नारायणदैवज्ञकृत.

# मुहूर्तमार्तंडः।

संस्कृत मार्तंडवल्लभा टीका

व

## सटीक मराठी भाषांतर

हें पुस्तक

विष्णु वासुदेव शास्त्री [illegible] यांनीं मराठींत केलें

तें

## बाळकृष्ण लक्ष्मण पाठक

यांनीं

'जगदीश्वर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १९०७ शके १८२९



किंमत १। रुपाया.

# प्रस्तावना.

सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ईश्वरानें प्राणिमात्रांच्या सुखाकरितां अनंत साधनें केलीं आहेत आणि त्यांत पुढें होणाऱ्या सुखाचें साधन ज्योतिषा वांचून दुसरें कोणतेंच नाहीं. व आपल्या हिंदुधर्माचे प्रवर्तक जे वेद त्यांतहि हें ज्योतिष एक अंग गणिलें आहे, परंतु कालगतीनें गीर्वाण भाषेचें ज्ञान कमी होत जाऊन त्या विषयीं अज्ञान मात्र वाढलें व सर्व लोकांस या आर्यभाषेंत असलेल्या ग्रंथांचा खरा हेतु काय आहे हें समजण्यास कठीण पडतें; करितां ही अडचण दूर व्हावी ह्मणून 'मुहूर्त मार्तंडाची' मराठी भाषेंत स्पष्ट व साधार अशि भाषांतर रूपानें व्याख्या केली आहे.

आतां आजपर्यंत संस्कृत ग्रंथांचीं मराठींत भाषांतरें अनेक झालीं आहेत व या "मुहूर्त मार्तंडाचेंही" भाषांतर अनेकांनीं अनेक प्रकारचें केलें आहे परंतु मूळ श्लोकांतील गूढार्थ किंवा सांकेतिकार्थ स्पष्ट दाखविणारी जी 'टीका' तिचा अर्थ स्पष्ट रीतीनें कोणीच केला नाहीं. करितां श्लोकार्थ आणि टीकार्थ निरनिराळे करून सर्व लोकांस सहज जाणतां यावें ह्मणून हें मराठी भाषांतर केलें आहे.

ह्या ग्रंथांत १३ प्रकरणें असून श्लोक १६० आहेत. मनुष्याची कोणतीही कृति निर्दोष होत नसते व ज्याचे त्याला दोषही दिसत नाहींत. ह्याकरितां विद्वानांला गुण ग्रहण करून दोष कळविण्याविषयीं माझी सविनय प्रार्थना आहे, त्यांनीं ह्या ग्रंथांत असलेले दोष मला अवश्य कळवावे, ह्मणजे पुढील आवृत्तींत काढून टाकितां येतील.

ह्या प्रसिद्ध मुहूर्तमार्तंड ग्रंथाचा कर्ता देवगिरी ( दौलताबाद ) जवळील प्रसिद्ध घृष्णेश्वर ज्योतिर्लिंग ज्यास सांप्रत वेरूळ ह्मणतात, त्याचे उत्तरेस नजीकच टापरगांवचा राहणारा माध्यंदिनशाखीय कौशिक गोत्री 'हरि' ह्याचा पुत्र 'अनंत' अनंताचा पुत्र 'नारायण' दैवज्ञ यानें हा ग्रंथ शके १४९३ त केला असें ग्रंथकारानें ग्रंथाचे शेवटीं सांगितलें आहे, ह्यावरून आज या ग्रंथाला तीनशें छत्तीस वर्षें झालीं. व ह्या ग्रंथकारानेंच आपल्या ग्रंथावर 'मार्तंडवल्लभा' नांवाची टीका केली आहे. ग्रंथकर्त्याची टीका असल्यामुळें ग्रंथांतील आशय स्पष्ट न झाल्याचा संशय घेण्यास जागा नाहीं.

भाषांतरकर्ता.

॥ श्री ॥

# ॥ अथ मुहूर्तमार्तंडस्य विषयानुक्रमणिका प्रारभ्यते ॥

**॥ इत्यनुक्रमणिका समाप्ता ॥**



## ॥ श्रीः ॥

# ॥ मुहूर्तमार्तण्डः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अविघ्नमस्तु ॥ मार्तंडोऽवतु वाचं नः पादैर्जाड्यतमोहरः ॥ वृत्तबद्धतनुः सेव्योऽभीष्टदो विश्वलोचनः ॥१॥ अर्थद्वयवाची ॥ तत्र प्रथमं सूर्यपक्षे। मार्तंडः श्रीसूर्यः नोऽस्माकं वाचं अवतु रक्षतु । किं लक्षणो मार्तंडः । वृत्तबद्धतनुः वृत्ते मंडले बद्धा तनुर्यस्य स तथा। तथाच स्मृतौ। सशंखचक्रं रविमंडले स्थितं कुशेशयाक्रांतमनंतमच्युतमित्यादि । श्रुतिरपि। य एष तस्मिन् मंडले पुरुषः सोऽग्निरित्यादि । पुनः किंलक्षणः पादैः किरणैर्जाड्यतमोहरः जाड्यं पातकं शीतं वा तमोऽधकारस्तद्धरतीति तथा । पुनः किं० सेव्यः सेवितुं योग्यः अभीष्टफलदातृत्वात्। पुनः किं० अभीष्टदः सेवितः सन्नभीष्टार्थदायीत्यर्थः । पुनः कथंभूतः । विश्वलोचनः विश्वंलोच्यतेऽनेनेति विश्वलोचनः लोकचक्षुर्ग्रहेश्वरमित्यादित्यहृदय उक्तत्वात् । अथ ग्रंथपक्षे । मार्तंडो मुहूर्तमार्तंडः नः वाचं अवतु । किंल० वृत्तबद्धतनुः वृत्तानि प्रहर्षिणीशार्दूलविक्रीडितादीनि तैर्निबद्धा तनुर्यस्यस तथा । पुनः किं० पादैर्जाड्यतमोहरः पादैर्वृत्तचरणैर्जाड्यं मूर्खत्वं तदेव तमः तद्धरतीति तथा । पुनः किं० सेव्यः निरंतरं पठनीय इत्यर्थः । पुनः किं० अभीष्टदःयथोक्तमुहूर्तव्युत्पत्तिकरणादभीष्टार्थ सिद्धिकारीत्यर्थः । पुनः किं० विश्वलोचनः समयप्रकाशकत्वात् कुर्वे मुहूर्तमार्तंडटीकांमार्तंडवल्लभाम् इयमाकल्पमेतेन दीव्याद्विप्रास्यवेश्मसु ॥ २ ॥ इह शास्त्रे तावत्संबंधाभिधेयप्रयोजनान्युच्यंते । आब्रह्मादिविनिःसृतमिदं वेदांगमिति संबंधः । उक्तं च नारदमुनिना स्वसंहितायां वेदस्य निर्मलं चक्षुर्ज्योतिःशास्त्रमनुत्तमं । अस्य शास्त्रस्य संबंधो वेदांगमिति धातृत इति ॥ अत्राप्युक्तं । पूर्ववाक्यार्थमादाय ग्रंथोऽयं रचितो लघुरिति ॥ त्याज्यनक्षत्राद्यतुलग्नगोचरगर्भाधानादिसंस्कारविवाहाग्न्याधानवास्तुयात्रामिश्रानध्यायपल्लीग्रहगोचरसंक्रांतिकथनमभिधेयं तथाच नारदः । अभिधेयं च जगतः शुभाशुभनिरूपणमिति । अस्य प्रयोजनं मुहूर्तैर्नानाकार्यसाधनं अस्य सम्यग्ज्ञानान्मोक्षावाप्तिरिति वा । किमेभिरुक्तैरित्यत्रोच्यते। नृणां संबंधाभिधेयप्रयोजनकथनाच्छास्त्रप्रवृत्तिर्जायते । उक्तंच । सिद्धिः श्रोतृप्रवृत्तीनां संबंधकथनाद्यतः । तस्मात् सर्वेषु शास्त्रेषु संबंधः पूर्वमुच्यते ॥ किमेवात्राभिधेयं स्यादिति पृष्टस्तु केनचित् । यदि न प्रोच्यते तस्मै फलं शून्यं तु । तद्भवेत् सर्वस्यैव हि शास्त्रस्य कर्मणो वाऽपि कस्यचित् । यावत्प्रयोजनं नोक्तं तावत्केन न गृह्यत इति ॥ इह शास्त्रे कस्याधिकार इति प्रोच्यते द्विजस्यैव वेदांगत्वात् । यतः षडंगो वेदो हि द्विजैरेवाध्ययनीयो ज्ञातव्यश्च । तथाचोक्तं भास्करीयसिद्धांतशिरोमणौ । तस्माद्द्विजैरध्ययनीयमेतत्पुण्यं रहस्यं परमं पवित्रं । यो ज्योतिषं वेत्ति नरः स सम्यग्धर्मार्थमोक्षान्लभते यशश्चेति । शिष्टास्तावच्छास्त्रारंभे सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृता इति शास्त्रेण सर्वारंभेष्वंतरायप्राप्तैः सत्यांधर्मेणपापमपनुदतीति श्रुतिसिद्धं प्रयोजनमास्थाय स्वस्ति न इंद्रो वृद्धश्रवा इति श्रुतिलिंगाच्च। ग्रंथस्य निष्प्रत्यूहपरिसमाप्तये मंगलमाचरंति । तस्मान्माध्यंदिनीयो ब्राह्मणो नारायणो नारायणाच्चावाप्तमतिर्ज्योतिःशास्त्रसंहितास्कंधं चिकीर्षुरशेषप्रत्यूहोपशांतयेऽभिमतदेवतानमस्कारलक्षणमंगलपूर्वकं ग्रंथकरणप्रतिज्ञां प्रहर्षिण्याऽऽह——

**टीकार्थ**—ज्यानें आपलें शरीर मंडलामध्यें बांधलें आहे तोच अर्थ स्मृतींत सांगितला आहे कीं, रविमंडलामध्यें शंखचक्राला धारण करणारा, कमलानें आक्रांत असलेला अनंत अच्युत भगवान् आहे. तसेंच श्रुतांतही सांगितलें आहे कीं, जो हा पुरुष रविमंडलामध्यें आहे तो अग्नि आहे तो मार्तंड आपल्या किरणांनीं पातक आणि थंडी ह्यांचा नाश करणारा, तो सेवा करावयाजोगा आहे कारण कीं, तो इच्छित फल देणारा आहे. सेवा केली असतां इच्छित देणारा आहे.

ज्याच्या योगानें सर्व विश्व पाहतां येतें असा,असाच अर्थ आदित्यहृदय ग्रंथांत सांगितला आहे.तो सूर्य आमची वाणी रक्षण करो. आतां ह्याचा मार्तंड ग्रंथाकडे लागणारा दुसरा अर्थ असा कीं, ज्याचें शरीर प्रहर्षिणी, शार्दूलविक्रीडित इत्यादि वृत्तांनीं बांधिलें ह्मणजे रचिलें आहे. ज्याच्या पादांनीं ह्मणजे श्लोकांच्या चरणांनीं जाड्य ह्मणजे मूर्खपणा हाच एक आंधार त्याचा नाश होतो. जो नेहमीं सेवन करण्याजोगा ह्मणजे पाठ करण्याजोगा आहे. जो इच्छित देणारा आहे ह्मणजे, यथायोग्य मुहूर्त सांगण्याची व्युत्पत्ति करणारा आहे ह्मणजे त्यापासून इच्छा पूर्ण होतात. तो विश्वांचा प्रकाशक आहे. कारण, ह्यापासून समयाचें प्रकाशन होतें ॥ १ ॥ ही मुहूर्तमार्तंडाची 'मार्तंड वल्लभी' ह्या नांवाची टीका करीत आहें ही कल्पकाळपर्यंत ब्राह्मणांच्या मुखरूपी घरामध्यें प्रकाश करो ॥ २ ॥

आतां ज्योतिष शास्त्रांत संबंध,जें आतां सांगावयाचें तें, आणि प्रयोजनेंही सांगतों तीं अशीं कीं,ब्रह्मदेव इत्यादिकांच्या सृष्टीचे आरंभींच हें ज्योतिःशास्त्र वेदांबरोबरच परमात्म्यापासून बाहेर निघालें आणि तें वेदांचें अंगही आहे हा संबंध झाला हींच गोष्ट नारद मुनींनीं आपल्यासहि तें सांगितलें आहे ती अशी कीं, वेदाचें निर्मल चक्षु हें ज्योतिःशास्त्र आहे, ह्याहून उत्तम दुसरें कोणतें ही शास्त्र नाहीं. हें शास्त्र वेदाचें अंग आहे, ह्मणून तें विधात्यापासून निघालें आहे. येथेंही सांगितलें आहे कीं, पूर्वीचे वाक्यार्थ घेऊन हा लहानसा ग्रंथ मी रचिला आहे असा हा संबंध आहे ह्यामध्यें, त्याज्य नक्षत्रादि, ऋतु, लग्न, गोचर, गर्भाधान, इत्यादि संस्कार, विवाह, अग्न्याधान, वास्तु, यात्रा, मिश्र, अनध्याय, पल्ली, ग्रहगोचर,संक्रांति ही सांगितलीं आहेत. हें अभिधेय सांगितलें. तेंच नारदमुनींनीं सांगितलें आहे कीं, जगाचें शुभ आणि अशुभ ह्या दोहोंचें निरूपण आहे. ह्या ग्रंथाचें प्रयोजन असें कीं. मुहूर्त समजल्यावर मग नाना प्रकारचीं कार्यें करावयाचीं हें आहे. ह्याचें उत्तम ज्ञान झाल्यापासून मोक्षप्राप्ति आहे. संबंध, अभिधेय, आणि प्रयोजन हीं सांगून काय उपयोग अशी शंका कोणी करील तर त्याचें उत्तर असें कीं, तीं सांगितल्यानें शास्त्रांत प्रवृत्ति होते. एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, संबंध सांगितल्यापासून श्रोत्यांची प्रवृत्ति होऊन त्यापासून प्रसिद्धि होते ह्मणून सर्व शास्त्रांमध्यें अगोदर संबंध सांगितला जातो ह्या शास्त्रांत काय सांगितलें आहे? असें जर कोणी विचारिलें आणि त्याला उत्तर दिलें नाहीं तर तें फल शून्य व फुकट आहे असें होतें ह्मणून सर्वही शास्त्रांचें आणि कोणत्याही कर्माचें प्रयोजन जोंपर्यंत सांगितलें नाहीं तोंपर्यंत तें कोणीही घेणार नाहीं.करितां कोणत्याही शास्त्रांत संबंधादि सांगणें जरूर आहे. शास्त्र शिकण्यास अधिकारी कोण आहे तर द्विज ह्मणजे ब्राह्मणच आहे. कारण हें शास्त्र वेदांग आहे. कारण, साहा अंगासहित वेद द्विजांनींच शिकावा. व जाणावा तेंच भास्कराच्या सिद्धांतशिरोमणि ग्रंथांत सांगितलें आहे कीं, हें उत्तम पुण्यकारक, फारच रहस्य, परमपवित्र ज्योतिःशास्त्र द्विजांनीं शिकावें. जो मनुष्य हें जाणतो तो उत्तम रीतीनें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष अशा चार पुरुषार्थांना आणि यशाला मिळवितो.

सर्व शिष्ट, पुरुष, शास्त्रांचे आरंभीं, जसा अग्नि हा धुरानें घेरलेला असतो तसे सर्व आरंभ दोषांनीं व्यापलेले असतात. ह्या कारणास्तव सर्व आरंभामध्यें विघ्न येण्याचें फार भय असतें आणि धर्मानें पापांचा नाश होतो असें श्रुतींत सांगितलें आहे व ती श्रुति अशी कीं, कांहीं प्रयोजन उद्देशून आमचें स्वस्ति क्षेम वृद्धश्रवा नांवाचा इंद्र करो। अशी प्रार्थना आहे. ग्रंथाची निर्विघ्नपणें समाप्ति व्हावी ह्याकरितां मंगलाचरण करितात. ह्मणून माध्यंदिन शाखेचा नारायण नांवाचा ब्राह्मण , श्रीनारायणाचा सुत ज्याला उत्तम बुद्धि मिळाली आहे असा हें ज्योतिःशास्त्राच्या संहितास्कंधाला रचण्याची इच्छा करणारा संपूर्ण विघ्नांचा नाश व्हावा ह्याकरितां आपल्या इष्ट देवतेला नमस्कारात्मक मंगल करून मग ग्रंथ करण्याची प्रतिज्ञा प्रहर्षिणीनामक वृत्तानें करीत आहे.

## मंगलाचरण. ( प्रहर्षिणी. )

**सिंदूरोल्लसितमिभेंद्रवक्त्रमंबां श्रीविष्णुं वियतिचरान् गुरून्प्रणम्य ॥**
**बह्वर्थं विबुधमुदे लघुं मुहूर्तमार्तंडं सुगममहं तनोमि सिद्ध्यै ॥ १ ॥**

श्लोकार्थ——शेंदूरानें सुशोभित असलेल्या अशा गजेंद्राप्रमाणें मुख असलेल्या श्रीगणपतीला, श्रीसरस्वतीला, लक्ष्मीसहवर्तमान असलेल्या महाविष्णूला. गगनांत संचार करणाऱ्या श्रीसूर्य इत्यादि नवग्रहांना, शास्त्रोपदेश करणाऱ्या गुरूंना नमस्कार करून ग्रंथ करणारा मी दैवज्ञ नारायण कार्यसिद्धीसाठीं आणि विद्वान् लोकांना आनंद व्हावा ह्यास्तव पुष्कळ अर्थ असून संख्येनें लहान व सुलभ असा हा मुहूर्तमार्तंड नांवाचा ग्रंथ रचीत आहें ॥ १ ॥

**सिंदूरोल्लसितमिति । सिंदूरेण उल्लसितं शोभायमानं इभेंद्रवक्त्रं गजाननं अंबां सरस्वतीं श्रीविष्णुं प्रसिद्ध वियतिचरान् ग्रहान् गुरून् निजगुरून् शास्त्रोपदेष्टॄन् प्रणम्य नमस्कृत्वाऽहं नारायणो मुहूर्त-**

मार्तंडं नाम ग्रंथं तनोमि विस्तारयामि किमर्थं सिद्ध्ये कार्यसाधनाय पुनः किमर्थं विबुधमुदे पंडित हर्षाय हर्षकारणं विशेषणद्वारेणाह किंलक्षणं मुहूर्तमार्तंडं लघुं अतिशयेनाल्पं अल्पे बह्वर्थाभावशंका विशेषणद्वारा परिहरति पुनः किंलक्षणं बह्वर्थं अर्थबहुलं अल्पग्रंथे बह्वर्थे दुर्बोधशंकां परिहरति पु० सुगमं प्रकटार्थमिति ॥ १ ॥

## त्याज्यप्रकरणं १

### शुभकर्मीं त्याज्य. ( शार्दूलविक्रीडित. )

यामार्धं कुलिकं दिनर्द्धिभवमं पूर्वं दलं पारिघम् ।
विष्टिं वैधृतिपातसंक्रमगणं गंडांतमेकार्गलम् ॥
कृष्णानंगचतुर्दिनं रविशशिक्रान्त्योः समत्वं खलाम् ।
होरां रात्रिदिनार्धके क्षयदिनं पित्रोर्जनन्यार्तवम् ॥ १ ॥
मासाद्यं जनिसंभवं ग्रहणभं चंडायुधं दुःक्षणम् ।
ज्येष्ठं पूर्वभवस्य पापयुगितैष्यर्क्षाणि विद्धं च भम् ॥
ऊनाख्याधिकमासकौ युतिषुविष्क्याशूवगंडातिषु ।
त्र्यंकार्थांकरसर्तुपूर्वघटिका भानां विषाख्या घटीः ॥ २ ॥
लत्तापंचकपापवर्गमशुभं चंद्रं दशारिष्टकम् ।
जन्मेशेज्यसितास्तमंगशशिनोः क्रूरोद्भवां कर्तरीम् ॥
रिष्टं गोचरसंभवं ग्रहजनिप्रांतोद्भवं सूतकम् ।
दुश्चिह्नानि मनोविभंगमपि च व्याधिं शुभे संत्यजेत् ॥ ३ ॥

श्लोकार्थ—यामार्ध–ह्याचा अर्थ ( विवाह प्रकरणांत २० व्या श्लोकांत आहे ) कुलिक ( त्याच २० श्लोकांत ) तिथि वृद्धि, तिथि क्षय, परिघयोगपूर्वार्ध, भद्रा, करण, ( विवाह प्र० १८ श्लोकीं ) वैधृति, व्यतिपात, सूर्य, चंद्र, मंगळ ह्या अशा नऊ ग्रहांच्या संक्रांति, ( विवाह १७ श्लोकीं ) गंडांत ( विवाह १९ श्लोकीं ) एकार्गल ( त्याच श्लोकांत ) कृष्ण पक्षांतील १३–१४–३०–१ असे चार दिवस, सूर्य आणि चंद्र ह्यांचें क्रांतीचें समत्व, ज्याला महापात असें नांव आहे. ( विवाह २१ श्लोकीं ) पापी ग्रहांची होरा, ( विवाह ३२ श्लोकीं ) मध्य रात्रीचीं पूर्वींचीं १० पळें व नंतरचीं १० पळें मिळून २० पळें तशींच दिवसाचे मध्यान्हीचीं २० पळें, मातापित्यांचा श्राद्ध दिवस, माता रजस्वला असलेला दिवस ॥ १ ॥ जन्मकालचा मास, तिथि, नक्षत्र, योग इत्यादि, ग्रह, नक्षत्र, ( विवाह १७ श्लोकीं ) चंडायुध, ( विवाह १९ श्लोकीं ) दुःक्षण, ( विवाह २० श्लोकीं ) पहिल्या संतानाचा ज्येष्ठ महिना, पापग्रह युक्त नक्षत्र तें व त्याचे मागचें एक व पुढचें एक मिळून तीन नक्षत्रें, विद्ध नक्षत्र, ( विवाह १५ श्लोकीं, ) क्षय महिना, आणि अधिक महिना, ( संक्रांति प्रकरणाचे २ श्लोकीं ) विष्कंभ, व्याघात, शूल, वज्र, गंड, अतिगंड ह्या सहा योगांच्या आरंभींच्या क्रमानें ३–९–५–९–६–६ घटिका, नक्षत्रांच्या विष घटिका ( विवाह २२ श्लोकीं ) ॥ २ ॥ लत्ता ( विवाह प्र० १६ श्लोकीं ) पंचक ( विवाह प्र० २९ श्लोकीं ) पापग्रहांचे वर्ग, ( विवाह ३५ श्लोकीं ) गोचरी असलेला अशुभ चंद्र, ( गोचर प्रकरण १ श्लोकीं,) जातकामधील अरिष्ट करणाऱ्या अशा ग्रहांची दशा, जन्म राशीचा स्वामी आणि गुरु व शुक्र यांचा अस्त, लग्नास आणि चंद्रास पापग्रहापासून झालेली कर्तरी, गोचर असलेल्या दुष्ट ग्रहाचा अधिकपणा, चंद्राचें व सूर्याचें ग्रहण, जनना शौच ( वृद्धि ) मरणाशौच ( मरणाचें सूतक ) शिंक येणें, दुष्ट भाषण, अपशकुन इत्यादि दुश्चिन्हें, कार्य करण्याविषयीं मनाचा भंग, आणि ज्वर इत्यादि रोग हीं सर्व शुभ, कार्य करण्याचे वेळीं सोडून द्यावींत ॥ ३ ॥

अथ नानामुहूर्तान् विवक्षुस्तावच्छुभे कर्मणि त्याज्यं त्रिभिः शार्दूलविक्रीडितैराह-यामार्धमिति । यामार्धादिकं शुभे शुभकर्माणि संत्यजेदित्यंतिमश्लोकेनान्वयः । यामार्धकुलिकौ वक्ष्यमाणलक्षणौ दिनर्द्धिर्नाम यत्र तिथिः सूर्योदयात् पष्टिघटिका भवति सैवान्यस्मिन् दिने दृश्यते सा दिनर्द्धिः । अवमः प्रसिद्धः पारिघं प्राग्दलं परिघयोगस्य पूर्वार्धं विष्टिर्भद्रा वक्ष्यमाणा वैधृतियोगः पातो व्यतीपातः संक्रमगणं सूर्यादीनां राशिसंक्रमणं सर्वेषां ग्रहाणां संक्रमणे त्याज्यघटिका अग्रे वक्ष्यमाणाः गंडांतं त्रिविधं वक्ष्यमाणं एकार्गलो वक्ष्यमाणः कृष्णानंगचतुर्दिनं कृष्णत्रयोदश्यादिप्रतिपदंतं चंद्रस्य क्षीणत्वात् केश्चिद्द्वादश्यादिसार्धदिनपंचकं त्यज्यते कृष्णे चांत्यत्रिकं केश्चित् तेषु मध्यमोऽयं पक्षोऽत्रां-गीकृतः कृष्णानंगचतुर्दिनमिति । रविशशिक्रांत्योः समत्वं सूर्यचंद्रमसोः क्रांतिसाम्यं गणितगम्यं तथापि तस्यावलोकनं कस्मिन्दिने कर्तव्यमित्यग्रे वक्ष्यति । खलां होरां पापग्रहहोरां रात्रिदिनार्धके दिनार्धे रात्र्यर्धे च उक्तं ग्रंथांतरे । मूर्तः कालो निवसति महानिशायां च दिनदले यस्मात् । दश पूर्वं दश परतस्तस्माद्वर्ज्यानि च पलानीति ॥ क्षयदिनं पित्रोः माता च पिता च पितरौ तयोः पित्रोः क्षय-दिनं श्राद्धदिनमित्यर्थः जनन्यार्तवं मातुः रजस्वलात्वम् ॥ १ ॥ मासाद्यमिति । मासाद्यं जनिसंभवं जनि-रुत्पत्तिस्तत्र संभवो यस्य एवं विधं मासाद्यं मासप्रभृति जन्ममासजन्मतिथिजन्मनक्षत्रादि ग्रहणभं ग्रहणनक्षत्रं चंडायुधं वक्ष्यमाणं दुःक्षणो दुर्मुहूर्तो वक्ष्यमाणः तं । ज्येष्ठं पूर्वभवस्य प्रथमजातापत्यस्य ज्येष्ठमासं पापयुगितैष्यर्क्षाणि पापाः पापग्रहाः वक्ष्यमाणास्तेषामन्यतमेन युक् युक्तं इतं गतं एष्यं पुरः स्थितं एतानि ऋक्षाणि नक्षत्राणि विद्धं भं च विद्धनक्षत्रं वक्ष्यमाणलक्षणं ऊनाख्याधिकमासकौक्षयमा साधिमासौ वक्ष्यमाणलक्षणौ युतिषु विव्याशुभगंडातिषु त्र्यं ३ का ९ र्थौ ५ क ९ रस ६ तु ६ पूर्वघटि काः वि विष्कंभः व्या व्याघातः शू शूलः व वज्रः गंडः प्रसिद्धः अति अतिगंडः एषु योगेषु क्रमेण त्र्यंका-र्थांकरसर्तुसंख्याकाः पूर्वघटिकाः प्रथमघटिकाः । तद्यथा विष्कंभे तिस्रः व्याघातेऽका नव शूले अर्थाः पंच वज्रे अंकाः नव गंडे रसाः षट् अतिगंडे ऋतवः षडिति भानां विषाख्या घटीः भानां अश्विन्यादी-नां नक्षत्राणां विषाख्या घटीर्वक्ष्यमाणलक्षणाः ॥ २ ॥ लत्तेति । लत्तापंचकपापवर्गं एतत्सर्वं वक्ष्यमाणं अशुभं चंद्रं वक्ष्यमाणगोचरप्रकरणे वेधं दशारिष्टकं जातकशास्त्रगम्यं जन्मेशेज्यसितास्तं जन्मेशो राशिस्वामी ईज्योगुरुः सितः शुक्रः एषां अस्तगमनं रविलुप्तकिरणत्वं अंगशशिनोः क्रूरोद्भवां कर्तरीं अंगं लग्नं शशी चंद्रः तयोः क्रूरोद्भवां क्रूरग्रहजनितां कर्तरीं वक्ष्यमाणलक्षणां रिष्टं गोचरसंभवं गोचरे दुष्टग्रहाधिक्यं गोचरं वक्ष्यमाणं ग्रहजनिप्रांतोद्भवं सूतकं ग्रहो ग्रहणं जनिर्जन्म प्रांतो मरणं एभ्यः उद्भूतं सूतकं ग्रहणसू-तकं जन्मसूतकं मृतसूतकमिति तेषु ग्रहणसूतकं वक्ष्यमाणं दुश्चिन्हानि कार्यारंभसमये क्षुतदुर्वचःश्रवणा-दीनि मनोविभंगं अंतःकरणस्य अप्रवर्तनं व्याधिर्ज्वरः तमपि रोगः पाप्मा ज्वरो व्याधिर्विकारो दुःखमाम यइतिवाग्भटः । ज्वरितस्य मंगलं न कुर्यादित्यर्थः । तथा चोक्तं ज्योतिःप्रकाशे । जन्माधिपविलग्नेशचंद्र भार्गव मंत्रिणां । विरश्मित्वं जन्ममासोजन्मभं जन्मवासरः ॥ दुर्निमित्तं मनोभंगः क्षयमासाधिमासकौ । मृतजातकयोश्चैव सूतकं ग्रहणस्य च ॥ ज्वरोत्पत्तिं रजो मातुः पित्रोः क्षयदिनं तथा । गंडांतत्रितयं कालः संधिर्भस्य तिथेस्तनोः । क्रांतिपातो व्यतीपातो वैधृतिः परिघार्धकं । भानोःसंक्रांतिभोगश्च कुलिकश्चार्धयामकः ॥ क्रूरैर्भुक्तं युतं भोग्यं सराहुशिखिधूमितं । धिष्ण्यं ग्रहणगं पापैर्विद्धं सौम्यैश्च पादतः ॥ विष्टीः क्रूरयुतं लग्नं लग्नेशो रिपुमृत्युगः । जन्मतो दुःस्थितचंद्रो लग्नस्थे निधनोपगः । जन्म-भाज्जन्मलग्नाच्च लग्नलग्नांशकाष्टमौ ॥ पापयोर्मध्यगं लग्नं क्षीणेंदुः कुनवांशकः । क्रूरवारे पापहोरादुष्ट योगा ग्रहोद्भवाः । तिथिवृद्धिः क्षयो भानां नाडिका विषसंज्ञिता ॥ एते दोषाः समाख्याताः शुभ कर्मणि गर्हिताः ॥ दशारिष्टोद्भवाश्चान्ये गोचरोत्थास्तथापरे । लत्तैकार्गलचंडास्त्रकालवेलाश्चपंचकम् । मृत्युयोगोपग्राहाद्याःस्वे स्वे देशे तु निंदिता इति ॥ ३ ॥

**टीकार्थ—**आतां नाना प्रकारचे मुहूर्त सांगण्याकरितां इच्छा करणारा ग्रंथकार अगोदर शुभकारक कर्म करण्या-करितां सोडावयास योग्य काय आहे तें तीन शार्दूलविक्रीडित वृत्तांनीं सांगतो. यामार्धादिक शुभ कर्माविषयीं सोडावेत असा अन्वय आहे. पैकीं यामार्ध व कुलिक हे दोन पुढें विवाह प्रकरणाचे वीसाव्या श्लोकांत सांगावयाचे आहेत. दिनर्द्धि ह्मणजे दिनवृद्धि त्याचा अर्थ असा कीं, ज्या वेळेस तिथि ही सूर्योदयापासून साठ घटिका येऊन पुनः तीच तिथि दुसरे दिवसास उरते. तिला दिनवृद्धि ह्मणावें अवम ह्म० नाश अर्थात् तिथीचा क्षय तो प्रसिद्ध आहे. परिघनामक योग आहे त्याचे पूर्वार्ध विष्टि ह्मणजे भद्रा पुढें विवाह प्रकारचे अठरावे श्लोकांत सांगितली आहे. वैधृति नांवाचा योग, पात ह्म० व्यतिपात

संक्रमण ह्म० सूर्य चंद्र इत्यादि ग्रहांचें एका राशीवरून दुसऱ्या राशीवर जाणें त्या वेळेस किती घटका टाकाव्यात तें विवाह प्रकरणाचे सतराव्या श्लोकांत सांगितलें आहे. गंडांत तीन प्रकारचे आहेत तें विवाह प्र० एकोणिसाव्या श्लोकांत सांगावयाचें आहे. एकार्गल त्याज्य प्र० त्याच श्लोकांत सांगावयाचा आहे. कृष्ण पक्षांतील त्रयोदशी, चतुर्दशी, अमावास्या व शुद्ध प्रतिपदा हे चार दिवस वर्ज्य आहेत कारण त्या वेळेस चंद्रमा फारच क्षीण असतो. कित्येकांचे मतानें द्वादशीपासून साडेपांच दिवस त्याज्य आहेत. दुसऱ्या कित्येकांच्या मतानें कृष्ण पक्षांतील शेवटले तीनच दिवस त्याज्य आहेत. त्या तीन पक्षांपैकीं येथें मध्यम पक्षाचा स्वीकार केला आहे, सूर्य आणि चंद्र क्रांतीचें समत्व हें गणितानें समजण्याजोगें आहे. तथापि तें कथीं पाहावें हें पुढें विवाह प्रकरणाचे एकविसावे श्लोकांत सांगावयाचें आहे. पापग्रहांची होरा हीं पुढें विवाह प्रकरणाचे बत्तिसाव्या श्लोकांत सांगावयाची आहे.

दिनार्ध व राज्यर्ध ह्यांचा अर्थ दुसऱ्या ग्रंथांत असा सांगितला आहे कीं, महाकाळ हा मूर्तिमान् मध्यरात्रीं व मध्यान्हीं रहात असतो ह्यास्तव बारा वाजावयाचे पूर्वी दहा पळें आणि बारा वाजल्यावर दहा पळें मिळून वीस पळें, तशीच दिवसाचे बाराचे पूर्वी दहा पळें आणि बारा नंतर दहा पळें मिळून वीस पळें सोडावीत. माता पिता ह्या दोघांचे प्रतिवार्षिक श्राद्धाचा दिवस. मातेचे रजस्वलाचे दिवस. चार सोडावेत. ॥ १ ॥

जन्म कालचा मास इत्यादि ह्मणजे जन्ममास, तिथि, जन्मतिथि, जन्मनक्षत्र, जन्मयोग, इत्यादि ग्रहणनक्षत्र हें पुढें विवाह प्रकरणाचे सतराव्या श्लोकांत सांगावयाचें आहे. चंडायुध हें पुढें विवाह प्रकरणाचे एकोणिसाव्या श्लोकांत सांगावयाचें आहे. दुःक्षण ह्मणजे. दुष्ट मुहूर्त तो कोणता हें त्याच प्रकरणाचे विसाव्या श्लोकांत सांगावयाचें आहे. प्रथम झालेला अपत्याचा ज्येष्ठमास असेल तर तो सोडावा. पापग्रह हे पुढें सांगावयाचे आहेत ते सोडावेत आणि त्यांपैकीं एखाद्या पापग्रहानें युक्त असें, मागील एक नक्षत्र व पुढील एक नक्षत्र अशीं तीन नक्षत्रें सोडावींत. विद्ध नक्षत्र हें पुढें विवाह प्रकरणाचे पंधराव्या श्लोकांत सांगावयाचें आहे. क्षयमास आणि अधिकमास हे दोन पुढें संक्रांतीचे प्रकरणांत २ श्लोकांत सांगावयाचे आहेत. वि. ह्म. विष्कंभ, व्या. ह्म. व्याघात, शू. ह्म. शूल, व. ह्म. वज्र, गं. ह्म. गंड, अति. ह्म. अतिगंड, ह्या साहा योगांच्या क्रमानें त्रि. ह्म. ३, अंक. ह्म. ९ अर्थ. ह्म. ५ अंक. ह्म.९ रस. ह्म. ६ ऋतु ह्म.६ अशा आरंभाच्या घटिका टाकाव्यात. ह्या घटिकांना विष असें नांव आहे. अश्विनी इत्यादि नक्षत्रांच्या कोणत्या विषघटि आहेत तें विवाह प्रकरणाच्या बाविसाव्या श्लोकांत सांगावयाचें आहे. ॥ २ ॥ लत्ता ही पुढें विवाह प्रकरणाचे सोळाव्या श्लोकीं सांगावयाची आहे. पंचक ह्म. पापग्रहांचे वर्ग हें ही विवाह प्रकरणाचे ३५ व्या श्लोकांत सांगावयाचें आहे. गोचर अशुभचंद्र हा गोचर प्रकरणांत १ श्लोकीं सांगावयाचा आहे तो त्याज्य आहे. जातक शास्त्रावरून जाणलेली ग्रहांची अरिष्ट कारक दशा. जन्म राशीचा स्वामी, गुरु व शुक्र ह्यांचा अस्त ह्मणजे सूर्याच्या तेजानें त्यांचें तेज लुप्त होणें. सूर्य आणि चंद्र ह्या दोघांनीं पापग्रहानें झालेला कर्तरी ह्मणजे लग्नाचे दोहों बाजूस व चंद्राचे दोहोंबाजूस पापग्रह असतील तर ती पापकर्तरी जाणावी. तिचें सर्व लक्षण पुढें सांगावयाचें आहे. गोचरामध्यें दुष्ट ग्रह अधिक असतील तर ते सोडावेत. तेंही पुढें सांगावयाचें आहे. ग्रहण वृद्धि ( सोयर ) आणि सूतक हीं तीन सोडावींत पैकीं ग्रहणाचें सूतक पुढें सांगावयाचें आहे कामाचे आरंभीं दुश्चिन्हें झाल्यास तीं सोडावींत तीं दुश्चिन्हें अशीं कीं, शिंका, दुष्ट भाषण ऐकणें इत्यादि मनाचा भंग ह्मणजे अंतःकरणाची प्रवृत्ति न होणें व्याधि ह्म० ज्वर कारण, वाग्भट्टानें सांगितलें आहे कीं, रोग हा पापी असून तो व्याधि आहे व तो विकार आहे. तो दुःख आहे तो आमय आहे. ज्वर आलेल्यानें मंगल करूं नये असा निषेध आहे. हा सर्व प्रकारच अर्थ ज्योतिःप्रकाशग्रंथांत सांगितला आहे तो असा कीं, जन्म स्वामी, लग्न स्वामी, चंद्र, गुरु, शुक्र, ह्यांचा अस्त, जन्ममास, जन्म नक्षत्र, जन्म दिवस, दुष्टनिमित्तें, मनाचा भंग, क्षयमास, अधिकमास, मरणाशौच, जननाशौच, ग्रहणाचें सूतक, माता व पित्याचे मरण दिवस, तीन गंडांत, कालाचा संधिसमय, राशीचा, तिथीचा, तनूचा क्रांतिपात, व्यतिपात, वैधृति, परिघार्ध, सूर्यसंक्रमण कुलिक, अर्धग्राम, क्रूरानें युक्त, भोगलेलें, भोग्य अशीं तीन नक्षत्रें, राहुसहित शिखीनें धूमित, ग्रहणाचे संबंधी पापांनी युक्त, सौम्यांनीं पादांशीं युक्त, विष्टि, क्रूरयुक्त लग्न, लग्नाधिपति शत्रुआणि मृत्युस्थानीं असलेला, जन्मकालीं चंद्र दुःस्थित असलेला लग्नस्थ असून मृत्युस्थानीं असलेला, जन्म राशीपासून अथवा जन्मलग्नापासून लग्न आणि लग्नांशकाचा अष्टम ह्या दोन पापग्रहांच्या मध्यें असलेलें लग्न, क्षीणचंद्र, कुनवांशक, क्रूरवार, पापहोरा, दुष्ट ग्रहा पासून झालेले दुष्ट योग, तिथिवृद्धि, दिनक्षय, नक्षत्रांच्या विषयुक्त घटिका हे सर्व दोष शुभकर्म करण्यामध्यें निंद्य ह्मणजे अग्राह्य असें सांगितलें आहे. रिष्टदशेपासून झालेले गोचर ग्रहापासून झालेले दोष, लत्ता, अर्गल, चंड, अस्त्र, कालवेला, पंचक, मृत्युयोग, उपग्रह, इत्यादि दोष आपापल्या दशामध्येंच निंदित आहेत. ॥ ३ ॥

## उपग्रहदोष.

**नो कुर्योद्दविभादगेंद्रधृतितोयुग्मेषुपंचाशयोः ।**

स्वर्गात्पंचसु शोभनानि तनुयादेषूग्रशस्त्रादिकम् ॥
मासर्त्वायनवारयोगतिथिभादीनां च सिद्धाभिधा ।
ज्ञातव्याःपुनरुक्तिरस्ति कुहचित्सा तत्स्मृतिप्राप्तये ॥ ४ ॥
इति श्रीमदनंताख्यचातुर्मास्ययाजिपुत्रनारा० मु०
मा० त्याज्यप्रकरणम् ॥ १ ॥

श्लोकार्थ—ज्या नक्षत्रावर सूर्य आहे त्या नक्षत्रापासून ७–८–१४–१५–१८–१९–५–१०–२१–२२–२३–२४–२५ सातवे ह्यापासून तों २५ पंचवीसावें ह्यांपैकीं कोणतेंही नक्षत्र असेल तर त्या नक्षत्रावर शुभ कर्म करूं नये. शुभाचे विरुद्ध अशुभ ह्मणजे उग्र कर्में, जसें दहन, घात, पात इत्यादिक शस्त्रांपासून होणारीं कापण्याचीं कामें करावींत. दुसऱ्या ग्रंथांत मास, ऋतु, अयन, वार, योग, तिथि, नक्षत्र इत्यादिकांच्या ज्या जसजशा संज्ञा सांगितल्या आहेत त्याच संज्ञा येथेंही समजाव्यात. कदाचित् कोठें पुनः सांगितल्या आहेत ह्मणून पुनरुक्तिदोष आहे तो पूर्वी सांगितलेल्या विषयाच्या स्मरणाकरितां समजावा. ॥ ४ ॥

अथोपग्रहांतर्वर्तिदोषांतरं वृत्तार्धेनाह–नोकुर्यादिति । रविभात् सूर्याधिष्ठितनक्षत्रात् अगेंद्रधृतिमितानि यानि नक्षत्राणि तेभ्यो युग्मेषु एतदुक्तं भवति। सप्तमाष्टमयोः चतुर्दशपंचदशयोः अष्टादशैकोनविंशयोरिति तथा पंचाशयोः रविनक्षत्रात् पंचमदशमयाः तथा स्वर्गात्पंचसु एकविंशात्पंचसु नक्षत्रेषु २१।२२।२३।२४।२५ शोभनानि कर्माणि नो कुर्यात् एषु उग्रशस्त्रघातादिकं तनुयात् विस्तारयेत् कुर्यादित्यर्थः । उक्तंच । विद्युत्पंचमभेक्षितेश्च चलनं स्यात्सप्तमे सूर्यभाच्छूलश्चाष्टमभे शनिश्च दशमे केतुस्तथाऽष्टादशे । दंडः पंचदशे चतुर्दश इह प्रोक्तो निपातो बुधैरुल्काकालविदां गणैर्निगदिता चैकोनविंशेऽर्कभादिति ॥ दैवज्ञवल्लभेऽपि । क्रमशोमोहनिर्घातभूकंपा वज्र एव च । परिवेषश्च विज्ञेया नक्षत्रादेकविंशतेः ॥ एतेष्विदुसुतेषु कुर्यात्कर्म न शोभनं । दहनास्त्रविषैः साध्यं यत्तत्सिद्धिमुपैति चेति ॥ अन्यानपि दोषानग्रे प्रसंगतो वक्ष्यामि । अथास्मिन् ग्रंथे मासादीनां संज्ञा लोकसिद्धा ज्ञेया इति । तथा पुनरुक्तिनिर्दूषणं वृत्तार्धेनाह–मासर्त्वायनेति। मासाश्चैत्रादयः ऋतवो वसंतादयः अयने दक्षिणोत्तरे वाराः सूर्यादयः योगा विष्कंभादयः तिथयः प्रतिपदादयः भान्यश्विन्यादीनि इत्यादीनां करणराशिभावादीनां सिद्धाभिधाः शास्त्रांतरसिद्धाः संज्ञा ज्ञातव्याः । तथा इहास्मिन् ग्रंथे कुहचित्कुत्रचित् पुनरुक्तिर्वर्तते सातस्य दूरांतरितस्य स्मृतिप्राप्तये स्मरणायेति न दोषः ॥ ४ ॥ इति स्वोक्तमुहूर्तमार्तंडटीकायां मार्तंडवल्लभायां त्याज्यप्रकरणम् ॥ १ ॥

टीकार्थ—आतां उपग्रहांचे आंत असलेले दुसरे दोष अर्ध्या वृत्तानें सांगतो. ज्या नक्षत्रावर श्रीसूर्याचें अधिष्ठान आहे अशा नक्षत्रापासून अंग ह्म० ७ सातवें इंद्र ह्म० चवदावें धृति ह्म० अठरावें अशीं जीं नक्षत्रें त्यांपैकीं युग्मनक्षत्रावर हें सांगितलेलें होतें. सातवें आणि आठवें. चवदावें आणि पंधरावें. अठरावें आणि एकोणीसावें नक्षत्रामध्यें. तसेंच पांचवे आणि दहावें नक्षत्र हें सूर्यनक्षत्र असल्यामुळें पांचवे आणि दहावे नक्षत्रामध्यें शुभकर्म करूं नये, तसेंच स्वर्गापासून ह्म० एकवीसांपासून पुढें पांच ह्मणजे २१–२२–२३–२४–२५ ह्या नक्षत्रांवर शुभकर्में करूं नयेत. परंतु ह्या नक्षत्रांवर भयंकर शस्त्रादिकांचा घात करणें हें कर्म करावें. असें सांगितलें आहे कीं, सूर्य नक्षत्रापासून पांचव्या नक्षत्रावर विजेचा प्रहार होतो ह्मणून शुभकर्म करूं नये. सातव्या नक्षत्रावर पृथ्वीचें चलन होतें ह्मणून शुभकर्म करूं नये, आठव्या नक्षत्रावर शूल होतो ह्मणून शुभकर्म करूं नये. दहाव्या नक्षत्रावर शनि असतो ह्मणून शुभकर्म करूं नये. आठराव्या नक्षत्रावर केतु असतो ह्मणून शुभकर्म करूं नये. पंधराव्यावर दंड असतो. चवदाव्यावर पात असतो ह्मणून शुभकर्म करूं नये. तसेंच एकविसावे नक्षत्रावर शुभकर्म करूं नये असें उल्का आणि काल जाणणाऱ्या पंडितांनीं सांगितलें आहे. दैवज्ञवल्लभ ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, सूर्य नक्षत्रापासून २१–२२–२३–२४–२५ ह्या पांचांना क्रमानें मोह, निर्घात, भूकंप, वज्र, परिवेष असे क्लेश आहेत ह्मणून त्या नक्षत्राशी चंद्राचा योग असेल तरी सुद्धां शोभनकर्म करूं नये, तर अशा नक्षत्रांवर अग्नि, अस्त्र, विष ह्यांनीं होणारीं उग्रकर्में केलीं असतां त्यांची सिद्धि होते. ह्या शिवाय दुसरेही कित्येक दोष आहेत तें पुढें प्रसंगानुसार सांगेन. ह्या ग्रंथांत मास इत्यादिकांच्या ज्या संज्ञा लोकसिद्ध आहेत त्याच सम-

जाव्यात. पुनरुक्ति झाली आहे त्याचें निवारण अर्ध्या वृत्तानें सांगतों कीं, चैत्रादि महिने, वसंतादिक ऋतु, दाक्षिणोत्तर अयनें, सूर्य इत्यादि वार, विष्कंभादि योग, प्रतिपदादि तिथि, अश्विनी इत्यादि नक्षत्रें इत्यादिकांची तसेंच करण, राशि-भाव इत्यादिकांच्या ज्या संज्ञा अन्य शास्त्रांत सांगितल्या आहेत. त्या तशाच तशाच जाणाव्यात. तसेंच ह्या ग्रंथांत कोठें कोठें पुनरुक्ति झाली असेल तर ती फार दूर असलेल्या संज्ञांचे स्मरण करण्याकारितां केली असें जाणावें. ह्मणजे पुनरुक्तीचा दोष नाहीं ॥ ४ ॥ अशा रीतीनें आपणच केलेल्या मुहूर्तमार्तंडाची आपणच केलेल्या मार्तंडवल्लभाटीकेंतील त्याज्य प्रकरणाची समाप्ति झाली ॥ १ ॥

असें हें त्याज्य प्रकरण पुरें झालें.

---

# नक्षत्रप्रकरणम् २

## नक्षत्रांचे स्वामी.

**भेशा दस्रयमाग्निकेंदुगिरिशाः प्रोक्ता अदित्यंगिराः ।**
**सर्पाः कव्यभुजो भगोऽर्यमरवी त्वष्टा समीरः क्रमात् ॥**
**इंद्राग्नी त्वथ मित्र इंद्र निर्ऋतिर्नीरं च विश्वे विधिः ।**
**वैकुंठो वसुपाश्यजैकचरणाहिर्बुध्न्यपूषाभिधाः ॥ १ ॥**

श्लोकार्थ—अगोदर नक्षत्र घालून त्याचे पुढें त्यांचे स्वामी घातले असा क्रम समजावा. जसें—अश्विनी नक्षत्र घालून त्याचे पुढें त्या नक्षत्राचा स्वामी दस्र ह्म० अश्विनी कुमार सांगितला, अशाच रीतीनें अठ्ठावीस नक्षत्रांचे अठ्ठावीस स्वामी दाखविले आहेत ते असे—

| नक्षत्र. स्वामी. | नक्षत्र. स्वामी. | नक्षत्र. स्वामी. | नक्षत्र. स्वामी. |
|---|---|---|---|
| १ अश्विनी—दस्र. | ८ पुष्य—गुरु. | १५ स्वाती—वायु. | २२ अभिजित्—विधि. |
| २ भरणी—यम. | ९ आश्लेषा—सर्प. | १६ विशाखा—इंद्राग्नी. | २३ श्रवण—विष्णु. |
| ३ कृत्तिका—अग्नि. | १० मघा—पितर. | १७ अनुराधा—मित्र. | २४ धनिष्ठा—वसु. |
| ४ रोहिणी—ब्रह्मा. | ११ पूर्वाफ.—भग. | १८ ज्येष्ठा—इंद्र. | २५ शतता—वरुण. |
| ५ मृगशीर्ष—चंद्र. | १२ उत्तराफ—अर्यमा. | १९ मूळ—निर्ऋति. | २६ पूर्वाभा—अजैकचर. |
| ६ आर्द्रा—शिव. | १३ हस्त—रवि. | २० पूर्वाषाढा—जल. | २७ उ. भा.—अहिर्बु. |
| ७ पुनर्वसु—अदिति. | १४ चित्रा—त्वष्टा. | २१ उत्तराषाढा—विश्वे. | २८ रेवती—पूषा. |

**अथ साधारणनक्षत्रप्रकरणं विवक्षुरादौ नक्षत्रदेवताश्च वृत्तेनैकेनाह-अस्मिन् प्रकरणे सर्वाणि शार्दूलविक्रीडितानि । भेशा इति । अश्विन्याः सकाशात् क्रमेण भेशा बुधैः प्रोक्ता इत्यन्वयः । भानां नक्षत्राणामीशाः स्वामिनः । दस्रौ अश्विन्याः । यमो भरण्याः अग्निः कृत्तिकायाः । को ब्रह्मा रोहिण्याः इंदुर्मृगस्य । गिरिशो महादेव आर्द्रायाः । अदितिः पुनर्वसोः । अंगिरा गुरुः पुष्यस्य । सर्पाः प्रसिद्धा आश्लेषायाः । कव्यभुजः पितरः मघायाः । भगः पूर्वाफाल्गुन्याः । अर्यमा उत्तराफा० । रविर्हस्तस्य । त्वष्टा चित्रायाः । समीरो वायुः स्वात्याः इंद्राग्नी देवताद्वयं विशाखायाः । मित्रः अनुराधायाः । इंद्रो ज्येष्ठायाः । निर्ऋतिः राक्षसो मूलस्य । नीरं जलं पूर्वाषाढायाः विश्वे उत्तराषाढायाः । विधि-र्ब्रह्माऽभिजितः वैकुंठो विष्णुः श्रवणस्य । वसवो धनिष्ठायाः । पाशी वरुणः शततारकायाः । अजैक-चरणः पूर्वाभाद्रपदायाः । अहिर्बुध्न्य उत्तराभाद्रपदायाः । पूषा रेवत्याः । देवताप्रयोजनं नक्षत्रज्ञा-नार्थं शांतिकादौ यजनार्थं च ॥ १ ॥**

**टीकार्थ**—आतां साधारण नक्षत्रांचें प्रकरण सांगण्याच्या इच्छेनें अगोदर नक्षत्रांच्या देवता एकावृत्तानें सांगतों, ह्या प्रकरणांत सर्वच शार्दूलविक्रीडितवृत्तें समजावींत. अश्विनी नक्षत्रापासून क्रमानें यांचे ह्मणजे नक्षत्रांचे ईश ह्म० स्वामी समजावेत जसें अश्विनीचे दस्र ह्मणजे अश्विनीकुमार, भरणीचा यम, कृत्तिकेचा अग्नि, रोहिणीचा ब्रह्मदेव, मृगशीर्षाचा चंद्र, आर्द्राचा गिरिश ह्मणजे महादेव, पुनर्वसूचा आदिति, पुष्याचा अंगिरा ह्म० गुरु, आश्लेषाचा सर्प, मघांचा कव्यभुक् ह्म० पितर, पूर्वाफाल्गुनीचा भग, उत्तराफाल्गुनीचा अर्यमा, हस्ताचा रवि, चित्रेचा त्वष्टा, स्वातीचा समीर ह्म० वायु, स्वातीचे इंद्र आणि अग्नि असे दोन स्वामी, अनुराधाचा मित्र, ज्येष्ठांचा इंद्र, मूळाचा निर्ऋति राक्षस, पूर्वाषाढेचा नीर ह्म० जल, उत्तराषाढेचा विश्वेदेव, अभिजिताचा विधि ह्म० ब्रह्मदेव, श्रवणाचा वैकुंठ ह्म० विष्णु, धनिष्ठेचा वसु आठ आहेत, शततारकेचा पाशी ह्म० वरुण, पूर्वाभाद्रपदेचा अजैकचरण ह्म० बकऱ्याचा एक पाय असलेला देव, उत्तराभाद्रपदेचा अहिर्बुध्न्य ह्म० अष्टमूर्ति, रेवतीचा पूषादेव नक्षत्रांचे स्वामी सांगण्याचें कारण, नक्षत्रज्ञान होण्याकरितां ह्मणजे अमुक देवावरून त्याचें अमुक नक्षत्र ओळखतां यावें आणि शांति कर्म करण्यामध्यें यजन करण्याच्या उद्देशानें त्या त्या नक्षत्रांचे स्वामी समजणें आवश्यक आहे ॥ १ ॥

### नक्षत्रांच्या स्थिरादिसंज्ञा आणि शुभ व पापग्रह.

**ब्राह्मं त्र्युत्तरयुक्ध्रुवं स्थिरमथो पूर्वामघायाम्यभम् ।**
**क्रूरोग्रं श्रवणत्रयादितियुता स्वाती चराख्या चला ॥**
**दस्राकीभिजिदीज्यभं लघु तथा क्षिप्रं च मैत्रांतिमे- ।**
**न्दुत्वाष्ट्रं मृदुमैत्रमग्निभविशे मिश्रे च साधारणे ॥ २ ॥**
**मूलाहींद्रशिवं च दारुणमदस्तीक्ष्णं मुनींद्रैः स्मृतम् ।**
**संज्ञातुल्यमिहाचरंति सुधियः कार्यं हि संसिद्धये ॥**
**सूर्याद्याः स्थिरचंचलोग्रमिलिताः क्षिप्रो मृदुर्दारुणः ।**
**क्षीणेंद्वर्कयमारराहुशिखिनः पापाबुधस्तैर्युतः ॥ ३ ॥**

श्लोकार्थ—सात ग्रह सांगून त्यांपैकीं कोणत्या ग्रहास कोणत्या संज्ञा आहेत आणि नक्षत्रांना कोण कोणत्या संज्ञा आहेत ह्मणजे त्या त्या नक्षत्रांस स्थिर चर इत्यादिक संज्ञा आहेत त्याही सांगितल्या आहेत जसें क्षीणचंद्र, रवि, शनि, मंगळ, राहु, केतु हे पापग्रह आहेत ह्या साहां बरोबर बुधाचा योग झाला असतां तोही पापग्रह होतो. बाकीचे उरलेले ह्म० पूर्णचंद्र, गुरु, शुक्र हे शुभ ग्रह होत. त्या त्या नक्षत्रांच्या स्थिरचरादि संज्ञां प्रमाणें त्याचें कार्य त्या त्या नक्षत्रांवर विद्वान् लोक सिद्धि होण्याकरितां करितात जसें—

| ग्रह. | संज्ञा. | नक्षत्रें. |
|---|---|---|
| रवि. | ध्रुव—स्थिर. | १ रोहिणी, २ उत्तराफल्गुनी, ३ उत्तराषाढा, ४ उत्तराभाद्रपदा. |
| चंद्र. | चर—चल. | १ श्रवण, २ धनिष्ठा, ३ शततारका, ४ पुनर्वसु, ५ स्वाती. |
| मंगळ. | क्रूर—उग्र. | १ पूर्वाफल्गुनी, २ पूर्वाषाढा, ३ पूर्वाभाद्रपदा, ४ मघा, ५ भरणी. |
| बुध. | मिश्र—साधारण. | १ कृत्तिका, २ विशाखा. |
| गुरु. | लघु—क्षिप्र. | १ अश्विनी, २ हस्त, ३ अभिजित्, ४ पुष्य. |
| शुक्र. | मृदु—मैत्र. | १ अनुराधा, २ रेवती, ३ मृग, ४ चित्रा. |
| शनि. | दारुण—तीक्ष्ण. | १ मूळ, २ आश्लेषा, ३ ज्येष्ठा, ४ आर्द्रा. |

**अथ नक्षत्राणां स्थिरचरादिसंज्ञामाह–ब्राह्ममिति । ब्राह्मं रोहिणी । किंलक्षणं ब्राह्मं त्र्युत्तरयुक् तिसृणामुत्तराणां समाहारस्त्र्युत्तरं तेन युक् युक्तं ध्रुवं स्थिरमिति द्व्यभिधानं मुनींद्रैः स्मृतमित्यन्वयः ।**

अथो पूर्वामघायाम्यभं पूर्वात्रयं मघाभरणीतिपंचकं क्रूरोग्रं क्रूरं उग्रं चोक्तं श्रवणत्रयादितियुता स्वाती श्रवणधनिष्ठाशततारका अदितिः पुनर्वसुः एभिः सहिता स्वाती चराख्या चला चोक्ता श्रवणत्रयादिपंचकं चराख्यं चलं प्रोक्तमित्यर्थः । दस्रार्काभिजिदीज्यभं दस्रौ अश्विनी अर्कौ हस्तः अभिजिद्वक्ष्यमाणलक्षणः ईज्यो गुरुस्तस्य भं पुष्य इति चतुष्टयं लघु तथा क्षिप्रं प्रोक्तं मैत्रांतिमेंदुत्वाष्ट्रं मैत्रमनुराधा अंतिमं रेवती इंदुर्मृगः त्वाष्ट्रं चित्रा एतच्चतुष्टयं मृदु तथा मैत्रं प्रोक्तं अग्निभविशे अग्निभं कृत्तिका विशा विशाखा एते द्वे मिश्रे साधारणे प्रोक्तम् ॥ २ ॥ मूलं प्रसिद्धं अहिराश्लेषा इंद्रो ज्येष्ठा शिव आर्द्रा एतच्चतुष्टयं दारुणं अदः इदं तीक्ष्णं चोक्तं इह एषु ध्रुवादिसंज्ञेषु नक्षत्रेषु संज्ञातुल्यं कार्यं सुधियः पंडिता आचरंति किमर्थं संसिद्धये । एतदुक्तं भवति । स्थिरनक्षत्रेषु स्थिरं स्तंभप्रतिष्ठादिकं चरे चरमित्यादि कुर्वतीति स्पष्टं । अत्र समानार्थसंज्ञाद्वयकरणं कवित्वबंधनार्थं । अत्र प्रसंगेन सूर्यादीनामपि स्थिरादिसंज्ञाः सौम्यपापत्वं च वृत्तार्धेनाह–सूर्याद्या इत्यादि । सूर्यः स्थिरः चंद्रश्चंचलः भौमः उग्रः बुधः मिलितः मिश्रः गुरुः क्षिप्रः शुक्रो मृदुः शनिर्दारुणः । अथ पापसौम्यान् ग्रहानाह–क्षीणेति । क्षीणेंदुः कृष्णाष्टम्यूर्ध्वं प्रतिपत्पर्यंतं क्षीणः अर्कः सूर्यः यमः शनिः आरो भौमः राहुः प्रसिद्धः शिखी केतुः एते क्षीणेंद्वादयः पापाः क्रूराः तैः पापैर्युतो बुधः पापः स्यात् । उक्तं च जातकोत्तमे । क्षीणेंद्वर्कार्किभौमाः स्युः पापाः सौम्योऽपि तद्युतः । राहुकेतू पापतरौ पापः पापयुतस्तथेति । अर्थादन्ये सौम्याः । एषां प्रयोजनं क्रूरसौम्यकर्मसाधने ॥ ३ ॥

**टीकार्थ**—आतां नक्षत्रांच्या स्थिर चर इत्यादि संज्ञा सांगतों. ब्रह्मा ज्याचा स्वामी आहे असें नक्षत्र ह्म० रोहिणी हें, तीन उत्तरा ह्म० उत्तराफाल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा ह्या तीघांसहवर्तमान हीं ध्रुव आणि स्थिर आहेत. तसेंच तीन पूर्वा ह्म० पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वभाद्रपदा आणि मघा व यम देवतेचें नक्षत्र ह्म० भरणी हीं पांच नक्षत्रें क्रूर व उग्र आहेत. श्रवणादि तीन ह्म० श्रवण, धनिष्ठा, शततारका, हीं तीन अदिति ह्म० पुनर्वसु ह्या चौघांसहवर्तमान स्वाती ह्मणजे एकंदर पांच नक्षत्रें हीं चर व चल आहेत. दस्र देवतेचें नक्षत्र ह्म० अश्विनी, अर्काचें नक्षत्र ह्म० हस्त, अभिजित् नक्षत्र पुढें सांगावयाचें तें, ईज्य, ह्म० गुरु त्याचें नक्षत्र पुष्य, हीं चार नक्षत्रें लघु तशींच क्षिप्र आहेत. मित्राचें नक्षत्र अनुराधा अंतिम ह्म० शेवटलें रेवती नक्षत्र इंदूचें नक्षत्र मृगशीर्ष, त्वष्ट्याचें नक्षत्र चित्रा, हीं चार नक्षत्रें मृदु आणि मित्र आहेत. अग्नीचें नक्षत्र ह्म०कृत्तिका आणि विशाखा हीं दोन नक्षत्रें मिश्र व साधारण आहेत॥२॥राक्षसाचें नक्षत्र मूल,आहि ह्म० सर्प त्याचें नक्षत्र आश्लेषा इंद्राचें नक्षत्र ज्येष्ठा, शिवाचें नक्षत्र आर्द्रा हीं दारुण व तीक्ष्ण आहेत. त्यासर्वांचा असा अर्थ निघतो कीं, स्थिर नक्षत्रांवर स्थिरकार्य ह्मणजे स्तंभ स्थापन करावयाचें कार्य, चर नक्षत्रांवर चर कार्य करितात हें स्पष्ट आहे. ह्या संज्ञांमध्यें एक अर्थाच्या दोन संज्ञा केल्या आहेत तें करणें कविता बांधण्याकरितां आहे, ह्या प्रसंगामध्यें सूर्य इत्यादि सात ग्रहांनांही स्थिर, चर संज्ञा आणि त्या ग्रहांना पापत्व व सौम्यत्व अर्ध्या वृत्तानें सांगतों. सूर्य स्थिर आहे व चंद्र चर आहे मंगळ उग्र आहे. बुध मिश्र आहे. गुरु क्षिप्र आहे. शुक्र मृदु आहे. शनि दारुण आहे. आतां ग्रहांमध्यें पाप कोणते आणि सौम्य कोणते हें सांगतों. कृष्णाष्टमीपासून तों प्रतिप्रदेपर्यंतचा चंद्र हा क्षीण असतो तो क्षीणचंद्र, सूर्य, यम, ह्म० शनि, आर ह्म० मंगळ, राहु, शिखी ह्म० केतु हे पाप ह्मणजे क्रूर ग्रह आहेत, ह्या क्रूरांसह बुध असेल तर तोही पाप समजावा. हीच गोष्ट जातकोत्तमग्रंथांत सांगितली आहे, ती अशी कीं, क्षीणचंद्र,सूर्य, शनि, मंगळ हे पापी आहेत त्यांबरोबर सौम्य ग्रह आला तर तो पापी होतो, राहु व केतू अधिक पापी आहेत. परंतु पापानें युक्त झाला तर तसा पापी होतो अर्थात् ह्यां शिवाय बाकीचे उरलेले पूर्णचंद्र, शुक्र, गुरु आणि नुसता बुध हे शुभ समजावेत ॥ ३ ॥

### दिनरात्रि नक्षत्रें.

अह्नः स्युः शिवसार्पमित्रपितरो वस्वंबुविश्वेऽभिजित् ।
केंद्रेंद्राग्निनिशाचरा अपि जलाधीशार्यमाख्यौ भगः ॥
रात्रेः स्युः स्मरहात्रयोऽजचरणात्पंचाश्वितोऽथोऽदितिः ।
जीवो विष्णुरिनात्रयस्तिथिलवाः कर्मसु भोक्तं स्मृतम् ॥ ४ ॥
इति श्रीमदनंताख्यचातुर्मास्ययाजिपुत्रनारायणविरचिते
मुहूर्तमार्तंडे नक्षत्रप्रकरणम् ॥ २ ॥

श्लोकार्थ—दिवसाचीं नक्षत्रें—१ आर्द्रा, २ आश्लेषा, ३ अनुराधा, ४ मघा, ५ धनिष्ठा, ६ पूर्वाषाढा, ७ उत्तराषाढा, ८ अभिजित्, ९ रोहिणी, १० ज्येष्ठा, ११ विशाखा, १२ मूळ, १३ शततारका, १४ उत्तरा, १५ पूर्वा. असे दिनमानाचे किंवा रात्रिमानाचे १५ भाग करावे. आणि प्रत्येक भागास एक एक नक्षत्र समजावें जसें—दिवसाचे पहिल्या भागास ह्मणजे पहिला मुहूर्त १ आर्द्रा २ मुहूर्त आश्लेषा ह्याच प्रमाणें—

रात्रीचीं नक्षत्रें—१ आर्द्रा, २ पूर्वाभाद्रपदा, ३ उत्तराभाद्रपदा, ४ रेवती, ५ अश्विनी, ६ भरणी, ७ कृत्तिका, ८ रोहिणी, ९ मृगशीर्ष, १० पुनर्वसु, ११ पुष्य, १२ श्रवण, १३ हस्त, १४ चित्रा, १५ स्वाती. अशीं हीं नक्षत्रें आहेत, रात्रीचे दिनमानाचे १५ भाग केल्यावर पहिल्या भागाचा ह्मणजे पहिला मुहूर्त १ आर्द्रा आला. २ दुसरा पूर्वाभाद्रपदा ह्याप्रमाणें पुढें जाणावेत. जें कर्म ज्या नक्षत्रावर करावयास सांगितलें असेल तें कर्म त्या नक्षत्रावर करावें. मग तें नक्षत्र दिवसास असो अथवा रात्रीं असो तें तसें कर्म करावें ॥ ४ ॥

**अथ प्रसंगेन नक्षत्रसमाननाथान् दिनरात्रिमुहूर्तान्नक्षत्रोक्तकार्यसाधकान्वृत्तेनैकेनाह । एतेऽह्नो दिवसस्य तिथि १५ लवाः पंचदशांशा मुहूर्ताः शिवादयः स्युः प्रथमः शिवः द्वितीयः सर्पः तृतीयो मित्रः चतुर्थः पिता पंचमो वसुः षष्ठोऽबु सप्तमो विश्वे अष्टमोऽभिजित् नवमो ब्रह्मा दशम इंद्रः एकादश इंद्राग्नी द्वादशो निशाचरः त्रयोदशो जलाधीशो वरुणः चतुर्दश अर्यमाख्यः पंचदशो भगः । अथ रात्रेः प्रथमः स्मरहा शिवः अजचरणात् त्रयः अजचरणाहिर्बुध्न्यपूषाह्वाः क्रमेण द्वितीयोऽजचरणः तृतीयोऽहिर्बुध्न्यः चतुर्थः पूषा पंचाश्वित इति अश्वितः पंच दस्रयमाग्निकेंदवः पंचमो दस्रः षष्ठो यमः सप्तमोऽग्निः अष्टमः कः ब्रह्मा नवम इंदुः अथोऽदितिर्दशमः एकादशो जीवः गुरुः द्वादशो विष्णुः इनात् त्रयः रवित्वष्ट्रनिलाः त्रयोदशो रविः चतुर्दशस्त्वष्टा पंचदशोऽनिलः वायुः । प्रयोजनमाह—कर्मैषु भोक्तं स्मृतं एषु मुहूर्तेषु भोक्तं नक्षत्रोक्तं कर्म स्मृतं मुनींद्रैरित्यध्याहारः । एतदुक्तं भवति । शिवमुहूर्ते आर्द्रानक्षत्रोक्तं सार्पमुहूर्तेऽऽश्लेषोक्तं मित्रमुहूर्तेऽनुराधोक्तं कर्म कुर्यादित्यादि । तदुक्तं रत्नमालायां । यस्मिन् धिष्ण्ये यच्च कर्मोपदिष्टं तद्दैवत्ये तन्मुहूर्तेऽपि कार्यं इति । लोके हि स्वामिशब्दं सेवके प्रयुंजाना दृश्यंते अतो देवताशब्दस्तन्नक्षत्रतिथ्यादिषु स्मर्यते तथाविधवृद्धप्रयोगदर्शनाच्च । नागो द्वादशनाडीभिर्दिक्पंचदशभिस्तथा । भूतोऽष्टादशनाडीभिर्दूषयत्युत्तरां तिथिमिति ॥ नागपंचमी दिग्दशमी भूतश्चतुर्दशीतिवत् ॥ ४ ॥ इति स्वोक्तमुहूर्तमार्तण्डटीकायां नक्षत्रप्रकरणम् ॥ २ ॥**

**टीकार्थ**—आतां प्रसंगानें दिवसाचे मुहूर्त व रात्रीचे मुहूर्त मिळून जेवढे मुहूर्त आहेत तेवढ्या मुहूर्तांचीं नक्षत्रें सांगतों कारण कीं, त्या त्या नक्षत्रांचे नाथ पूर्वी सांगितले आहेतच व ज्या नक्षत्रांवर जें कर्म करावयास सांगितलें आहे तें कार्य त्या नक्षत्रावर करावयास त्याच मुहूर्तांचा उपयोग आहे ह्या करितां हे सर्व एका वृत्तानें सांगतों. दिवसाचे ( तिथिचे ) १५ अंश पाडून तितके मुहूर्त समजावे, पैकीं पहिल्या मुहूर्ताचा ह्मणजे आर्द्राचा स्वामी शिव आहे, दुसऱ्याचा सर्प, तिसऱ्याचा मित्र, चवथ्याचा पितर, पांचव्याचा वसु, सहाव्याचा जल, सातव्याचे विश्वेदेव, आठवा अभिजित् त्याचा स्वामी विधि, नवव्याचा ब्रह्मा, दहाव्याचा इंद्र, अकराव्याचा इंद्र, अग्नि असे दोघे, बाराव्याचा राक्षस, तेराव्याचा वरुण, चवदाव्याचा अर्यमा, पंधराव्याचा भग. आतां रात्रीचा पहिला मुहूर्त आर्द्रा नक्षत्र आहे. त्याचा स्वामी स्मरहा ह्मणजे शिव आहे, अजचरणापासून तिघे ह्मणजे २ अजचरण, ३ अहिर्बुध्न्य, ४ पूषा हे क्रमानें २ पूर्वाभाद्रपदा ३ उत्तराभाद्रपदा आणि ४ रेवती ह्या तिघांचे स्वामी आहेत. अश्विनीपासून पांच नक्षत्रांचे पांच मुहूर्तांचे स्वामी क्रमानें ५ अश्विनीचा दस्र ह्म० अश्विनीकुमार २ भरणीचा यम, ३ कृत्तिकेचा अग्नि, ४ रोहिणीचा ब्रह्मा, ५ मृगशीर्षाचा चंद्र ह्मणजे, ५ अश्विनीनक्षत्राचे मुहूर्ताचा अश्विनीकुमार, ६ भरणीनक्षत्राचे मुहूर्ताचा यम, ७ कृत्तिकानक्षत्राचे मुहूर्ताचा अग्नि, ८ रोहिणीनक्षत्राचे मुहूर्ताचा ब्रह्मा, ९ मृगशीर्षाचे नक्षत्राचे मुहूर्ताचा स्वामी चंद्र, १० पुनर्वसुनक्षत्राचे मुहूर्ताचा अदिति, ११ पुष्यनक्षत्राचे मुहूर्ताचा स्वामी जीव ह्म० गुरु, १२ श्रवणनक्षत्राचे मुहूर्ताचा स्वामी विष्णु, १३ हस्तनक्षत्राचे मुहूर्ताचा रवि, १४ चित्रानक्षत्राचे मुहूर्ताचा त्वष्टा, १५ स्वातीनक्षत्राचे मुहूर्ताचा वायु, असे हे त्या त्या नक्षत्राचे स्वामी ते त्या त्या नक्षत्राचेवरील मुहूर्तांचे स्वामी समजावेत. ह्यांचें प्रयोजन सांगतों तें असें कीं, ह्या नक्षत्रांवर सांगितलेलें कर्म त्या नक्षत्राच्या मुहूर्तावर करावें असें श्रेष्ठमुनींनीं सांगितलें आहे. व ह्याचा स्पष्ट अर्थ असा कीं, आर्द्रानक्षत्रावर जें कर्म करावयास सांगितलें तें आर्द्रानक्षत्राचा शिव मुहूर्त आहे, त्यावर करावें. तसेंच आश्लेषानक्षत्रावर जें कर्म सांगितलें तें सर्प मुहूर्तावर करावें. अनुराधानक्षत्रावर करावयास सांगितलेलें कार्य मित्रमुहूर्तावर करावें. तोच अर्थ रत्नमाला ग्रंथांत सांगितलेला आहे कीं, ज्या नक्षत्रावर जें कर्म सांगितलें तें कार्य त्या नक्षत्राची जी देवता असेल त्याचे त्या मुहूर्तावर करावें. लोकांतही असाच प्रचार दिसतो कीं, स्वामीचा जो शब्द असतो तो

सेवकाला लावतात ह्मणून देवताही त्या त्या तिथिनक्षत्राची स्वामी असते, ह्मणून स्वामीचा शब्द त्या त्या सेवकरूपीनक्षत्र तिथ्यादिकांला लागतो व तसाच वृद्धविद्वानांचा व्यवहारही दिसत आहे. जसें—नाग ( नागपंचमी ) हा बारा नाडिकांनीं व दिशा ( दशमी ) ही पंधरांनीं, भूत ( चतुर्दशी ) अठरांनीं, पुढल्या तिथिला दूषित करतात ह्यांत नाग ही देवता असून तो शब्द पंचमी तिथिला लावला आहे, तसेंच पुढेंही समजावें ॥ ४ ॥ अशा रीतीनें आपण केलेल्या मुहूर्तमार्तंड टीकेंतील नक्षत्र प्रकरण पुरें झालें ॥ २ ॥

---

# अथ संस्कारप्रकरणम् ३

### प्रथम रजोदर्शनीं अशुभ.

आद्यर्तौ पौषशुक्रोर्जमधुशुचिनभस्याः कुयुक्पापवाराः ।
रिक्तामार्काष्टषष्ठ्यः परगृहकुपदे रात्रिसंध्यापराह्णाः ॥
मिश्रोग्रामूलतीक्ष्णं विवरमनरुणाल्पाधिकास्रं गराष्टौत् ।
पातः पापस्य लग्नं न सद्रुरुणजरन्नीलचित्रांबरं च ॥ १ ॥

श्लोकार्थ—प्रथमतः रजोदर्शन होतानां जें अशुभ तें सांगतों—महिन्यांमध्यें—१ पौष, २ ज्येष्ठ, ३ कार्तिक ४ चैत्र, ५ आषाढ, ६ भाद्रपद हे सहा महिने अशुभ आहेत.

योगांमध्यें—१ विष्कंभ, २ अतिगंड, ३ शूळ, ४ गंड, ५ व्याघात, ६ वज्र, ७ व्यतिपात, ८ परिघ, ९ वैधृति हे नऊ योग अशुभ आहेत.

वारांमध्यें—पाप ग्रहांचे वार ह्मणजे १ मंगळ, २ रवि, ३ शनि हे अशुभ आहेत.

तिथींमध्यें—रिक्तातिथि, ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) अमावास्या, द्वादशी, अष्टमी ह्या तिथि अशुभ आहेत.

गृहांमध्यें—पतिवांचून दुसऱ्याचें घर, अशुभ स्थान ( मार्ग अथवा नीचांचें घर. )

वेळेमध्यें—रात्र, प्रातःकाळ, सायंकाळ, अपराण्ह, ( दिवसाचा तिसरा भाग. )

नक्षत्रांमध्यें—मिश्र ह्म० कृत्तिका व विशाखा, उग्र ह्म० तीन पूर्वा, मघा, भरणी. तीक्ष्ण ह्म० आश्लेषा, ज्येष्ठा, आर्द्रा हीं दहा नक्षत्रें अशुभ आहेत. ह्यांशिवाय बाकीचीं सर्व [1]नक्षत्रें शुभ आहेत.

[2]संधि—तिथींचा संधि व नक्षत्रांचा संधि अशुभ आहे.

रक्त—फारच लाल नसून तें अधिक नसावें व फार थोडेंही नसावें असें रक्त अशुभ आहे.

करण—गर नाम करणापासून आठ करणें अशुभ आहेत.

उत्पात—ग्रहण, उत्पात, पापग्रहाचें लग्न हीं अशुभ आहेत.

वस्त्र—फार लाल, फाटकें, निळें व अनेक रंगाचें वस्त्र हीं सर्व प्रथम रजोदर्शनीं अशुभ आहेत. ॥ १ ॥

अथ गर्भाधानादिसंस्कारप्रकरणम् विवक्षुस्तावद्गर्भाधानस्य ऋतुसंबंधात्प्रथमर्तुफलं स्रग्धरावृत्तेनाह—आद्यर्ताविति । तत्राऽऽदौ मासफलमाह आद्यर्तौ प्रथमर्तौ पौषशुक्रोर्जमधुशुचिनभस्याः संतो न स्युरित्यन्वयः । अर्थाद्विभक्तिविपरिणामः पौषः प्रसिद्धः शुक्रो ज्येष्ठः ऊर्जः कार्तिकः मधुश्चैत्रः शुचिराषाढः नभस्यो भाद्रपदः एते षण्मासाः न शुभा इत्यर्थः । अर्थादन्ये शुभाः । तदुक्तं ज्योतिर्निबंधे । प्रथमर्तौ मधौ नारी विधवा भवति ध्रुवं । वैशाखे धनपुत्राढ्या ज्येष्ठे रोगान्विता भवेत् ॥ आषाढे च मृतापत्या श्रावणे च धनान्विता । भाद्रपदे दुर्भगा च आश्विने च तपस्विनी । ऊर्जेऽल्पायुष्मती नारी मार्गशीर्षे बहुप्रजा । पौषे तु पुंश्चली नारी माघे पुत्रसुखान्विता ॥ फाल्गुने श्रीमती साध्वी क्रमान्मासफलं स्मृतमिति ॥ योगफलमाह—कुयुगिति । कुयोगो विष्कंभादिकः । योगेषु नव योगाः दुष्टाः संति विष्कंभातिशूलगंडव्याघातवज्रव्यतीपातपरिघवैधृतयः । एते योगा न शुभा इत्यर्थः । अर्थादन्ये शुभाः । तदुक्तं । आद्यर्तौ दुर्भगा नारी विष्कंभे चेद्रजस्वला । वंध्या चैवातिगंडे च शूले शूलवती भ-

---

१ मात्र मूळ नक्षत्र सोडावें. २ हे संधि पुढें सांगावयाचे आहेत.

वत् ॥ गंडे च पुंश्चली नारी व्याघाते चाऽऽत्मघातिनी । वज्रे च स्वैरिणी प्रोक्ता पाते च परिघातिनी ॥ परिघे मृतवंध्या च वैधृतौ पतिमारिणी । शेषाः शुभावहा योगा यथानामफलप्रदा इति ॥ वारफलमाह–पापवारा इति । क्षीणेंद्वर्कयमाराः पापस्तेषां वारा न शुभा अर्थादन्ये शुभाः । उक्तं च कारिकायां । आदित्ये विधवा नारी सोमे चैव मृतप्रजा । अंगारके स्वसृहंत्री बुधे कन्याप्रसूर्भवेत् । पुत्रिणी गुरुवारे च कन्यापुत्रवती भृगौ । शनौ तु पुंश्चली नारी प्रथमर्तौ विदुर्बुधा इति ॥ तथाच नारदः । रोगी पतिव्रता दुःखी पुत्रिणी भोगभागिनी । पतिप्रिया क्लेशभागी सूर्यवारादिषु क्रमात् इति ॥ कारिकावचने सोमवारफलं–मृतप्रजेति । नारदवचने पतिव्रतेति एवं द्वयोर्विरोधे मृतप्रजेति कृष्णपक्षसोमवारविषयं पतिव्रतेति शुक्लपक्षीयसोमवारविषयमिति व्यवस्थापनीयं । अतो मार्तंडवचनं पापवारा इत्येतदतिप्रशस्तं । तिथिफलमाह–रिक्तामार्काष्टषष्ठ्य इति । रिक्ताश्चतुर्थीनवमीचतुर्दश्यः । अमा अमावास्या अर्को द्वादशी द्वादश्याः स्वामी अर्कोऽथवा अर्कसंख्याऽपि द्वादशवाचका संख्ययाऽपि द्वादशी भवति । तिथिदेवताऽपि रत्नमालायां । तिथिपाश्चतुर्मुखविधातृविष्णव इत्यादयः । अष्ट अष्टमी षष्ठी प्रसिद्धा एताः सप्त तिथयो न शुभा अर्थादन्याः शुभाः । उक्तं च । आद्यर्तौ सुभगा नारी प्रतिपत्सु रजस्वला । द्वितीयायां भाग्यवती तृतीयायां सुतान्विता । चतुर्थ्यां विधवा नारी पंचम्यां धनदायिनी । षष्ठ्यां च क्लेशभाक् नारी सप्तम्यां धनवर्धिनी । अष्टम्यां राक्षसी नारी नवम्यां पापवर्धिनी । दशम्यां प्रीतिकृन्नारी एकादश्यां सुतान्विता । द्वादश्यां दुर्भगा नारी त्रयोदश्यां हिरण्यदा । चतुर्दश्यां पुंश्चली स्यात्पौर्णमास्यां सुपुत्रिणी । यदि भद्रा न जायेत दर्शे स्याच्चौरिका ध्रुवमिति॥स्थानफलमाह–परगृहकुपद इति।परगृहं भर्तृगृहादन्यत् । कुपदं कुत्सितस्थानं एते उभे निंद्ये । अर्थादन्यच्छुभं । उक्तं च । देवस्थाने पितृस्थाने निंद्यस्थानेऽन्यवेश्मनि । पुष्पवत्याः फलं न स्यान्मार्गे चांडालवेश्मनीति देवस्थानं देवालयं । पितृस्थानं श्मशानं निंद्यस्थानं कुत्सितस्थानमन्यवेश्म भर्तृगृहादन्यत् गृहं । अन्यत्सुगमं । नन्वत्र श्लोके बहूक्तमत्र कथं परगृहकुपदे इत्येवोक्तं सत्यं यत्स्थानद्वयमुक्तं तस्मिन्नेव सर्वश्लोकोक्तमधितिष्ठति । तद्यथा । देवस्थानान्यवेश्मचांडालवेश्मेतिपदत्रयं परगृह इत्येतस्मिन्पदेऽधितिष्ठति अन्यत् श्लोकोक्तं कुपदे वर्तते । ननु मार्गः कथं कुपदेऽस्ति स तु कुत्सितो न भवति अस्ति मार्गेऽपि दुष्टत्वं सर्वजनैसंचाराद्धर्मशास्त्रप्रसिद्धं तर्हि पूर्वश्लोकोक्तं बहुभाषणं व्यर्थं स्यात् । मैवं तदुक्तं बहुभाषणं त्वधिकाधिकदोषविवक्षयोक्तमिति न दोषः । वेलाफलमाह–रात्रिसंध्यापराह्णा इति । रात्रिः प्रसिद्धा संध्ये द्वे अपराह्णस्त्रेधा विभक्तस्याह्नस्तृतीयो भागः एते चत्वारः काला न शुभाः । अर्थादन्यौ पूर्वाह्णमध्याह्नौ शुभौ। उक्तं च । पुत्रिणी सुभगा पुण्या पूर्वाह्णे या रजस्वला । मध्याह्ने तु शुभप्राप्तिः स्वैरिणी चापराह्णके । संध्ययोरुभयोर्वेश्या निशायां विधवा तथेति ॥ नक्षत्रफलमाह–मिश्रोग्रामूलतीक्ष्णमिति । मिश्रे कृत्तिकाविशाखे उग्राणि पूर्वात्रयभरणीमघाः अमूलतीक्ष्णानि मूलरहिततीक्ष्णानि आश्लेषा ज्येष्ठाऽऽर्द्रा इत्येतन्नक्षत्रदशकं न शुभं अर्थादन्यानि शुभानि । तदुक्तं नारदीयसंहितायां । श्रीयुता सुभगा पुत्रवती सौख्यान्विता स्थिरा । कुलाधिका मानवती चाश्विन्यां प्रथमार्तवा ॥ १ ॥ दुःशीला स्वैरिणी स्वस्य गर्भपातनतत्परा । परप्रेष्या काकवंध्या भरण्यां प्रथमार्तवा ॥ २ ॥ अनर्था पुंश्चली वंध्या गर्भपातनतत्परा । प्रेष्या मृतप्रजा वाऽपि वह्निभे प्र० ॥ ३ ॥ सुशीला सुप्रजा मान्या पतिभक्ता दृढव्रता । गृहार्चनरता नित्यं धातृभे प्र० ॥ ४ ॥ गुणान्विता धर्मरता नारी सर्वसहा सती । पतिप्रिया सुताढ्या च चंद्रभे प्र० ॥ ५ ॥ कुलटा दुर्भगा कष्टा मृतपुत्रा खला जडा । दुष्टा व्रतपरिभ्रष्टा रौद्रभे प्र० ॥ ६ ॥ पतिभक्ता पुत्रवती वरसंतानमोदिनी । कुलाचारानुरक्ताऽऽढ्याऽदितिभे प्र० ॥ ७ ॥ पतिप्रिया पुत्रवती नानाभोगवती शुभा । स्वकर्मनिरता दक्षा तिष्यभे प्रथमार्तवा ॥ ८ ॥ परभर्तृरता प्रेष्या कोपिनी निर्घृणाऽलसा । मृषावागीशदुष्पुत्रा भौजंगे प्र० ॥ ९ ॥ निर्द्वेष्या रोगसंयुक्ता सर्वदा गेयलोलुपा । पितृवेश्मरता मान्या पितृभे प्र० ॥१०॥ परकार्यरता दीना दुष्पुत्रा क्लेशभागिनी । मलिना कर्कशा क्रुद्धा भाग्यर्क्षे प्र० ॥ ११ ॥ प्रजावती धर्मरता निर्वैरा मित्रपूजिता । सती मातृगृहासक्ता अर्यमर्क्षे रजस्वला ॥ १२ ॥ निर्द्वेष्या भूरिविभवा पुत्राढ्या भोगभागिनी । प्रधाना दानकुशला हस्तर्क्षे प्रथमा० ॥ १३ ॥ चित्रकर्मा भोगिनी च कुशला क्रयविक्रये । विकीर्णकामा श्लक्ष्णाढ्या त्वाष्ट्रभे प्र० ॥ १४॥ बहुवित्तवती नीरुक्कुशला शिल्पकर्मणि । पुत्रपौत्रवती साध्वी वायुभे प्र० ॥१५॥ नीचकर्मरता दुष्टा पानासक्ता परप्रिया । विपुत्रा मलिना क्रुद्धा द्विदैवे प्र० ॥ १६ ॥ स्वामिपक्षार्चिता स्वस्य गुणैः सम्यग्विभूषिता । सुपुत्रा सुभगा कांता मित्रभे प्र० ॥ १७ ॥ दुश्चरित्ररता क्लेशिन्यनर्था पुंश्चली व्यसुः ।

दुःसंतानवती ज्येष्ठानक्षत्रे प्र० ॥ १८ ॥ संतानार्थगुणैर्नाल्पैर्युताऽन्यक्लेशमोचनी । स्वकर्मनिरता नित्यं मूलर्क्षे प्र० ॥ १९ ॥ प्रच्छन्नपापा दुष्पुत्रा प्राणिहिंसनतत्परा । अजस्रं व्यसनासक्ता तोयभे प्र० ॥ २० ॥ कार्याकार्येषु कुशला सदा धर्मानुवर्तिनी । गुणाश्रया भाग्यवती विश्वभे प्र० ॥ २१ ॥ पुत्रपौत्रान्विता भोगधनधान्यवती सती । कुलानुमोदिनी मान्या विष्णुभे प्र० ॥ २२ ॥ धनधान्यवती भोगपुत्रपौत्रसमन्विता । स्वकर्मनिरता साध्वी वसुभे प्र० ॥२३॥ बहुपुत्रा धनवती स्वकर्मनिरता सती। कुलानुमोदिनी मान्या वारुणे प्र० ॥ २४ ॥ बंधकी बंधुविद्वेष्या नित्यं दुष्टरता खला । शिल्पकार्येषु कुशलाऽजांघ्रिभे प्र० ॥ २५ ॥ आढ्या पुत्रवती मान्या सुप्रसन्ना प्रतिप्रिया । बंधुपूज्या धर्मवत्याहिर्बुध्न्ये प्र० ॥ २६ ॥ दृढव्रता धर्मवती पुत्रसौख्यार्थसंयुता । विख्याता गुणसंपन्ना पौष्णभे प्रथमार्तवा ॥ २७ ॥ अथ संधिफलमाह–विवरमिति । तिथिभादीनां विवरं संधिः न शुभं । उक्तं च । दुर्भगा सर्वसंधिष्विति । रक्तफलमाह–अनरुणाल्पाधिकास्रमिति । अरुणादन्यदनरुणं अनरुणं च अल्पं च अधिकं च अनरुणाल्पाधिकं तच्च तदस्रं च अनरुणाल्पाधिकास्रं न सत् स्यात् अनरुणं नाम यत्सुरंगं आरक्तं न भवति अस्रं रक्तं अन्यत्सुगमं अर्थादन्यच्छुभं । उक्तंच । प्रथमर्तौ फलं स्त्रीणामुच्यते रजसोऽधुना । सुभगा पुत्रसंयुक्ता शुक्लवर्णे तथाऽऽर्तवे ॥ शशशोणितसंकाशे यद्वाऽलक्तकसन्निभे । पुत्रकन्याप्रसूतिः स्यान्नीले तु स्यान्मृतप्रजा ॥ कर्बुरे म्रियते सा च पिंगटे च मृतप्रजा । कृष्णे तु विधवा नारी रजस्येवं विनिर्दिशेत् ॥ शोणिते बिंदुमात्रे तु स्वैरिणी चाल्पशोणिता । वरा मध्यस्रवा स्यात्तु दुर्भगा बहुशोणितेति ॥ ग्रंथांतरेऽप्युक्तं । रक्ते रक्ते भवेत्पुत्राः कृष्णे च मृतपुत्रका । पिच्छलाभे भवेद्वंध्या काकवंध्या च पांडुरे ॥ पीते च स्वैरिणी प्रोक्ता सुभगा गुंजवर्णके । सिंदूराभे भवेत्कन्या रजःशोणितलक्षणमिति ॥ करणफलमाह–गराष्टेती । गरादष्ट गराष्ट गराद्यष्टकरणानि बवपर्यंतानि न संति न शुभानि स्युः । अर्थादन्यानि शुभानि । उक्तं च । बवे पुष्पवती नारी वंध्या वा विधवा भवेत् । बालवे पुत्रिणी नारी कौलवे प्रमदा भवेत् । तैतिले सन्मतवती गरे नारी विनश्यति । नष्टप्रजा वणिक्संज्ञे विष्ट्यां वंध्या धनोज्झिता ॥ शकुनौ च चतुष्पादे नारी वैधव्यमाप्नुयात् । नागे न रमते रामां किंस्तुघ्ने विधवा भवेत् इति । अथोत्पातफलं–उत्पातस्त्रिविधः सत् न स्यात् तथा च नारदः । संध्यासूपप्लवे विष्ट्यामशुभंप्रथमार्तवमिति ॥ अथ लग्नफलमाह–पापस्य लग्नमिति । पापग्रहस्य लग्नं न सत्स्यात् । क्षीणेंद्वर्कयमाराः पापास्तेषामन्यतमस्य लग्नमित्यर्थः । पापग्रहस्य मेषसिंहवृश्चिकमकरकुंभा एतानि लग्नानि न शुभानीत्यर्थः । अर्थादन्यानि शुभानि । कर्कलग्ने शुक्लपक्षे शुभं कृष्णपक्षे अशुभं स्वामित्वात् लग्नस्वामिनो वक्ष्यमाणाः उक्तं च । आत्मघ्नी भ्रूणहा मेषे वृषे पुत्रवती भवेत् । द्वंद्वे कन्याप्रसूर्नारी मृतापत्या च कर्किणी ॥ सिंहे वैधव्यमाप्नोति कन्यायां स्त्रीप्रसूर्भवेत् । तुलायां बहुपुत्राढ्या दुष्टकर्मरताऽलिनि ॥ चापे पुत्रधनाढ्या स्यान्मकरे दुःखिनी भवेत् । सकृत्प्रजावती कुंभे मीने चाल्पप्रजा भवेत् । नारदोऽपि । कुलीरवृषचापाल्यनृयुक्कन्यातुलाधनाः । राशयः शुभदा ज्ञेया नारीणां प्रथमार्तव इति ॥ अत्रापि कर्कलग्नस्य द्वैधे चंद्रस्य सौम्यत्वपापत्ववशाद्यवस्था ज्ञेया । अथ वस्त्रफलमाह–अरुणजरन्नीलचित्रांबरमिति । न सत् स्यात् अरुणमारक्तं जरत् जीर्णं नीलं प्रसिद्धं चित्रं नानावर्णै रंजितं एवंविधमंबरं न सत् स्यात् न शुभं स्यादित्यर्थः अर्थात् दृढं शुभ्रं पीतं वस्त्रं शुभं । उक्तं च । सुभगा श्वेतवस्त्रा च रोगिणी रक्तवाससा । नीलांबरधरा नारी विधवा प्रथमार्तवे ॥ भोगिनी पीतवस्त्रा च दृढवस्त्रा पतिव्रता । दुर्भगा जीर्णवस्त्रा च सुभगा चारुवस्त्रिणी ॥ अत्रानुक्तमपि त्याज्यप्रकरणोक्तमन्यद्दुष्टं विचारणीयं अत्रास्मिन्नुक्ते निषिद्धकाले रजोदर्शने सति अक्षततिलघृतैर्देव्या इज्यया यजनं स्यात् देव्या गायत्रीमंत्रेण संख्यानुपादानादक्षततिलघृतानामष्टोत्तरशतं होमो यथाशक्ति स्वर्णगोभूतिलदानं च कार्यम् ॥१॥ ॥ इतिश्रीस्वोक्तमुहूर्तमार्तंडटीकायां प्रथमार्तवप्रकरणम्॥३॥

**टीकार्थ**—आतां गर्भाधान इत्यादि संस्कारांचें प्रकरण सांगण्याच्या इच्छेनें गर्भाधानाला ऋतूची आवश्यकता असल्याकारणानें अगोदर ऋतूचें फल स्रग्धरावृत्तानें सांगतों. अगोदर मासांचें फल सांगतों. प्रथम ऋतुदर्शनाचे वेळीं पौष, ज्येष्ठ, कार्तिक, चैत्र, आषाढ, भाद्रपद हे सहा महिने शुभकारक नाहींत. अर्थात् याहून बाकी राहिलेले सहा महिने ह्मणजे माघ, फाल्गुन, वैशाख, श्रावण, आश्विन, मार्गशीर्ष हे शुभकारक आहेत. तोच अर्थ ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितला आहे कीं, प्रथम ऋतु चैत्रांत आला तर ती स्त्री विधवा होते. वैशाखांत आला असतां धन आणि पुत्र ह्यांनीं संपन्न होते. ज्येष्ठांत आला असतां रोगिणी होते. आषाढांत आला असतां तिचे पुत्र मर-

तात. श्रावणांत आला असतां धनवती होते.भाद्रपदांत आला असतां अभाग्यवती होते. आश्विनांत आला असतां तपस्विनी ह्म० सदाचार संपन्न होते. कार्तिकांत आला असतां अल्पायुष्याची होते. मार्गशीर्षांत आला असतां पुष्कळ संतति देणारी होते. पौषांत आला असतां दुराचरणी होते. माघांत आला असतां पुत्रांचे सुखांनीं संपन्न होते. फाल्गुनांत आला असतां लक्ष्मीवान् होते. असें हें क्रमानें मासांचें फल सांगितलें. योगांचें फल सांगतों तें असें कीं, १ विष्कंभ,२ अतिगंड,३ शूळ, ४ गंड, ५ व्याघात, ६ वज्र, ७ व्यतिपात, ८ परिघ, ९ वैधृति हे नऊ योग यांवर प्रथम ऋतू आला असतां तो अशुभ होतो. अर्थात् ह्या नवांशिवाय बाकी राहिलेले अठरा योग शुभ आहेत. तोच अशुभकारक अर्थ असा सांगितला आहे कीं, प्रथम ऋतु विष्कंभावर आला असतां दुर्भगा ह्म० विधवा होते. अतिगंडावर आला असतां वांझ होते. शूलावर आला असतां तिला शूळ होतो. गंडावर आला असतां जार कर्म करणारी होते. व्याघातावर आला असतां आत्महत्या करणारी होते. वज्रावर आला असतां स्वच्छंद फिरणारी होते. पातावर आला असतां परिघात करणारी होते. परिघावर आला असतां मृत वांझ होते. वैधृतिवर आला असतां पतिला मारणारी होते. बाकी राहिलेले योग शुभकारक आहेत. त्यांचीं जशीं नावें आहेत तसें ते फल देणारे आहेत. वारांचें फल सांगतों—क्षीणचंद्र, सूर्य, शनि, मंगळ हे पापग्रह आहेत त्यांचे वार अशुभ आहेत अर्थात् बाकीचे वार शुभ आहेत. तोच अर्थ कारिकेंत सांगितला आहे तो असा, रविवारीं प्रथम ऋतु आला असतां स्त्री विधवा होते. सोमवारीं आला असतां तिच्या प्रजा मरतात. मंगळवारीं आला असतां बहिणीला मारणारी होते. बुधवारीं आला असतां तिला कन्या प्रजा होते. गुरुवारीं आला असतां ती पुत्रवती होते. शुक्रवारीं आला असतां कन्या आणि पुत्र दोनही होतात. शनवारीं आला असतां जारिणी होते, असें विद्वान् जाणतात. तोच विचार नारदानें सांगितला आहे. तो असा रविवारचे क्रमानें १ रोगी २ पतिव्रता ३ दुःखी ४ पुत्रवती ५ भोगभोगणारी, ६ पतीला प्रिय, ७ क्लेश भोगणारी, आतां कारिका वचनांत सोमवारचें फल मृतप्रजा असें आहे आणि नारदवचनांत पतिव्रता असें सोमवाराचें फल आहे ह्मणून दोन वचनांचा विरोध आला असतां कृष्णपक्षांतील सोमवाराचें फल मृतप्रजा असें आहे कारण त्यावेळेस चंद्र क्षीण असतो आणि पतिव्रता हें फल शुक्लपक्षांतील सोमवाराचें आहे कारण त्या वेळेस चंद्र वृद्धिंगत असतो अशी व्यवस्था समजावी. ह्मणून मार्तंडानें सांगितलेल्या पापग्रहांचे वार हे फारच प्रशस्त आहेत. तिथींचें फल सांगतों—रिक्ता तिथि ह्म० ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, ) अमावास्या, अर्क ह्म० द्वादशी कारण द्वादशीचा स्वामी अर्क आहे अथवा अर्क ही संख्या बारा आहे ह्मणून ही द्वादशीच येते. तिथींच्या देवता रत्नमाला ग्रंथांत सांगितल्या आहेत त्या अशा तिथींचे पति चतुर्मुख, विधाता, विष्णु असे तिघे इत्यादि आहेत. अष्ट ह्म० अष्टमी, षष्ठी ह्या सात तिथी अशुभ आहेत, अर्थात् बाकीच्या शुभ समजाव्या. ह्याच विचार सांगितला आहे तो असा कीं, प्रथम ऋतु दर्शन होतांना प्रतिपदा असेल तर ती स्त्री सौभाग्यवती, द्वितीयेस भाग्यवती, तृतीयेस पुत्रवती,चतुर्थीस विधवा,पंचमीस धन देणारी, षष्ठीस क्लेश करणारी, सप्तमीस धन वाढविणारी, अष्टमीस राक्षसी, नवमीस पाप वाढविणारी, दशमीस प्रीति करणारी, एकादशीस पुत्रवती, द्वादशीस दुर्भगा ह्म० दुष्ट भाग्याची, त्रयोदशीस सुवर्ण देणारी, चतुर्दशीस जार कर्म करणारी; पौर्णिमेस सुपुत्र देणारी, जर भद्रा नसतील तर अमावास्येस ऋतु पाहिला तर खरोखर चोरी करणारी होते. आतां घराचा विचार सांगतों. पतिवांचून दुसऱ्याच्या घरीं, कुत्सितस्थानीं हीं दोन स्थानें निंद्य ह्म० अशुभ आहेत अर्थात् ह्यांहून बाकीचीं स्थानें शुभ आहेत. असें सांगितलें आहे कीं, देवस्थानीं ह्म० मंदिरांत, पितृस्थानीं ह्म० स्मशान भूमीवर, निंद्यस्थानीं, दुसऱ्याचे घरीं, चांडाळाचे घरीं, ऋतुमती झाल्याचें फल शुभकारक असत नाहीं. आतां अशी शंका येते कीं, ह्या श्लोकांत पुष्कळ स्थानें निंद्य ह्मणून सांगितलीं आहेत मग मार्तंडांत परगृह आणि कुपद ह्म० कुस्थान एवढीं दोनच कां सांगितलीं ? हें ह्मणणें खरें आहे. परंतु जीं दोनच स्थानें सांगितलीं त्यांमध्येंच श्लोकांतील सर्व स्थानांचा समावेश आहे. तो असा कीं, परगृह ह्या शब्दामध्यें देवस्थान, दुसऱ्याचें घर, चांडाल घर इतक्यांचा समावेश होतो आणि बाकीच्यांचा समावेश कुपद शब्दांत होतो आतां अशी शंका येते कीं, मार्ग ह्मणजे रस्ता ह्याचा कुपदांत समावेश कसा होईल ? कारण तो मार्ग कांहीं कुत्सित असत नाहीं. परंतु धर्म शास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें असतां मार्गामध्यें सर्व प्रकारच्या जनांचा संचार असल्या कारणानें तो दुष्ट असतो. असें जर आहे तर पूर्वीच्या श्लोकांतील पुष्कळ बोलणें फुकट होईल असें ह्मणूं नका. कारण कीं, पुष्कळ बोलणें हें एकापेक्षां एक अधिक दोष युक्त आहे असें सांगण्याच्या इच्छेनें आहे ह्मणून तो दोष येत नाहीं,आतां वेळाचें फल सांगतों—रात्रि, दोन संध्या आणि अपराण्ह ह्म० दिवसाचा तिसरा भाग. अपराण्ह काल ह्मणजे एका दिवसाचे तीन भाग केल्यावर जो तिसरा भाग असतो त्याला अपराण्ह काल ह्मणतात. हे चार काळ प्रथम रजो दर्शनास शुभ नाहींत. अर्थात् दुसरे मध्यान्ह आणि पूर्वाण्ह हे शुभ आहेत. असें सांगितलें आहे कीं, पूर्वाण्हीं जी रजोदर्शन पावते ती पुत्रवती होते व सौभाग्यवती होते. मध्यान्हीं रजोदर्शन पावणाऱ्या स्त्रियेला शुभ फल प्राप्त होतें. अपराण्हीं पावणारी स्वैरिणी ह्मणजे स्वच्छंद गमन करणारी होते. दोन संध्येचे वेळीं ऋतु प्राप्त होणारी वेश्या होते. रात्रीं ऋतु प्राप्त झालेली स्त्री विधवा होते. नक्षत्रांचें फल सांगतों.—मिश्र ह्मणजे कृत्तिका व विशाखा हीं दोन. उग्र ह्मणजे तीन पूर्वा ह्म०

पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा हीं तीन आणि भरणी व मघा अशीं हीं पांच नक्षत्रें. व मूळ नक्षत्राशिवाय बाकीचीं सर्व तीक्ष्ण नक्षत्रें, ह्म० आश्लेषा, ज्येष्ठा, आर्द्रा, इतकीं नक्षत्रें शुभ नाहींत. ह्म० ह्यांवर ऋतु आलेला शुभकारक नाहीं. अर्थात् बाकीचीं सर्व राहिलेलीं नक्षत्रें शुभ आहेत. तोच विचार नारदसंहितेंत सांगितला आहे कीं, १ अश्विनी नक्षत्रांवर प्रथम ऋतु आला तर ती स्त्री लक्ष्मीवती, सौभाग्यवती, सौख्यवती, कुलामध्यें श्रेष्ठ, मानवती अशी होते. २ भरणी नक्षत्रावर प्रथम ऋतु आला तर दुष्ट स्वभावाची स्वछंद गमन करणारी, आपला गर्भ पाडणारी, दुसऱ्याच्या घरीं चाकरी करणारी, ह्म० दासी, काकवंध्या होते. ३ अग्नि देवतेच्या ह्मणजे कृत्तिका नक्षत्रावर ऋतु प्राप्त झाला तर दरिद्री, जार कर्म करणारी, वांझ, गर्भघात करणारी, दासी, मृतप्रजा होते. ४ धातृदेवतेचे नक्षत्रावर ह्म० रोहिणीवर ऋतु आला तर सुस्वभावाची, सुप्रजावती, मान्य, पतिसेवातत्पर, दृढव्रत करणारी, गृहाचे कृत्यांत तत्पर अशी होते. ५ चंद्रदेवतेच्या ह्म० मृगशीर्ष नक्षत्रावर ऋतु आला तर गुणवती, धर्माचरणांत तत्पर, क्षमावती, पतिप्रिया, पुत्रसंपन्न अशी होते. ६ रुद्रदेवतेच्या नक्षत्रावर ह्म० आर्द्रा नक्षत्रावर ऋतु आला तर कुलटा ह्म० जारिणी, दुर्भाग्यवती, कष्ट देणारी, मृतपुत्रा, खल आणि जड स्वभावाची, पातिव्रत्यापासून भ्रष्ट होणारी होते. ७ अदिति देवतेचे ह्मणजे पुनर्वसु नक्षत्रावर ऋतु आला तर. पतीची सेवा करणारी, पुत्रवती-उत्तम संतानानें आनंद पावणारी, कुलाचारानें वर्तन करणारी अशी होते. ८ पुष्य नक्षत्रावरची स्त्री, पतिप्रिय, पुत्रवती, नानाप्रकारचे भोग भोगणारी, आपल्या स्वकर्तव्यकर्मांत तत्पर, चतुर, अशी होते. ९ सूर्यदेवतेच्या ह्म० आश्लेषा नक्षत्रावर ऋतु आला असतां दुसऱ्याच्या पतिबरोबर रत होणारी, दासी, रागीट, निर्दय, आळसी, खोटें बोलणारी, दुष्ट पुत्रवती होते. १० पितृदेवतेच्या ह्म० मघा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री द्वेष न करणारी, रोगी, नेहेमीं गायनप्रिय, बापाचे घरीं रहाण्यास तत्पर, मान्य अशी होते, ११ भगदेवतेच्या ह्म० पूर्वा फाल्गुनीवर ऋतु आलेली स्त्री दुसऱ्यांचें काम करण्यांत तत्पर, दीन स्वभावाची, दुष्ट पुत्राची, क्लेश भोगणारी, मलिना, कर्कशा आणि क्रोधी होते. १२ अर्यमादेवतेच्या ह्म० उत्तराफाल्गुनीवर ऋतु आलेली स्त्री प्रजासंतति युक्त, धर्मतत्पर, वैररहित, मित्राकडून मान मिळविणारी, पतिव्रता, मातेच्या घरीं राहणारी, अशी होते. १३ हस्त नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री द्वेष न करण्याजोगी, पुष्कळ धनवती, पुत्रांनीं संपन्न, भोग भोगणारी, दान करण्यांत कुशल, प्रधान ह्म० श्रेष्ठ स्वभावाची अशी होते. १४ त्वष्ट्रदेवतेचा ह्म० चित्रा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री चित्रकर्म करण्यांत कुशल, भोग भोगणारी, क्रयविक्रय करण्यामध्यें कुशल, मोठमोठ्या इच्छा करणारी, प्रीतियुक्त अशी होते. १५ वायुदेवतेच्या ह्म० स्वाती नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री पुष्कळ वित्त असलेली, रोगरहित, शिल्प कामांत चतुर, पुत्र, पौत्र असलेली, पतिव्रता, अशी असते. १६ दोन देवता ज्याच्या आहेत अशा ह्म० विशाखा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री नीच कर्म करण्यांत तत्पर, दुष्ट स्वभावाची, मद्यपानाविषयीं आसक्त, परप्रिय, पुत्ररहित, मलिन आणि क्रोधी अशी असते. १७ मित्रदेवतेच्या ह्म० अनुराधा नक्षत्रावर ऋतु आला असतां ती स्त्री आपल्या पतिकडील माणसांकडून आदर केलेली, आपल्या स्वतःच्या गुणांनीं उत्तम शोभायमान, सुपुत्रवती, सौभाग्यवती, रमणीय अशी होते. १८ ज्येष्ठा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री दुराचरणांत तत्पर, क्लेश करणारी, द्रव्यरहित, जारकर्म करणारी, दुष्ट प्रजा उत्पन्न करणारी आणि शेवटीं मरण पावणारी होते. १९ मूल नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री संतान, संपत्ति इत्यादि नाना गुणांनीं युक्त, दुसऱ्याचें दुःख नाश करणारी, नेहेमीं आपल्या कर्तव्यकर्मांत तत्पर असणारी होते. २० जलदेवतेच्या ह्म० पूर्वाषाढा नक्षत्रावरची स्त्री चोरून पाप करणारी, दुष्ट पुत्रवती, प्राण्यांची हिंसा करण्यांत तत्पर, नेहेमीं संकटांत पडून दुःख भोगणारी होते. २१ विश्वेदेवदेवतेच्या ह्म० उत्तराषाढा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री कर्तव्य आणि अकर्तव्य ह्यांविषयीं कुशल, नेहेमीं धर्माला अनुसरून वागणारी, गुणांनीं युक्त, भाग्यवती अशी असते. २२ विष्णुदेवतेचे ह्म० श्रवण नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री पुत्र, पौत्र ह्यांनीं युक्त, उत्तमभोग, धन, धान्य ह्यांनीं संपन्न, पतिव्रता, कुलाला आनंद देणारी. सर्वांना मान्य अशी असते. २३ वसुदेवता असलेल्या ह्म० धनिष्ठा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री धन आणि धान्य ह्यांनीं संपन्न, उत्तम भोग, पुत्र, पौत्र ह्यांनीं संपन्न, आपल्या कर्तव्यकर्मांत तत्पर, पतिव्रता असते. २४ वरुण देवतेच्या ह्म० शततारका नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री पुष्कळ पुत्र असलेली, धनवती, स्वकर्तव्यकर्मांत तत्पर, पतिव्रता, कुलाला आनंद करणारी, मान्य अशी होते. २५ अजैकचरणदेवतेच्या ह्म० पूर्वाभाद्रपदा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री बंधुजनांकडून द्वेष करण्याजोगी, नेहेमीं दुष्ट कामांत तत्पर, दुष्ट, शिल्प कामांत कुशल अशी असते. २६ अहिर्बुध्न्य देवतेचे ह्म० उत्तराभाद्रपदा नक्षत्रावर ऋतु आलेली स्त्री श्रीमान्, पुत्रवती, मान्य, सुप्रसन्न, पतिप्रिया, बंधुनीं पूज्य, धर्माचरणवती अशी उत्तम असते. २७ पूषादेवतेच्या ह्म० रेवती नक्षत्रावर प्रथम ऋतु आलेली स्त्री नियम करण्यांत दृढव्रताची, धर्माचरणवती, पुत्र व पौत्र आणि संपत्ति ह्यांनीं संपन्न, प्रसिद्ध गुणसंपन्न, अशी होते. आतां संधींचें फल सांगतों—तिथि, नक्षत्र इत्यादिकांचे संधींवर प्रथम ऋतु आला तर तो शुभकारक नाहीं ह्मणूनच सांगितलें आहे कीं, सर्व प्रकारच्या संधीवर ऋतु आला तर ती स्त्री दुर्भगा होते. रक्ताचें फल सांगतों—फार थोडें व फार अधिक असून फार लाल रक्त नसावें. अर्थात् त्याहून निराळें शुभ जाणावें. हीच गोष्ट अन्य ग्रंथांत सांगितली आहे कीं, प्रथम ऋतु कालीं स्त्रियांचें रज ह्मणजे रक्त पांढुरक्या वर्णाचें असेल तर ती स्त्री सौभाग्यवती व पुत्रसंयुक्त होईल. शशाच्या रक्तासारखें रज असेल अथवा

अळत्यासारखें असेल तर पुत्र व कन्या ह्यांना जन्म देणारी होईल. नील वर्णाचें रज असेल तर ती मृतप्रजा होईल. कर्बुर ह्म० चित्रविचित्र वर्णाचें असेल तर ती स्वतःच मरेल. पिंगट वर्णाचें रज असेल तर ती मृतप्रजा होईल. काळ्या वर्णाचें रज असेल तर ती विधवा होईल. रज बिंदुमात्र असेल ह्मणजे फारच थोडें असेल तर ती स्वैरिणी ह्म० यथेच्छ फिरणारी होईल. मध्यम स्राव असेल तर ती श्रेष्ठ समजावी. फारच रजाचा स्राव असेल तर ती दुर्भगा ह्म० दुष्टभाग्याची होईल. दुसऱ्याही ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, रज रक्त असेल तर तिला पुत्र होतील, काळें असेल तर पुत्र मरतील, पिच्छल वर्णाचें ह्म० चित्र वर्णाचें असेल तर ती वांझ होईल. पांढरें असेल तर काकवंध्या होईल. पिंवळें असेल तर स्वैरिणी ह्म० यथेच्छ गमन करणारी, गुंजेसारखें असेल तर सुभगा ह्म० श्रेष्ठ होईल. सिंदूरासारखें रज असेल तर कन्या होईल असें हें रजाचें लक्षण जाणावें. करणाचें फल सांगतों—गर नांवाच्या करणापासून बवापर्यंत जे आठ करण आहेत ते शुभ नाहींत. अर्थात् बाकीचे शुभ आहेत. ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, बवावर ऋतु आलेली स्त्री वांझ अथवा विधवा होईल, बालवावर स्त्री पुत्रवती होईल, कौलवावरची स्त्री उत्तम कामयुक्त होईल, तैतिलावर उत्तम बुद्धिवती होईल, गरावरची स्त्री नाश पावते, वणिक् करणावरची स्त्री नष्ट प्रजा होते, विष्टि करणावरची स्त्री वांझ आणि निर्धन होईल, शकुनि करणावरची व चतुष्पाद करणावरची स्त्री विधवा होईल. नागावरची स्त्री रमण पावत नाहीं. किंस्तुघ्नावरची स्त्री विधवा होईल. आतां उत्पाताचें फल सांगतों—तीन प्रकारचा उत्पात शुभकारक नाहीं. तेंच नारदानें सांगितलें आहे कीं, संध्याचेवेळीं, ग्रहणाचे काळीं, विष्टिवरचा प्रथम ऋतु शुभकारक होत नाहीं. आतां लग्नाचें फल सांगतों—पापग्रहांचें लग्न शुभकारक नाहीं. पापग्रह ह्म० क्षीणचंद्र, सूर्य, शनि, मंगळ हे चार आहेत. त्यांपैकीं प्रत्येकाचें लग्न अशुभ आहे तीं लग्नें ह्मणजे मेष, सिंह, वृश्चिक, मकर आणि कुंभ हीं अशुभ आहेत अर्थात् बाकीचीं लग्नें शुभ आहेत. कर्कलग्न शुक्लपक्षांत शुभ आणि कृष्णपक्षांत तें अशुभ आहे, लग्नांचे स्वामी पुढें सांगावयाचे आहेत. असें सांगितलें आहे कीं, मेष लग्नावरची स्त्री आत्महत्या, भ्रूणहत्या करणारी होईल. वृषावर पुत्रवती होईल. मिथुनावरची स्त्री कन्या प्रसवणारी होईल. कर्कावरची स्त्री मृतापत्या होईल. सिंहावरची स्त्री विधवा होईल कन्यावरची स्त्री कन्या प्रसवणारी होईल. तुलावरची स्त्री बहु पुत्रवती होईल. वृश्चिक लग्नावरची स्त्री दुष्ट कर्म तत्पर होईल. धन लग्नावरची स्त्री पुत्र आणि धन ह्यांनीं संपन्न होईल. मकरावरची स्त्री दुःखी होईल. कुंभावरची स्त्री एक पुत्रवती होईल मीनावरची स्त्री अल्पप्रजा होईल. नारदही असें सांगतो कीं, स्त्रियांचे प्रथम ऋतुला, कर्क, वृष, धनु, मीन, मिथुन, कन्या, तुल, धन, इतक्या राशी शुभकारक आहेत. अर्थात् बाकीच्या अशुभ आहेत. येथेंही कर्कलग्न हें चंद्राचें आहे ह्मणून त्याची व्यवस्था शुक्लपक्षांतील चंद्राचें कर्कलग्न शुभ व कृष्णपक्षांतील चंद्राचें कर्कलग्न अशुभ अशी व्यवस्था जाणावी. आतां वस्त्राचें फल सांगतों—लाल, फाटकें, निळें, चित्रविचित्र ह्म० बहुरंगाचें असें वस्त्र शुभकारक नाहीं अर्थात् मजबूत, पांढरें, पिंवळें, वस्त्र शुभ आहे. असें सांगितलें आहे कीं, शुभ्र वस्त्राची स्त्री शुभ. लाल वस्त्राची रोगी होईल. निळें वस्त्राची स्त्री विधवा होईल. पिवळे वस्त्राची स्त्री भोगवती होईल. बळकट वस्त्राची स्त्री पतिव्रता होईल. फाटक्या वस्त्राची स्त्री दुर्भगा ह्म० दुर्भाग्याची होईल. शुभ वस्त्राची स्त्री सौभाग्यवती होईल. येथें न सांगितलें असेल तींही त्याज्य प्रकरणांत सांगितलेलीं दुसरीं कित्येक विचार करण्याजोगीं आहेत. येथें सांगितलेल्या निषिद्धकालावर रजोदर्शन झालें असतां अक्षता, तिल आणि घृत ह्यांनीं देवीचें यजन करावें. देवीचें गायत्रीमंत्रानें असुक संख्या सांगितली नसेल तरीहि अक्षता, तिळ, तूप ह्यांच्या एकशें आठ आहूतींचा होम करावा. आणि आपल्या शक्त्यनुसार सुवर्ण, गाय, भूमि, तिळ ह्याचें दान करावें. ॥ १ ॥ अशा रीतीनें आपण केलेल्या मुहूर्तमार्तंडटीकेचें पहिल्या ऋतूचें प्रकरण समाप्त झालें. ॥ ३ ॥

## साधारण लग्नबल.

प्रायश्चंद्रं त्यजांत्याष्टमारिपुतनुगं भांशकौ मूढनाथौ ।
क्रूरेंद्राप्तौ खलांशं मृतिगतखचरं मृत्युतत्पौ तनुस्थौ ॥
सौम्याः केंद्रत्रिकोणेष्वरिभवसहजेष्वन्यखेटाः प्रशस्ताः ।
सर्वत्रैतत्प्रयोज्यं प्रकरणपठितांस्तद्विशेषान्विदित्वा ॥२॥
॥ इति साधारणलग्नबलम् ॥

श्लोकार्थ—ह्यापुढें जेवढे मुहूर्त सांगावयाचे आहेत त्या सर्वांना लग्नाचें ग्रहबल पाहातांना बहुधा बारावा, आठवा, सहावा, पहिला ह्या स्थानचा चंद्र सोडावा. अस्तंगत ग्रहाचें लग्न व नवांश सोडावे. पापानें किंवा चंद्रानें युक्त लग्न व त्याचे नवांश सोडावेत. पापाचा नवांश सोडावा, ज्या लग्नाचा पति आठव्या स्थानीं असेल तें लग्न

सोडावें. जन्मराशी आणि जन्मलग्न ह्यां पासूनचें आठवें लग्न सोडावें आणि त्याच अष्टम स्थानचे अधिपति इष्ट-लग्नीं सोडावेत. त्रिकोणांत आणि केंद्रांत शुभ ग्रह असावा आणि ६–११–३ ह्या स्थानीं पापग्रह हे शुभ जाणावेत. पुढें प्रत्येक प्रकरणांत विशेष लग्नबल सांगितलें असेल तें जाणून हें सामान्य लग्नबल सर्व कार्यांचे वेळीं योजावें॥२॥

**अथ साधारणं लग्नबलं स्रग्धरावृत्तेनाऽऽह– प्राय इति । इह वक्ष्यमाणे गर्भाधानादिकृत्ये प्रायो बाहुल्येन चंद्रं अंत्याष्टमरिपुतनुगं त्यज जहीति अंत्यं द्वादशं अष्टमं प्रसिद्धं रिपुः षष्ठं तनुर्लग्नं एतान्प्रति गतं चंद्रं त्यजेति । तथा भांशकौ त्यज किंलक्षणौ भांशकौ मूढनाथा मूढः नाथो ययोस्तौ तथा अस्तंगतस्य लग्ननवांशावित्यर्थः । पुनः किंलक्षणौ क्रूरेंद्वाप्तौ क्रूरग्रहचंद्राणामन्यतमेन युक्तौ । तथा खलांशं त्यज यत्र कुत्रापि लग्ने पापग्रहनवांशं त्यज । तथा मृतिगतखचरं त्यज लग्नादष्टमं ग्रहं त्यजेदित्यर्थः । तथा मृत्युतत्पौ तनुस्थौ त्यज मृत्युर्जन्मराशिजन्मलग्नाभ्यामष्टमं त्याज्यं तत्पस्तत्पतिस्त्याज्यः एतौ तनुस्थौ त्यजेदित्यर्थः । लग्नगोचरमाह–सौम्याः इति । सौम्या साम्यग्रहाः केंद्राणि लग्नचतुर्थसप्तमदशमानि त्रिकोणे नवपंचमे एतेषु केंद्रत्रिकोणेषु सौम्या ग्रहाः प्रशस्ताः । अरिभवसहजेषु अन्यखेटाः अरिः षष्ठं भवः एकादशं सहजं तृतीयं एषु स्थानेषु अन्ये खेटाः सौम्येभ्योऽन्ये पापग्रहाः प्रशस्ताः स्युः सर्वत्रैतत्प्रयोज्यमेतत् श्लोकोक्तं सर्वत्र गर्भाधानादिकृत्ये प्रयोज्यं साधारणत्वात् किं कृत्वा प्रकरणपठितांस्तद्विशेषान् विदित्वा पृथक्कृत्ये प्रकरणपठितविशेषान् ज्ञात्वा ॥ २ ॥ इति साधारणलग्नबलप्रकरणम् ॥**

**टीकार्थ**—आतां साधारण लग्नबल सांगण्याकरितां स्रग्धरावृत्तानें सांगतो–पुढें सांगावयाच्या अशा गर्भाधान इत्यादि कार्यांमध्यें बहुतकरून बारावा, आठवा, सहावा आणि पहिला ह्मणजे लग्न इतक्या स्थानचा चंद्र सोडावा. ज्या लग्नाचा स्वामी मूढ ह्मणजे अस्तंगत झालेला अशीं लग्नें सोडावींत, तसेंच अस्तंगत झालेल्याचे नवांशही सोडून द्यावेत. तसेंच क्रूरग्रहानें आणि चंद्र ह्यांपैकीं एकानें युक्त असलेलें लग्न व त्याचे नवांशही सोडावेत. तसे जेथें कोठें ही लग्नावर पापग्रहांचा नवांश सोडून द्यावा. तसाच लग्नापासून आठव्यास्थानीं ह्म. मृत्युस्थानीं जो ग्रह असेल त्याचें जें लग्न असेल तें सोडून द्यावें. तसेंच मृत्युस्थानचा ग्रह आणि त्याचा स्वामी हे दोन ग्रह जर तनु ह्मणजे लग्नीं असतील तर तें लग्न सोडावें. लग्नाचे गोचर सांगतो– जर सौम्य ह्मणजे शुभग्रह केंद्रांत ह्मणजे लग्न, चतुर्थस्थान, सप्तमस्थान, दशम या स्थानीं असतील, अथवा त्रिकोणांत ह्मणजे नवम आणि पंचमस्थानीं असतील तर ते फारच प्रशस्त आहेत. आणि दुसरे ह्मणजे पापग्रह जर अरि ह्मणजे षष्ठस्थान, भव ह्मणजे अकरावें स्थान, सहज ह्मणजे तृतीयस्थान ह्या तीन स्थानचे पापग्रह फारच प्रशस्त आहेत. हा नियम सर्वठिकाणीं लागू करण्याजोगा आहे. श्लोकांत सांगितलेला सर्व प्रकार गर्भाधान इत्यादि कृत्यांत योजावा. कारण तो साधारण प्रकार आहे, परंतु प्रकरणविशेषामध्यें सांगितलेले ते ते विशेष जाणून घ्यावेत आणि निराळ्या कृत्यामध्यें दुसऱ्या प्रकरणांत सांगितलेले विशेषही जाणून घ्यावेत. ॥ २ ॥ अशारीतीनें साधारण लग्नाचें बलप्रकरण सांगितलें.

## गर्भाधानकाल.

स्वस्त्रीं प्राङ्गनिट्चतुष्कासमदिनविवरश्राद्धतत्प्राग्दिनानि ।
त्यक्त्वा मूलं मघांत्ये वसुकलिजनिभाहानि पर्वाणि चर्तौ ॥
याहीज्यार्केंदुलग्नैर्विषमभलवगैरुद्बलैर्भोसुतार्थिन् ।
व्यस्तैरेतैरिहैवायुगहनि मुदितः कन्यकेच्छो सुचंद्रे ॥ ३ ॥

श्लोकार्थ—स्त्रीला प्रथम ऋतु आल्यावर पहिल्यापासूनच्या चार रात्रि, विषमदिवस, तिथि, नक्षत्रें इत्यादिकांचा संधि, आई बापाचे श्राद्धाचा दिवस व त्याचा पूर्व दिवस, मूळ, मघा, रेवती, हीं तीन नक्षत्रें, अष्टमी, चतुर्दशी, जन्मनक्षत्रादिवस आणि पर्वें हीं सोडून पुत्र होण्याची इच्छा करणाऱ्यानें गुरु, रवि, चंद्र, हे लग्न बलवान् असून विषमराशींत व विषमनवांशांत स्वस्त्रीशीं गमन करावें. वरील तिथि, नक्षत्र इत्यादि सोडून गुरु, रवि, चंद्र आणि लग्न बलवान् असून समराशींत व समाननवांशांत असतां विषमदिवशीं कन्येची इच्छा करणाऱ्यानें स्वस्त्रीशीं गमन करावें परंतु त्या स्त्रीला व त्या पुरुषाला दोघांना चंद्रबळ असलेंच पाहिजे आणि रतिसुखाचे वेळीं दोघांनीं आनंदांत असावें ॥ ३ ॥

अथ गर्भाधानं स्रग्धरावृत्तेनाऽऽह– भोः सुतार्थिन् ऋतौ मुदितः सन् स्वस्त्रीं प्रति याहि गच्छ इत्यन्वयः। सुतं अर्थयतेऽसौ सुतार्थी तस्य संबोधनं भोः सुतार्थिन् ऋतौ रजोदर्शनादारभ्य षोडश रात्रयः ऋतुः तस्मिन् मुत् हर्षः संजातो यस्य स मुदितः एवंविधः सन् स्वस्त्रीं प्रति गच्छेत्यर्थः। यतोऽत्र स्त्री गर्भधारणं करोति अत्र ह्यपि हर्षिता भाव्या। तथा च मनुः। ऋतुः स्वाभाविकः स्त्रीणां रात्रयः षोडश स्मृता इति॥ किंकृत्वा प्राङ्निट्चतुष्कासमदिनविवरश्राद्धतत्प्राग्दिनानि त्यक्त्वा प्राचां निशां चतुष्कं प्राङ्निट्चतुष्कं पूर्वरात्रिचतुष्टयं असमदिनं विषमदिनं विवराणि दिनरात्रितिथिभादीनां संधयः श्राद्धं स्वपित्रोः श्राद्धदिनं तत्प्राग्दिनं तस्य श्राद्धस्य पूर्वदिनं एतानि त्यक्त्वेत्यर्थः। एवं मूलं त्यक्त्वा तथा मघांत्ये त्यक्त्वा मूलमघे प्रसिद्धे अंत्यं रेवती एतानि त्यक्त्वेत्यर्थः। तथा वसुकलिजनिभाहानि त्यक्त्वा वसुरष्टमी कलिश्चतुर्दशी जनिभं जन्मनक्षत्रं अहो दिवा एतानि त्यक्त्वेत्यर्थः। तथा पर्वाणि च त्यक्त्वा पर्वाणि दर्शपौर्णिमाव्यतीपातवैधृतिसंक्रांतिमहापातादीनि त्यक्त्वा स्त्रियं प्रति गच्छेत्यर्थः। तथा च नारदः। रजोदर्शनतोऽस्पृश्या नार्यो दिनचतुष्टयम्। ततः शुद्धा क्रियास्वेताः सर्ववर्णेष्वयं विधिरिति॥ वसिष्ठः। उपप्लवे वैधृतिपातयोश्च विष्ट्यां दिवा परिघपूर्वभागे॥संध्यासु सर्वास्वपि मातृपित्रोर्मृतेह्नि पत्नीगमनं विवर्ज्यम्॥दिनेषु युग्मेषु च वक्ष्यमाणयोगैः सुतार्थी स्वसतीमुपेयात्। दिनेष्वयुग्मेषु च कन्यकार्थी हित्वा च गंडांस्तिथिलग्नभागान्॥ ज्योतिषार्के। ऋतौ युग्मनिशि स्वस्त्रीं गच्छेत्पुत्राय सद्विधौ। मघामूलांत्यपक्षांतभूतदर्शाष्टमीस्त्यजेदिति। कैः इज्यार्केंदुलग्नैः विषमभलवगैः इज्यो गुरुः अर्कः प्रसिद्धः इंदुश्चंद्रः लग्नं प्रसिद्धं एतैर्विषमभलवगैः भं राशिः लवो नवांशः विषमराशिविषमनवांशस्थितैरित्यर्थः। न केवलं विषमभलवगैरपि उद्बलैः उत् उत्कृष्टं बलं येषां तानि तथा तैः। अथ कन्याकामिनो विशेषमाह– भोः कन्यकेच्छो इहैव अनंतरोक्तलक्षणे काले अयुगहनि विषमे दिने मुदितः सन् स्त्रीं प्रति याहि कैः एतैर्व्यस्तैः एतैः इज्यार्केंदुलग्नैः व्यस्तैरिति समभलवगैः समराशिसमांशस्थैः तथा च बृहज्जातके। ओजर्क्षे पुरुषांशकेषु बलिभिर्लग्नार्कगुर्विंदुभिः पुंजन्म प्रवदेत्समांशकगतैर्युग्मेषु तैर्योषित इति। कस्मिन्सति सुचंद्रे शोभने चंद्रे सति गोचरेण चंद्रबले सतीत्यर्थः। सुचंद्र इति अनन्यगतिकं विना सर्वत्र योज्यं। पूर्ववल्लग्नबलम्॥ ३॥

**टीकार्थ**—गर्भाधान हें स्रग्धरावृत्तोनें सांगतो–हे पुत्राची इच्छा करणाऱ्या, तूं ऋतुकाळीं मोठ्या आनंदानें आपल्या स्त्रीबरोबर गमन कर परंतु तें गमन करण्याच्या पूर्वीं पुढें सांगावयाचा तो विचार कर. तो असा कीं, ऋतुकाळ ह्मणजे ऋतुदर्शनापासून सोळा रात्री हा आहे. त्या सोळा रात्रीं मध्यें पुढें सांगितलेल्या गोष्टी वर्ज्य करून आनंदानें गमन कर. कारण कीं, त्या रात्रींमध्यें स्त्री गर्भधारण करीत असते त्या वेळेस स्त्री ही हर्ष युक्त असावी. तोच ऋतुकाळ किती आहे हें मनु सांगतो कीं, स्त्रियांना स्वाभाविक ऋतुकाळ ह्मणजे सोळा रात्री आहे, गमन करावयाचे पूर्वीं काय करावें तें सांगतो–पहिल्या चार रात्री, असमदिन ह्मणजे विषमदिवस, जसे ५–७–९–११–१३–१५ वगैरे, दिवस ( रात्रि ) तिथि, नक्षत्रें, ह्यांच्या संधि, आपल्या आईचा आणि बापाचा श्राद्धदिवस व त्याचे पूर्वींचा दिवस असे ४ दिवस इतक्यांचा त्याग करून स्वस्त्रीबरोबर गमन करावें. तसेंच मूल नक्षत्र, मघा आणि रेवती नक्षत्र आणि जन्मनक्षत्र आणि दिवस इतक्यांचा त्याग करावा. तसेंच पर्व ह्मणजे अमावास्या, पौर्णिमा, व्यतीपात, वैधृति, संक्रांति, महापात इत्यादिकांचा त्याग करून स्त्रीबरोबर गमन करावें. तेंच नारद सांगतो कीं, रजोदर्शन झाल्यापासून स्त्रिया ह्या चार रात्री पर्यंत अस्पृश्य ह्मणजे शिवण्याजोग्या असत नाहींत, त्या नंतर ह्या स्त्रिया क्रिया करण्यामध्यें शुद्ध समजाव्यात. हा विधि सर्व वर्णांना ह्मणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्यांना सारखाच आहे. वसिष्ठ सांगतो कीं, ग्रहणामध्यें ह्मणजे चंद्र, सूर्याच्या ग्रहणांत, वैधृति आणि व्यतीपातामध्यें, विष्टियोगांत, दिवसास, परिघयोगाच्या पूर्वभागीं, सर्व संध्यांमध्यें, तिथि, नक्षत्रादिकांच्या सर्व संधींमध्यें, आईबापांचे श्राद्धाचे दिवशीं, पत्नीबरोबर गमन करणें निषिद्ध आहे. समदिवसावर पुढें सांगावयाच्या योगांचा योग असतां पुत्रेच्छु पुरुषानें स्वस्त्रीबरोबर गमन करावें. अयुग्म ह्म० विषमदिवसावर कन्येची इच्छा करणाऱ्यानें तिथि,लग्न,भाग असे सर्व गंडांतांचा त्याग करून स्वस्त्रीबरोबर गमन करावें. ज्योतिषार्क ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ऋतुकाळीं उत्तमविधीवर समदिवशीं स्वस्त्रीबरोबर गमन करावें परंतु त्यावेळेस मघा, मूल, रेवती ह्या नक्षत्रांचा त्याग करावा. पौर्णिमा, अमावास्या, चतुर्दशी, अष्टमी ह्यांचा त्याग करावा. कोणते योग असावेत तें सांगतो–इज्य ह्म० गुरु, अर्क ह्म० सूर्य, इंदु ह्म० चंद्र, लग्न ह्म०लग्न हीं सर्व विषमराशि आणि विषमनवांश ह्यांवर असलीं पाहिजेत ह्मणजे गुरु, रवि, चंद्र, हे विषम राशीचे असून विषमनवांशाचे असावेत. तसेंच लग्न विषमराशीचें असून विषमनवांशाचें असावें. नुसते विषमराशी व विषमनवांशाचे असावेत एवढेंच नाहीं तर

त्यांना उत्कृष्ट बल असावें. आतां कन्येची इच्छा करणाऱ्याला जेवढा विशेष आहे तेवढा सांगतो-अरे कन्येची इच्छा करणाऱ्या पुरुषा, वर सांगितलेल्या लक्षणात्मक काळीं विषम दिवशीं, गुरु, रवि, चंद्र आणि हे व्यस्त ह्मणजे समराशीचे व समनवांशाचे असावेत तीच गोष्ट बृहज्जातकग्रंथांत सांगितली आहे कीं, नक्षत्राचें बल असतां पुरुषनवांशकावर लग्न, गुरु, रवि, चंद्र हे बलवान् असून त्यावेळेस गमन करणाऱ्यास पुत्र होईल असें सांगावें आणि ते तसेचेतसे सर्व लग्नादिक समांशकावर असतील तर कन्या होईल असें सांगावें.. परंतु दोन्ही वेळेस चंद्राचें उत्तम बल असलें पाहिजे ह्मणजे गोचरींचा चंद्र बलवान् असावा परंतु दुसरा कांहीं उपाय नसेल ह्मणजे वर लिहिलेला निर्दोष दिवस न सांपडला तर मग कांहीं दोष असतांही स्वस्त्रीबरोबर गमन करावें. अशी योजना करावी पूर्वीप्रमाणें लग्नाचें बल जाणावें ॥ ३ ॥

### पुंसवन आणि सीमंतोन्नयन.

पुंभेऽर्केज्यारवारे विमिथुनविषमांगांशयोः पुंसवं स्यात् ।
सीमंताख्यं च सत्सुव्ययसुतगृहयोः पर्वरिक्तोनतिथ्याम् ॥
मासे द्वित्रिप्रसंख्ये प्रथमकमपरं तुर्यषष्ठाष्टमेषु ।
प्रोक्तं पुंगर्भलग्नं ग्रहबलमनयोर्योज्यमाद्यश्च पक्षः ॥ ४ ॥

श्लोकार्थ—पुरुषनक्षत्रावर ह्मणजे पुष्य, हस्त, पुनर्वसु, अभिजित्, पूर्वाभाद्रपदा, अनुराधा, अश्विनी ह्या सर्व नक्षत्रांवर द्वादश आणि पंचम स्थानीं पापग्रह नसतानां, मिथुनलग्नाशिवाय दुसऱ्या कोणत्याही विषमलग्नीं आणि विषमनवांशावर, रवि, गुरु आणि मंगळ ह्या वारांवर, पौर्णिमा, अमावास्या आणि रिक्ता ह्या तिथी सोडून मग गर्भधारणोत्तर दुसऱ्या किंवा तिसऱ्या महिन्यांत पुंसवन करावें आणि चवथ्या, साहाव्या आणि आठव्या महिन्यांत सीमंतोन्नयन करावें. ह्या दोन संस्कारांला मागच्या श्लोकीं सांगितल्या प्रमाणें पुरुष गर्भधारण होणारें लग्नाचें ग्रहबळ आणि शुक्लपक्षाची योजना करावी ॥ ४ ॥

अथ पुंसवनसीमंतोन्नयने स्रग्धरयाऽऽह-पुंभेति। पुंभे पुंनक्षत्राणि चैतानि पुष्यो हस्तः पुनर्वसुः। अभिजित्प्रौष्ठपाच्चैव अनुराधाश्वियुक् तथेति ॥ प्रौष्ठपात् पूर्वाभाद्रपदा एषामन्यतमे पुंनक्षत्रे अर्केज्यारवारे रविगुरुभौमवारे विमिथुनविषमांगांशयोः अंगं च अंशश्च अंगांशौ विगतं मिथुनं याभ्यां तौ विमिथुनौ तौ च तौ अंगांशौ च तथा तयोर्मिथुनरहिते विषमलग्ने विषमनवांशे इत्यर्थः। पुंसवं पुंसवनं सीमंताख्यं च सीमंतोन्नयनमिति सत्स्यात् नामैकदेशग्रहणे नामग्रहणं। कयोः सतोः सुव्ययसुतगृहयोः सतोः पापग्रहरहितयोः व्ययसुतभवनयोः सतोरित्यर्थः। पर्वरिक्तोनतिथ्यां पूर्णिमामारिक्तातिथिरहिततिथ्यां मासे द्वित्रिप्रसंख्ये प्रथमकं पाठोक्त्या प्रथमकं पुंसवनं गर्भाधानाद्द्वित्रिप्रसंख्ये मासि द्वितीये तृतीये वा मासि सत्स्यात् अपरं सीमंतोन्नयनम् तुर्यषष्ठाष्टमेषु गर्भाच्चतुर्थषष्ठाष्टमेषु मासेषु सत्स्यात् यत् पुंगर्भाय लग्नबलमुक्तं ईज्यार्केंदुलग्नैरित्यादिकं तदनयोः पुंसवनसीमंतोन्नयनयोर्योज्यं। आद्यः पक्षः शुक्लपक्षश्च योज्यः न कृष्णः । अत्र गर्भाधन्नाशनांतेषु गुरुशुक्रमौढ्यादिकं न चिंत्यमित्यग्रे वक्ष्यति। लग्नबलं पूर्ववत्। जातूकर्ण्यः। द्वितीये वा तृतीये वा मासि पुंसवनं भवेत्। व्यक्ते गर्भे भवेत्कार्यं सीमंतेन सहाथवा ॥ नृसिंहः । रिक्तां च पर्व नवमीं त्यक्त्वा पुंसवने शुभाः ॥ वृत्तशते। सीमंतोन्नतनं बुधैस्तुहिनगोपुन्नामधिष्ण्ये स्थिते कुर्यात् पुंसवनं च सूर्यदिवसे भौमस्य जीवस्य वेत्यादि। बृहस्पतिः। कुलीरं मिथुनं कन्यां हित्वा शेषाः शुभावहा इति ॥ नारदः। चतुर्थे मासि षष्ठे वाऽप्यष्टमे वा तदीश्वरे । बलोपपन्ने दंपत्योश्चंद्रतारावलान्विते ॥ अरिक्तापर्वदिवसे कुजजीवार्कवासरे। तीक्ष्णमिश्रोग्रवर्ज्येषु पुंलग्ने पुंनवांशके ॥ शुद्धेऽष्टमे जन्मलग्नात्तयोर्लग्ने न नैधने। शुभग्रहयुते दृष्टे पापखेटायुतेक्षिते ॥ पंचेष्टके चतुर्भिर्वा इष्टेऽर्कैद्वीज्यपूर्वकैः। स्त्रीणां तु प्रथमे गर्भे सीमंतोन्नयनं शुभं ॥ शुभग्रहेषु धीधर्मकेंद्रेष्वरिभवत्रिषु। पापेषु सत्सु चंद्रेऽन्त्यनिधनाद्यरिवर्जिते ॥ क्रूरग्रहाणामेकोऽपि लग्नादंत्यात्मजाष्टगः। सीमंतिनीं वा तद्गर्भं बली हंति न संशय इति ॥ ४ ॥

टीकार्थ—आतां पुंसवन आणि सीमंतोन्नयन हे दोन संस्कार स्रग्धरावृत्तानें सांगतो-पुरुषनक्षत्रांवर ( पुष्य, हस्त, पुनर्वसु, अभिजित् पूर्वा भाद्रपदा ) इतक्यां पैकीं कोणत्यातरी एका नक्षत्रावर रविवार, गुरुवार आणि मंगळवार ह्यां पैकीं

एका वारावर, मिथुनलग्नाशिवाय दुसऱ्या कोणत्याही विषमलग्नीं व विषमनवांशावर पुंसव ह्मणजे पुंसवन आणि सीमंतोन्नयन नांवाचे संस्कार करावेत. आतां पुंसव आणि सीमंत ह्या शब्दांनीं पुंसवन आणि सीमंतोन्नयन असे पूर्ण शब्द घ्यावेत. कारण असा एक न्याय आहे कीं, नामाचा एक अवयव उच्चारला असतां त्यापासून सर्व नाम घ्यावें ह्मणून पुंसव ह्या एका अवयवानें पुंसवन हा शब्द आणि सीमंत ह्या एका अवयवानें सीमंतोन्नयन हा शब्द घ्यावा. पुंसवन व सीमंतोन्नयन करावयाचे वेळीं पंचमस्थानीं आणि द्वादशस्थानीं पापग्रह नसावा. पूर्णिमा, अमावास्या, रिक्ता ह्यांशिवाय दुसऱ्या कोणत्याही तिथि असाव्या, दुसरा किंवा तिसरा महिना असावा. प्रथमक असा पाठ आहे. त्यानें प्रथमक ह्मणजे पहिलें पुंसवन असा अर्थ आहे. गर्भाधानापासून दुसऱ्या, तिसऱ्या महिन्यांत केलेलें उत्तम असतें. दुसरें ( सीमंतोन्नयन ) गर्भाधानापासून चवथ्या, साहाव्या आणि आठव्या महिन्यामध्यें केलेलें फारच प्रशस्त आहे. पूर्वी पुरुषगर्भ होण्याकरितां जें लग्नाचें बल सांगितलें. गुरु, रवि, चंद्र इत्यादिक जे सर्व पूर्वी सांगितले ते सर्व ह्या पुंसवन आणि सीमंतोन्नयन संस्कारा विषयीं योजावे. पहिला पक्ष ह्म० शुक्लपक्ष योजावा. कृष्णपक्ष नसावा. ह्या गर्भाधानापासून तों अन्नप्राशना पर्यंतच्या सर्व संस्कारांमध्यें शुक्र, गुरु ह्यांचें अ-स्तादिक पाहाण्याची आवश्यकता नाहीं, असें पुढें सांगावयाचें आहे. लग्नाचें बळ पूर्वी प्रमाणें पाहावें. जातूकर्ण्य असें सांगतो कीं, दुसऱ्या अथवा तिसऱ्या महिन्यांत पुंसवन संस्कार करावा. अथवा गर्भ व्यक्त झाल्यावर सीमंतोन्नया बरोबर तरीं पुंसवन करावें. नृसिंह असें सांगतो कीं, रिक्तातिथी, पर्व आणि नवमी इतक्यांचा त्याग करून बाकीच्या सर्व तिथि पुंसवन संस्कारास शुभकारक आहेत. वृत्तशत ग्रंथांत सांगितलें आहे कीं, चंद्र पुरुषनामक नक्षत्रावर असेल त्यावेळेस रविवारीं, गुरुवारीं अथवा मंगळवारीं विद्वानांनीं सीमंतोन्नयन संस्कार करावा. बृहस्पति असें सांगतो कीं, कर्क, मिथुन आणि कन्या इतकीं लग्नें सोडून बाकीचीं सर्व लग्नें शुभकारक आहेत. नारद असें बोलतो कीं, चवथ्या मासीं, साहाव्या मासीं अथवा आठव्या मासीं त्यांचा स्वामी बलवान् असावा. दंपतीला ह्मणजे स्त्रीपुरुषांना चंद्र आणि तारा ह्यांचें बल असावें. रिक्ता आणि पर्व नसावेत. मंगळ,गुरु,रवि हे वार असावेत. तीक्ष्ण,मित्र आणि उग्र हीं नक्षत्रें नसावींत.पुरुष लग्न असावें आणि पुरुष नवांश शुद्ध असावा.जन्मलग्नापासून अष्टम आणि षष्ठ स्थानचा ग्रह नसून त्या स्थानचा अधिपती जो असेल तो लग्नीं नसावा. लग्न शुभ ग्रहांनीं युक्त असावें व त्यांनीं दृष्ट असावें. पंचमस्थानीं अथवा अष्टमस्थानीं पापग्रह नसावा व तीं स्थानें पापग्रहांनीं पाहिलेलीं नसावींत. रवि, चंद्र, गुरु इत्यादिकांनीं पाहिलेलें असें पंचमस्थान व अष्टमस्थान असावें. अशावेळेस स्त्रियांच्या प्रथम गर्भाचे वेळीं सीमंतोन्नयन करावें, पंचमस्थान, नवमस्थान आणि केंद्र ह्मणजे १–४–७–१० ह्या स्थानीं शुभ ग्रह असावेत. आणि ६–११–३ ह्या स्थानीं पापग्रह असावेत. १२–८–६ ह्या स्थानीं चंद्र नसावा. लग्नापासून १२–५–८ ह्या स्थानीं एक जरी पापग्रह असला तर तो जिचें सीमंतोन्नयन करावयाचें त्या गर्भिणी स्त्रीचा आणि त्या गर्भाचा नाश करतो ह्मणून तसा ग्रह नसावा ॥ ४ ॥

## जातकर्म व नामकरण.

**सूतौ जातं विदध्यादपिजनिमरणाशौचके वा तदंते ।**
**क्षिप्रैर्ध्रौव्योत्तराभिश्चरमृदुभिरथो नामवर्णा विदध्युः ॥**
**सूतेः सूर्याष्टिविंशाकृतिमितदिवसे जातभैर्वा चरांगम् ।**
**रिक्ताष्टम्यारमंदान् व्ययगतखचरं प्रोज्झ्य रात्रिं पराह्णम् ॥ ५ ॥**

श्लोकार्थ—स्त्रीप्रसूत होता क्षणींच तत्काळ जातकर्म करावें. मग त्या विळेस कदाचित् जननाशौच ह्मणजे वृद्धि असेल अथवा मरणाशौच ह्मणजे सूतक असेल तरी त्याची हरकत नाहीं. कदाचित् कांहीं अडचणीमुळें प्रसूतिकाळीं घडलें नाहीं तर मग पुढें क्षिप्र, ध्रुव, चर आणि मृदु ह्या नक्षत्रांवर जातकर्म करावें. ब्राह्मणानें प्रसूति दिवसापासून १२ दिवशीं, क्षत्रियानें १६ दिवशीं, वैश्यानें २० दिवशीं, शूद्रानें २२ दिवशीं, नामकरण ह्मणजे नांव ठेवण्याचा विधि करावा. त्यावेळेस चर लग्नें, रिक्ता व अष्टमी तिथी, मंगळ आणि शनि हे वार, लग्नापासून १२ ग्रह, रात्रि व अपराह्ण काळ इतके वर्ज्य करावेत ॥ ५ ॥

**अथ जातकर्मविधिं स्रग्धरावृत्तेनाऽऽह–सूताविती । सूतौ प्रसूतौ जातायां जातं जातकर्म विदध्यात् कुर्यात् । अथ कदाचित् सूतकमध्ये प्रसूतौ जातायां सत्यां स्मार्तकर्मपरित्यागो राहोरन्यत्र सूतक इति शास्त्रेण जातकर्मणोऽवरोधे प्राप्ते तदपवादमाह– जनिमरणाशौचकेऽपि । अयमर्थः**

कदाचिज्ज्ञातकमृतसूतकयोः प्रसूतिर्भवति तदा जातकर्मविषये सूतकांतरदोषो नास्तीतिभावः। सूतकांतरे सत्यपि जाते पिता सचैलं स्नानं कुर्यादिति स्वस्वगृह्योक्तं कर्म कुर्यादित्यर्थः। यतः पूर्वाशौचेनैवास्य शुद्धिः। पितुरिति कर्तुरुपलक्षणं वा तदंते पूर्वाशौचांते वा एतस्यांते वा क्षिप्रादिभिर्नक्षत्रैः कुर्यात्। क्षिप्राणि अश्विनीहस्ताभिजित्पुष्याः ब्राह्मं रोहिणी उत्तरास्तिस्रः चराणि श्रवणत्रयपुनर्वसुस्वात्यः मृदूनि अनुराधारेवतीमृगचित्रा एभिरित्यर्थः। लग्नबलं पूर्ववत्। उक्तं च। तस्मिन् जन्ममुहूर्तेऽपि सूतकांतेऽथवा शिशोः। जातकर्म च कर्तव्यं पितृपूजनपूर्वकम्॥ क्षिप्रैर्ध्रुवैर्ध्रुवैर्मिश्रैर्द्वादशे प्रथमेऽह्नि वा। केंद्रे गुरौ भृगौ कार्यं जातकर्म सनातनमिति॥ प्रजापतिः। सूतके तु समुत्पन्ने पुत्रजन्म यदा भवेत्। कर्तुस्तात्कालिकी शुद्धिः पूर्वाशौचेन शुद्ध्यतीति॥ संवर्तः। जाते पुत्रे पितुः स्नानं सचैलं तु विधीयते। तच्च शीतोदकेन कार्यं। तत्र जाबालिः। कुर्यान्नैमित्तिकं स्नानं शीताद्भिः काम्यमेव चेति॥ एतच्च रात्रावपि कार्यं। तत्र वसिष्ठः। पुत्रजन्मनि यज्ञे च तथा संक्रमणे रवेः। राहोश्च दर्शने स्नानं प्रशस्तं नान्यथा निशि॥ तच्च उत्तराभिमुखं कार्यं तदुक्तं तेनैव। श्रुत्वा जातं पिता पुत्रं सचैलं स्नानमाचरेत्। उत्तराभिमुखो भूत्वा नद्यां वा देवखातक इति॥ रात्रावुदकादिगमनाशक्तौ विशेषमाह सांख्यायनः। दिवा यदाहृतं तोयं कृत्वा स्वर्णयुतं तु तत्। रात्रिस्नाने तु संप्राप्ते स्नायादनलसन्निधाविति॥ अथ नामकर्माऽऽह—अथो नामवर्णा विदध्युः सूतेः सूर्याष्टिविंशाकृतिमितदिवस इति। अथोऽनंतरं वर्णा ब्राह्मणादयः क्रमेण सूतेः प्रसूतेः सकाशात् सूर्या १२ ष्टि १६ विंशा २० कृति २२ मितदिवसे द्वादशषोडशविंशद्वाविंशमितदिवसे नाम विदध्युः कुर्युरित्यर्थः। अयमर्थः ब्राह्मणो द्वादशे दिवसे क्षत्रियः षोडशे वैश्यो विंशतिमिते शूद्रो द्वाविंशतिमिते दिवसे नाम कुर्यादित्यर्थः। तच्चोक्तं बृहस्पतिना। द्वादशे दिवसे वाऽपि जन्मतो दिवसे शुभे। षोडशे विंशतौ चैव द्वाविंशे वर्णतः क्रमादिति॥ अत्रान्येऽपि विकल्पाः संति तत्र व्यासः। नामधेयं दशम्यां तु केचिदिच्छंति सूरयः। द्वादशेऽन्ह्याहुरन्ये तु मासे पूर्णे तथा परे। अष्टादशेऽहनि तथा वदंत्यन्ये मनीषिण इति॥ प्राप्तकालेऽपि विशेषमाह गर्गः। व्यतीपाते च संक्रांतौ ग्रहणे वैधृतावपि। श्राद्धं विना शुभं नैव प्राप्तकालेऽपि मानवः॥ अमासंक्रांतिविष्ट्यादौ प्राप्तकालेऽपि नाऽऽचरेदिति॥ यत्र। कालनिरोधस्तत्र दोषो नास्ति। यस्यां क्रियायां सर्वोक्तः कालो मासदिनैरपि। तस्यां न दोषो मूढत्वं वक्रं वा जीवशुक्रयोरिति॥ अथ कालातिक्रमे नक्षत्राण्याह— जातभैर्वेति। जातभैर्जातकर्मोक्तनक्षत्रैर्भैः क्षिप्रैरित्यादिभिर्वा कार्यं। तदुक्तं नारदेन। देशकालोपघाताद्यैः कालातिक्रमणं यदि। अनस्तगे भृगावीज्ये तत्कार्यं चोत्तरायणे॥ चरस्थिरमृदुक्षिप्रनक्षत्रे शुभवासरे। चंद्रताराबलोपेते दिवसे च शिशोः पितेति॥ अथात्र त्याज्यविशेषमाह— चरांगमिति। चरांगं चरलग्नं रिक्ताष्टम्याऽरमंदान् रिक्ताश्चतुर्थीनवमीचतुर्दश्यः अष्टमी प्रसिद्धा आरो भौमवारः मंदः शनैश्चरः तान्। व्ययगतखचरं। व्ययभागवर्तं सौम्यं असौम्यं वा। रात्रिः प्रसिद्धा। अपराह्णो दिनतृतीयांशः। एतान् प्रोज्झ्य त्यक्त्वा। लग्नबलं पूर्ववत्। तथाच बृहस्पतिः। पूर्वाह्णः श्रेष्ठ इत्युक्तो मध्याह्ने मध्यमः स्मृतः। अपराह्णं च रात्रिं च वर्जयेन्नामकर्मणीति॥ नृसिंहः। सायाह्ने दुष्टयोगे च शनिभूमिजवारयोः। रिक्तापर्वाष्टमीविष्टिः किंस्तुघ्नं च विशेषतः॥ एतैर्दोषैर्युते काले रात्रावपि न कारयेदिति॥ बृहस्पतिः। शुभवारे च षड्वर्गे शुभानां नामसंपदे। राशयश्च स्थिराः श्रेष्ठा द्विःस्वभावाः शुभैर्युताः॥ नृसिंहः। लग्नाद्व्ययाष्टमे सर्वे न शुभा नामकर्मणीति॥ केषां नाम कार्यमिति संग्रहे उक्तं। देवालयगजाश्वानां वृक्षाणां वाऽपिकूपयोः। सर्वोपकरणानां च विहायां योषितां नृणां॥ काव्यादीनां कवीनां च पश्वादीनां विशेषतः। राजप्रासादसंज्ञानां नामकर्म विशिष्यत इति॥ ५॥

**टीकार्थ**—आतां जातकर्मविधि स्रग्धरावृत्तानें सांगतो—प्रसूति झाल्यावर जातकर्म करावें. आतां कदाचित् सूतक असतां त्यामध्यें प्रसूति झाली असतां स्मृतींत सांगितलेल्या कर्मांचा त्याग ग्रहणाशिवायच्या सूतकांमध्यें करावा. असें शास्त्र आहे ह्मणून जातकर्मांचा प्रतिबंध करावा असें प्राप्त झालें असतां त्याचा अपवाद सांगतो—कदाचित् जातकसूतक आणि मरण सूतक ह्यांपैकीं एक असतां किंवा दोन्ही असतां प्रसूति होईल तर जातकर्म करावें जातकर्म करण्याविषयीं दुसऱ्या कोणत्याही सूतकाचा प्रतिबंध नाहीं. दुसरें सूतक जरी असलें तरी प्रसूति झाल्याबरोबर बापानें सचैल स्नान करावें आणि आपल्या गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें जातकर्म करावें. कारण पहिल्या आशौचानेंच ह्याची शुद्धि होते बापानें सचैल स्नान करावें ह्यावरून बाप जवळ नसेल किंवा मुळींच नसेल तर दुसऱ्या योग्य अधिकाऱ्यानें सचैल स्नान करून जातकर्म करावें. असें

सुचविलें आहे. अथवा पहिलें असलेलें आशौच संपल्यावर किंवा हें सूतकाशौच संपल्यावर क्षिप्र, चर आणि मृदु नक्षत्रांवर जातकर्म करावें. क्षिप्र नक्षत्रें येणेप्रमाणें—अश्विनी, हस्त, अभिजित्, पुष्य, रोहिणी, तीन उत्तरा, ह्म०( उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराफाल्गुनी ). चरनक्षत्रें येणेप्रमाणें—श्रवणत्रय, ह्म० ( श्रवण, धनिष्ठा, शततारका, ) पुनर्वसु आणि स्वाती. मृदु नक्षत्रें—अनुराधा, रेवती, मृगशीर्ष, चित्रा ह्या नक्षत्रांवर जातकर्म करावें. लग्नबल पूर्वीप्रमाणें जाणावें. असें सांगितलें आहे कीं, प्रसूति झाल्याबरोबरच अथवा त्या जन्मकालच्याच मुहूर्तावरही किंवा पहिलें असलेलें सूतक संपल्यावर अथवा बालकाचें जननाशौच पुरें झाल्यावर जातकर्म संस्कार करावा ज्यामध्यें पूर्वी पितृदेवतांचें पूजन असतें. क्षिप्र,चर,ध्रुव,मित्र ह्या नक्षत्रांवर बारावे दिवशीं अथवा पहिले दिवशीं केंद्रामध्यें गुरु किंवा शुक्र असतां हें सनातन ह्मणजे फारच दिवसापासून चालत आलेलें जातकर्म करावें. प्रजापति सांगत आहे कीं, सूतक असतांना जर पुत्र जन्म झाला तर जातकर्म करणाऱ्याला स्नानानें तेवढया कर्मापुरती पूर्वाशौचाची शुद्धि होते. संवर्त असें सांगतो कीं, पुत्र झाल्यावर पित्यानें सचैल स्नान करावें. तें स्नान थंड पाण्यानें करावें. जाबालि सांगतो कीं, नैमित्तिक स्नान थंड पाण्यानें करावें अथवा काम्य कर्माबद्दलचें स्नान थंड पाण्यानें करावें. हें कर्म रात्रीसही करावें. त्याविषयीं वसिष्ठ सांगतो कीं, पुत्र जन्म झाल्यावर, यज्ञामध्यें, सूर्याच्या संक्रमणांत, चंद्राचे ग्रहणांत, रात्री स्नान करणें प्रशस्त ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही कर्मास रात्रीं स्नान प्रशस्त नाहीं तें स्नान उत्तर दिशेस तोंड करून करावें. तेंच त्यानें सांगितलें आहे कीं, बापानें पुत्र झाला असें ऐकून सचैल स्नान करावें. उत्तर दिशेस तोंड करून नदीवर अथवा तलावावर अथवा आडावर करावें. रात्रीस तलावादिक लांब असून जाण्यास अशक्त असेल तर त्याविषयीं विशेष प्रकार सांख्यायन सांगतो—दिवसास जें पाणी आणलें असेल त्यांतच सुवर्ण टाकून स्नान करावें. कारण कीं,रात्रीस स्नान प्राप्त झालें असतां अग्नि समीप स्नान करावें. आतां नामकर्म सांगतो—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार वर्णांनीं क्रमानेंच प्रसूति झाल्यापासून १२ बारावे, १६ सोळावे, २० विसावे आणि २२ बाविसावे दिवशीं नांव ठेवण्याचा संस्कार करावा. तेंच बृहस्पति सांगतो कीं, वर्णांच्या क्रमानें जन्म झाल्यापासून १२–१६–२०–२२ दिवशीं नांव ठेवण्याचा संस्कार करावा. ह्याविषयीं दुसरे कित्येक विकल्प आहेत त्याविषयीं व्यास सांगतो—कित्येक विद्वान् दहावे दिवशीं नाम कर्म करावें असें इच्छितात. कित्येक बारावे दिवशीं, कित्येक महिना पुरा झाल्यावर, दुसरे कित्येक अठरावे दिवशीं करावें असे विद्वानांचे विकल्प आहेत. नामकर्माचा काल प्राप्त झाला असतांही त्याविषयीं गर्ग सांगतो कीं, व्यतीपात, संक्रांति, ग्रहण, वैधृति, इतक्या ठिकाणीं श्राद्ध मात्र करावें त्याशिवाय दुसरें कोणतेंही मंगलकार्य करूं नये. त्याचा जरी काळ आला असला तरी तें कर्म करूं नये. तसेंच अमावास्या, संक्रांति, विष्टि ह्यांवर प्राप्तकाल असेंही मंगलकार्य करूं नये. जेथें कालाचा प्रतिबंध आहे तेथें दोष नाहीं.ज्या क्रियेविषयीं महिना आणि दिवस ह्यांनीं सर्व प्रकारचा काळ सांगितला त्या क्रियेविषयीं गुरु किंवा शुक्र ह्यांचा अस्त अथवा वक्रीभवन ह्यांचा दोष नाहीं. आतां सांगितलेल्या काळाचें अतिक्रमण झाल्यावर कोणत्या नक्षत्रावर तें कर्म करावें तीं नक्षत्रें सांगतो—जातकर्मास सांगितलेलीं जीं नक्षत्रें आहेत त्यांवर जातकर्म करावें. तेंच नारदानें सांगितलें आहे कीं, देश, काल, उपघात इत्यादिकांनीं जर कालाचें अतिक्रमण होईल तर गुरु आणि शुक्र ह्यांचा अस्त नसेल त्यावेळीं उत्तरायणामध्यें चर, स्थिर, मृदु, क्षिप्र ह्या नक्षत्रांवर,शुभ वारावर, चंद्र आणि तारा ह्यांचें बल असेल त्यादिवशीं बापानें बालकाचें जातकर्म करावें. ह्याविषयीं त्याज्य काय तें सांगतो—चर लग्न, रिक्ता ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ), अष्टमी, मंगळवार, शनिवार तसा व्ययस्थानीं ह्मणजे द्वादशस्थानीं असलेला ग्रह मग तो सौम्य अथवा पाप कसाही असो. रात्रि, अपराण्हकाळ ह्म० दिवसाचा तिसरा भाग हे सर्व टाकून नामकर्म करावें. लग्नबल पूर्वीप्रमाणेंच पहावें. तेंच बृहस्पति सांगतो—पूर्वाण्ह उत्तम आहे, मध्यान्ह मध्यम आहे, अपराण्ह आणि रात्रिही नामकर्मास वर्ज्य आहेत. नृसिंह सांगतो कीं, लग्नापासून बारावे आणि आठव्या स्थानीं कोणतेही ग्रह असले तरी ते नामकर्माला शुभ कारक नाहींत. नांव कोणाचें ठेवावें असा विचार संग्रहांत सांगितला आहे तो असा कीं, देवालय, हत्ती, घोडा, वृक्ष, कूप अथवा सर्व प्रकारचीं जेवढीं उपकरणें आहेत त्यांचीं, स्त्रियांचीं, पुरुषांचीं, काव्य इत्यादिकांचीं, कवींचीं, पशु इत्यादिकांचीं, राजाच्या वाक्यांचीं नामें ठेवावींत, असा हा विशेष सांगितला ॥ ५ ॥

## पालकारोहण, भूम्युपवेशन, दुग्धपान व निष्क्रमण.

**जन्माहाद्द्वादशेऽह्नि ध्रुवमृदुलघुभैर्वा न्यसेत्पालकेऽर्भम् ।**
**सौम्याश्वीज्यध्रुवेंद्रैर्भुवि शुभदिवसे पंचमे मासि दध्यात् ॥**
**एकत्रिंशे दिने वाऽशननिगदितभैः कंबुना योज्यमर्भे ।**
**व्यर्कवाशास्ये पयोऽथास्य गमवदुदितो निष्क्रमोमासि तुर्ये ॥ ६ ॥**

श्लोकार्थ—ज्या दिवशीं जन्म झाला असेल त्यापासून बाराव्या दिवशीं किंवा त्या दिवशीं कांहीं अडचणी मुळें न झाल्यास ध्रुव, मृदु, लघु ह्या नक्षत्रांवर बालकाला पाळण्यांत ठेवावें. नंतर पांचव्या महिन्यांत मृगशीर्ष, अश्विनी, पुष्य, ध्रुव आणि ज्येष्ठा ह्या नक्षत्रांवर शुभ दिवशीं बाळकाला भूमीवर ठेवावें. जन्म झाल्यापासून बरोबर ३१ एकतिसावे दिवशीं किंवा पुढें अन्नप्राशनास सांगितलेल्या नक्षत्रावर ज्या दिशेस राहु नसेल अशा दिशेस बालकाचें तोंड करून शंखानें बाळकाला दूध पाजावें. राहु हा गुरु आणि रवि ह्या दोन वारीं पूर्वेस, सोम व शुक्र ह्या दोन वारीं दक्षिणेस, मंगळवारीं पश्चिमेस, बुध आणि शनि ह्या दोन वारीं उत्तरेस असतो. बालकाला जन्मापासून चवथ्या महिन्यांत यात्रा प्रकरणांत सांगितलेल्या गमनाच्या मुहूर्तावर घरांतून बाहेर न्यावें ॥ ६ ॥

अथ पालकारोहणं भूम्युपवेशनं दुग्धपानं निष्क्रमणं चेति चतुष्टयं वृत्तेनैकेनाऽऽह–जन्माहादिति। जन्माहात् प्रसूतेः सकाशात् द्वादशे दिवसे पालके खट्वायां वा अभें बालकं न्यसेत् निदध्यात् उक्तकालातिक्रमे ध्रुवमृदुलघुभैर्वा नक्षत्रैर्निदध्यात्। लग्नबलं पूर्ववत्। सूर्यभाच्चांद्रभं यावत् पंच पंच चतुर्दिशं। मध्ये च सप्त देयानि बालकस्य हिताय वै ॥ पूर्वभागे तु रोगित्वं दक्षिणे मरणं ध्रुवं। पश्चिमे विकृतिर्बाले उत्तरे व्याधिसंभवः ॥ शेषे तु मध्यनक्षत्रे बालकस्य हिताय वै ॥ तथाचोक्तं बृहस्पतिना स्वसंहितायां। खट्वारोहस्तु कर्तव्यो दशमे द्वादशेऽपि वा। षोडशे दिवसे वाऽपि द्वाविंशे दिवसेऽपि वा ॥ तथा चोक्तं भविष्योत्तरे॥ अभीष्टदिवसे पुण्ये चंद्रताराबलान्विते। मृदुध्रुव क्षिप्रभे तु माता वा कुलयोषितः। शेषशायिनमाचिंत्य प्राक्शीर्षं विन्यसेच्छिशुमिति ॥ भूम्युपवेशनमाह–सौम्येति। सौम्यो मृगः अश्विनी प्रसिद्धा ईज्यः पुष्यः ध्रुवाणि पूर्वोक्तानि त्र्युत्तरारोहिण्यः इंद्रो ज्येष्ठा एभिर्नक्षत्रैः शुभदिवसे रिक्तादिवर्जिते जन्मतः पंचमे मासि भुवि भूम्यां अर्भं निदध्यात् उपवेशयेदित्यर्थः। तथाचोक्तं ब्रह्मपुराणे। पंचमे च तथा मासि भूमौ तमुपवेशयेत्। तत्र सर्वे ग्रहाः शस्ता भौमोऽप्यत्र विशेषतः ॥ तिथिं विवर्जयेद्रिक्तां शस्तान्याशृणु भानि मे। उत्तरात्रितयं सौम्यं पुष्यर्क्षं शक्रदैवतं ॥ प्राजापत्यं च हस्तश्च शस्तमाश्विनमित्रभं। वराहं पूजयेद्देवं पृथिवीं च तथा द्विजान्। भूभागमुपलिप्याथ तत्र कृत्वा तु मंडलं। वाद्यपुण्याहशब्देन भूमौ तमुपवेशयेदिति ॥ उपवेशनमंत्रस्तत्रैवोक्तः। रक्षैनं वसुधे देवि सदा सर्वगतं शिशुं। आयुःप्रमाणं सकलं निक्षिपस्व हरिप्रिये इति ॥ दुग्धपानमाह–एकत्रिंशे दिन इति। एकत्रिंशमिते दिवसे अर्भे बालके कंबुना शंखेन पयः दुग्धं योज्यं पाययेदित्यर्थः। अत्र नृसिंहः। एकत्रिंशे दिने चैव पयः शंखेन योजयेदिति ॥ अथ मातुः स्वल्पपयस्त्वे पक्षांतरमाह–वा अशननिगदितभैरिति। अन्नप्राशननक्षत्रैर्योज्यं भैरित्युपलक्षणं अन्नप्राशनोक्तं अन्यदपि विचार्यं किंलक्षणे अर्भे व्यग्वाशास्ये विगतः अगुः राहुर्यस्याः सा व्यगुः सा चासौ आशा च तस्यां आस्यं मुखं यस्य स तथा तस्मिन् राहुवर्जितदिङ्मुख इत्यर्थः। व्यग्वाशास्य इत्युपलक्षणं तेन रुद्रयोगिन्यादिकमपि वर्ज्यं। तथा चोक्तं ज्योतिर्निबंधे। योगिनीराहुरुद्रादिमुखं चैव विवर्जयेत्। राहुलक्षणं। गुरुभान्वोर्वसेत्प्राच्यामिंदौ शुक्रे च दक्षिणे। कालाराहुः कुजे प्रत्युगुत्तरे बुधमंदयोः ॥ लक्षणांतरं। इंद्रे वायौ यमे रौद्रे तोयाग्निशशिराक्षसे। यामार्धमुदयाद्राहुर्भ्रमत्येवं दिगष्टक इति ॥ उदयात्सूर्योदयात्। रुद्रलक्षणं। हरिसोमवह्निराक्षसयमवरुणानिलहरालयेष्वेवं। उदयादि भ्रमति सदा घटिका रुद्रो महालयेत्यादि ॥ हरिरिंद्रः। अथ निष्क्रमणमाह–अथास्य गमवदुदितो निष्क्रमो मासि तुर्ये तुर्ये चतुर्थे मासि अस्यार्भकस्य निष्क्रमो निष्क्रमणं गमवत् गमनवदिति यावत्। उदितः उक्तः। पूर्वैः अत्र यात्राप्रकरणोक्तं सर्वं योज्यमित्यर्थः। निष्क्रमणं बृहस्पतिनोक्तं। अथ निष्क्रमणं नाम गृहात्प्रथमनिर्गमः। अकृतायां क्रियायां स्यादायुः श्रीनाशनं शिशोरिति ॥ यमः। उपनिष्क्रमणं कुर्याच्चतुर्थे मासि सावन इति ॥ कात्यायनः। चतुर्थे मासि पुण्यर्क्षे शुक्रे निष्क्रमणं भवेत्। स्नातं स्वलंकृतं स्वाभिः कृतस्वस्त्ययनं शिशुमिति ॥ आदाय गेहान्निर्गम्य गच्छेयुर्देवतालयं। अभ्यर्च्य देवतां सम्यगाशिषो वाचयेदथ ॥ कृत्वा प्रदक्षिणं गेहमागत्य ततः स्वकं। मातृष्वसृगृहं गत्वा मातुलादेर्गृहं नयेत् ॥ तदाशीर्वचनाद्यैश्च दीर्घायुरभिनंदितः। जयंतस्य मतेनायं लिखितः शिशुनिष्क्रमः ॥ स्वगृह्यानुसारं योजयेत् ॥ ६ ॥

टीकार्थ—आतां पाळण्यांत ठेवणें, जमिनीवर बसविणें, दूध पाजणें, घरांतून बाहेर निघणें हीं चार कृत्यें एका वृत्तानें सांगतो–जन्मदिवसापासून बाराव्या दिवशीं पाळण्यांत अथवा पलंगावर बाळकास ठेवावें. सांगितलेला बारावा दिवस

जर चुकला तर मग ध्रुव, मृदु, लघु ह्या नक्षत्रांवर पाळण्यांत ठेवण्याचें करावें. लग्नाचें बल पूर्वीप्रमाणें जाणावें. सूर्य नक्षत्रापासून तों चंद्र नक्षत्रापर्यंत एकंदर २७ नक्षत्रें आहेत. पैकीं प्रत्येक दिशेस पांच पांच नक्षत्रें कल्पना करावींत आणि मध्यें सात नक्षत्रें हीं बालकाच्या हिताकरितां ठेवावींत. पूर्वभागीं रोगित्व, दक्षिणेस मरण, पश्चिमेस विकृति, उत्तरेस व्याधीचा संभव, आतां बाकीचें जें शेष नक्षत्र राहिलें तें बालकाच्या हिताकरितां आहे. बृहस्पतीनें आपल्या संहितेंत तसाच अर्थ सांगितला आहे कीं, जन्मापासून दहावे किंवा बारावे दिवशीं बालकाला पलंगावर ठेवावें, अथवा सोळावे दिवशीं किंवा बावीसावे दिवशीं ही पलंगावर ठेवावें. तसेंच भविष्योत्तर पुराणांत सांगितलें आहे कीं, चंद्र आणि ग्रह ह्यांचें बल असेल अशा पुण्यकारक आपल्या आवडत्या दिवसावर मृदु, ध्रुव व क्षिप्र ह्या नक्षत्रांवर आईनें अथवा दुसऱ्या कुलीन स्त्रियांनीं शेषशायी श्रीलक्ष्मीनारायणाचें चिंतन करून बालकाचें डोकें पूर्वेस करून त्याला पलंगावर अथवा पाळण्यांत निजवावें. भूईवर बसविणें सांगतो–सौम्य ह्म. मृगशीर्ष, अश्विनी, ईज्य ह्म. पुष्य, ध्रुव ह्मणजे पूर्वीं सांगितलेलीं नक्षत्रें, तीन उत्तरा ह्म. उत्तरा, उत्तराषाढा, उत्तरा भाद्रपदा, रोहिणी, इंद्र ह्मणजे ज्येष्ठा ह्या नक्षत्रांवर उत्तम दिवशीं रिक्तादि वर्ज्य तिथी सोडून जन्मापासून पांचव्या महिन्यांत बालकाला भुईवर ठेवावें. तेंच ब्रह्म पुराणांत सांगितलें आहे कीं, पांचव्या महिन्यांत बालकाला भुईवर बसवावें. त्यावेळेस सर्व ग्रह प्रशस्त आहेत त्यांत विशेषें करून मंगळ प्रशस्त असावा. मात्र रिक्तातिथींचा त्याग करावा. नक्षत्रें कोणतीं प्रशस्त आहेत तीं सांगतों ऐक–तीन उत्तरा प्रशस्त आहेत, सौम्य ह्मणजे मृगशीर्ष, पुष्य नक्षत्र, इंद्र दैवत्य ह्म० ज्येष्ठा, प्राजापत्य ह्म. रोहिणी, हस्त, अश्विनी, मित्र देवतांचें नक्षत्र ह्म. अनुराधा ह्या नक्षत्रांवर श्रीवराह देवाची पूजा करावी. पृथ्विची पूजा करावी. तशीच ब्राह्मणांची पूजा करावी. पृथ्वीचा भाग सारवावा. त्यावर उत्तम मंडल करावें. मंगल वाद्यें वाजवीत पुण्याह शब्द बोलत बोलत बालकाला भुईवर ठेवावें. बसवितांना जो मंत्र आहे तो तेथेंच सांगितला आहे त्याचा अर्थ असा कीं, हे पृथ्वी देवी! चोहोंकडे इकडे तिकडे फिरणाऱ्या ह्या बाळकाचें रक्षण कर. हे श्रीहरि प्रिये पृथ्वी! ह्याला पूर्ण आयुष्य दे. एकतिसावे दिवशीं दूध पाजावें हें सांगतो–एकतिसावे दिवशीं बाळकाला शंखानें दूध पाजावें ह्याविषयीं नृसिंह सांगतो–एकतिसावे दिवशीं बाळकाला शंखानें दूध पाजावें. आतां मातुश्रीला स्तनांत दूध कमी असेल तर दुसरा एक पक्ष सांगतो–अन्नप्राशन करण्याकरितां सांगितलेल्या नक्षत्रांवर येथें नक्षत्रच नुसतें घ्यावें असें नाहीं, तर अन्नप्राशनाला सांगितलेलें दुसरें सर्व जें असेल तें सर्व विचारावें त्या बालकाचें तोंड राहु नसलेल्या दिशेस करावें, राहु असलेल्या दिशेचा त्याग करावा एवढेंच नाहीं; तर रुद्र योगीनी इत्यादिकांचाही त्याग करावा. तेंच ज्योतिर्निबंधग्रंथांत सांगितलें आहे कीं, योगिनी, राहु, रुद्रादि मुखही वर्ज्य करावें. राहूचें लक्षण असें कीं, गुरुवारीं आणि रविवारीं राहु पूर्वेस राहतो, सोमवारीं आणि शुक्रवारीं दक्षिणेस रहातो, मंगळवारीं पश्चिमेस राहतो, बुध आणि शनी ह्या दोन वारीं उत्तरेस राहतो. दुसरें लक्षण असें आहे कीं, इंद्र, वायु, यम, रुद्र, वरुण, अग्नि, चंद्रमा, राक्षस, ह्या अशा आठ लोकपालांच्या आठदिशेमध्यें सूर्योदयापासून यामार्धपर्यंत राहु भ्रमण करीत असतो. रुद्राचें लक्षण असें आहे कीं, इंद्र, चंद्र, अग्नि, राक्षस, यम, वरुण, वायु, हराचें आलय ह्मणजे उत्तर, इतक्या ह्या आठ लोकपालांचे आठ दिशेस सूर्योदयापासून एक घटिकापर्यंत नेहेमी रुद्र फिरत असतो. आतां घराबाहेर निघण्याचें सांगतो–पूर्वींच्या विद्वानांनीं यात्रा प्रकरणांत जें सर्व सांगितलें आहे तें सर्व निष्क्रमणास लावावें बृहस्पतीनें निष्क्रमण सांगितलें आहे कीं, निष्क्रमण ह्मणजे घरांतून पहिल्या प्रथम बाहेर पडणें. हा बाहेर निघण्याचा संस्कार न केला तर आयुष्याचा आणि लक्ष्मीचा नाश होतो यम सांगतो कीं, सावनमानाच्या चवथ्या महिन्यांत बाहेर निघण्याचें करावें. कारिकेंत सांगितलें आहे कीं, चवथ्या महिन्यांत व शुक्लपक्षांत शुभनक्षत्रावर बाहेर निघणें करावें, त्या बालकाला स्नान घालावें, अलंकार घालवेत, स्वकीय आप्त अशा सुवासिनींनीं स्वस्तिवाचन करून बाळकाला घेऊन घरांतून निघून देवमंदिरांत जावें. तेथें उत्तम रीतीनें देवाचें पूजन करावें, नंतर बाळकाला उत्तम आशीर्वाद बोलवावेत, मग देवाला प्रदक्षिणा घालून नंतर आपल्या घरीं माघारें आणावें. मग मावशीच्या घरीं जाऊन नंतर मामा इत्यादिकांचे घरीं बाळाला न्यावें. मावशी, मामी इत्यादि वडिलांच्या आशीर्वादांनीं बाळकाला दीर्घायुष्यांनीं आनंदित करावें हा बाळकाला घराबाहेर निघण्याचा प्रकार जयंताचें मतानें लिहिला आहे. आपापल्या गृह्यसूत्रानुसारें करून बालकाचें निष्क्रमण करावें ॥ ६ ॥

## कर्णवेध.

**मैत्रैः क्षिप्रैः स्थिरभचरभैर्व्योनिलांभःपकर्क्षैः ।**
**चैकाफापौष्विनशनिकुजर्क्षांशवारानपास्य ॥**
**रिक्तापर्वेश्वरवसुतिथीन् रात्रिसंध्ये समाब्दम् ।**
**पुंस्त्रीकर्णौ सविधिपटुना दक्षवामादि वेध्यौ ॥ ७ ॥**

श्लोकार्थ—स्वाती, शततारका, रोहिणी हीं तीन नक्षत्रें सोडून स्थिर व चर नक्षत्रांवर मैत्र व क्षिप्र नक्षत्रांवर, चैत्र, कार्तिक, फाल्गुन व पौष ह्या चार महिन्यांत, रवि, शनि ह्यांचे वार व त्यांचें लग्न नवांश सोडून रिक्तातिथी, पर्व, एकादशी, अष्टमी ह्या तिथी सोडून रात्री व संध्याकाळ सोडावा, चतुर पुरुषानें विधियुक्तमुलाचा प्रथम उजवा कान आणि मुलीचा प्रथम डावा कान टोंचावा ॥ ७ ॥

अथ कर्णवेधं मंदाक्रांतयाऽऽह- मैत्रैरिति । मैत्रैः अनुराधारेवतीमृगचित्राभिः । क्षिप्रैः दस्रार्काभिजिदीज्यभैः । स्थिरभचरभैः स्थिराणि उत्तरात्रयरोहिण्यः । चराणि श्रवणत्रयपुनर्वसुस्वात्यः तैः कथंभूतैः स्थिरभचरभैर्व्यानिलांभःपकर्क्षैः विगतानि अनिलांभःपकर्क्षाणि येभ्यस्तानि तथा तैः अनिलं स्वाती अंभःपः शततारका कर्क्षं रोहिणी तद्रहितैरित्यर्थः । चैकाफापौषु चैत्रकार्तिकफाल्गुनपौषेष्वित्यर्थः । पुंस्त्रीकर्णौ पुरुषस्त्रियोः कर्णौ पटुना कुशलेन सविधि यथा स्यात्तथा दक्षवामादि वेध्यौ पुरुषस्य दक्षिणकर्णादि स्त्रियाः वामकर्णादि वेध्यावित्यर्थः । कर्णवेधने सूचीमाह बृहस्पतिः । सौवर्णी राजपुत्रस्य राजती विप्रवैश्ययोः । शूद्रस्य त्वायसी सूची मध्यमाऽष्टांगुलात्मिका ॥ कर्णवेधविधिस्तु गृह्यपरिशिष्ट उक्तः । अथ कर्णवेधो वर्षे तृतीये पंचमे वा पुष्येंदुहरिचित्रारेवतीषु पूर्वाह्णे प्राङ्मुख उपविश्य दक्षिणं कर्णमभिमंत्रयते भद्रं कर्णेभिरिति सव्यं वक्ष्यंतीवेदेति कुमाराय मधुरं दत्वाऽथ भिंद्यात्ततो ब्राह्मणभोजनमिति । किंकृत्वा इनशनिकुजर्क्षांशवारान् अपास्य रविशनिकुजानां ऋक्षाणि लग्नानि अंशा नवांशाः वाराः प्रसिद्धास्तांस्त्यक्त्वेत्यर्थः । पुनः किं कृत्वा रिक्तापर्वेश्वरवसुतिथीन् अपास्य रिक्ताश्चतुर्थीनवमीचतुर्दश्यः पर्वणी पौर्णिमाऽमावास्ये संक्रांतिश्च ईश्वरतिथिरेकादशी वसुरष्टमी एतान् अपास्य । पुनः किं कृत्वा रात्रिसंध्ये अपास्य स्पष्टं । पुनः किं कृत्वा समाब्दमपास्य समवर्षं त्यक्त्वा विषमे वर्षे कर्तव्यमित्यर्थः लग्नबलं प्राग्वत् । अत्र नृसिंहः॥वेध्यौ कर्णावदंतस्य विषमेऽब्देऽपि वा शिशोः।शुक्लपक्षे शुभे वारे चैत्रपुष्योर्जफाल्गुने ॥एकादश्यष्टमीपर्वरिक्तावर्ज्याः शुभावहाः । शिष्टाश्च तिथयः सर्वाः कृष्णे चांत्यत्रिकं विना ॥ कर्णद्वयादिति क्षिप्रमृदुभैस्त्र्यायगैः शुभैः - गुरौ लग्ने च केऽप्याहुरुत्तरासु श्रुतिं व्यधेदिति ॥ अगस्त्यः । द्वयोश्च संध्ययोर्लग्ने न कुर्यात्कर्णवेधनं । रात्रावपि तथा लग्ने नक्षत्रतिथिसंधिषु ॥ कर्णवेधं न कुर्वीत कुर्याच्चेच्छेदनं भवेदिति ॥ बृहस्पतिः मंदार्कारांशवाराः स्युर्वर्ज्याः कर्णस्य वेधने । गुरुशुक्रेंदुजेंदूनां पूज्या वारांशकोदया इति ॥ संग्रहे । शातकुंभमयी सूची वेधनेषु शुभप्रदा । राजती वाऽऽयसी वाऽपि यथाविभवतः शुभा ॥ सुभूमौ प्रांगणे रम्ये शुचौ देशेऽबरे रवौ । संस्थिते वेधयेत्कर्णौ स्त्रीपुंसौर्वामदक्षिणौ ॥ शुक्लसूत्रसमायुक्तताम्रसूच्याऽथ वेधयेत् । वेधात्तृतीयनक्षत्रे क्षालयेदुष्णवारिणेति ॥ देवलः कर्णरंध्रे रवेश्छाया न विशेदग्रजन्मनः । तं दृष्ट्वा विलयं यांति पुण्यौघाश्च पुरातना इति ॥ ७ ॥

**टीकार्थ**—आतां कान टोंचण्याचा संस्कार मंदाक्रांता वृत्तानें सांगतो–मित्र नक्षत्रें ह्मणजे अनुराधा, रेवती, मृग चित्रा. क्षिप्र नक्षत्रें ह्मणजे अश्विनी, हस्त, अभिजित्, पुष्य. स्थिर नक्षत्रें ह्मणजे तीन उत्तरा व रोहिणी. चर नक्षत्रें ह्मणजे श्रवणत्रय, ह्मणजे श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, स्वाती इतक्या नक्षत्रांवर ह्मणजे मित्र, क्षिप्र, स्थिर व चर ह्या नक्षत्रांवर परंतु त्यांतून स्वाती, शततारका, रोहिणी हीं वर्ज्य करावींत. महिन्यामध्यें चै ह्मणजे चैत्र, का ह्मणजे कार्तिक, फा ह्मणजे फाल्गुन, पौ ह्म० पौष, ह्या महिन्यांत कान टोंचावेत. पुरुषाचे व स्त्रीचे कान चतुर पुरुषानें यथाविधि ह्मणजे पुरुषाचा अगोदर उजवा मग डावा आणि स्त्रीचा अगोदर डावा आणि मग उजवा अशा क्रमानें टोंचावेत. कान टोंचण्याला सुई कशी असावी तें बृहस्पती सांगतो–राजपुत्राला सोन्याची, ब्राह्मण आणि वैश्य ह्यांना रुप्याची, शूद्राला लोखंडाची असावी ती मध्यम आठअंगुल असावी. कान टोंचण्याचा विधि गृह्यपरिशिष्टांत सांगितला आहे. आतां कान टोंचण्याचा विधि तिसऱ्या अथवा पांचव्या वर्षी पुष्य, मृगशीर्ष, ज्येष्ठा, चित्रा, रेवती ह्या नक्षत्रांवर पूर्वाण्हीं पूर्वेस तोंड केलेल्या बाळकास बसवून उजवा कान " अभिमंत्रयते भद्रंकर्णेभिरिति " ह्या मंत्रानें. डावा कान " वक्ष्यंति वेदेति " ह्या मंत्रानें बाळकाना मधुर पदार्थ देऊन टोंचावा नंतर ब्राह्मणांनां भोजन द्यावें त्या दिवशीं रवि, शनि आणि मंगळ ह्यांचीं नक्षत्रें ह्यांचे वार, आणि ह्यांचे नवांश नसावेत. तसेंच रिक्तातिथी ह्मणजे चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, पर्व ह्मणजे पौर्णिमा, अमावास्या, संक्रांति, ईश्वरतिथि ह्मणजे एकादशी, वसु ह्मणजे अष्टमी हे नसावेत. त्याचप्रमाणें रात्र आणि संध्याकाळ नसावा. व समवर्ष नसावें अर्थात् विषम वर्षी कान टोंचावा. लग्नाचें बल पूर्वींप्रमाणें पाहावें. ह्याविषयीं नृसिंह सांगतो कीं, दांत येण्याचे पूर्वी विषम वर्षावरही बाळकाचे कान टोंचावेत. चैत्र, कार्तिक, पौष, फाल्गुन ह्या महिन्यामध्यें, शुक्लपक्षीं, शुभवारीं मात्र एकादशी,

अष्टमी, पर्व, रिक्ता इतक्या तिथि वर्ज्य आहेत. बाकीच्या सर्व तिथि शुभकारक आहेत मात्र कृष्णपक्षांतील शेवटल्या तीन ह्मणजे त्रयोदशी, चतुर्दशी आणि अमावास्या ह्या वर्ज्य आहेत. क्षिप्र मृदु नक्षत्रें, स्थिर चर नक्षत्रें उत्तम प्रकारचीं असावींत. गुरु हा लग्नीं असतानां कित्येक उत्तरा नक्षत्रावर कान टोंचावा असें ह्मणतात. अगस्त्य असें बोलतो कीं, दोन संध्येच्या वेळीं कान टोंचणें करूं नये रात्रींही करूं नये तसेंच लग्नीं ही करूं नये, नक्षत्र, तिथी, ह्यांच्या संधीमध्यें कान टोंचणें करूं नये जर केलें तर कानाचा च्छेद होतो. बृहस्पति सांगतो–शनि, रवि, मंगळ हे वार वर्ज्य करावेत आणि गुरु, शुक्र, बुध, चंद्र ह्यांचे वार आणि नवांश हे पूज्य ह्मणजे शुभकारक आहेत. संग्रहांत सांगितलें आहे कीं, कान टोंचण्याकरितां सोन्याची सुई उत्तम अथवा ती न मिळाल्यास रुप्याची, किंवा लोखंडाची घ्यावी जशी शक्ती असेल त्याप्रमाणें घ्यावी. उत्तम भूमीवर, रम्य देशीं, आंगणांत, सूर्य नारायण आकाशांत असतां स्त्री आणि पुरुष ह्यांचे कान क्रमानें अगोदर डावा मग उजवा असे टोंचावे ह्मणजे स्त्रीचा अगोदर डावा मग उजवा पुरुषाचा अगोदर उजवा मग डावा असा टोंचण्याचा क्रम ठेवावा. अथवा पांढऱ्या सुतानें युक्त तांब्याच्या सुईनें कान टोंचावेत. टोंचल्यानंतर तिसऱ्या नक्षत्रावर ऊन पाण्यानें स्नान घालावें. देवल असें सांगतो कीं, ब्राह्मणाच्या मुलाचा कान टोंचल्यावर मग त्या पडलेल्या भोकांत सूर्याचें किरण पडूं नयें इतकें बारीक भोंक असावें. कारण तसें सूर्याचें किरण आंत पडलेलें पाहिलें असतां पूर्वीचें सर्व पुण्य नाहींसें होतें ॥ ७ ॥

## अन्नप्राशन.

मासे षष्ठेऽष्टमे नुर्निगदितमशनं पंचमे सप्तमे वा ।
भीरोरुज्झंति नंदाहरिवसुरजनीरिक्तकाः स्वर्क्षमेके ॥
सदृक्कांशाह्व्यचांद्रे ध्रुवमृदुचरभक्षिप्रभेऽजालिमीनो– ।
नांगे केंद्रत्रिकोणांत्यमृतिषु विमलास्विंदुऽरिष्टोऽखिलोंऽगे ॥ ८ ॥

श्लोकार्थ—जन्म झाल्यापासून ६ किंवा ८ महिन्यांत पुत्राला आणि ५–अथवा ७ महिन्यांत कन्येला अन्नप्राशन करावें. त्यावेळेस नंदातिथि, द्वादशी, अष्टमी, रात्रि, रिक्तातिथि आणि एकाच्या मतानें जन्मनक्षत्रही सोडावें. शुभग्रहाचे द्रेष्काण व नवांश हे चंद्रापासूनचे घ्यावेत. ध्रुव, मृदु, चर, क्षिप्र ह्यांपैकीं नक्षत्र घ्यावें. मेष, वृश्चिक, मीन ह्यांशिवाय दुसरें लग्न घेऊं नये अर्थात् हीं चार लग्नें घ्यावींत. आणि केंद्रांत ह्मणजे १–४–७–१० ह्या ठिकाणीं पापग्रह नसावा. त्रिकोणांत ह्मणजे ५–९ ह्या ठिकाणीं पापग्रह नसावा. १२ बारा आणि ८ आठ ह्या ठिकाणीं पापग्रह असूं नये. अन्नप्राशनाचे वेळीं लग्नीं पूर्ण चंद्र असून तो शुभ असावा ॥ ८ ॥

अथान्नप्राशनं वृत्तेनैकेनाऽऽह–जन्मतः षष्ठमासे अष्टमे वा मासे नुः नरस्य अशनं अन्नप्राशनं निगदितं प्रोक्तं । भीरोः कन्यायाः पंचमे सप्तमे वा मासे अशनं प्रोक्तं । अत्र नंदाहरिवसुरजनीरिक्तकाः उज्झंति मुनयः नंदाः प्रतिपत्षष्ठ्येकादश्यः हरिर्द्वादशी वसुरष्टमी रजनीरात्रिः रिक्ताश्चतुर्थीनवमीचतुर्दश्यः ताः स्वर्क्षं जन्मनक्षत्रं च एके आचार्या अत्र उज्झंति । तथा चोक्तं । जन्मर्क्षे श्रीक्षयं विद्यादिति । जन्मर्क्षं तु पुंविवाहान्नप्राशनादिषु बहुभिर्गृह्यते तदग्रे वक्ष्यते । पुनः कस्मिन् सदृक्कांशाह्वि दृक्को दृक्काणः अंशो नवांशः अह्वो दिनं एषां समाहारः दृक्कांशाहः सतो ग्रहस्य दृक्कांशाहः सदृक्कांशाहः तस्मिन् कथंभूते सदृक्कांशाह्वि अचांद्रे न विद्यते चांद्रदृक्कांशो यस्मिन्तदचान्द्रं तस्मिन् चंद्रस्य दृक्कांशाहानि निंद्यानि क्षीणश्चेत् पूर्णे तु न दोषः अन्येषां शुभग्रहाणां शुभानीत्यर्थः । पुनः कस्मिन् ध्रुवमृदुचरक्षिप्रभे ध्रुवादीनि प्रसिद्धानी पूर्वमेवोक्तानि तत्रेत्यर्थः । पुनः कस्मिन् अजालिमीनोनांगे अजो मेषः अलिर्वृश्चिकः मीनः प्रसिद्धः । एभिरूनलग्ने मेषवृश्चिकमीनलग्नान्यन्नप्राशने न शुभानीत्यर्थः । कासु सतीषु केंद्रत्रिकोणांत्यमृतिषु विमलासु सतीषु । केंद्राणि प्रथमचतुर्थसप्तमदशमानि । त्रिकोणे नवपंचमे अंत्यं द्वादशं मृतिरष्टमं "परवल्लिंगं द्वंद्वतत्पुरुषयोः" एतासु विमलासु पापग्रहरहितासु सतीषु पापग्रहोऽत्रानिष्टकारीत्यर्थः । इंदुश्चंद्रः अखिलः पूर्णः अंगे लग्ने इष्टः अन्नप्राशने पूर्णचंद्रो लग्ने शुभ इत्यर्थः । अन्यल्लग्नबलं पूर्ववत् अत्र नारदः । षष्ठे मास्यष्टमेऽपि पुंसां स्त्रीणां तु पंचमे । सप्तमे मासि वा कार्यं नवान्नप्राशनं शिशोः॥ रिक्तां दिनक्षयं नंदां द्वादशीमष्टमीं समां। त्यक्त्वाऽन्यतिथयः श्रेष्ठाः प्राशने शुभवासरा इति ॥ ज्योतिर्विवरणे । जन्मर्क्षे श्रीक्षयं विद्यात्कर्मर्क्षे चातिसौख्यकृत् । आधानर्क्षे च बालानां प्राशने रोगनाशनं ॥ वृद्धनारदः । जीवसौम्यसितानां तु दृक्काणदि-

वसांशकाः। बालान्नप्राशने शस्ता न चंद्रार्कार्किजासृजामिति॥ अर्णवे । गौश्वो कुंभस्तुला कन्या सिंहः कर्किमृगौ यमः। एताश्च राशयः शस्ता न मेषझषवृश्चिका इति। नारदः। चरस्थिरमृदुक्षिप्रनक्षत्रेषु न नैधन इति॥ रवौ लग्ने कुष्ठीत्याह॥ ८॥

**टीकार्थ**—अन्न प्राशनाचा संस्कार एका वृत्तानें सांगतो—जन्मापासून सहाव्या अथवा आठव्या महिन्यांत पुत्राचें अन्नप्राशन सांगितलें आणि भित्री स्वभावाचे ह्मणजे कन्येचें पांचव्या आणि सातव्या महिन्यांत सांगितलें आहे. ह्याविषयीं नंदा ह्मणजे प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, हरी ह्मणजे द्वादशी, वसु ह्मणजे अष्टमी, रजनी ह्मणजे रात्रि, रिक्ता ह्मणजे चतुर्थी, नवमी, चतुर्दशी इतक्या तिथि, जन्म नक्षत्र इतक्या गोष्टी कित्येक आचार्य सोडतात. तेंच सांगितलें आहे कीं, जन्म नक्षत्रापासून लक्ष्मीचा नाश होतो. बाकी जन्मनक्षत्र पुरुषविवाह अन्नप्राशन इत्यादि पुष्कळ कार्यामध्यें पुष्कळांनीं घेतलें आहे. तें-पुढें सांगूं. क्षीणचंद्राचे द्रेक्काण आणि नवांश ह्यांशिवाय बाकीच्या शुभ ग्रहांचे द्रेक्काण व नवांश ज्या दिवशीं असतील अशा दिवशीं अन्नप्राशन करावें आणि त्या दिवशीं ध्रुव, मृदु, चर आणि क्षिप्र अशीं हीं नक्षत्रें असावींत; तीं पूर्वी सांगितलीं आहेत त्यादिवशीं बाळकाला अन्नप्राशन करावें. आणखी मेष, वृश्चिक, मीन ह्या लग्नांशिवाय दुसरीं लग्नें अन्नप्राशनास शुभ आहेत तसेंच केंद्र ह्मणजे १–४–७–१० हीं स्थानें, त्रिकोण ९–५ हीं स्थानें, अंत्य ह्मणजे बारावें, मृति ह्मणजे ८ आठवें हीं स्थानें निर्मल असावींत अर्थात् ह्या स्थानांवर पापग्रह नसावेत कारण ह्या ठिकाणचा पापग्रह अनिष्ट करणारा आहे. आणि लग्नीं पूर्ण चंद्र असेल तर तो फारच शुभ आहे. बाकीचें लग्न पूर्वीप्रमाणेंच जाणावें. नारद असें सांगतो कीं, सहाव्या किंवा आठव्या महिन्यांत बालकाला अन्नप्राशन करावें कन्येला अन्नप्राशन पांचव्या अथवा सातव्या महिन्यांत करावें. त्या दिवशीं रिक्ता तिथि, दिनक्षय, नंदा, द्वादशी, अष्टमी इतक्या तिथींचा त्याग करून बाकीच्या तिथि उत्तम आहेत आणि शुभ वार असावेत. ज्योतिर्विवरण ग्रंथांत सांगितलें आहे कीं, जन्मनक्षत्रावर बालकाला अन्नप्राशन करविलें तर लक्ष्मीचा नाश होतो. काचे ह्मणजे ब्रह्माचे नक्षत्रावर ह्मणजे रोहिणी नक्षत्रावर अतिशय सौख्य होतें. आधानाचे नक्षत्रावर अन्नप्राशन करविलें तर रोगांचा नाश होतो. वृद्ध नारद सांगतो कीं, गुरु, बुध आणि शुक्र ह्यांचे द्रेक्काण आणि ह्यांचे वार व ह्यांचें नवांश हे अन्न प्राशनाला प्रशस्त आहेत, परंतु क्षीणचंद्र, सूर्य, शनि आणि मंगळ ह्यांचे द्रेक्काण, नवांश आणि वार हे प्रशस्त नाहींत. अर्णव ग्रंथांत सांगितलें आहे कीं, मेष, मीन, वृश्चिक ह्या तीन राशि प्रशस्त नाहींत त्याशिवाय बाकीच्या सर्व-राशि अन्न प्राशनास प्रशस्त आहेत. नारद सांगतो कीं, चर, स्थिर, मृदु आणि क्षिप्र इतक्या नक्षत्रांवर अन्न प्राशन करावें, परंतु नैधनावर करूं नये. रवीचे लग्नीं अन्न प्राशन करविलें असतां कुष्ठी होतो॥ ८॥

### अस्ताचा निर्णय वगैरे.

**गर्भाद्यन्नाशनांतेषु न गुरुसितयोर्बाल्यवार्धे च मौढ्यम्।**
**जह्यात्कालस्य रोधाद्धरिगुरुमयनं याम्यमूनाधिमासौ॥**
**एतच्चौलादिषूज्झेदथ गुरुसितयोर्बाल्यवार्ध्ये नगाहे।**
**चाथो शाखेशमौढ्ये व्रतमपिनिगमारंभमार्यो न कुर्यात्॥ ९॥**

श्लोकार्थ—गर्भाधान संस्कारापासून तों अन्न प्राशन संस्कारापर्यंतच्या सात संस्कारांचा काळ फारच थोडा आहे. ह्मास्तव त्याकरितां गुरु व शुक्र ह्यांचें बाल्य, वार्ध्य, अस्त आणि सिंहस्थ गुरु, दक्षिणायन, क्षयमास, अधिकमास, हीं सोडूं नये, पुढील चौल इत्यादि संस्कार करतांनां हीं सर्व सोडावींत. आतां गुरु आणि शुक्र ह्यांचा उदय झाल्यापासून सात सात दिवसपर्यंत बालत्व असतें आणि दोघांचा अस्त होण्यापूर्वीं सात सात दिवस वार्ध्य असतें. त्याची जी शाखा असेल त्या शाखेच्या अधिपतीचा अस्त असेल तर उपनयन व वेदाचा आरंभ करूं नये॥ ९॥

**अथ येषु संस्कारेषु गुरुशुक्रास्तादिदोषाभावः येषु दोषः बालत्ववृद्धत्वप्रमाणं शाखेशस्य मौढ्ये किं न कार्यमिति चतुष्टयं वृत्तेनैकेनाऽऽह – गर्भादीति। गर्भाद्यन्नाशनांतेषु गर्भाधानादिषु अन्नप्राशनांतेषु कर्मसु। गुरुसितयोर्बाल्यवार्ध्ये च परं मौढ्यं गुरुशुक्रमूढत्वं न जह्यात् न त्यजेत् कस्माद्धेतोः कालस्य रोधात् यतः शास्त्रे गर्भाधानाद्यन्नप्राशनांतानां कर्मणां कालनिरोधः कुतोऽस्ति तस्माद्धेतोः। तथा च मांडव्यः। नित्ययाने गृहे जीर्णे प्राशनांतेषु सप्तसु। वधूप्रवेशमांगल्ये न मौढ्यं गुरुशुक्रयोरिति॥ हरि-गुरुं सिंहस्थितं बृहस्पतिं याम्यमयनं दक्षिणायनं ऊनाधिमासौ क्षयमासाधिमासौ न त्यजेत् कालस्य**

रोधादित्येतत्पदं बुद्ध्यावगंतव्यं तद्यथा प्रसूतिसमय एव जातकर्म विहितं तत्र कालनिरोधात किमप्यस्तादिकं न चिंत्यं अन्नप्राशनं तु मासे षष्ठेऽष्टमे वेति विकल्पेन मासद्वये विहितं तत्र यस्मिन्मासे मौढ्यादिकं नस्यात्तत्र कर्तव्यं कालस्य सावकाशत्वात् तयोरपि मासयोर्यदि सिंहस्थगुर्वादिनिरोधः स्यात् सोऽप्यत्र न चिंतनीयः एवं गर्भाद्यन्नाशनांतेषु विचारणीयं। अनन्यगतिकं कुर्यान्नित्यं नैमित्तिकं तथेति स्मरणात् संस्कारक्रमस्तु कात्यायनगृह्यकारिकायामप्युक्तः । गर्भाधानं पुंसवनं सीमंतोन्नयनं ततः । जातकर्माभिधेयं च निष्क्रमप्राशने क्रमात् ॥ चूडोपनयनं वेदव्रतानां च चतुष्टयं। गोदानं मेखलामोको विवाहः षोडश क्रिया इति ॥ अनेन क्रमेण गर्भाद्यन्नाशनांतेषु मौढ्यादिकं बुद्ध्याऽवलोकयेदित्यर्थः। तथा च बृहस्पतिः। मासप्रयुक्तकार्येषु मूढत्वं गुरुशुक्रयोः। न दोषकृत्तदा मासलक्षणो बलवानिति ॥यमोऽपि गर्भे वार्धुषिके भृत्ये श्राद्धकर्मणि मासिके । सपिंडीकरणे नित्ये नाधिमासं विवर्जयेत् ॥ भृगुः सीमंतजातकादीनि प्राशनांतानि च क्रमात्। कर्तव्यानि न दोषोऽस्ति पंचाननगते गुराविति ॥ कात्यायनस्मृतौ। गर्भाधानादिका अन्नप्राशनांता मलिम्लुचे । आकर्णवेधाः कर्तव्या नान्या इत्याह–भास्कर इति। अस्तादिकं चूडादिषु वर्जनीयमित्याह एतच्चौलादिषूज्झेदिति। एतद्गुरुसितास्तादिकं चूडादिषु कर्मसु उज्झेत् त्यजेत् । अथ बालत्ववृद्धत्वप्रमाणमाह–अथ गुरुसितयोरिति। गुरुसितयोर्गुरुशुक्रयोर्बाल्यवार्धे बालत्ववृद्धत्वे नगाहे सप्ताहे सप्ताहं बाल्यं सप्ताहं वार्ध्यमिति बालत्वं वृद्धत्वं बहुविधमस्ति तत्र मध्यमः पक्षोऽत्रांगीकृतः । अथ शाखेशस्य अस्ते वर्जमाह–अथो शाखेशमौढ्य इति। शाखेशो वेदपतिर्वक्ष्यमाणः तस्य मौढ्ये अस्ते व्रतं मौंजीबंधनं निगमारंभमपि आर्यः श्रेष्ठो न कुर्यात् तस्यास्ते व्रतादिके कृते सति बटोर्मूर्खत्वं स्यात्। ननु वेदारंभे मूर्खत्वं घटते वेदपतित्वात् व्रते मूर्खत्वं किमुक्तं। उच्यते व्रतबंधनस्तु वेदाध्ययनार्थे क्रियते तस्मात्तत्रापि मूर्खत्वं घटते। तथाच याज्ञवल्क्यः। उपनीय गुरुः शिष्यं महाव्याहृतिपूर्वकं। वेदमध्यापयेदेनं शौचाचारांश्च शिक्षयेत् ॥ प्रतिवेदं ब्रह्मचर्यं द्वादशाब्दानि पंच वा। ग्रहणांतिकमित्येके केशांतश्चैव षोडश इति ॥ यज्ञानां तपसां चैवं शुभानां चैव कर्मणां। वेद एव द्विजातीनां निःश्रेयसकरः परः ॥ तथाच कात्यायनगृह्यसूत्रे । वेदं समाप्य स्नायाद्ब्रह्मचर्यं वाऽष्टाचत्वारिंशकं द्वादशकेऽप्येके गुरुणाऽनुज्ञात इत्यादि ॥ ९ ॥

**टीकार्थ**—आतां ज्या संस्कारांमध्यें गुरु, शुक्र ह्यांच्या अस्तांचा दोष नाहीं, ज्या संस्कारास दोष आहे, त्याग्रहांचें बालत्व व वृद्धत्व ह्यांचे प्रमाण, शाखाधिपतीचा अस्त असतां काय करूं नये, हीं चार एका वृत्तानें सांगतो–गर्भाधानापासून तों अन्न प्राशना पर्यंतचे जे संस्कार आहेत त्या संस्कारकर्माविषयीं गुरु आणि शुक्र ह्यांचें बालत्व, वृद्धत्व, त्यांचा अस्त इतक्यांचा त्याग करूं नये अर्थात् इतके असतां हे ७ संस्कार करावेत.कारण ह्या सातही संस्कारांच्या काळाचा नियम शास्त्रकारांनीं बांधून टाकिला आहे. तेंच मांडव्य सांगतो कीं, रोजच्या प्रवासाला, जुन्या घराचे डागडुजी करण्याला, गर्भाधानापासून अन्न प्राशनापर्यंतच्या सात संस्कारांला,वधू प्रवेश करण्याला, गुरु आणि शुक्र ह्यांच्या अस्ताचा बाध नाहीं, सिंहस्थ गुरु, दक्षिणायन, क्षयमास, अधिकमास, ह्यांचाही बाध नाहीं ह्मणजे हे असतांना वरील मंगल कार्यें करावींत. कारण कीं, ह्यांन कालाचा नियम केला आहे असा अर्थ बुद्धीनें जाणावा. तें असें कीं, प्रसूतिकाळीं सांगितलेलें जातकर्म त्या वेळेस केलेंच पाहिजे.तेथें अस्तादिक पाहून चालणार नाहीं. अन्न प्राशन साहाव्या किंवा आठव्या महिन्यांत असें विकल्पानें दोन महिन्यांत सांगितलेलें कर्म आहे ह्मणून ज्या महिन्यांत अस्त नसेल त्या महिन्यांत तो संस्कार करावा. कारण तेथें काळाचा अवकाश आहे. आतां दोनही महिन्यांत जर सिंहस्थ गुरु आहे तर मात्र त्या गुरूचा विचार न करतां संस्कार करावा कारण दोन महिने गेल्यावर त्याचा काळ निघून जाईल. अशाच रीतीनें गर्भाधाना पासून तों अन्न प्राशनापर्यंत जें कर्म न राहण्यासारखें असेल तें त्यावेळेसच करावें व तें नित्य, नैमित्तकही तसेंच करावें. संस्कार करण्याचा क्रम कात्यायन गृह्यकारिकेंतही सांगितला आहे. तो असा कीं, १ गर्भाधान, २ पुंसवन, ३ सीमंतोन्नयन, ४ जातकर्म, ५ नामकर्म, ६ निष्क्रमण, ७ अन्नप्राशन, ८ चूडाकरण, ९ उपनयन १०–११–१२–१३ चार वेदांचे चार ग्रहणसंस्कार. १४ गोदान, १५ मेखलामोचन, १६ विवाह असे हे १६ सोळा संस्कार आहेत. ह्याक्रमानें गर्भाधाना पासून तों अन्न प्राशनापर्यंत अस्तादिक हें आपल्या बुद्धीनें पाहावें. तोच अर्थ बृहस्पतीनें सांगितला आहे कीं, जें कार्य अमुक महिन्यांत करावें ह्मणून सांगितलें आहे तेथें गुरु आणि शुक्र ह्यांचा अस्त पाहूं नये. कारण मासाचें कार्य अस्त पाहिल्यानें बंद पडणार आहे व त्याला पुढें काळ नाहीं. यमही असें सांगतो कीं, गर्भाधान, वृद्धत्व, भृत्य, श्राद्ध कर्म, मासिक, सपिंडीकरण,नित्यकर्म इतक्या कर्मामध्यें अधिक मास पाहूं नये. भृगु सांगतो कीं, गुरु सिंहस्थ असतां सीमंतोन्नयन, जात कर्म इत्यादि आणि अन्न प्राश-

नपर्यंतचे संस्कार करावेत ते करण्यास दोष नाहीं, कात्यायन स्मृतींत सांगितलें आहे कीं, गर्भाधाना पासून अन्न प्राशना पर्यंतच्या क्रिया आणि कान टोंचणें ह्या क्रिया अधिक महिन्यांत कराव्या, त्या शिवाय दुसऱ्या क्रिया करूं नयेत. असें भास्कर सांगत आहे. चूडा इत्यादि कर्मांमध्यें ते अस्तादिक सोडावेत हे सर्व प्रकार " एतच्चौलादिषूह्येत् " ह्या श्लोकांत सांगावयाचे आहेत. गुरु, शुक्र ह्यांचे अस्तादिक चौलादिक संस्काराविषयीं पहावेत ह्मणजे अस्तांत ते चौलादि करूं नयेत. आतां बालत्व आणि वृद्धत्व ह्यांचें प्रमाण सांगतो—गुरु आणि शुक्र ह्यांचें बालत्व आणि वृद्धत्व सात सात दिवस असतें. पैकीं वृद्धत्व पुष्कळ प्रकारचें आहे पैकीं मध्यम पक्ष येथें घेतला आहे.आतां शाखाधिपतीचा अस्त असतां काय वर्जावें हें सांगतो—शाखेचा अधिपति ह्मणजे वेदाचा अधिपति तो कसा व कोण असतो हें पुढें सांगावयाचें आहे त्याचा अस्त असेल तर मौंजीबंधन आणि वेदांचा आरंभ हीं विद्वान् पुरुष करीत नाहींत. जर अस्तांत तीं दोन्हीं केलीं तर तो बटु मूर्ख होतो. आतां अशी शंका येते कीं, वेदाचा आरंभ करण्याविषयीं मूर्ख होतो हें ह्मणणें बरोबर दिसतें, कारण तो वेदाधिपति आहे परंतु मौंजी बंधनाविषयीं मूर्ख होतो हें ह्मणणें बरोबर नाहीं, कारण मौंजीबंधन हें वेदाचे अध्ययनाकरितां आहे ह्मणून तेथेंही मूर्खत्व येणें योग्य आहे; तसेंच याज्ञवल्क्य सांगतो कीं, गुरूनें शिष्याचें मौंजीबंधन करावें आणि त्याला प्रणवपूर्वक वेद शिकवावा आणि शौच आचार ही शिकवावा. प्रत्येक वेदाकरितां बारा बारा वर्षें ब्रह्मचर्य अथवा पांच पांच वर्षें ब्रह्मचर्य किंवा ग्रहणांतिक संस्कारापर्यंत किंवा केशांत संस्कार सोळावे वर्षी असतो तेथपर्यंत तरी ब्रह्मचर्य ठेवावें. यज्ञाकरितां, शुभकारक कर्म करण्याकरितां द्विजांना वेद हाच फारच निःश्रेयस ह्म० अक्षय कल्याण करणारा आहे. तसेंच कात्यायन गृह्यसूत्रांत सांगितलें आहे कीं, प्रत्येक वेदास बारा बारा वर्षें ह्याप्रमाणें चार वेदांनां अठ्ठेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य अथवा बारा वर्षें किंवा गुरूची आज्ञा होईपर्यंत ब्रह्मचर्य धारण करून वेद शिकावेत. ते संपविल्यावर मग गुरूच्या आज्ञेनें विवाह करावा ॥ ९ ॥

### चौलाचा काळ व निर्णय.

चौलं माघादिपंचस्वमधुषु गदितं द्वित्रिपंचोन्मितेऽब्दे ।
स्वाचाराद्वा सगर्भा यदि भवति जनन्यत्र नो कार्यमेतत् ॥
साकं यत्रोपनीत्या क्रियत इह तदाऽयं निरोधो न हि स्यात् ।
जह्यादंबार्तवेऽदो व्रतमुपयमनं चाविशुद्धेः शुभार्थी ॥ १० ॥

श्लोकार्थ—चैत्राशिवाय माघ महिन्यापासून पांच महिन्यांत अर्थात् चैत्र नसल्यामुळें माघ, फाल्गुन, वैशाख आणि ज्येष्ठ ह्या चारच महिन्यांत चौल करावें. तें जन्मापासून दुसऱ्या, तिसऱ्या किंवा पांचव्या वर्षी करावें. अथवा जसा कुलाचार असेल त्या वर्षी करावें. बालकाची माता गर्भिणी असल्यास चौल करूं नये. उपनयना बरोबर करावयाचें असल्यास वर सांगितलेला प्रतिबंध नाहीं. फक्त माता रजस्वला असेल तर चौल आणि उपनयन व विवाह करूं नयेत. ॥ १० ॥

**अथ चौलं सनिर्णयं वृत्तेनैकेऽनाह—चौलमिति । कार्यं वर्णैरित्यग्रिमश्लोकेनान्वयः । चौलं चूडाकरणं माघादिपंचसु मासेषु अमधुषु चैत्ररहितेषु गदितं उक्तं तथा चोक्तं नारदेन । माघादिपंचके चौलं हित्वा क्षीणविधुं मधुमिति द्वित्रिपंचोन्मितेऽब्दे द्वितीये तृतीये पंचमे वर्षे स्वाचाराद्वा स्वकुलाचारतो वा । उक्तं च कात्यायनगृह्ये । सांवत्सरिकस्य चूडाकारणं तृतीये वाप्रतिहते षोडशवर्षस्य केशांतो यथामंगलं वा सर्वेषामिति॥ सांवत्सरिकस्य अतिक्रांताब्दस्येति । हरिहरमिश्रैर्व्याख्यानं कृतं । तथा च सद्गुरुशिष्यः । आद्येऽब्दे कुर्वते केचित्पंचमेऽन्ये द्वितीयके । उपनीत्या सहैवेति विकल्पः कुलधर्मत इति ॥ सगर्भा यदी भवति जनन्यत्र नो कार्यमेतत् । अत्र उक्तवर्षेषु द्वित्रिपंचमाब्दकेषु जननी कुमारस्य माता यदि सगर्भा भवति स्यात् तदा एतच्चौलं नो कार्यं । पंचमाब्दादूर्ध्वं गर्भिण्यां सत्यामपि कार्यमित्यर्थसिद्धं । अत्र नारदः । सूनोर्मातरि गर्भिण्यां चूडाकर्म न कारयेत् । पंचाब्दात्प्रागतोर्ध्वं तु गर्भिण्यामपि कारयेत् ॥ उपनयनेन सहक्रियमाणे न दोष इत्याह साकं यत्रोपनीत्या क्रियत इह तदाऽयं निरोधो न हि स्यादिति । यत्र उपनीत्या साकं उपनयनेन सह क्रियते तदा इहास्मिन् चौले अयमुक्तो निरोधश्चैत्रमासमातृगर्भलक्षणो न ह्येव स्यात् । तदुक्तं तेनैव । सऽहोपनीत्या कुर्याच्चेत्तदा दोषो न विद्यत इति ॥ अंबार्तवे निषेधमाह—जह्यादंबार्तवेऽदो व्रतमुपयमनं चाविशुद्धेः शुभार्थीति ।**

अंवार्तवे मातृरजसि अदः अनंतरोक्तं चौलमित्यर्थः । व्रतं मौंजी उपयमनं विवाहः आविशुद्धेः शुद्धिपर्यंतं शुभार्थी नरः एतत्त्रयं जह्यात् न कुर्यादित्यर्थः । तथा च मनुस्मृतौ । उद्वाहव्रतचूडासु माता यदि रजस्वला । तदा न मंगलं कार्यं शुद्धौ कार्यं शुभेच्छुभिः । अन्यमुहूर्तालाभे कारिका निबंधे । शांतिकमुक्तं । अलाभे सुमुहूर्तस्य रजोदोषे तु संस्थिते । श्रियं संपूज्य विधिवत्ततो मंगलमाचरेत् ॥ हैमीं माषमितां पद्मां श्रीसूक्तविधिनाऽर्चयेत् । प्रत्यृचं पायसं हुत्वाऽभिषिच्य शुभमाचरेत् ॥ सूतिकोदक्ययोः शुद्धौ गां दद्याद्धेमपूर्वकम् । प्राप्ते कर्मणि शुद्धिः स्यादितरस्मिन्नशुद्ध्यतीति ॥ उदक्या रजस्वला ॥ १० ॥

टीकार्थ—चौलाचा निर्णय एकावृत्तानें सांगतो—चौल करावयाचें तें चार वर्णांनीं चैत्राशिवाय बाकीच्या ह्मणजे माघपासून ज्येष्ठ महिन्यापर्यंत ह्मणजे माघ, फाल्गुन, वैशाख आणि ज्येष्ठ ह्या चार महिन्यांत करावें असें सांगितलें आहे. तेंच नारदानें सांगितलें आहे कीं, क्षीणचंद्र असलेला चैत्र सोडून बाकीचा माघापासून ज्येष्ठापर्यंत चौल करावें. दुसऱ्या, तिसऱ्या पांचव्या वर्षी अथवा आपल्या घराचा जसा कुलाचार असेल त्या वर्षी चौल करावें. तेंच कात्यायन गृह्यांत सांगितलें आहे कीं, संवत्सर अतिक्रमण झालेल्या चौलाचा काळ सोळा वर्षपर्यंत आहे. जसा केशांत संस्कार असतो तो सर्वांना मंगळकारक असतो असें व्याख्यान हरिहरमिश्रांनीं केलें आहे. तेंच सद्गुरुशिष्य असें सांगतो कीं, कित्येक पहिल्या वर्षी, दुसरे कित्येक पांचव्या वर्षी, तिसरे कित्येक दुसऱ्या वर्षी, चौथे कित्येक उपनयनाबरोबर, आणि आपल्या कुलाचारा प्रमाणेंही कित्येक चौल कारितात. मात्र माता गर्भिणी असेल तर करूं नये. ह्या सर्व सांगितलेल्या काळांत जर बालकाची माता गर्भिणी असेल तर चौल करूं नये. पांच वर्षे झाल्यावर जरी माता गर्भिणी असेल तरीही करावें. ह्या विषयीं नारद सांगतो कीं, माता गर्भिणी असेल तर पांच वर्षपर्यंत चौल करूं नये. आणि पांच वर्षे झाल्यावर माता गर्भिणी असेल तरीही चौल करावें. उपनयनाबरोबर चौल केल्यास कोणताच दोष नाहीं. जेथें उपनयनाबरोबर चौल करतात त्या वेळेस चैत्र महिना, माता गर्भिणी हा सांगितलेला दोष नाहीं तेंच त्यानें सांगितलें आहे कीं, उपनयनाबरोबर चौल केलें तर हा कोणताच दोष नाहीं. माता रजस्वला असेल तर हें चौल, उपनयन, आणि विवाह हीं तीनही माता शुद्ध होई पर्यंत करूं नयेत. ह्मणजे त्यापासून कल्याण शुभ होतें. तेंच मनुस्मृतींत सांगितलें आहे कीं, विवाह, चौल आणि उपनयन ह्या वेळीं जर माता रजस्वला असेल तर हीं तीन मंगलें कल्याणाची इच्छा करणाऱ्यानें करूं नयेत. दुसरा मुहूर्त मिळत नाहीं आणि माता रजस्वला असेल तर कारिकानिबंधांत सांगितलेली शांति आहे; ती अशी कीं, दुसरा मुहूर्त मिळत नसेल आणि माता तर रजस्वला आहे ह्मणून श्रीशांति यथाविधीनें करून हें मंगल करावें एक माशाची सुवर्णमय अशी लक्ष्मी करून तिच्यावर श्रीसूक्तानें अभिषेक करून तिची षोडशोपचारांनीं पूजा करावी. प्रत्येक ऋचेनें पायसाचा होम करून व तिला अभिषेक घालून मंगलकार्य करावें. सूतिका ह्मणजे बाळंतीण आणि रजस्वला ह्यांची शुद्धि झाल्यावर सुवर्ण पूर्वक एका गाईचें दान करावें. प्राप्त झालेल्या कर्मापुरती तिची शुद्धि होते परंतु दुसऱ्या कर्मांविषयीं शुद्धि होत नाहीं ॥ १० ॥

### चौलाचे वार, नक्षत्रें व लग्नबल.

कार्यं वर्णैरिनारार्किशनिषु निखिलैर्ज्ञत्रये शुक्लसोमे ।
द्व्यंत्यद्व्यादित्यशाक्रेंदुभिरिनहरितास्त्रित्रिभैश्चौलकर्म ॥
लग्नेऽर्कारार्किशुक्रा गतकविनिखिला मृत्युगा मृत्युदास्युः ।
त्र्यब्ज्जाः संतोंऽत्य इष्टास्त्यज गुहशशिनौ रात्रिसंध्ये च रिक्ताः ॥ ११॥

श्लोकार्थ—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्यांना क्रमानें ब्राह्मणास रविवार, क्षत्रियास मंगळवार, वैश्यास शनिवार आणि शूद्रास शनिवार असे उक्त आहेत आणि सर्व वर्णांनीं बुध, गुरु, शुक्र ह्या तीन वारीं आणि शुक्लपक्षीं, सोमवारीं, चौल करावें. आतां रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, ज्येष्ठा, मृगशीर्ष, हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका ह्या बारा नक्षत्रांवर चौल करावें. तिथीमध्यें षष्ठी, पूर्णिमा, रवि, संध्याकाळ, रिक्तातिथी इतक्या सोडून बाकीच्या तिथींवर चौल करावें. इष्ट लग्नापासून रवि, मंगळ, शनि, शुक्र हे सप्तमस्थानीं मृत्यु देणारे आणि शुक्राशिवाय सर्व ग्रह अष्टमस्थानीं मृत्यु देणारे होतात. चंद्राशिवाय सर्व शुभ ग्रह हे द्वादश स्थानीं शुभ जाणावेत ॥ ११ ॥

अथ वर्णविशेषेण वारविशेषं तथा नक्षत्राणि लग्नबलं च वृत्तेनैकेनाऽऽह–कार्यमिति। वर्णैर्ब्राह्मणादिभिः यथाक्रमेण इनारार्किशनिषु चौलकर्म कार्यमित्यन्वयः । इनः सूर्यः आरो भौमः आर्किः शनिः प्रसिद्धः । तेष्वित्यर्थः । एतदुक्तं भवति । विप्रेण रविवारे क्षत्रियेण भौमवारे वैश्येन शनिवारे शूद्रेणापि शनिवारे चौलं कर्तव्यमित्यर्थः। शूद्रस्य द्वादशसंस्कारा उक्ताः। वेदव्रतोपनयनं महानाम्नीमहाव्रतं। विना द्वादश शूद्राणां संस्कारा नाममंत्रत इति॥निखिलैरिति। निखिलैश्चतुर्भिर्वर्णैरविशेषेण ज्ञत्रये बुधत्रये शुक्रसोमे शुक्लपक्षगतसोमवारे कार्यं कृष्णपक्षे सोमवारोऽतिनिंदितः क्षीणत्वात् । अत्र नारदः । अपर्वरिक्तातिथिषु शुक्रेज्यज्ञेंदुवासर इति ॥ बृहस्पतिः । सोमवारः सिते पक्षे कृष्णपक्षेऽतिगर्हितः । बुधवारः शुभः प्रोक्तः पापग्रहयुते बुधे ॥ पापग्रहाणां वारादौ विप्राणां शुभदो रविः । क्षत्रियाणां क्षमासूनुर्विट्शूद्राणां शनिः शुभ इति। कैः द्व्यंत्यद्व्यादित्यशाक्रेंदुभिः अंत्याद्वे इति द्व्यंत्यं रेवत्याश्विन्यौ द्व्यादित्यं पुनर्वसुपुष्यौ शाक्रं ज्येष्ठा इंदुर्मृगः तैः पुनः कैः इनहरितस्त्रिभिः इनो हस्तः हरिः श्रवणः ताभ्यां त्रित्रिभैः हस्तात्त्रिभिः श्रवणात्त्रिभिरित्यर्थः । तथा च नारदः। दस्रादितीज्यचंद्रेंद्रपूषभानि शुभान्यतः । चौलकर्मणि हस्तर्क्षात्त्रीणी त्रीणि च विष्णुभादिती ॥ द्यूनेऽर्कारार्किशुक्राः अत्र चौले मृत्यदाः स्युः द्यूने सप्तमे अर्कारार्किशुक्राः अर्कः सूर्यः आरो भौमः अर्कस्यापत्यमार्किः शनिः शुक्रः प्रसिद्ध एते चत्वारो मृत्युदा इति चतुर्णां समानं फलमुक्तं । वसिष्ठेनात्र विशेषफलमुक्तं । जामित्रे भास्करे क्षौरे मृत्युः स्याद्भूमिजे तथा । शुक्रे सौख्यविनाशः स्यान्मंदभाग्यं शनैश्चर इति ॥ अत्र चतुर्णामपि सामान्येन मृत्युफलमुक्तं तद्दारिद्र्यान्मरणं वरमिति न्यायेन न दोषः । गतकविनिखिला मृत्युगा मृत्युदाः स्युः गतः कविः शुक्रः येभ्यस्ते गतकवयः ते च ते निखिलाश्च शुक्ररहिताः सर्वे मृत्युगा अष्टमा मृत्युदाः स्युः । अत्र बृहस्पतिः । अष्टमस्थानगाः सर्वे नेष्टाः शुक्रविवर्जिताः । शुक्रस्तु निधने क्षौरे सर्वसंपत्प्रदः शिशोरिति ॥ व्यब्जाः संतोऽन्त्ये इष्टा विगतः अब्जश्चंद्रो येभ्यस्ते व्यब्जाः एवंविधाः संतः सद्ग्रहाः चंद्ररहिताः सद्ग्रहाः अंत्ये द्वादश इष्टाः शोभनाःस्युः तथा च नारदः चौलान्नप्राशने शस्ताः सौम्यारंध्रव्ययोपगाइति । अन्यच्च न नैधने मे शीतांशौ षष्ठाष्टांत्यविवर्जित इति। तस्यैव वचनं । अन्यलग्नबलं पूर्ववत् । त्यज गुरुशशिनौ रात्रिसंध्ये च रिक्ताः । गुरुः षष्ठी दर्शी पौर्णिमा स्पष्टमन्यत् । क्रूरवारं निशां रिक्तां षष्ठीं संध्यां च जन्मभं । सद्भिर्विवर्जयेदेतन्नारदस्य वचो यथेति ॥ ११ ॥

**टीकार्थ**—आतां अमुक वर्णास अमुक वार आणि नक्षत्रें व लग्नबल हें एका वृत्तानें सांगतो–ब्राह्मणादिकांनीं क्रमानें रवि, मंगळ, शनि, शनि ह्या वारीं चौल कर्म करावें. इनः ह्मणजे सूर्य, आरः ह्मणजे मंगळ, अर्किः ह्मणजे शनि शनिः ह्मणजे शनि. असा अर्थ झाला कीं, ब्राह्मणानें रविवारीं, क्षत्रियानें मंगळवारीं, वैश्यानें शनिवारीं, शूद्रानें शनिवारीं चौल करावें. शूद्राला बारा संस्कार सांगितले आहेत. ते असे कीं, वेदग्रहण, उपनयन, महानाम्नी, महाव्रत ह्या चार संस्कारांशिवाय बाकीचे बारा संस्कार नुसते नाम ह्याच मंत्र उच्चारून आहेत. अथवा चारही वर्णांनां बुध, गुरु, शुक्र हे वार सांगितले आहेत. आणि शुक्लपक्षांत सोमवारीं चौल करावें कृष्णपक्षांतील सोमवार वर्ज्य आहे कारण त्यावेळेस चंद्र क्षीण आहे. ह्याविषयीं नारद सांगतो कीं, पर्व आणि रिक्ता तिथी सोडून शुक्र, गुरु, बुध, सोम इतक्या वारांवर चौल करावें. बृहस्पति सांगतो कीं, शुक्लपक्षांतील सोमवार ग्राह्य आहे आणि कृष्णपक्षांतील सोमवार निंद्य आहे. जरी पापग्रह युक्त असला तरी बुध हा शुभकारक आहे. पापग्रहाचे वारांमध्यें ब्राह्मणांना रवि शुभ देणारा, क्षत्रियांना मंगळवार शुभ देणारा आणि वैश्यांना व शूद्रांना दोघांना शनि शुभ देणारा आहे. नक्षत्रांमध्यें १ रेवती, २ अश्विनी, ३ पुनर्वसु, ४ पुष्य, ५ शुक्र ह्म० ज्येष्ठा, ६ इंदु ह्म० मृग, इन ह्म० हस्त, हरि ह्म० श्रवण, ह्या दोघांपासून तीन ह्म० हस्तापासून तीन ह्म० ७ हस्त, ८ चित्रा आणि ९ स्वाती, श्रवणापासून तीन ह्म० १० श्रवण, ११ धनिष्ठा, १२ शततारका,ह्या बारा नक्षत्रांवर चौल करावें. तेंच नारद सांगतो कीं, दस्र, ह्म० १ अश्विनी, आदिति ह्म० २ पुनर्वसु, इज्य ह्म० ३ पुष्य, चंद्र ह्म० ४ मृगशीर्ष, इंद्र ह्म० ५ ज्येष्ठा, पूषा ह्म० ६ रेवती हीं सहा आणि हस्तापासून ७ हस्त, ८ चित्रा, ९ स्वाती, विष्णुभ ह्म. श्रवण ह्यापासून तीन १० श्रवण, ११ धनिष्ठा, १२ शततारका अशीं बारा नक्षत्रें चौल कर्मास शुभ आहेत, बाकीचीं अशुभ जाणावीत. लग्नापासून सप्तमस्थानीं अर्क ह्मणजे सूर्य, आर ह्म० मंगळ, आर्कि ह्म० अर्काचा पुत्र शनि हे आणि शुक्र हे असतील तर मृत्यु देणारे आहेत.चौघांचें सारखें फल आहे. वसिष्ठानें येथें विशेष फळ सांगितलें आहे तें असें कीं, सप्तमस्थानीं रवि असेल आणि चौल केलें तर मृत्यु होतो. मंगळ असेल तर मृत्यु होतो.शुक्र असेल तर सौख्याचा नाश होतो. शनि असेल तर भाग्य मंद होतें. ह्या चौघांनांही सामान्यतः मरण हें फल सांगितलें आहे.कारण दरिद्रपणापेक्षां

मरण बरें, असा एक न्याय आहे ह्मणून दोष नाहीं. कवि ह्म० शुक्र ह्या शिवाय बाकीचे सर्व ग्रह अष्टमस्थानीं असतील ते मृत्यु देणारे आहेत. ह्याविषयीं बृहस्पतीचें असें मत आहे कीं, अष्टमस्थानचे सर्व ग्रह शुभकारक नाहींत. परंतु त्यांत शुक्र मात्र शुभकारक आहे कारण चौल कर्मांत अष्टमस्थानचा शुक्र सर्व संपत्ति देणारा आहे. अब्ज ह्म० चंद्र त्याखेरीज सर्व ग्रह अंत्य ह्म० द्वादशस्थानीं असलेले शुभकारक आहेत. तेंच नारद सांगतो कीं, चौल आणि अन्नप्राशनास सर्व शुभ ग्रह आठवे आणि बारावे स्थानचे शुभकारक आहेत, परंतु चंद्र हा आठवे आणि बारावे स्थानीं मात्र शुभकारक नाहीं. हें त्याचेंच वचन आहे. बाकीचें लग्नबल पूर्वीप्रमाणें सर्व जाणावें. आतां तिथीमध्यें षष्ठी, पौर्णिमा, रात्रि, संध्या ह्यांचा त्याग चौलकर्मामध्यें करावा. नारदाचें वचन असें आहे कीं, पापवार, रात्रि, रिक्तातिथी, षष्ठी, संध्या, जन्मनक्षत्र हे सर्व योग सत्पुरुषांनीं वर्ज्य करावेत ॥ ११ ॥

## क्षौरनिर्णय आणि गर्भिणीपतिधर्म.

भुक्ताभ्यक्तोपवासीश्वरजनयुवतिप्राग्वयस्काश्च योगी ।
यात्रायुद्धोन्मुखा ये कृतदिनविधयोऽस्त्यंबकास्ते न मुंड्याः ॥
सीमंतोर्ध्वं नपत्युर्नखकचलवनं दूरदेशप्रयाणम् ।
वृक्षच्छेदः समुद्राप्लुतिमृतहरणे स्याद्दतेऽवश्यकार्यात् ॥ १२ ॥

श्लोकार्थ—जेवलेला, तेल लावलेला, उपोषण करणारा, राजाचा सेवक, सौभाग्यवती स्त्री, पन्नास वर्षांचे आंतला तरुण, योगी ह्म० योग साधन करणारा, यात्रेस आणि युद्धास निघालेला, संध्यादि सर्व केलेला, आणि जीवत्पितृक ह्मणजे बाप जिवंत असलेला इतक्यांनीं क्षौर करूं नये. गर्भिणीपतीनें सीमंतोन्नयन संस्कार केल्यावर मग नख च्छेदन, केश च्छेदन, दूर देशीं गमन, वृक्ष च्छेदन, समुद्रयान, प्रेतवाहन इतकीं कर्मे आवश्य कार्यावांचून करूं नयेत ॥ १२ ॥

अथ प्रसंगात्क्षौरनिर्णयं सार्धवृत्तेनाऽऽह–भुक्तेति । भुक्तः कृतभोजनः अभ्यक्तः कृताभ्यंगः उपवासी प्रसिद्धः ईश्वरजनो राजसेवकः समर्थो वा युवतीः स्त्री सौभाग्यवती प्राग्वयस्काः प्रथमवयस्काः पंचाशद्वर्षपर्यंतं पूर्ववयः योगी राजयोगी गीतादौ प्रसिद्धः यात्रायुद्धोन्मुखः । यात्रा प्रयाणं युद्धं प्रसिद्धं तौ प्रति ये उन्मुखाः प्रचलिता यात्रोन्मुखा युद्धोन्मुखाश्चेत्यर्थः । कृतः दिनविधिः आह्निकं यैस्ते कृतदिनविधयः अस्त्यंबको जीवत्पितृकः ते न मुंड्या मुंडनार्हा न भवंति अवश्यकार्याद्दत इत्युत्तरार्धोक्तमत्रानुसंधेयं यत्रावश्यं मुंडनकारणं भवति तत्रावश्यं मुंड्याः ॥ अथ क्षौरनिषेधप्रसंगाद्गुर्विणीपतेर्निषिद्धं सापवादमाह–सीमंतोर्ध्वमिति। सीमंतोर्ध्वं सीमंतोन्नयनादूर्ध्वं पत्युः कृतसीमंतसंस्कारस्य पत्युः भर्तुरवश्यकार्याद्दते नखकचलवनादिकं न स्यात् नखकचलवनं नखकेशच्छेदनमन्यत्सुगमं अवश्यकार्याद्दते न स्यादित्यनेन आवश्यके न दोष इत्यर्थात्सिद्धं यथा पितृमरणे क्षौरादि देशविप्लवे देशांतरगमनं इत्यादि विचारणया आवश्यके न दोष इत्यर्थः । कृताग्न्याधानस्य मुंडनपक्षांगीकारे मुंडनमावश्यकं । मासि मास्युपासनिकस्य पक्षे पक्षेऽग्निहोत्रिण इति ॥ १२ ॥

टीकार्थ—आतां प्रसंगानें चालू असलेला क्षौराचा निर्णय दीड श्लोकानें सांगतो–भोजन केलेला, अभ्यंग स्नान केलेला, उपवास करणारा, राज सेवक, अथवा समर्थ, सौभाग्यवती स्त्री, पन्नास वर्षांचे आंतला तरुण, पन्नास वर्षपर्यंत पूर्व वय समजावें, राजयोगी गीतेंत सांगितलेला, यात्रा आणि युद्धास जाणारा, अर्थात् त्यांचे तयारींत असणारा, ज्यांनीं दिवसाचें अन्हिक कर्म केलं आहेत ते, ज्यांला माता पिता जीवंत आहेत ते, इतक्यांनीं क्षौर कर्म करूं नये. मात्र अवश्य कार्य असेल तर त्यांना मुंडण्यास अधिकार आहे. असा अर्थ अनुसंधान करावा. ह्मणजे जेथें अवश्य मुंडण्याचा प्रसंग येतो तेथें मुंडण केलेंच पाहिजे. आतां क्षौराचा प्रसंग चालला आहे, त्यामध्यें गर्भिणी पतिला काय निषिद्ध आहे तें अपवादासहित सांगतो–गार्भिणीपतीनें सीमंतोन्नयन संस्कार झाल्या नंतर आवश्यक कार्याशिवाय एरव्हीं नख आणि केंश ह्यांचें छेदन करूं नये. आवश्यक कार्याशिवाय असें ह्मटल्यामुळें आवश्यक कार्याचे वेळेस नखाचें कर्तन आणि केशांचें छेदन करण्यास हरकत नाहीं असें अर्थात् सिद्ध झालें. जसें बाप मेल्यावर क्षौरादि केलेंच पाहिजे. देशाचा नाश झाला असतां दुसऱ्या दूर देशास गमन केलेंच पाहिजे. असा विचार केला असतां तशा अडचणीच्या कामास दोष नाहीं. ज्यांनीं अग्नीचें आधान केलें आहे त्यांना

मुंडनाचा स्वीकार करण्याचा प्रसंग प्रत्येकपक्षीं आहे व तो आवश्यक आहे. कारण उपासनिकानें प्रत्येकमासीं आणि अग्निहोत्र्यानें प्रत्येक पक्षास मुंडन करावें असा नियम आहे ॥ १२ ॥

### क्षौर आणि अक्षरारंभ.

क्षौरं चौलोक्तभादौ गदितमथ रविक्षेत्रगंगाध्वराग्न्या-।
धाने पित्रोर्विनाशे द्विजनृपकथने सर्वदा क्षौरमिष्टम् ॥
मित्रत्र्यर्कादितींद्रांतिमहरितुरगैः पंचमेऽब्दे व्रतात्प्राक् ।
विद्यारंभोक्तकालेऽक्षरविधिरघटे सौम्यसंज्ञेऽयनेऽर्के ॥ १३ ॥

श्लोकार्थ—क्षौर करावयाचें तें चौलाचें नक्षत्र, तिथि इत्यादिकांवर करावें, गंगेस, भास्कर क्षेत्रीं गेलें असतां. यज्ञामध्यें, अग्नि होत्रांत, माता व पिता मेलीं असतां, ब्राह्मणाची व राजाची आज्ञा झाली तर तत्काळ क्षौर करावें. त्या वेळेस नक्षत्रादिकांचा नियम नाहीं, विद्येचा आरंभ करावयाचा तो अनुराधा, हस्त, चित्रा, स्वाती, पुनर्वसु, ज्येष्ठा, रेवती, श्रवण, अश्विनी ह्या नक्षत्रांवर जन्मापासून पांचव्या वर्षी, उपनयनचे पूर्वी कुंभावांचून उत्तरायणांत सूर्य असतां करावा ॥ १३ ॥

अथोक्तेभ्योऽन्येषां क्षौरार्थं नक्षत्रादिकमाह-क्षौरमिति । चौलोक्तभादौ क्षौरं गदितं प्रोक्तं चौलार्थमुक्तश्चौलोक्तः स चासौ भादिश्च तस्मिन्नक्षत्रतिथ्यादिकाले क्षौरं गदितं प्रोक्तं । अथ क्षौरनिमित्तान्याह–रविक्षेत्रगंगाध्वराग्न्याधाने पित्रोर्विनाश इत्यादि । रविक्षेत्रं भास्करक्षेत्रं गंगा प्रसिद्धा अध्वरो यागः अग्न्याधानमग्निहोत्रं तस्मिन् पित्रोर्विनाशो मरणं तस्मिन् द्विजनृपकथने ब्राह्मणाज्ञायां राजाज्ञायां च सत्यां सर्वदा क्षौरमिष्टं स्यात् क्षौरे नक्षत्रादिनियमो नास्तीत्यर्थः । तदुक्तं वृत्तशते । भुक्ताभ्यक्तनिरशनैरित्यादि । रत्नमालायां । आज्ञया नरपतेर्द्विजन्मनामित्यादि । बृहस्पतिः । राजकार्ये नियुक्तानां नराणां भूपसेविनां । श्मश्रुलोमनखच्छेदे नास्ति कालविशोधनं ॥ ज्योतिर्निबंधे । राजयोगी पुरंध्री च मातापित्रोश्च जीवतोः। मुंडनं सर्वतीर्थेषु न कुर्याद्गुर्विणीपतिः ॥ स्मृत्यंतरे । सिंधुस्नानंद्रुमच्छेदं वपनं प्रेतवाहनं । विदेशगमनं चैव न कुर्याद्गुर्विणीपतिः ॥ क्षौरं नैमित्तिकं कुर्यान्निषेधे सत्यपि ध्रुवं । पित्रोः प्रेतविधानं च न दोषस्तत्र विद्यते ॥ गंगायां भास्करक्षेत्रे मातापित्रोर्मृतेऽहनि । आधाने सोमपाने च षट्सु क्षौरं विधीयते॥अंतर्वत्न्यां तु जायायां तीर्थे क्षौरं न कारयेत् । प्रेतवाहादिकं नैव सीमंतोन्नयनादनु॥पंचाशद्वायनात्पूर्वं क्षौरं नैमित्तिकं विना । न कुर्यात्तत ऊर्ध्वं तु स्वेच्छया वपनं चरेत् इति ॥ अथाक्षरारंभं वृत्तार्धेनाऽऽह–मित्रत्र्यर्केति । मित्रादिभिर्नक्षत्रैः जन्मतः पंचमे वर्षे व्रतात् व्रतबंधात्प्राक् प्रथमं विद्यारंभोक्तकाले वक्ष्यमाणलक्षणेऽक्षरविधिः प्रथमाक्षरारंभविधिः शुभः स्यादित्यध्याहारः । कस्मिन् सति सौम्यसंज्ञे अयने अर्के सति कथं भूतं सौम्यसंज्ञं अयनं अघटे न विद्यते घटो यस्मिन् तथा तस्मिन् कुंभरहित उत्तरायण इत्यर्थः । ब्रह्मतुल्ये अयनलक्षणं कर्किमृगादिषट्के ते चायने दक्षिणसौम्यायने इति । मित्रमनुराधा त्र्यर्कं हस्तत्रयं अदितिः इंद्रो ज्येष्ठा अंतिमं रेवती हरिः श्रवणः तुरगोश्विनी शेषं प्रथममेव व्याख्यातं व्रतात्प्रागित्यनेन व्रतबंधादुपरि निषेधोऽर्थात्सिद्धः पंचमे वर्षे पठनरूपया व्रतबंधोऽग्रे वक्ष्यते । तथा चोक्तं बृहस्पतिना । द्वितीयजन्मतः पूर्वमारभेताक्षरान् सुधीरिति ॥ उक्तंच संग्रहे। उदग्गते भास्वति पंचमेऽब्दे प्राप्तेऽक्षरस्वीकरणं शिशूनां । सरस्वतीं विघ्नविनायकं च गुडौदनाद्यैरभिपूज्य कुर्यादिति ॥ नृसिंहः । अक्षरस्वीकृतिः प्रोक्ता मासे पंचमहायने । उत्तरायणगे सूर्ये कुंभमासं विवर्जयेदिति ॥ १३ ॥

टीकार्थ—आतां पूर्वी जीं सांगितलीं त्याहून बाकीच्यांना क्षौर करण्याचीं नक्षत्रादिक सांगतो–चौलाकरितां जो नक्षत्रादिक काळ सांगितला त्याच नक्षत्रादिक काळावर क्षौर करावें असें सांगितलें. आतां क्षौर करण्याचीं निमित्तें सांगतो-भास्कर क्षेत्रीं, गंगा क्षेत्रीं, यज्ञांत, अग्निहोत्रांत, आईबापांच्या मरणीं, ब्राह्मणानें आणि राजानें आज्ञा केली असतां सर्वदा क्षौर करणें इष्ट आहे, तशा वेळीं क्षौर करण्यास नक्षत्रादिकांचा नियम नाहीं. तोच अर्थ वृत्तशतांत सांगितला आहे कीं, भोजन केलेला, तेल लावलेला, उपवासी ह्यांनीं क्षौर करूं नये. रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ब्राह्मणाच्या आणि

राजाच्या आज्ञेनें क्षौर करावें त्याला नक्षत्रादिकांचा नियम नाहीं. बृहस्पति असें सांगतो कीं, राजकीयकार्यांमध्यें नेमलेल्या मनुष्यांनां राजाची सेवा करणाऱ्यांना क्षौर करणें, नखच्छेदन, ह्याविषयीं काळ पाहावयाचें कारण नाहीं. ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, राजयोग्यान, सौभाग्यवती स्त्रीनें, मातापिता जिवंत असलेल्या पुत्रानें, गर्भिणी पतिनें सर्व तीर्थांवर मुंडन करूं नये. दुसऱ्या स्मृतींत सांगितलें आहे कीं, गर्भिणीपतीनें समुद्रस्नान, वृक्षच्छेदन, वपन ह्मणजे क्षौर, प्रेतवाहन, परदेशीं गमन, इतकीं कामें करूं नयेत. जरी असा निषेध आहे तरीसुद्धां निमित्तानें आलेलें क्षौर करावें. मातापित्यांचें प्रेतवाहन व त्याबद्दल क्षौर करण्यास दोष नाहीं. कारण गंगातीर्थीं, भास्करक्षेत्रीं, मातापित्यांचे मरणोत्तर, अग्नीच्या आधानांत, सोमलतेच्या यज्ञांत अर्थात् सोमयज्ञांत ह्या सहा कार्यीं क्षौर करावें स्त्री गर्भिणी असेल तर तीर्थावर क्षौर करवूं नये. सीमंतोन्नयनानंतर प्रेतवाहन करूं नये. पन्नास वर्षांच्या आंत निमित्ताशिवाय क्षौर करूं नये. पन्नास वर्षांनंतर आपल्या इच्छेप्रमाणें क्षौर करावें. आतां अक्षरारंभ अर्ध्या वृत्तानें सांगतो—जन्मापासून पांचवे वर्षीं उपनयन ह्मणजे मौंजी बंधनाचे पूर्वीं विद्यारंभाचे वेळेस पुढें सांगावयाचा अक्षरारंभाचा विधि केला असतां तो शुभकारक होतो. त्या वेळेस उत्तरायण असावें आणि त्या उत्तरायणांत कुंभेचा सूर्य नसावा. ब्रह्मतुल्यामध्यें अयनाचें लक्षण सांगितलें आहे तें असें कीं, कर्कापासून सहा राशींस सूर्य असला तर दक्षिणायन ह्मणजे कर्क, सिंह, कन्या, तुला, वृश्चिक, धन ह्या सहा राशींवर सूर्य असतो, तें दक्षिणायन होतें आणि मकरापासून सहा राशींस सूर्य असला तर उत्तरायण ह्मणजे मकर, कुंभ, मीन, मेष, वृषभ, मिथुन, इतक्या सहा राशींवर सूर्य असला तर उत्तरायण होतें. नक्षत्रांमध्यें मित्र ह्म० अनुराधा, अर्कापासून तीन ह्म०हस्त, चित्रा, स्वाती, अदिति ह्म०पुनर्वसु, इंद्र ह्मणजे ज्येष्ठा, अंतिम ह्म० रेवती, हरि ह्म० श्रवण, तुरग ह्म० अश्विनी इतक्या नक्षत्रांवर अक्षरारंभ करावा. हा आरंभ व्रतबंधाचे पूर्वीं करावा असें ह्मटल्यामुळें अर्थात् व्रतबंधानंतर त्याचा निषेध आहे. पांचव्या वर्षीं शिकण्याची रुचि असल्यामुळें व्रतबंध पुढें सांगावयाचा आहे. तेंच बृहस्पतीनें सांगितलें आहे कीं, बुद्धिवानानें दुसरा जन्म उपनयन संस्काराचे पूर्वीं अक्षराचा ह्मणजे शिकण्याचा आरंभ करावा. संग्रहग्रंथांत सांगितलें आहे कीं, सूर्यनारायण उत्तरायणीं असतां पांचव्या वर्षीं विद्या शिकण्याचा आरंभ करावा. त्या वेळेस श्रीसरस्वती, श्रीविघ्नविनायक ह्यांचें गूळ, ओदन इत्यादि पक्वान्नांनीं पूजन करून मग विद्येचा आरंभ करावा. नृसिंह सांगतो कीं, पुत्राच्या पांचव्या वर्षीं कुंभ संक्रांती सोडून उत्तरायणांत अक्षर शिकविण्याचा आरंभ करावा ॥ १३ ॥

## उपनयनकाल.

विप्रादेर्गर्भतोऽब्देऽष्टशिवरविमिते जन्मतो वा व्रतं स्या- ।
दत्रानिष्टेऽपि जीवेऽनिमिषरविमधौ कार्यमब्दस्य दार्ढ्यात् ॥
स्वाब्दादूर्ध्वं क्रमाद्वा द्विगुणितशरदो निंद्यमब्दक्रमेण ।
पंचाष्टांकाब्दतो वा म्पठनरुचितः शस्तमेषां तदाहुः ॥ १४ ॥

श्लोकार्थ—ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य, ह्या तिघांनां जन्मापासून अथवा गर्भधारणापासून क्रमानें ८–११–१२ ह्यावर्षीं गुरु अनिष्ट असला तरी मुख्य काळ जातो ह्मणून चैत्र मासीं मीन राशीला सूर्य असेल तर उपनयन संस्कार करावा. आतां वर सांगितलेल्या काळाची दुप्पट ह्मणजे १६–२२–२४ वर्षपर्यंत उपनयनाचा अवधि आहे. परंतु तो उत्तरोत्तर अधिक निंद्य आहे, श्रेष्ठ लोकांचें मत असें आहे कीं, पुत्राला वेदपठणाची इच्छा असेल तर ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांना क्रमानें ५–८–९ हीं वर्षेंही उपनयनाचा काळ आहे व त्यावेळीं उपनयन करावें ॥ १४ ॥

अथ ब्रह्मक्षत्रविशां मुख्यं गौणं च व्रतबंधकालं वृत्तेनाऽऽह–विप्रादेरिति। गर्भतः गर्भाधानाज्जन्मतो वा अष्टशिवरविमिते अब्दे विप्रादेर्व्रतं स्यात् विप्रस्याष्टमे क्षत्रियस्य शिवमिते एकादशे वर्षे स्यात् वैश्यस्य रविमिते द्वादशे वर्षे स्यात् । अत्र स्वस्ववर्षे जीवे गुरौ अनिष्टेऽशुभे सत्यपि व्रतं कार्यं क अनिमिषरविमधौ अनिमिषे रविः अनिमिषरविः अनिमिषरविणा विशिष्टो मधुः अनिमिषरविमधुः तस्मिन् मीनस्थे रवौ सति चैत्रे व्रतं कर्तव्यमित्यर्थः । अब्दस्य दार्ढ्यात् वर्षबलात् । तदुक्तं संग्रहे । शुद्धिर्न विद्यते यस्य वर्षे प्राप्तेऽष्टमे यदि । चैत्रे मीनगते भानौ तस्योपनयनं शुभं॥ जन्मभादष्टगे सिंहे नीचे वा शत्रुभे गुरौ। मौंजीबंधः शुभः प्रोक्तश्चैत्रे मीनगते रवौ ॥ अशुभेऽब्दे ग्रहाः सर्वे शुभगोचरगा अपि । शांत्यभावाच्छुभं नैव स्यात्स्वब्दः कालमृत्युवदिति॥अथ गौणकालफलमाह–स्वाब्दादूर्ध्वं क्रमा-

दिति । स्वाब्दात् स्ववर्षादूर्ध्वं क्रमात् आ द्विगुणितशरदः द्विगुणिता चासौ शरच्च द्विगुणितशरत् वर्षं तां मर्यादीकृत्येति तथा तस्याः अब्दक्रमेण निंद्यं तद्यथा ब्राह्मणस्याष्टमं वर्षं मुख्यं तद्विगुणितं षोडशं अष्टमवर्षात् षोडशवर्षपर्यंतं ब्राह्मणस्य एकादशवर्षाद्द्वाविंशवर्षपर्यंतं क्षत्रियस्य द्वादशवर्षाच्चतुर्विंशतिवर्षपर्यंतं वैश्यस्य अब्दक्रमेणोत्तरोत्तरं निंद्यं अर्थादतः अनधिकारिणो भवंति । तदुक्तं संग्रहे । नृपा १६ कृति २२ जिना २४ ब्दांतं नातिकालस्ततः परं । पातित्यं स्याद्द्विजादेर्व्रात्यस्तोमो विशोधनमिति ॥ तथाच कात्यायनगृह्ये । आषोडशाद्ब्राह्मणस्यानतीतः काल आ द्वाविंशात्क्षत्रियस्या चतुर्विंशाद्वैश्यस्यात ऊर्ध्वं पतितसावित्रीका भवंति नैनानुपनयेयुर्नाध्यापयेयुर्न याजयेयुर्न चैभिर्व्यवहरेयुः कालातिक्रमे नियतवत्त्रिपुरुषं पतितसावित्रीकाणामपत्ये संस्कारो नाध्यापनं तेषां संस्कारेप्सुर्व्रात्यस्तोमेनेष्ट्वाकाममधीयीरन् व्यवहार्या भवंतीति वचनादिति । अथ स्वाब्दक्रमागपि अध्ययनौत्सुक्यादुपनयनकालमाह–पंचषष्टांकाब्दतो वेति । पंचमाष्टमनवमवर्षेभ्यः सकाशादेषां ब्रह्मक्षत्रविशां क्रमेण प्रपठनरुचितः वेदादिपठनरुच्या तद्व्रतं शस्तमाहुर्मुनयः । उक्तंच संग्रहे । ब्रह्मवर्चसमूर्जश्च विद्याऽऽयुः श्रीर्यशः सुखं । विप्रादेरुपनीतस्य पंचाष्टांकाब्दतः फलम् ॥ १४ ॥

टीकार्थ–आतां ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांचा व्रतबंध करण्याचा मुख्य काळ आणि गौण काळ ही दोन्ही एका वृत्तानें सांगतो–गर्भाधानापासून अथवा जन्मापासून ब्राह्मणाला आठवे वर्षीं, क्षत्रियाला शिव ह्म० ११ वे वर्षीं, वैश्याला रवि ह्म० बारावे वर्षीं उपनयन संस्कारात्मक व्रत करावें. त्यावेळीं अनिमिष ह्म० मीन राशीवर रवि असून चैत्र मास असावा. कारण हें वर्ष फारच बळकट ह्मणजे अति आवश्यक आहे. तेंच संग्रह ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ज्याला आठवें वर्ष बसलें असेल त्याचा उपनयन संस्कार करण्याला कोणत्याही प्रकारची काळशुद्धि पाहावयास नको मात्र चैत्र महिना व मीनावर सूर्य असला ह्मणजे तो काळ उपनयनाला शुभकारक आहे. फार तर जन्मराशी पासून आठवा गुरु असेल, सिंहेचा असेल, नीचींचा असेल, शत्रुस्थानीं असेल तरीही चैत्रांत मीनाचे सूर्यावर मौंजीबंधन शुभकारक आहे. वर्ष अशुभ असले आणि सर्व ग्रह शुभ असले तरीही तो शांतिकारक काळ नव्हे ह्मणून तें वर्ष शुभकारक होत नाहीं. तर तो वर्षाचा काळ काळक्रमाप्रमाणें समजावा. आतां गौण काळ सांगतो– ज्याला जें वर्ष सांगितलें आहे. त्याच्या दुप्पट काळ ह्म० ब्राह्मणाला ८ वर्षांचे दुप्पट १६ वर्षें, क्षत्रियांना ११ वर्षांचे दुप्पट २२ वर्षें, वैश्याना १२ वर्षांचे दुप्पट २४ वर्षें या वर्षांत उपनयन करण्याच्या काळाचा अवधि आहे. परंतु तो काळ प्रति वर्षास अधिक अधिक निंद्य आहे. ह्मणजे ब्राह्मणाला आठ वर्षांपुढें प्रत्येक वर्ष अधिक निंद्य आहे. ह्मणजे आठव्यापेक्षां नववें व नवव्यापेक्षां दहावें असें उत्तरोत्तर अधिक निंद्य आहे. ह्याप्रमाणेंच क्षत्रियांचें अकरा वर्षांपुढील प्रत्येक वर्ष उत्तरोत्तर अधिक निंद्य आहे. आणि वैश्यांचेंही बारा वर्षांनंतर पुढें प्रत्येक वर्ष उत्तरोत्तर अधिक निंद्य आहे. अर्थात् त्या अवधीपुढें मग ते उपनयनाचे अधिकारी रहात नाहींत. तेंच संग्रहग्रंथांत सांगितलें आहे कीं, नृप ह्म० १६ कृति ह्म० २२ जिन ह्म० २४ इतक्या वर्षांनंतर क्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांना काळ रहात नाहीं. त्या पुढें राहिलेले ब्राह्मणादि तिघे पतित होतात आणि त्यांच्या त्या पातित्याचे शोधनाकरितां व्रात्यस्तोम केला पाहिजे. तेंच कात्यायन गृह्यसूत्रांत सांगितलें आहे कीं, ब्राह्मणाला १६ वर्षेंपर्यंत काळ आहे, पुढें क्षत्रियांना २२ वर्षें आणि वैश्यांना २४ वर्ष पर्यंत काळाचा अवधि आहे. त्या पुढें ते पतित ह्म० उपनयन देण्यास अधिकारी रहात नाहीं, मग त्यांनां उपनयनही नाहीं आणि वेदाध्ययन शिकवूं नये. त्यांच्याकडून यजन ही करवूं नये. त्यांच्या बरोबर अन्नादि व्यवहार ही करूं नये. कालाचा अतिक्रम झाल्यामुळें त्यांचे पुढील तीन पिढीपर्यंत सर्व पुरुष गायत्री मंत्रापासून भ्रष्ट झालेले समजावेत. त्यांच्या पुत्रपौत्रानांही संस्कार नाहीं, अध्यापन नाहीं. त्यांना संस्कार करावा अशी इच्छा करणारानें व्रात्यस्तोमानें यजन करावें मग त्यांनीं अध्ययन करावें नंतर मग ते संस्कार करण्यास योग्य होतात. आतां उपनयनाला सांगितलेल्या काळाचे पूर्वींही अध्ययनाविषयीं उत्सुकता असेल तर उपनयनाचा दुसरा काळ सांगतो– ब्राह्मणाला पांचवे वर्षीं, क्षत्रियाला आठवे वर्षीं, वैश्याला ९ वे वर्षीं उपनयन संस्कार करावा आणि त्या मुलांच्या इच्छेप्रमाणें त्यांनां वेदाध्ययन सुरु करावें. असें मुनीचें प्रशस्त मत आहे. तेंच संग्रहांत सांगितलें आहे कीं, ब्राह्मणादि तिघां वर्णांनां, ब्रह्मतेज, विद्या, आयुष्य, लक्ष्मी, यश आणि सुख ह्यांची इच्छा असेल तर ५–८–९ ह्या वर्षीं उपनयन संस्कार क्रमानें करावा ॥ १४ ॥

### गुरुचे बलाबलाचा विचार.

राशेः षट्त्र्याद्यखस्थो गुरुरिह शुभदः पूजयास्यात्तयाऽपि ।
अंत्योंबुस्थोऽष्टमो नो यदि निजगृहगस्तुंगगोऽत्रापि शस्तः ॥

**एवं कन्यर्क्षतः स्यादतितरगुणिनो लब्धये वाऽतिकाले-।**
**ऽनिष्टो पीह द्विरर्च्योऽष्टमभवनगतः शोभनः स्यात्रिरर्च्यः ॥ १५ ॥**

श्लोकार्थ—जर पुत्राचे जन्मराशीपासून ६–३–१–१० ह्या स्थानीं गुरु असेल तर त्याची पूजा करावी. ह्मणजे तो घेण्यास प्रशस्त आहे. १२–४–८ ह्या स्थानचा गुरु पूजेनेंही प्रशस्त नाहीं. तथापि गुरु आपल्या घरीं ह्मणजे धन आणि मीन ह्या राशींवर असेल किंवा उच्चींचा ह्मणजे कर्क राशीचा असेल तर तो मात्र शुभ जाणावा. असेंच कन्येविषयींही जाणावें. उत्तम गुणवान् पति मिळत आहे तर किंवा अतिकाळ होत असेल तर अनिष्ट गुरुचें दोन वेळा पूजन आणि अष्टम गुरूचें पूजन तीन वेळां केल्यानें तो शुभ होतो ॥ १५॥

**अथात्र गुरुबलाबलं वत्तेनैकेनाऽऽह–राशेरिति । राशेः जन्मराशेः सकाशात् षट्त्र्याद्यखस्थो गुरुः इहास्मिन्व्रतबंधे पूजया शुभदः स्यात् षट् षष्ठं त्रि तृतीयं आद्यं जन्मराशिः खं दशमं एषु तिष्ठतीति तथा । तयाऽपि पूजयाऽपि प्रांत्यो द्वादशः अंबु चतुर्थः अष्टमः न शुभदः स्यात् पूजयाऽपि अशुभदः स्यादित्यर्थः । स यदि निजगृहगः स्वगृहगः धनुर्मीनग इत्यर्थः । तुंगगो वा यदि भवति तदा इह दुष्टस्थानेषु वर्तमानः शस्तः स्यात् अस्य तुंगं कर्कटः। तदुक्तं बृहज्जातके अजवृषभमृगांगनाकुलीरा झषवणिजौ च दिवाकरादितुंगाः । दश १० शिखि ३ मनुयुक् २८ तिथीं १५ द्रियांशै ५ स्त्रिनवक २७ विंशतिभि २० श्च तेस्तनीचा इति । अर्थादुक्तस्थानेभ्योऽन्यस्थानगः शुभदः स्यात् एवं कन्यर्क्षतः स्यात् कन्यर्क्षतः कन्याराशेः सकाशात् एवमुक्तवत् शुभाशुभः स्यात्। अतितरगुणिनो वरस्य लब्धये अतिकाले वा अनिष्टोऽपि गुरुर्द्वादशचतुर्थाष्टमः द्विरर्च्यः षट्त्र्याद्यखस्थस्य शास्त्रे या पूजोक्ता तत्प्रमाणतो द्विरर्च्यः तेन द्विगुणार्चनेन शोभनः स्यात् एवं सामान्येनोक्त्वा अष्टमस्य विशेषमाहाष्टमभवनगतः त्रिरर्च्यः तेन शोभनः स्यात् । अत्र बृहस्पतिः । झषचापकुलीरस्थो जीवोऽप्यशुभगोचर। अतिशोभनतां दद्याद्विवाहोपनयादिषु ॥ व्रते जन्मत्रिखारिस्थो जीवोऽपीष्टोऽर्चनात्सकृत् । शुभोतिकाले तुर्याष्टव्ययस्थो द्विगुणार्चनात् ॥ उद्वाहतत्वे । कन्यर्क्षाद्विसुतद्युनायनवमे श्रेष्ठो गुरुश्चान्यथा पूज्योऽष्टांत्यं सुखेति काल इह तु प्राज्ञैर्द्विरर्च्यः शुभः ॥ रिःफांबुनिधनाश्रगैर्यदि ग्रहैः श्रेष्ठोऽपि विद्धोह्यसन्वामाद्धिद्ध इहेष्टदो न निधने वेधस्त्रिरर्च्यः शुभ इति ॥ १५ ॥**

**टीकार्थ**–आतां गुरूचें बळ आणि अबळ हें एका वृत्तानें सांगतो– जन्मराशीपासून सहा ६ तीन ३ आद्य १ ख १० इतक्या ठिकाणचा गुरु ह्या व्रतबंधकार्यांत पूजा केल्यानें शुभ होतो. तसाच बारावा प्रांत्य ह्म० बारावा, अंबु, ह्म० चौथा, आठवा हे तीन गुरु पूजा करूनही शुभ होत नाहींत ह्मणजे ते अशुभच आहेत. परंतु तो जर आपल्या घरीं ह्मणजे धनेचा आणि मीनेचा असेल किंवा तुंग ह्म० उच्चींचा ह्मणजे कर्केचा असेल आणि दुष्टस्थानीं जरी असला तरी तो शुभ आहे.तेंच बृहज्जातकांत सांगितलें आहे कीं,अज ह्मणजे मेष ह्याचा सूर्य उच्च,वृषभेचा चंद्र उच्च,मृग ह्म०मकरेचा मंगळ उच्च,व अंगना ह्मणजे कन्या ह्याचा बुध उच्च, कुलीर ह्म० कर्केचा गुरु उच्च, झष ह्म० मीनेचा शुक्र उच्च, वणिक् ह्मणजे तूळेचा शनि उच्च आहे. ह्या इतक्या ग्रहांच्या उच्च राशी सांगितल्या त्या राशींच्या वरही रवि १० चंद्र ३ मंगळ २८ बुध १५ गुरु ५ शुक्र २७ शनि २० इतक्या अंशांनीं उच्च समजावा अर्थात् ह्या उच्च स्थानाशिवाय दुसऱ्या स्थानावरचे गुरु नीच समजावेत.अशाच रीतीनें कन्येच्या राशीपासून पूर्वीप्रमाणें असेल तर शुभ समजावा आणि त्याहून निराळा अशुभ जाणावा. अतिशय उत्तम वर मिळण्याचा योग आला असेल अथवा कन्येचा विवाहकाळ निघून जात असेल तर जरी गुरु अनिष्ट ह्मणजे १२–४–८ ह्या स्थानचा असेल तर त्या गुरूची दोन वेळा पूजा करावी. ६–३–१–१० ह्या ठिकाणचा असेल तर शास्त्रांत जी पूजा सांगितली त्या प्रमाणानें त्या गुरूची पूजा करून कार्य करावें दुप्पट पूजा करावी असें सांगितलें आहे. असें सामान्य रीतीनें सांगून आठवा गुरु हा विशेष आहे ह्मणून त्याचा विशेष सांगतो कीं, अष्टमस्थानीं असलेला गुरु फारच अशुभ आहे, ह्मणून त्याची तीन वेळां पूजा करावी ह्मणजे तो शुभकारक होतो. ह्या विषयीं बृहस्पतीचें असें मत आहे कीं, मीन, धन, कर्क ह्या ठिकाणचा गुरु जरी अशुभस्थानचा असला तरी तो विवाह, उपनयन इत्यादिकार्यांमध्यें फारच शुभ कारक होतो. १–३–१०–६ ह्या ठिकाणचा गुरु मौंजीबंधनामध्यें पूजा केल्यानें शुभ देणारा आहे आणि ४–८–१२ ह्या ठिकाणचा गुरु दोन वेळां पूजा केल्यानें शुभप्रद होतो. उद्वाह तत्त्वांत असें सांगितलें आहे कीं, कन्या राशीपासून २–५–७–११–९ ह्या स्थानचा गुरु फारच श्रेष्ठ आहे ह्याशिवाय दुसरे ठिकाणचा गुरु पूजेनें श्रेष्ठ होतो. उत्तम वराचा लाभ अथवा काळाचें उल्लंघन होत असेल तर ८–१२ ठिकाणचाही गुरु दोन वेळां पूजा केल्यानें शुभप्रद आहे. गुरु श्रेष्ठ असूनही

तो जर १२-४-३-२-१० ह्या स्थानावरील ग्रहांनीं विद्ध असेल तर तो अशुभ जाणावा. वाम बाजूनें जर विद्ध असेल तर इष्ट देणारा आहे. अष्टम स्थानचा वेध असलेला गुरु तीन वेळा पूजा केल्यानेंही इष्ट फल देणारा होत नाहीं ॥ १५ ॥

### गुरूचा वेध व उपनयनाचे मासादि.

द्विष्वायागांकसंस्थो व्ययजलनिधनत्र्यभ्रगैश्चेन्न विद्धः ।
शस्तोऽनिष्टोऽपि वामं शुभ इह खचरैर्वेधितो नोऽष्टमस्थः ॥
शुक्ले माघादिपंचस्विनशुभदिवसे प्राग्दलेऽह्नो व्रतं सत् ।
त्यक्त्वाऽनध्यायरिक्तातिथिमुनिमदनांश्चंद्रभागं प्रदोषम् ॥ १६ ॥

श्लोकार्थ—जन्मराशीपासून १२-४-८-३-१० ह्या स्थानीं कोणताही ग्रह नसून अनुक्रमानें २-५-११-७-९ ह्या स्थानीं गुरु असेल तर तो शुभ जाणावा. आतां १२-४-८-३-१० ह्या स्थानचा गुरु अशुभ आहे हें खरें. परंतु त्या गुरूवर २-५-११-७-९ ह्या स्थानच्या कोणत्याही ग्रहाचा वेध असेल तर तो अशुभही गुरु शुभ जाणावा. आठवा गुरु कोणाच्याही वेधानें शुभ होत नाहीं (परंतु त्यांची तीन वेळां पूजा केल्यानें शुभ जाणावा) शुक्लपक्षांत, माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख आणि ज्येष्ठ ह्या पांच महिन्यांत रविवारीं अथवा दुसऱ्या शुभ वारीं पूर्वार्धांत उपनयन करणें शुभ आहे परंतु अनध्याय, रिक्तातिथी, सप्तमी, त्रयोदशी हीं सोडावीत. तसेंच कर्क लग्नाचा नवांश सोडून व्रतबंध करणें शुभ आहे ॥ १६ ॥

**अथ गुरोर्वामवेधमाह–द्वीष्वायागांकसंस्थो गुरुस्तदा शुभः स्यात् तदा कदा यदि व्ययजलनिधनत्र्यभ्रगैः खचरैर्नः विद्धः स्यात्। द्विर्द्वितीयं इषुः पंचमं आय एकादशं अगः सप्तमं अंकः नवमं एतत्संस्थो गुरुः व्ययं द्वादशं जलं चतुर्थं निधनं अष्टमं त्रि तृतीयं अभ्रं दशमं एतत्संस्थैः खचरैः यदि नो विद्धो भवति तदा शुभः स्यात् २।५।११।७।९।१२।४।८।३।१० वेधितश्चेदशुभ इत्यर्थः। अनिष्टोऽपि व्ययजलनिधनत्र्यभ्रगोऽपि वामं विद्धः सन् द्विष्वायागांकसंस्थैः खचरैर्वेधितः सन्नित्यर्थः। इह अस्मिन्व्रतबंधे विवाहे वा शुभः नोऽष्टमस्थः अष्टमस्थो वेधितो न शुभदः स्यादित्यर्थः। सोऽति कालादौ त्रिगुणार्चनेनैव शुभः स्यात्। तथाच बृहस्पतिः। रजस्वला यदा कन्या गुरुशुद्धिं न चिंतयेत्। अष्टमेऽपि प्रकर्तव्यो विवाहस्त्रिगुणार्चनात् ॥ अथोपनयने मासादिकमाह–शुक्ल इति। शुक्ले शुक्लपक्षे माघादिपंचमासेषु ज्येष्ठांत्येषु इनशुभदिवसे इनः सूर्यः शुभाः वर्धमानेंदुगुरुबुधशुक्राः एषां दिवसः तस्मिन् अह्नः प्राग्दले दिवसस्य पूर्वार्धे व्रतमुपनयनं सत् शुभं स्यात् किंकृत्वा अनध्यायरिक्तातिथिमुनिमदनान् चंद्रभागं प्रदोषं त्यक्त्वा अनाध्याया वक्ष्यमाणा रिक्तातिथयश्चतुर्थीनवमीचतुर्दश्यः मुनिः सप्तमी मदनस्त्रयोदशी एतान् चंद्रभागः कर्कांशः पापांशादिकं पुरैव निषिद्धं प्रदोषोऽनध्याय-प्रकरणोक्तः तं त्यक्त्वा ॥ १६ ॥**

**टीकार्थ**–आतां गुरूचा वाम वेध सांगतो– द्वि, इषु, आय, अग, अंक ह्म० २-५-११-७-९ ह्या स्थानाचा गुरु शुभकारक आहे परंतु तो जर व्यय, जल, निधन, त्रि, अभ्र ह्म० १२-४-८-३-१० ह्या स्थानीं असलेल्या ग्रहांनीं विद्ध नसेल तर तो शुभ जाणावा. ह्म० गुरु जरी २-५-११-७-९ ह्या उत्तम स्थानचा आहे परंतु त्यावर १२-४-८-३-१० ह्यां वरील ग्रहांचा वेध पोहोंचतो तर तो गुरु अशुभ जाणावा. ह्या उपनयनामध्यें आणि विवाहामध्यें आठवे स्थानाचा गुरु वेधितही शुभ होत नाहीं, तो आठवा गुरु लग्नाचा अति काळ होत असेल तर तिप्पट पूजा केल्यानें शुभ होतो. तेंच बृहस्पति सांगतो कीं, जर कन्या रजस्वला आहे तर मग कालाची शुद्धि पाहूं नये, मग आठवा गुरु असला तरी तिप्पट पूजा करून विवाह करावा. आतां उपनयनाला मासादिक सांगतो–माघ, फाल्गुन, चैत्र, वैशाख आणि ज्येष्ठ ह्या पांच महिन्यांत रविवारीं अथवा दुसऱ्या वाढणाऱ्या शुभ ग्रहांचे वारीं ह्म० सोम, गुरु, बुध आणि शुक्र ह्या वारीं दिवसाच्या पहिल्या अर्धांत उपनयन करावें परंतु अनध्यायतिथि, रिक्तातिथि, सप्तमी आणि त्रयोदशी इतक्या तिथि सोडाव्यात. चंद्र भाग ह्म० कर्काचा नवांश, पापांशादिक पूर्वींच सांगितले. प्रदोषकालही अनध्याय प्रकरणांत सांगावयाचा आहे तो सोडून व्रतबंध करावा ॥ १६ ॥

## उपनयनाचीं नक्षत्रें, वेदपति व लग्नबल.

शस्तो द्वीशाग्निशाक्रांतकपितृरहितैः सर्वभैर्मौंजिबंधो ।
वेदेशे ज्ञे बलाढ्ये गुरुसितकुजवित्संज्ञका वेदपाः स्युः ॥
स्वर्क्षोच्चांशेषु सौम्याः श्रुतिपतिरपि चेत्केंद्रकोणस्थिताःस्युः ।
वर्णी वेदार्थवेत्ता पशुगृहधनवानत्र मंदेऽत्यसेवी ॥ १७ ॥

श्लोकार्थ—उपनयन करतानां विशाखा, कृत्तिका, ज्येष्ठा, भरणी, मघा, हीं पांच नक्षत्रें सोडून बाकीच्या कोणत्याही नक्षत्रावर करावें, वेदपति आणि बुध हे बलवान् असावेत. ऋग्वेदाचा गुरु, यजुर्वेदाचा शुक्र, सामवेदाचा मंगळ आणि अथर्ववेदाचा बुध असे हे चार वेदांचे चार पति आहेत, शुभ ग्रह आणि वेदपति स्वगृहीं स्वोच्चस्थानीं स्वनवांशीं असून केंद्रीं व त्रिकोणीं असतील तर कुमार वेदार्थ जाणारा आणि पशू, गृह, धन ह्यानीं युक्त होतो, केंद्रीं, त्रिकोणीं शनि असतां तो कुमार नीच जातीचा सेवक होतो ॥ १७ ॥

अथ व्रतबंधे नक्षत्राण्याह -स्पष्टं । उक्तं च मघा च भरणी ज्येष्ठा विशाखा चैव कृत्तिका। नक्षत्रपंचकं प्राज्ञैर्न ग्राह्यं व्रतबंधने । वेदेशे वेदपतौ ज्ञे बुधे बलाढ्ये सति स्थानादिबलसमृद्धे सति ते के वेदेशा इत्यपेक्षायामाह गुरुसितकुजवित्संज्ञकाः क्रमात् वेदपाः वेदाधिपतयः स्युः गुरुः ऋग्वेदस्य शुक्रो यजुर्वेदस्य कुजः सामवेदस्य वित् बुधोऽथर्वणवेदस्य पतिरित्यर्थः । अथ लग्नगोचरबलमाह— स्वर्क्षोच्चांशेषु सौम्या इति । सौम्याः स्वोच्चस्वभांशेषु वर्तमानाःश्रुतिपतिरपि वेदपतिरपि स्वोच्चस्वभांशे वर्तमानश्चेद्यदि केंद्रकोणस्थिताः स्युस्तदा वर्णी ब्रह्मचारी वेदार्थवेत्ता स्यात् न केवलं वेदार्थवेत्ता स्यात् अपि तु पशुगृहधनवान् स्यात् । अत्र केंद्रकोणे शनौ मंदे सति अंत्यसेवी अंत्यजसेवकः स्यात् तस्मात्केंद्रकोणे शनिर्न भावितव्यः ।उक्तंच संग्रहे । केंद्रस्थितैरिनाद्यैर्नृपसेवी विट्क्रियःश्ववृत्तिश्च । वेदाभ्यासी यज्वा क्रतुकर्ता हीनसेवको भवतीति ॥ १७ ॥

टीकार्थ-आतां उपनयनाविषयीं नक्षत्रें सांगतो—एके ठिकाणीं सांगितलें आहे कीं, प्राज्ञ लोकांनीं व्रतबंधाविषयीं मघा, भरणी, ज्येष्ठा, विशाखा आणि कृत्तिका हीं नक्षत्रें घेऊं नयेत. वेदाचे पति, बुध, हे बलवान् असतां स्थान इत्यादि बल समृद्धि असतां व्रतबंध करावा. वेदपति कोणते ही शंका आली असतां तिचें उत्तर सांगतो—गुरु, शुक्र, मंगळ, बुध हे क्रमानें वेदांचे अधिपति आहेत. ह्म० ऋग्वेदाचा गुरु, यजुर्वेदाचा शुक्र, सामवेदाचा मंगळ आणि अथर्ववेदाचा बुध असे चार वेदांचे चार अधिपति आहेत. आतां लग्न गोचरबल सांगतो—सौम्य ग्रह आपल्या उच्चावर आणि आपल्या राशीच्या नवांशांत राहाणारे असावेत. वेदपतिही आपल्या उच्चीं व आपल्या राशीच्या नवांशांत रहाणारे असतील आणि केंद्रीं आणि त्रिकोणीं राहाणारे असतील तर तो ब्रह्मचारी वेदार्थ जाणणारा होतो. नुसता वेदार्थ जाणणारा होतो इतकेंच नाहीं तर तो पशु, धन, धान्य ह्यांनीं समृद्ध होतो. आतां जर केंद्रीं आणि त्रिकोणीं शनि असेल तर तो ब्रह्मचारी अंत्यजाची ह्म० नीचाची सेवा करणारा होतो. ह्मणून केंद्रांत शनि नसावा असें लग्न पाहावें. संग्रहांत सांगितलें आहे कीं, केंद्रामध्यें रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि हे ग्रह असतील तर तो ब्रह्मचारी क्रमानें राजसेवक, व्यापारी, सेवा करणारा, वेदाभ्यासी, याज्ञिक कर्म करणारा, यज्ञ कर्ता, हीनाचा सेवक असा होतो ॥ १७ ॥

## उपनयनाला अशुभ ग्रह आणि विद्यारंभ काळ.

चंद्रक्रूरा विलग्ने शशिसिततनुपाः षष्ठगेहे सितोऽत्ये ।
सर्वे रंध्रे बटुघ्नाः क्व च तनुगइनः श्रेष्ठ उच्चेंदुरेके ॥
विद्यां मौंज्युक्तकाले स्थिरचरहरिज्ञत्र्युत्तरब्राह्महीने ।
मौंज्या ऊर्ध्वं गणेशं गिरमपि विधिवत्पूजायित्वाऽऽरभेत ॥ १८ ॥

श्लोकार्थ—ब्रह्मचाऱ्याला घात करणारे इतके आहेत कीं, इष्ट लग्नीं चंद्र आणि पापग्रह षष्ठस्थानीं शुक्र आणि लग्नपति, द्वादशस्थानीं शुक्र व अष्टमस्थानीं सर्वांपैकीं कोणतेही ग्रह असले तर घातक आहेत आतां ह्या

अशा दुष्ट लग्नांवांचून दुसरें लग्न न मिळेल तरी लग्नीं रवि असला तर तो शुभ जाणावा. कित्येकांचे मतानें लग्नीं वृषभींचा ह्म० उच्चींचा चंद्र शुभकारक आहे. उपनयन झाल्यावर विद्यारंभ करावयाचा तो स्थिर लग्नें, चर लग्नें, आणि उत्तराफाल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी ह्यांशिवाय व्रतबंधाच्या नक्षत्र तिथि इत्यादिकांवर गणपति व सरस्वति ह्यांची यथाविधि पूजा करून विद्यारंभ ह्मणजे वेदाचा आरंभ करावा ॥ १८ ॥

अथ लग्नभंगानाह–चंद्र इति । चंद्रक्रूराः क्रूरग्रहाः विलग्ने तनौ शशिसिततनुपाः षष्ठे गेहे शशी चंद्रः सितः शुक्रः तनुपो लग्नपः षष्ठगेहे सितः शुक्रः अंत्ये द्वादशस्थाने शेषं सुगमं सर्वे रंध्रे अष्टमस्थाने एते प्रत्येकं बटुघ्नाः बटुमारका भवंति किंच कचित् अन्यलग्नाभावे तनुगः लग्नगः इनः रविः श्रेष्ठः । उक्तं च मौंजीपटले । शुभदो बलवान् भानुर्लग्नगो दशमस्तथा । सर्वशाखाधिपो यस्मात्सर्वेषां व्रतबंधने ॥ सर्वशाखाधिपो भानुः केचिदूचुर्महर्षयः । तस्माद्दत्यंतराभावे लग्नस्थोर्कः प्रशस्यते ॥ उच्चेंदुरेक इति एके मुनयः उच्चेंदुः उच्चस्थश्चंद्रः तनुगश्च श्रेष्ठ इति वदंति । तद्वाक्यं । चंद्रोदयेऽभिशस्तः स्यात्क्षयरोगी सितेतरे । सितपक्षे भवेद्यज्वा स्वभे तुंगे विशेषतः इति । अस्यार्थः सितेतरे कृष्णपक्षे चंद्रोदये चंद्रयुक्ते लग्ने सति व्रती अभिशस्तः स्यात् क्षयरोगी च स्यात् । अभिशस्तो नाम मिथ्याभिशस्तः मिथ्याभिशंसी अनेनेदं पातकं कृतमिति यं लोका मिथ्या वदंति सोऽभिशस्तः क्षयरोगी स्यादिति कृष्णपक्षे लग्नस्थे चंद्रफलमुक्तं सितपक्षे भवेद्यज्वेति वाक्यं स्पष्टं । अयं श्लोकः पुनःसंस्कारविषय इति भाति यतः कृष्णपक्षे व्रतबंधे चंद्रस्य फलमुक्तं तस्य दिवा असंभवात् पुनःसंस्कारार्हस्य तु कर्मलोपभयात् । रात्रावपि संस्कारो विहितो नान्यस्य प्रथमव्रतबंधस्तु सर्वैर्ग्रंथकारैर्दिवैव पूर्वाह्णे विहितो न रात्रौ अतः कारणादिदं वचनं पुनःसंस्कारविषयं प्रतिभाति पुनःसंस्कारनिमित्तानि रासभारोहणादीनि धर्मशास्त्रप्रसिद्धानि । तादृशं वाक्यं रत्नमालायां । त्रिषट्खगोऽर्कस्त्रिधनास्तकर्मगश्चंद्रस्त्रिषष्ठः शनिराहुभौमाः । सर्वे च लाभे द्वित्रिकोणकेंद्रगाः शुभाशुभाः स्युर्व्रतबंधकाल इति ॥ अत्र तृतीयस्य षष्ठस्य सूर्यस्य रात्रिगते लग्ने संभवः नारदेन तु लग्नस्थचंद्रो निंदित एव तद्वाक्यमेवं । स्वोच्चसंस्थोऽपि शीतांशुर्व्रतिनो यदि लग्नगः । तं करोति शिशुं निःस्वं सततं क्षयरोगिणमिति–अन्यलग्नबलं पूर्ववत् । अथ विद्यारंभं वृत्तार्धेनाऽऽह–विद्यां मौंज्युक्तकाल इति । मौंज्या ऊर्ध्वं मौंज्युक्तकाले विद्यामारभेत मौंज्युक्तः स चासौ कालश्च तस्मिन् विद्यां वेदं आरभेत मौंज्या ऊर्ध्वमित्यनेन मौंज्याः प्रागनधिकारः सूचितः । किं कृत्वा गणेशं गिरमपि सरस्वतीमपि विधिवद्विध्युक्तमार्गेण पूजयित्वा कथंभुते मौंज्युक्तकाले स्थिरचरहरिजध्युत्तरब्राह्महीने स्थिरचरहरिजं स्थिरलग्नं चरलग्नं तिसृणामुत्तराणां समाहारस्त्र्युत्तरं ब्राह्मं रोहिणी एभिर्हीने रहिते मौंज्यर्थमेतानि गृहीतानि विद्यारंभेऽग्राह्याणीत्यर्थः । जाड्यं स्थिरे द्वयं लग्ने सुविद्यास्थिरे भ्रम इति श्रवणात् ॥ १८ ॥

**टीकार्थ**–आतां लग्नाचे घातक कोण आहेत तें सांगतो–लग्नस्थानीं चंद्र आणि पापग्रह, षष्ठस्थानीं चंद्र, शुक्र, लग्नपति, बारावे स्थानीं शुक्र, हे घात करणारे आहेत आणि अष्टमस्थानीं हे प्रत्येक ग्रह बटूला मारक आहेत. कदाचित् ह्या शिवाय दुसरें नाहींच मिळालें तर ज्या लग्नीं रवि असेल तें लग्न घ्यावें. हें श्रेष्ठ आहे. मौंजीपटलांत सांगितलें आहे कीं, लग्नीं असलेला भानु हा बलवान् असून शुभ देणारा आहे.तसाच दशमस्थानाचाही आहे. कारण तो रवि सर्व शाखांचा अधिपति आहे ह्मणून सर्वांना व्रतबंधनाविषयीं श्रेष्ठ आहे. कित्येक महर्षींचें असें मत आहे कीं, रवि हा सर्व शाखांचा अधिपति आहे ह्मणून दुसरा कांहीं उपाय नसेल तर लग्नीं रवि असेल तर तो प्रशस्त आहे.कांहीं मुनींचें मत आहे कीं, उच्चींचा चंद्र ह्मणजे वृषभेचा आणि लग्नीं चंद्र प्रशस्त आहे. तें वाक्य असें कीं, कृष्णपक्षांतील चंद्रमाच्या उदयीं चंद्र युक्त लग्न असेल तर तो ब्रह्मचारी मिथ्याभिशंसी ह्मणजे ह्यानें हें पाप केलें अशा रीतीनें ज्याला लोक ह्मणतात तसा होईल. आणि क्षयरोगी होईल. शुक्लपक्षीं चंद्र लग्नीं असला तर बटु यज्ञ करणारा होईल. तो चंद्र आपल्या राशीवर व उच्चीं असेल तर विशेषें करून फारच श्रेष्ठ गुणवान् तो बटु होईल. हा श्लोक पुनःसंस्कार विषयक आहे असें वाटतें, कारण कृष्णपक्षीं व्रतबंधाबद्दल चंद्राचें फल सांगितलें तसा चंद्र दिवसास तर मिळणार नाहीं. पुनःसंस्कारास जो योग्य असतो त्याचा संस्कार रात्रींही होतो. कारण त्याचे कर्मांचा लोप असतो ह्यास्तव त्याला रात्रींही संस्कार करण्यास सांगितलें आहे. दुसऱ्या कोणाचा संस्कार रात्रीस होत नाहीं. प्रथम व्रतबंध संस्कार तर सर्व ग्रंथकारांनीं दिवसास पूर्वाह्ण कालीं सांगितला आहे. रात्रीस सांगितला नाहीं ह्या कारणास्तव हें वचन पुनःसंस्कार विषयक आहे असें मला वाटतें. पुनः संस्कार करण्याचीं कारणें गाढवावर बसणें इत्यादिक धर्म शास्त्रांत प्रसिद्ध आहेत, तसेंच वाक्य रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे

कीं, ३-६-१० ह्या स्थानचा रवि ३-२-१०-९ ह्या स्थानचा चंद्र ३-६ ह्या स्थानचे शनि, राहु आणि मंगळ आणि ११-२-५-९-१-४-७-१० ह्या स्थानीं असलेले सर्वच ग्रह व्रतबंध करणाऱ्याकरितां शुभ व अशुभ आहेत असें समजावें. ह्यांत तिसरा आणि सहावा रवि हा रात्रीस असलेल्या लग्नालाच संभवतो. नारदानें सांगितलें आहे कीं, लग्नाचा चंद्र निंदितच आहे. त्याचें वाक्य असें आहे कीं, चंद्रमा आपल्या उच्चस्थानीं जरी आहे तरी तो जर लग्नीं असेल तर त्या शिशूला दरिद्री, आणि नेहेमी रोगी असा करतो. बाकीच्या लग्नाचें बल पूर्वींप्रमाणें जाणावें. आतां विद्यारंभ ह्मणजे वेदविद्येचा आरंभ अर्ध्या वृत्तानें सांगतो-मौंजी बंधनाचा जो काळ ह्मणजे तिथ्यादि त्याच काळावर विद्येचा आरंभ करावा. मौंजीबंधन झाल्यावर विद्यारंभ असें ह्मटल्यामुळें मौंजी बंधनाचे पूर्वी विद्यारंभास अधिकार नाहीं असें सुचविलें जातें. विद्यारंभाचे पूर्वी श्रीगणपतीचें, सरस्वतीचें यथाविधीनें पूजन करावें. तो विद्यारंभाचा काळ घेतानां त्यावेळीं स्थिर लग्नें, चर लग्नें, उत्तरात्रय ह्म० उत्तराफल्गुनी उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी इतकीं नक्षत्रें वर्ज्य करावींत. ह्या शिवाय बाकीचीं व्रतबंधाचीं सर्व नक्षत्रें तिथि इत्यादिक जें सर्व कांहीं सांगितलें आहे तें विद्यारंभाकरितां घ्यावें. स्थिर लग्न असेल तर विद्या शिकतानां जडत्व येतें. द्व्य असेल तर उत्तम विद्या प्राप्ति होते. जर चर लग्न असेल तर श्रम होतो. असें वचनावरून ऐकण्यांत येत आहे ॥ १८ ॥

### केशांत, समावर्तन व छूरिकाबंध.

**केशांतं चौलवत्स्यान्नृपमितशरदीत्याहुरार्या व्रतोक्ते ।**
**काले मौंजीविमोक्षं गुरुबलमनयोर्नावलोक्यं सुधीभिः ॥**
**शूद्राणां मौंज्यभावात्तदुदिततिथिभेऽनस्तभौमेज्यशुक्रैः ।**
**व्यारे वारे लवे मास्युपयमविहिते छूरिकाबंधमाहुः ॥ १९ ॥**
**॥ इति मुहूर्तमार्तंडे गर्भाधानादिसंस्कारप्रकरणम् ॥ ३ ॥**

श्लोकार्थ—जन्मापासून सोळाव्या वर्षीं जो चौलास मुहूर्त सांगितला आहे त्याच मुहूर्तावर केशांत नांवाचा संस्कार करावा आणि त्यानंतर उपनयनाच्या मुहूर्तावर समावर्तन (सोडमुंज) हा संस्कार करावा असें श्रेष्ठ लोक ह्मणतात. ह्या दोहोंला गुरुबल नको शूद्राला मौंजीबंधन नाहीं ह्मणून उपनयनाच्या तिथि, नक्षत्रादिकांवर मंगळ, गुरु, शुक्र, ह्यांचें अस्त असतां, मंगळवाराशिवाय दुसऱ्या वारीं आणि नवांशावर विवाहाच्या मासांत शूद्राच्या कंबरेस छूरिकाबंध सांगितला आहे ॥ १९ ॥ इति संस्कारप्रकरणम् ॥ ३ ॥

अथ केशांतमौंजीविमोक्षं च वत्तार्धेनाऽऽह- केशांतमिति । तदुक्तं मनुना । केशांतः षोडशे वर्षे ब्राह्मणस्य विधीयते । राजन्यबंधोर्द्वाविंशे वैश्यस्य ह्यधिके तत इति ॥ केशांतं कर्म नृपमितशरदि षोडशे वर्षे चौलवत्स्यादित्यार्या आहुः सर्वं चौलोक्तमत्र ग्राह्यमित्यर्थः । व्रतोक्ते काले मौंजीविमोक्षमाहुः । स्पष्टं । अनयोः केशांतमौंजीविमोक्षयोः गुरुबलं सुधीभिर्नावलोक्यं । अथ शूद्राणां मौंज्यभावाच्छूरिकाबंधं वृत्तार्धेनाऽऽह-शूद्राणां मौंज्यभावात्तदुदिततिथिभे मौंज्युक्ततिथिनक्षत्रे अनस्तभौमेज्यशुक्रैः उदितैः भौमगुरुशुक्रैः व्यारे वारे आरो भौमः तद्रहितवारे लवे नवांशे यत्र कुत्रापि लग्ने भौमनवांशवर्जित इत्यर्थः । उपयमविहिते मासि विवाहोक्तमासे विवाहोपयमौ समावित्यमरः । छूरिकाबंधं कटिप्रदेशे छूरिकाबंधनमाहुः । तथाच संग्रहे । शूद्राणां राजपुत्राणां मौंज्यभावेऽस्त्रबंधनं । मौंजीबंधोक्ततिथ्यादौ कार्यं भौमदिनं विना । नारदः । छूरिकाबंधनं वक्ष्ये नृपाणां प्राक्करग्रहात् । विवाहोक्तेषु मासेषु शुक्लपक्षेऽप्यनस्तगे ॥ जीवे शुक्रे च भूपुत्रे चंद्रताराबलान्विते । मौंजीबंधर्क्षतिथिषु कुजवर्जितवासरे ॥ तेषां नवांशके कर्तुरष्टमोदयवर्जिते शुद्धेऽष्टमे विधौ लग्नषडष्टांत्यविवर्जिते ॥ धनत्रिकोणकेंद्रस्थैः शुभैस्त्र्यायारिगैः परैः । छूरिकाबंधनं कार्यमर्चयित्वा सुरान्पितॄन् ॥ अर्चयेच्छूरिकां सम्यग् देवतानां च सन्निधौ । ततः सुलग्ने बध्नीयात्कट्यां लक्षणसंयुतां ॥ तस्यास्तु लक्षणं वक्ष्ये यदुक्तं ब्रह्मणा पुरा । संमितं छूरिकायामं विस्तारेणैव ताडयेत् ॥ भाजितं गजसंख्यैश्च अंगुलान्परिकल्पयेत् । शेषं चैव फलं वक्ष्ये ध्वजाये धनवान् भवेत् ॥ धूमाये मरणं सिंहे जयः श्वायेऽतिरोगिता ॥ धनलाभो वृषेऽत्यंतं दुःखी भवति गर्दभे । गजायेऽत्यंतं संप्रीतिर्ध्वांक्षे वित्तविनाशनमिति ॥ सर्वत्र त्याज्यप्रकर-

णोक्तं विलोक्यं । अस्मिन्प्रकरणे कर्णवेधवृत्तं विना सर्वाणि स्रग्धरावृत्तानि ॥ १९ ॥ ॥ इति स्वोक्तमुहूर्तमार्तंडटीकायां मार्तंडवल्लभायां गर्भादानादिसंस्कारप्रकरणम् ॥ ३ ॥

**टीकार्थ**—केशांत संस्कार आणि मौंजी मोक्ष ( सोडमुंज ) हे संस्कार अर्ध्या वृत्तानें सांगतो– तोच अर्थ मनूनें सांगितला आहे कीं, सोळावे वर्षी केशांत संस्कार ब्राह्मणाला सांगितला. क्षत्रियांना बाविसावे वर्षी आणि वैश्यांना त्याहून दोन अधिक ह्मणजे चोवीसावे वर्षी सांगितला आहे. जसें चौल कर्म असतें तसेंच एक कर्म सोळावे वर्षी करावें असें विद्वान् लोक सांगतात. चौलास जें जें सांगितलें आहे. तें सर्व ह्या केशांताविषयीं समजावें. मौंजी व्रताला जें सांगितलें आहे तें सर्व मौंजी मोक्ष ह्मणजे सोडमुंजीलाही समजावें. केशांत आणि मौंजी मोक्ष ह्याबद्दल गुरुबल पाहूं नये असें विद्वानांचें मत आहे. आतां शूद्रांनां मौंजी नाहीं ह्मणून छूरका बांधावी हें अर्ध्या वृत्तानें सांगतो–शूद्रांनां मौंजी नसल्याकारणानें मौंजीला सांगितलेल्या लग्नावर, तिथीवर, मंगळ, शुक्र आणि गुरु ह्यांचा अस्त नसेल अशा वेळीं मंगळवार नसतांना नवांशावर कोणत्या तरी लग्नावर मात्र मंगळाचा नवांश नसावा अशा वेळीं विवाहास सांगितलेल्या महिन्यामध्यें छूरिका कंबरेस बांधावी असें सांगितलें आहे. तेंच सार संग्रहांत सांगितलें आहे कीं, राजाचे पुत्र असून शूद्र असतील तर त्यांनां मौंजीबंधन नसल्याकारणानें अस्त्र ह्मणजे छुरिका बांधावी. तो बांधण्याचा काळ ह्मणजे मौंजी बंधनाचा जो काळ तोच-काळ समजावा. नारद असें सांगतात कीं, राजानां विवाह होण्याच्या पूर्वी कंबरेस छूरिका ह्मणजे लहान तरवार बांधावी असें मी सांगेन तें बंधन विवाहास सांगितलेल्या महिन्यांतच आहे शुक्लपक्षीं, शुक्र, गुरु आणि मंगळ ह्यांचा अस्त नसावा. चंद्राचें व ग्रहांचें बल असावें, मौंजी बंधनाच्या तिथि, नक्षत्रें वगैरे असावींत. मंगळवार मात्र वर्ज्य करावा. त्यांचा शुक्र व गुरु आणि मंगळाचा नवांश असावा. अष्टमस्थानीं मंगळादिकांचा उदय नसावा. शुद्ध अष्टमाच्या विधीवर लग्नीं, षष्ठस्थानीं, अष्टमस्थानीं, द्वादशस्थानीं ते पूर्वीचे तीन ग्रह नसावेत. २–५–९–१–४–७–१० इतक्या स्थानीं शुभ ग्रह असावेत आणि ३–६–११ ह्या स्थानीं पापग्रह असावेत. अशा वेळीं देव आणि पितर ह्यांची पूजा करून मग छूरिका बंधन करावें. त्या वेळीं छूरिकेचें उत्तम रीतीनें दुसऱ्या देवतांच्या जवळ पूजन करावें. नंतर उत्तम लग्नावर सुलक्षण युक्त अशी ती लहानशी तरवार कंबरेस बांधावी. त्या तरवारीचें लक्षण जें पूर्वी ब्रह्मदेवानें सांगितलें आहे तें सांगेन. छूरिकेची जेवढीं अंगुळें लांबी असेल आणि जेवढीं अंगुळें रुंदी असेल त्या लांबी रुंदीचा गुणाकार करावा आणि त्याला आठानीं भागावें. आतां आठांनीं भागावयाचें कारण कीं एकंदर आठ आय आहेत ते असे कीं, १ ध्वजाय २ धूमाय ३ सिंहाय ४ श्वाय ५ वृषाय ६ गर्दभाय ७ गजाय ८ ध्वांक्षाय असे आठ आय आहेत. जर गुणाकाराला ८ नीं भागून बाकी १ राहिला तर ध्वजाय समजून त्याचें फळ धनवान् होईल. २ राहिले तर धूमाय समजून त्याचें फळ मरण होईल. ३ राहिले तर सिंहाय समजून त्याचें फळ जय होईल. ४ राहिले तर श्वाय समजून त्याचें फळ अतिरोग होईल. ५ राहिले तर वृषाय समजून त्याचें फळ श्रम लाभ होईल. ६ राहिले तर गर्दभाय समजून त्याचें फळ दुःखी होईल. ७ राहिले तर गजाय समजून त्याचें फळ उत्तम प्रीति होईल. ८ राहिले तर ध्वांक्षाय समजून त्याचें फळ वित्ताचा नाश होईल ॥ १९ ॥

॥ इति संस्कार प्रकरण ॥

---

# ॥ अथ विवाहप्रकरणम् ॥ ४ ॥

### घटित वर्णविचार.

शुद्धां गोत्रकुलादिभिर्गुणयुतां कांतां वरश्चोद्वहेत् ।
वर्णो वश्यभयोनिखेचरगणाः कूटं च नाडी क्रमात् ॥
वर्णाद्या बलिनो यथोत्तरमहींदूर्ध्वं गुणैक्यं शुभम् ।
वर्णा विप्रमुखा झषादिह वरो वर्णोत्तमः स्याच्छुभः ॥ १ ॥

श्लोकार्थ—गोत्र, कुल, शील इत्यादिकांनीं उत्तम गुणवती व रूपानें सुंदर असलेल्या अशा कन्येबरोबर वरानें विवाह करावा. व वरही गोत्रादिक उत्तम गुणवान् असून सुंदर असावा. वर्ण, वश्य, नक्षत्र, योनि, ग्रह, गण, कूट, नाडी असे हे आठ घटित होण्याचे प्रकार आहेत. त्यांचे वर्णापासून तों नाडीपर्यंत एक दोन तीन

वगैरे वाढते गुण असतात. सर्व मिळून गुण ३६ छत्तीस आहेत त्यांचे अर्धे ह्म० १८ अठरा गुण आहेत. त्यापेक्षां अधिक गुण असले ह्मणजे तें घटित शुभ जाणावें. पूर्ण ३६ येतील तर फारच उत्तम. मीनापासून तों मिथुनपर्यंतच्या चार राशि ह्म० मीन, मेष, वृषभ, मिथुन, हे चार क्रमानें मीन ह्मणचे ब्राह्मण, मेष–क्षत्रिय, वृषभ–वैश्य, मिथुन–शूद्र, असे आहेत. असाच क्रम पुढच्या आठ राशिंबद्दल जाणावा. वधूपेक्षां वराचा वर्ण श्रेष्ठ असावा हें शुभ आहे ॥ १ ॥

**अथ विवाहप्रकरणं विवक्षुस्तावत् घटितगुणविचारं द्वादशभिर्वृत्तैराऽऽह। अतः परमत्र ग्रंथे सर्वाणि शार्दूलविक्रीडितानि। वरः गोत्रकुलादिभिः शुद्धां कांतां कमनीयां कन्यां उद्वहेत् चकाराद्वरोऽपि एवंविधो भाव्यः । गोत्रशुद्धिर्ग्रंथांतराज्ज्ञातव्या कुलमपि पंचसप्तनिर्णयमपि एतद्द्वयं ग्रंथांतरात् ज्ञात्वा अन्यदत्रावलोकयेत्। अथ यथोत्तरं बलिष्ठं घटितक्रममाह–वर्ण इति। वर्णः १ वश्यं २ भं ३ योनिः ४ खेचरः ५ गणः ६ कूटं ७ नाडी ८ क्रमाद्यथोत्तरं बलिनः स्युः । अहींदूर्ध्वं अष्टादशाधिकं गुणैक्यं यथोत्तरं शुभं स्यात्। तत्राऽऽदौ वर्णलक्षणमाह। झषात् मीनात्सकाशात् विप्रमुखाः ब्राह्मणादयो वर्णाः पुनर्गणनया ज्ञेयाः तद्यथा। मीनो ब्राह्मणः मेषः क्षत्रियः वृषो वैश्यः मिथुनः शूद्रः पुनः कर्को ब्राह्मणः सिंहः क्षत्रिय इत्यादि । इहास्मिन् राशिमेलने वर्णोत्तमो वरः शुभः स्यात् नान्यथेत्यर्थात्सिद्धम् ॥ १ ॥**

**टीकार्थ**—विवाहप्रकरण सांगण्याच्या इच्छेनें अगोदर घटिताचे गुणांचा विचार बारा वृत्तांनीं सांगतो–ह्यापुढें ह्या ग्रंथांत सर्वच शार्दूलविक्रीडितवृत्तें आहेत. वरानें गोत्र, कुल इत्यादिकांनीं शुद्ध अशी रमणीय सुंदर स्त्रीबरोबर विवाह करावा. श्लोकांतच असें अव्यय आहे ह्मणून वरही गोत्रादिकांनीं शुद्ध असून सुंदर असावी. गोत्र शुद्ध आहे किंवा कसें हें दुसऱ्या ग्रंथापासून जाणून घ्यावें आणि कुलही, ही पांचवी आहे किंवा सातवी आहे वगैरे विचार दुसऱ्या धर्मशास्त्राच्या ग्रंथापासून जाणावा. आतां एकापेक्षां एक अधिक आहे असा घटिताचा क्रम सांगतो–वर्ण १ वश्य २ भं ३ योनि ४ खेचर ५ गण ६ कूट ७ नाडी ८ अशा क्रमानें एकापेक्षां एकानें अधिक असे गुण आहेत. ह्मणजे वर्णाचा १ गुण, वश्याचे २ गुण, भाचे ह्म० नक्षत्राचे ३ गुण असा क्रम जाणावा. अहि ह्म० ८ आणि इंदु ह्म० १ मिळून अंकाची गति उलटी असते ह्या रीतीनें १८ गुणांपेक्षां अधिक गुण आले तर शुभ आहे, त्यापेक्षां अधिक गुण असले तर जसे जसे अधिक गुण असतील तसतसें अधिक शुभ जाणावें. अगोदर वर्णाचें लक्षण सांगतो–तें असें कीं, मीनापासून ब्राह्मणाचा क्रम समजावा. जसें मीन–ब्राह्मण, मेष–क्षत्रिय, वृषभ–वैश्य, मिथुन–शूद्र, पुनः कर्क–ब्राह्मण, सिंह–क्षत्रिय, कन्या–वैश्य, तूळ–शूद्र, वृश्चिक–ब्राह्मण, धन–क्षत्रिय, मकर–वैश्य, कुंभ–शूद्र अशा रीतीनें गणना करतांनां जो उत्तम वर्णाचा वर असतो तो शुभ समजावा. तसें नसेल तर शुभ समजूं नये ॥ १ ॥

### वश्य, नक्षत्र, योनि.

नुर्भक्ष्या जलजा वशा विहरयो वश्या विकौर्प्या हरेः ।
अस्यालिर्न शुभो नुरब्जहरयो नेष्टाः स्युरन्यज्जनात् ॥
भे गण्येऽकहते मिथक्ष्यगशराः शेषं न सच्चाश्विभात् ।
अश्वेभाव्यहिभोगिनः श्ववृकभुङ्मेषाखुभुग्द्व्युंदुराः ॥ २ ॥

श्लोकार्थ—जलचर राशीही सर्व मनुष्यांना भक्ष्य आहे आणि सिंहाशिवाय बाकीचे सर्व वश्य ह्मणजे स्वाधीन आहेत. सिंह राशीला वृश्चिकाशिवाय सर्व राशी वश्य आहेत, एक वृश्चिक राशी मात्र शुभ नाहीं. मनुष्यराशीला जलचरराशि आणि सिंह हे अनिष्ट आहेत. ह्याशिंवाय आणखी वश्याचा विचार लोकव्यवहारानें करावा. तो असा कीं, मनुष्यराशीला चतुष्पदराशि वश्य आहेत. परंतु यवनादिकांला भक्ष्य आहेत. वराचे नक्षत्रापासून वधूचें नक्षत्र आणि वधूच्या नक्षत्रापासून वराचें नक्षत्र मोजावें नंतर त्या आलेल्या दोन संख्येला ९ नीं भागून ३–७–५ बाकी रहातील तर तें नक्षत्र अशुभ जाणावें. पुढें लिहिलेल्या. अश्विन्यादि नक्षत्राच्या योनि जाणाव्या ॥ २ ॥

अथ वृत्तार्धेन वश्यमाह–नुर्भक्ष्या इति। नुः नृराशेः मनुष्यराशेः जलजा जलचरा भक्ष्याः तस्यैव विहरयाः सर्वे वश्याः विगतः हरिः सिंहो येभ्यस्ते विहरयः सिंहरहिताः सर्वे वश्या इत्यर्थः। हरेः सिंहस्य विकौर्प्याः वश्याः कौर्प्यो वृश्चिकः विगतः येभ्यस्ते विकौर्प्याः सिंहस्य वृश्चिकरहिताः सर्वे राशयो वश्याः अथानंतरोक्तस्य हरेः अलिर्वृश्चिको न शुभः वैरीत्यर्थः। नुः मनुष्यराशेः अब्जहरयः नेष्टाः स्युः अब्जा जलजा हरिः सिंह एते नेष्टा मेलनं न कर्तव्यमित्यर्थः।अन्यज्ञनात् अन्यत् वश्यभक्ष्यादिकं जनाज्ज्ञेयं तद्यथा नुः पुरुषस्य गौर्वश्या भवति अत्र परस्परं मित्रत्वं दृश्यते तस्माद्वयोर्मेलनं शुभं स्यात्। इदमेव म्लेच्छजातीयवधूवरयोर्न शुभं म्लेच्छानां गौर्भक्ष्यं इत्येवं लोकप्रचारतो विचारणीयमित्यर्थः। राशिस्वरूपं बृहज्जातकवशादवगंतव्यं। बृहज्जातके। मत्स्यौ घटी नृमिथुनं सगदं सवीणं चापी नरो श्वजघनो मकरो मृगास्यः। तौलीससस्यदहना प्लवगा च कन्या शेषाः स्वनामसदृशाः खचराश्च सर्वे॥अथ भयोनी द्वावपि वृत्तेनैकेनाऽऽह–भे गण्य इति। मिथः परस्परं वधूवरयोर्भे नक्षत्रे वधूनक्षत्राद्वरनक्षत्रं गण्यं वरनक्षत्रात्कन्यानक्षत्रं गण्यं उभे अपि नवभिर्भाजिते कार्ये शेषं त्र्यगशराः त्रिसप्तपंच भवंति तदा न सत्स्यात्। अथ योनिमाह–अश्विभादिति। अश्विभात्सकाशात् भानां नक्षत्राणां अश्वादयो योनयो भवंति। अश्वाऽश्विन्याः। इभो भरण्याः। अविर्मेषः कृत्तिकायाः। अहिः सर्पो रोहिण्याः। भोगी सर्पो मृगस्य। श्वा श्वान आर्द्रायाः। वृकं उंदुरं भुनक्तीति वृकभुक् मार्जारः पुनर्वसोः। मेषःप्रसिद्धः पुष्यस्य। आखुभुक् मार्जार आश्लेषायाः। द्व्युंदुरौ द्वौ उंदुरौ मघापूर्वाफाल्गुन्योः॥ २॥

टीकार्थ–आतां अर्ध्या वृत्तानें वश्य सांगतो–मनुष्यराशीला जलचर राशि भक्ष्य असून वश्यही आहेत. मात्र सिंह हा वश्य नाहीं. सिंहराशीला वृश्चिकाशिवाय सर्व राशि वश्य आहेत. आतांच जवळ सांगितलेल्या सिंह राशीला वृश्चिक राशी शुभ नाहीं अर्थात् वैरी आहे. मनुष्यराशीला अब्जा ह्म० जलचर आणि सिंह हे शुभ नाहींत. अर्थात् त्यावरोबर मेलन करूं नये. ह्याशिवाय भक्ष्य, वश्य ह्यांचा विचार लोकव्यवहारानें करावा. तो असा–मनुष्याला वृषभ वश्य आहे ह्याविषयीं परसर मित्रत्व आहे. ह्मणून दोघांचें मेलन करणें शुभ आहे. हेंच मेलन म्लेच्छ ह्मणजे यवनजातीयांचें शुभ नाहीं. कारण म्लेच्छाची गाय हें भक्ष्य आहे. असा प्रकार पाहून भक्ष्य वश्याचा विचार लोकावरून जाणावा. राशीचें स्वरूप बृहज्जातक ग्रंथावरून जाणावें तें असें कीं, मीन राशि ही दोन माशाचें युग्म आहे, कुंभ राशि ही मस्तकावर घडा घेतलेला आहे, मिथुन ह्म० स्त्रीपुरुषाचें जोडवें आहे, त्याच्या हातांत रोग आणि वीणा आहे, धनुराशि हा धनु धारण केलेला आहे, मकर राशी हा मृगासारख्या तोंडाचा आहे, तूळ राशि तागडी घेतलेला आहे, कन्या राशी ही एक स्त्री होडींत बसलेली आणि धान्य अग्नींत शेकणारी आहे, बाकीच्या राशी आपापल्या नांवाप्रमाणें जाणाव्या. आतां नक्षत्रें आणि योनी ह्या एका वृत्तानें सांगतो–वधू आणि वर ह्म० दोघांचीं नक्षत्रें गणावयाचीं तीं अशीं कीं, वधूचे नक्षत्रापासून वराचें नक्षत्र कितवें आहे तें गणावें. ती एकसंख्या, आणि वराचे नक्षत्रापासून वधूचें नक्षत्र कितवें आहे तें गणावें ती एकसंख्या मिळून ज्या दोन संख्या आल्या असतील त्याला नऊनें भागावें बाकी शेष ३–७–५ हे उरले तर तें शुभ नाहीं असें समजावें. आतां योनि सांगतो–अश्विनी नक्षत्रापासून रेवती नक्षत्रापर्यंत जीं सर्व नक्षत्रें आहेत त्यांच्या अशा योनि आहेत कीं, १ अश्विनीचा–अश्व, २ भरणीचा हत्ती, ३ कृत्तिकेचा मेष, ४ रोहिणीचा सर्प, ५ मृगाचा सर्प, ६ आर्द्राचा श्वान, ७ पुनर्वसूचा मांजर, ८ पुष्याचा मेष, ९ आश्लेषेचा मांजर, १० मघेचा उंदीर, ११ पूर्वाचा उंदीर, बाकीच्या नक्षत्रांच्या योनी पुढल्या श्लोकाच्या टीकेंत सांगावयाच्या आहेत ॥ २॥

गौः काली पशुभुङ्महिष्यथ पशुद्विट् द्वौ मृगौ श्वा कपिः।
द्वौ बभ्रू कपिसिंहवाजिहरिगोनागाः क्रमाद्योनयः॥
सिंहेभं महिषाश्वमोतुखनकं श्वैणं च कीशाविगो।
व्याघ्रं बभ्रुफणीति भीरुवरयोः प्रेष्येशयोश्च त्यजेत्॥ ३॥

श्लोकार्थ—सिंह हत्ती; महिषी अश्व; मांजर उंदीर; श्वान हरिण; वानर मेष; गो व्याघ्र; मुंगुस सर्प; ह्या जोडप्या जोडप्याचें वैर आहे; ह्यावरून वधूवराच्या व स्वामीसेवकांच्या योनीचें वैर असतां तें वर्ज्य करावें॥ ३॥

गौरुत्तराफाल्गुन्याः काली महिषी हस्तस्य । पशुभुक् व्याघ्रश्चित्रायाः । महिषी स्वात्याः । पशुछिद् व्याघ्रः विशाखायाः द्वौ मृगौ अनुराधाज्येष्ठयोः । श्वा मूलस्य । कपिर्वानरः पूर्वाषाढायाः । द्वौ बभ्रू उत्तराषाढाऽभिजितोः बभ्रू नकुलौ । कपिर्वानरः श्रवणस्य । सिंहो धनिष्ठायाः । वाजी अश्वः शततारकायाः । हरिः सिंहः पूर्वाभाद्रपदायाः । गौः उत्तराभाद्रपदायाः नागो हस्ती रेवत्याः । इति योनिमभिधाय योनिवैरमाह-सिंहेभमिति । सिंहश्च इभश्च सिंहेभं सिंहगजं । महिषाश्वं । ओतुखनकं मार्जारोंदुरं । श्वैणं श्वानमृगं । कीशावि वानरमेषं । गोव्याघ्रौ ब भ्रूफणी नकुलसर्पं । इति वैरं भीरुवरयोः वधूवरयोः प्रेष्येशयोः प्रेष्यः सेवकः ईशः स्वामी एतयोश्च त्यजेत् वर्जयेत् ॥ ३ ॥

टीकार्थ—१२ उत्तराफाल्गुनीची गो, १३ हस्ताची महिषी, १४ चित्रेचा व्याघ्र, १५ स्वातीची महिषी, १६ विशाखेचा व्याघ्र, १७ अनुराधेचा मृग, १८ ज्येष्ठाचा मृग, १९ मूळाचा श्वान, २० पूर्वाषाढेचा वानर, २१ उत्तराषाढेचा मुंगुस, २२ अभिजिताचा मुंगुस, २३ श्रवणाचा वानर, २४ धनिष्ठेचा सिंह, २५ शततारकेचा घोडा, २६ पूर्वाभाद्रपदेचा सिंह, २७ उत्तराभाद्रपदेचा सिंह, २८ रेवतीचा हत्ती. अशा अठ्ठावीस नक्षत्रांच्या योनी सांगून त्यांचें परस्परांचें वैर सांगतो— सिंह आणि हत्ती ह्यांचें वैर, रेडा आणि घोडा ह्यांचें वैर, मांजर आणि उंदीर ह्यांचें वैर, कुत्रा आणि हरिण ह्यांचें वैर, वानर आणि मेष ह्यांचें वैर, गाय आणि वाघ ह्यांचें वैर, मुंगुस आणि साप ह्यांचे वैर, अशा रीतीनें वधू आणि वर ह्यांचें, मालक आणि चाकर ह्यांचें परस्पर वैर असेल तर तें सोडून द्यावें ॥ ३

| | | | |
|---|---|---|---|
| अश्विनी—अश्व. | पुष्य—मेष. | स्वाती—महिषी. | अभिजित्—मुंगुस. |
| भरणी—हस्ती. | आश्लेषा—मार्जार. | विशाखा—व्याघ्र. | श्रवण—वानर. |
| कृत्तिका—मेष. | मघा—उंदीर. | अनुराधा—मृग. | धनिष्ठा—सिंह. |
| रोहिणी—सर्प. | पूर्वा—उंदीर. | ज्येष्ठा—मृग. | शततारका—अश्व. |
| मृग—सर्प. | उत्तरा—गो. | मूळ—श्वान. | पूर्वाभाद्रपदा—सिंह. |
| आर्द्रा—श्वान. | हस्त—महिषी. | पूर्वाषाढा—वानर. | उत्तराभाद्रपदा—गो. |
| पुनर्वसु—मार्जार. | चित्रा—व्याघ्र. | उत्तराषाढा—मुंगुस. | रेवती—हस्ती. |

### राशी स्वामी आणि मित्र, शत्रु ग्रह.

मेशा मंशुबुचंरबूशुमगुशाः शोगुः क्रियात्स्यू रवे- ।
र्मित्राणीज्य कुजेंदवः शनिसितौ शत्रू विधोर्नो रिपुः ॥
मित्रे सूर्यबुधौ कुजस्य विदरिः सूर्येंदुजीवा हिता ।
ज्ञस्यार्कास्फुजितौ हितौ विधुररिः सूरेः सितज्ञावरी ॥ ४ ॥
मित्राण्यर्ककुजेंदवोऽथ भृगुजस्यारी रवींदू हितौ ।
मंदज्ञौ च शनेः कुजेंदुरवयो नेष्टाः सितज्ञौ हितौ ॥

श्लोकार्थ—पुढल्या कोष्टकांतील मेषापासून तों मीनपर्यंतच्या बारा राशींचे स्वामी समजावेत जसें मेषाचा मं म्ह० मंगळ, वृषभाचा शु म्ह० शुक्र असें समजावें—

| राशि. | मे० | वृ० | मि० | क० | सिं० | क० | तु० | वृ० | ध० | म० | कुं० | मी० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ग्रह. | मं० | शु० | बु० | चं० | र० | बु० | शु० | मं० | गु० | श० | श० | गु० |

पुढील कोष्टकावरून रवि, चंद्र इत्यादि ग्रहांचे मित्र कोण, सम कोण, शत्रु कोण ते जाणावेत, रविचे गुरु, मंगळ, चंद्र हे मित्र. शनि, शुक्र हे शत्रु आणि बुध हा सम आहे इत्यादि समजावें ॥ ४ ॥

| ग्रह. | रवि. | चंद्र. | मंगळ. | बुध. | गुरु. | शुक्र. | शनि. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मित्र. | गु. मं. चं. | र. बु. | र. चं. गु. | र. शु. | र. मं. चं. | श. बु. | शु. बु. |
| सम. | बु. | मं. श. गु. शु. | शु. श. | मं. गु. श. | श. | मं. गु. | गु. |
| शत्रु. | श. शु. | ० | बु. | चं. | शु. बु. | र. चं. | मं. चं. र. |

अथ ग्रहाणां वैरावैरं विवक्षुस्तावद्राशिनाथानाह—भेशा इति । क्रियान्मेषात्सकाशात् भानां राशीनामीशा भेशा एते क्रमेण स्युः मं मंगलो मेषस्य शु शुक्रो वृषभस्येत्यादिस्पष्टं । रवेः ईज्यकुजेंदवो मित्राणि ईज्यो गुरुः कुजो भौमः इंदुश्चंद्र एते मित्राणि सुहृदः स्युः । शनिसितौ शत्रू शनिः प्रसिद्धः सितः शुक्रः एतौ शत्रुवैरिणौ अर्थादन्ये उदासीनाः। विधोर्नो रिपुः विधोश्चंद्रस्य रिपुर्नास्ति । सूर्यबुधौ मित्रे अन्ये सर्वे उदासीनाः कुजस्य भौमस्य वित् बुधः अरिः सूर्येंदुजीवाः हिताः मित्राणि अन्यौ समौ । ज्ञस्य बुधस्य अर्कास्फुजितौ रविशुक्रौ हितौ मित्रे विधुश्चंद्रः अरिः वैरी अन्ये समाः । सूरेः गुरोः सितज्ञौ शुक्रबुधौ अरी वैरिणौ ॥ ४ ॥ अर्ककुजेंदवः रविभौमचंद्रा मित्राणि अन्ये समाः । भृगोः जातः भृगुजः तस्य भृगुजस्य शुक्रस्य रविंदू सूर्यचंद्रौ शत्रू मंदज्ञौ शनिबुधौ हितौ मित्रे अन्ये समाः । शनेः कुजेंदुरवयः अरयः सितज्ञौ मित्रे अन्ये समाः ॥

**टीकार्थ**—आतां ग्रहांचें वैर आणि अवैर हें सांगण्याच्या ईच्छेनें अगोदर राशींचे कोण कोण स्वामी आहेत ते सांगतों—मेषापासून तो मीनपर्यंतचे जे बारा राशी आहेत त्यांचे हे स्वामी क्रमानें आहेत ते असे. मं. मंगळ हा मेषाचा, शु. शुक्र हा वृषभेचा, बु. बुध हा मिथुनेचा चं. चंद्रमा हा कर्केचा स्वामी र. रवि सिंहाचा, बु. बुध कन्येचा, शु. शुक्र तूळेचा, मं. मंगळ वृश्चिकेचा. गु. गुरु धनाचा, श. शनि मकरेचा, श. शनि कुंभेचा, गु. गुरु मीनेचा, राशी बारा पैकीं कर्क राशीचा चंद्र आणि सिंहराशीचा रवि असे स्वामी झाल्यावर बाकी उरलेल्या दहा राशींचे मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, असे पांच ग्रह आहेत, ते प्रत्येक ग्रह दोन दोन राशीचे स्वामी आहेत, जसें मेष आणि वृश्चिकाचा मंगळ, कन्या आणि मिथुनेचा बुध, धन आणि मीनाचा गुरु, वृषभ आणि तुलेचा शुक्र, कुंभ आणि मकर ह्यांचा शनि असे स्वामी आहेत. रवीचे मित्र गुरु,मंगळ आणि चंद्र असे तिघे आहेत. शनि आणि शुक्र हे दोघे शत्रू आहेत आणि बुध हा सम आहे. चंद्राचा कोणी शत्रु नाहीं व त्याचे मित्र सूर्य आणि बुध दोघे आहेत. बाकीचे सर्व सम ह्म० उदासीन असे मंगळ, शनि, गुरु, शुक्र हे आहेत मंगळाचा शत्रु बुध हा आहे, त्याचे मित्र रवि, चंद्र आणि गुरु आहेत, बाकीचे सम ह्म० उदासीन आहेत बुधाचे रवि आणि शुक्र हे मित्र आहेत, त्याचा चंद्र हा शत्रु आहे. बाकीचे सर्व ग्रह उदासीन आहेत. गुरुचे शुक्र आणि बुध हे शत्रु आहेत ॥ ४ ॥ रवि, मंगळ आणि चंद्र हे मित्र आहेत. बाकीचे सम ह्म० उदासीन आहेत. शुक्राचे रवि आणि चंद्र शत्रु आहेत त्याचे शनि आणि बुध मित्र आहेत. बाकीचे ग्रह सम ह्म० उदासीन आहेत. शनीचे मंगळ, चंद्र, रवि हे शत्रु आहेत शुक्र आणि बुध हे मित्र आहेत बाकीचे ग्रह सम ह्म० उदासीन आहेत. असें समजावें.

### गण व कूट.

पूर्वार्द्रांतकर्कोत्तरं नरि सुरेऽर्कात्यादितीज्यानिलें- ।
दुश्रुत्यश्विनिमित्रमन्यदसुरे दैत्यैर्नृणां स्यान्मृतिः ॥ ५ ॥
स्याद्देवासुरयोः कलिर्नृसुरयोर्मध्यं स्वयोः सौहृदं ।
नैस्व्यं द्विव्ययके षडष्टसु विपद्वैपुत्र्यमर्थांकके ॥
शेषेऽर्था विविधा विभैकचरणे भिन्नर्क्षराश्यैकके ।
भिन्नांघ्र्येकभमेतयोर्गणखगौ नाडी नृदूरं न [illegible] ॥ ६ ॥

श्लोकार्थ—१ पूर्वाफाल्गुनी, २ पूर्वाषाढा, ३ पूर्वाभाद्रपदा, ४ आर्द्रा, ५ भरणी, ६ रोहिणी, ७ उत्तराफाल्गुनी, ८ उत्तराषाढा, ९ उत्तराभाद्रपदा ह्या नऊ नक्षत्रांचा मनुष्य गण आहे. १ हस्त, २ रेवती, ३ पुनर्वसु, ४ पुष्य, ५ स्वाती, ६ मृग, ७श्रवण, ८ अश्विनी, ९ अनुराधा ह्या नवांचा देव गण आहे. १ कृत्तिका, २ आश्लेषा, ३ मघा, ४ चित्रा, ५ विशाखा, ६ ज्येष्ठा, ७ मूळ, ८ धनिष्ठा, ९ शततारका ह्या नवांचा राक्षस गण आहे. दैत्य गणानें मनुष्य गणाच्याला मरण येतें ॥ ५ ॥ देव गण आणि राक्षस गण ह्यांचा कलह होतो. मनुष्य आणि देव ह्यांचें मध्यम जमतें. वधू आणि वर ह्यांचा एक गण असेल तर अतिशय मैत्री असते, वधू आणि वर ह्यांचा जन्म राशि परस्पर मोजून २–१२ होतील तर निर्धनत्व जाणावें. आणि ६–८ होतील तर विपत्ति जाणावी ५–९ होतील तर अनपत्यता जाणावी, बाकी सर्व कूटें शुभ जाणावीं, परंतु उभयतांच्या नक्षत्राचा चरण एकच असतां तें अशुभ होय. दोघांचें नक्षत्र भिन्न असून एक राशि असेल तर आणि भिन्न चरण असून नक्षत्र एक असेल तर गण, ग्रह, मैत्री, नाडी नृदूर हीं कांहीं एक पाहावयाचें कारण नाहीं ॥ ६ ॥

**अथ गणमाह–पूर्वास्तिस्त्र आर्द्रा प्रसिद्धा अंतको भरणी कः रोहिणी उत्तरास्तिस्त्रः एतन्नक्षत्रनवकं सुरे देवे नरि भवति नृगणमित्यर्थः । अर्को हस्तः अंत्यं रेवती अदितिः पुनर्वसु ईज्यः पुष्यः आनिलः स्वाती इंदुर्मृगः श्रुति श्रवणः अश्विनी प्रसिद्धा मित्रं अनुराधा एतन्नक्षत्रनवकं सुरे देवे भवति देवगणमित्यर्थः । अन्यत् कृत्तिका आश्लेषा मघा चित्रा विशाखा ज्येष्ठा मूलं धनिष्ठा शततारका एतन्नक्षत्रनवकं असुरे भवति रक्षोगणमित्यर्थः । दैत्यैर्नृणां मृतिर्भवति ॥ ५ ॥ देवासुरयोर्देवदैत्ययोः कलिः स्यात् नृसुरयोर्नृदेवयोर्मध्यं स्यात् तयोर्मिलने सौहृदं स्यात् । अथ कूटमाह–द्विव्ययके द्विर्द्वादशे नैस्व्यं निस्वस्य भावो नैस्व्यं निर्धनत्वं स्यात् षडष्टसु विपत् मरणं स्यात् वैपुत्र्यमर्थांकके अर्थांकके पंचमनवमे वैपुत्र्यं अनपत्यत्वं स्यात् शेषे उर्वरिते तृतीयैकादशे चतुर्दशमे उभयसप्तमे एकर्क्षे विविधार्थाः धनपुत्रपश्वादयः स्युः । कथंभूते शेषे विभैकचरणे विगतं भैकचरणं नक्षत्रैकचरणं यस्मात् तथा तस्मिन्नक्षत्रैकचरणे कूटे अनिष्टं फलं श्रूयते । एकराशौ शुभोद्वाह एकभांशे मृतिप्रद इति । एकऋक्षस्य चत्वारो भेदा एकराशिर्भिन्नर्क्षं एकर्क्षं भिन्नराशि एकराशिनक्षत्रं भिन्न चरणं एक राशिनक्षत्रचरणं चेति चत्वारो भेदाः तत्र एकराशिनक्षत्रचरणं निंदितं विभैकचरण इति । अथ शुभकूटे यद्भिन्नर्क्षराश्यैककं भिन्ननक्षत्रराश्यैकत्वं यच्च भिन्नांघ्र्येकभं एतयोर्गणखगौ नाडी नृदूरं च न अत्र किमपि नावलोक्यं शुभमित्यर्थः । नृदूरं वक्ष्यमाणं भिन्नांघ्र्येकभमित्यत्र भेदद्वयमागतं भवति एकर्क्षं भिन्नराशिकं अपरं एकराशिनक्षत्रं भिन्नचरणं तस्मात् एकराशिनक्षत्रचरणं त्यक्त्वा त्रिषु भेदेषु गणादिकं न चिंतयेत् तत्र गणादिदोषे सत्यपि शुभं स्यादित्यर्थः ॥ उक्तं च बृहस्पतिना । एकराशौ पृथक् धिष्ण्ये पृथग्राशौ तथैकभे । गणनाडी नृदूरं च ग्रहवैरं न चिंतयेत् ॥ कालनिर्णये । दंपत्योरेकनक्षत्रे भिन्नपादे शुभावहम् । दंपत्योरेकपादे तु वर्षांते मरणं ध्रुवमिति ॥ ६ ॥**

**टीकार्थ**—आतां गण सांगतो–३ पूर्वा, १ आर्द्रा, १ अंतक ह्मo भरणी, १ क ह्मo रोहिणी, ३ उत्तरा मिळून नऊ नक्षत्रें मनुष्यगणाचीं आहेत, १ अर्क ह्मo हस्त २ अंत्य ह्मo रेवती ३ अदिति ह्मo पुनर्वसु, ४ इज्य ह्मo पुष्य ५ अनिल ह्मo स्वाती ६ इंदु ह्मo मृगशिर्ष ७ श्रुति ह्मo श्रवण ८ अश्विनी ९ मित्र ह्मo अनुराधा हीं नऊ नक्षत्रें देवगणाचीं आहेत. दुसरीं राहिलेलीं १ कृत्तिका २ आश्लेषा ३ मघा ४ चित्रा ५ विशाखा ६ ज्येष्ठा ७ मूळ ८ धनिष्ठा ९ शततारका हीं नऊ नक्षत्रें राक्षसगणाचीं आहेत. दैत्यांबरोबर मनुष्यांचें मरण होतें. ॥ ५ ॥ देव आणि राक्षस ह्यांचा कलह होतो, मनुष्य आणि देव ह्यांचें मध्यमत्व असतें समान गणाचें मेलन झालें असतां चांगलें मित्रत्व रहातें. आतां कूट सांगतो–वधू आणि वर ह्यांच्या परस्परांच्या राशीपासून परस्परांच्या राशी मोजाव्यात त्यांत जर २–१२ आले तर निर्धनत्व येतें. ६–८ आले तर विपत्ति येते. मरण येतें अथवा अपुत्रत्व येतें. ९–५ आले तर अनपत्यता येते. बाकी उरलेल्या ३–११–४–१०–२–७ हीं कूटें उत्तम आहेत. दोघांचेंच नक्षत्र एक असेल तर नानाप्रकारच्या संपत्ति मिळतील. ह्मo धन, पुत्र, पशु इत्यादिक मिळतील दोघांच्या नक्षत्रांचा एक चरण असेल तर मात्र फारच अनिष्ट फळ होतें. दोघांचा एक राशि असेल तर विवाह शुभ जाणावा. परंतु नक्षत्राचा एक चरण असेल तर अशुभ जाणावा. एक नक्षत्राचे चार प्रकार आहेत ते असे कीं, १ एकराशी असून नक्षत्र भिन्न असावें. २ एकनक्षत्र असून राशी भिन्न असावी. ३ राशी आणि नक्षत्र एक असून चरण भिन्न असावा. ४ राशी, नक्षत्र आणि चरण एकच असावींत. पैकीं राशी, नक्षत्र आणि चरण एक असतील

तर निंद्य समजावें. नक्षत्रांचे एक चरण नसून एक नक्षत्र असेल तर तें शुभ समजावें. आतां शुभ कूटामध्यें १ भिन्न नक्षत्र असून राशी एक असेल तें, २ चरण भिन्न असून एक नक्षत्र असेल तें असें असेल तर त्या वधू आणि वराचे व बाकीचे गण, नाडी, नृदूर इत्यादि कांहींएक पाहावयाचें कारण नाहीं. नृदूर हें पुढें सांगावयाचें आहे. चरण भिन्न असून एक नक्षत्र असेल अशाचे दोन भेद आहेत ते असे कीं,१ एक नक्षत्र असून राशि भिन्न असेल ते,२ राशि व नक्षत्र एक असून चरण भिन्न असेल तें, ह्मणून एक राशी व नक्षत्र चरण एक असे सोडावे. तीनभेदांविषयीं ह्मणजे वर सांगितलेल्या तीनभेदांविषयीं गण इत्यादिक पाहावयाचें कारण नाहीं. वर सांगितलेल्या तीन भेदांमध्यें गणादिकांचा दोष असला तरीसुद्धां शुभ जाणावें. हेंच बृहस्पतीनें सांगितलें आहे कीं, एक राशी असून नक्षत्र भिन्न असतां, भिन्नराशी असून एक नक्षत्र असतां मग गण, नाडी, नृदूर, ग्रहांचें वैर इत्यादिकांचा विचार करावयाचें कारण नाहीं. कालनिर्णयांत सांगितलें आहे कीं, वधू आणि वर ह्यांचें नक्षत्र एक असून चरण भिन्न असेल ह्मणजे तें शुभकारक आहे. दोघांचा नक्षत्र चरण एक असेल तर एका वर्षांत निश्चयानें मरण येतें ॥ ६ ॥

## कूटापवाद आणि नाडी.

षट्काष्टे समभं च षष्ठसहितं चेच्छोभनं स्यात्समं ।
भं द्विर्द्वादशके द्वितीयसहितं श्रेष्ठं स्त्रिया युग्घरिः ॥
मूलेंद्रार्कभपारयजैकचरणादित्यार्यमेशाश्विभैः ।
याम्येंद्वीज्यभमित्रभाग्यवसुभत्वाष्ट्रांब्वाहिर्बुध्न्यभैः ॥ ७ ॥
अन्यैर्नाड्यइहैकनाडिनवके स्यातां द्विभे चेन्मृतिः ।
गोदादाक्षिणतः क्वचिन्नृपमुखे पार्श्वैकनाडी हिता ॥
मैत्र्याद्विःख्ययमर्थनंदमपिसत् षट्काष्टकं वश्यतः ।
षड्भिः स्त्रीनृगणाः वरोस्रपगणः सत्कूटमैत्र्योस्तदा ॥ ८ ॥

श्लोकार्थ—६–८ ह्मणजे षट्काष्टकांत सम राशीपासून ६ होतील तर तें शुभ कूट होय. तसेंच २–१२ ह्मणजे द्विर्द्वादशकांमध्यें पूर्वीप्रमाणेंच सम राशीपासून मोजून २ येतील तर तेंही शुभ आहे. कन्या राशी बरोबर सिंह ही राशी शुभ आहे. जसें—वृषभापासून तूळापर्यंत सहा येतात परंतु वृषभ ही राशी सम आहे ह्मणून हें षडष्टक कूट शुभ आहे. मिथुनापासून वृश्चिक ६ होतात परंतु मिथुन विषम आहे ह्मणून हें शुभ नाहीं, आतां आद्यनाडी, मध्यनाडी आणि अंत्यनाडी ह्यांचें स्वरूप सांगतो—पैकीं २७ नक्षत्रें आहेत त्यांतील १ मूळ, २ ज्येष्ठा, ३ हस्त, ४ शततारका, ५ पूर्वाभाद्रपदा, ६ पुनर्वसु, ७ उत्तराफा० ८ आर्द्रा, ९ अश्विनी हीं नऊ नक्षत्रें आद्यनाडीचीं आहेत. १ भरणी, २ मृग, ३ पुष्य, ४ अनुराधा, ५ पूर्वाफाल्गु० ६ धनिष्ठा, ७ चित्रा, ८ पूर्वाषाढा, ९ उत्तराषाढा हीं नऊ नक्षत्रें मध्य नाडीचीं आहेत. ह्यांशिवाय १ कृत्तिका, २ रोहिणी, ३ आश्लेषा, ४ मघा, ५ स्वाती, ६ विशाखा, ७ उत्तराषाढा, ८ श्रवण, ९ रेवती हीं नऊ नक्षत्रें अंत्य नाडीचीं आहेत. आतां वधू आणि वर ह्यांचें नक्षत्र एका नाडींत असल्यास दोघांची एक नाडी होते ह्मणून मरण समजावें. गोदावरी नदीच्या दक्षिणेस देशांतील सर्व वर्णांला आणि सर्व देशांमध्यें क्षत्रियादिकांना दुसरी कन्या मिळणें दुर्लभ असतें. ह्मणून उभयतांचीं नक्षत्रें आद्यनाडींत अथवा अंत्य नाडींत असतांही शुभ मानावी. राशींचे स्वामी परस्परांशीं मित्र असतील २–१२ ह्म० द्विर्द्वादश आणि ९–५ ह्मणजे नवपंचक शुभ असतें. शुभ कूट आणि ग्रह मैत्री असेल तर वधूचा मनुष्य गण व वराचा राक्षस गण असेल तरी हा शुभ जाणावा ॥ ७ ॥ ८ ॥

अथ ग्राह्यषट्काष्टकं द्विर्द्वादशं चाऽऽह-षट्काष्टे सति समभं कर्ककन्यादि चेद्यदि षष्ठसहितं स्यात्तदा शोभनं स्यात् ग्राह्यं स्यादित्यर्थः। तद्यथा वृषः समभं तस्मात्सकाशात् षष्ठेन तुलाधारेण सहितं यदि भवति तदा ग्राह्यं स्यादित्यर्थः । तत्स्वामिनो मैत्र्यभावात् समभं अष्टमेन समं न ग्राह्यम् । एवमेव ग्राह्याग्राह्यं विलोकयेत् । अथ ग्राह्यं द्विर्द्वादशं चाऽऽह-द्विर्द्वादशके समभं द्वितीयसहितं यदा भवति तदा श्रेष्ठं शोभनं स्यात् विपरीतमसत् । अत्र सिंहे विशेषमाह-स्त्रिया युग्घरिरिति । विष-

सोऽपि सिंहः स्त्रिया कन्यया युक् युक्तः श्रेष्ठः । अथ नाडीमाह-मूलेती । अत्र श्लोके तृतीयांतैस्त्रिभिः पादैः तिस्रो नाड्यः सूचिताः मूलं प्रसिद्धं इंद्रो ज्येष्ठा अर्कभं हस्तः पाशी शततारका अजैकचरणं पूर्वाभाद्रपदा आदित्यं पुनर्वसुः अर्यमा उत्तराफाल्गुनी ईश आर्द्रा अश्विभं अश्विनी एभिर्नक्षत्रनवकैरेकनाडी भवति याम्यं भरणी इंदुर्मृगः ईज्यभं पुष्यः मित्रं अनुराधा भाग्यभं पूर्वाफाल्गुनी वसुभं धनिष्ठा त्वाष्ट्रं चित्रा अंबु पूर्वाषाढा अहिर्बुध्न्यं उत्तराभाद्रपदा एभिर्नवनक्षत्रैरेकनाडी भवति । अन्यैरुर्वरितैर्नक्षत्रैरेकनाडी एवं तिस्रो नाड्यो भवंति इह विवाहविषये यदा एकनाडी नवके द्विभे वधूवरयोर्भे नक्षत्रे चेत्स्यातां तदा मृतिर्मरणं स्यात् । अथ गौतम्यादिदाक्षिणे देशे क्षत्रियादीनां च अन्यवध्वा अलाभे गतिमाह-गोदादाक्षिणतः गोदा गौतमी तस्याः दक्षिणतः दक्षिणे देशे सर्ववर्णे नृपमुखे क्षत्रियादौ सर्वदेशस्थे क्वचित् अन्यकन्याया अलाभे सति पार्श्वैकनाडी हिता शुभा स्यान्न मध्यनाडी । उक्तंच रत्नकोशे । अग्रनाडीव्यधे भर्ता मध्यनाडीव्यधे द्वयं । पृष्ठनाडीव्यधे कन्या म्रियते नात्र संशयः । समासन्ने व्यधे शीघ्रं दूरव्यधे चिरेण तु । व्यधांतरसमानेन वर्षे दुष्टं प्रजायते । इति ब्राह्मणविषयं । जठरे निर्धनत्वं च गर्भे मरणमेव च । पृष्ठे दौर्भाग्यमाप्नोति तस्मात्तां परिवर्जयेति । ज्योतिःप्रकाशे । निधनं मध्यनाड्यां च दंपत्योर्नैव पार्श्वयोः । अस्य व्यवस्था तत्रैवोक्ता । करग्रहे पृष्ठनाड्यौ न निंद्ये इति यद्वचः । तत्क्षत्रियादिविषयं गौतमीयाम्यतस्तथेति ॥ अथपूर्वोक्तानां द्विर्द्वादशादीनां शुभत्वमाह-मैत्र्येति। मैत्र्या ग्रहमैत्र्या द्विव्ययं द्विर्द्वादशं अर्थनंदं पंचमनवमं सत् शुभं स्यात् वश्यादिषड्भिः षट्काष्टकं शुभं स्यात् वश्यभयोनिखेचरगणनाडीभिः षडष्टकं शुभं स्यादित्यर्थः। अथ यदा स्त्री नृगणा वरोऽसुपगणो रक्षोगणः स्यात्तदा तन्मेलनं सत्कूटमैत्र्योः सत्योः शुभं स्यात्॥७॥८॥

**टीकार्थ**—आतां जें षट्काष्टक ग्राह्य आहे तें सांगतों—आणि द्विर्द्वादशकही ग्राह्य आहे तें सांगतो—सम राशीपासून जर षट्काष्ट असेल तर तें ग्राह्य आहे जसें कर्क राशीपासून अथवा कन्या वगैरे सम राशीपासून जर षष्ठानें सहित असेल तर तें षट्काष्टक शुभ समजावें. तें असें—वृष ही सम राशी आहे, त्यापासून सहावी राशी तुला आहे त्या तुलासहित जें षट्क तें ग्राह्य आहे. परंतु त्या षष्ठाचा स्वामी ह्मणजे तुलेचा स्वामी जो शुक्र आहे त्याची मित्रता आठव्या राशीच्या स्वामी बरोबर ह्मणजे धनाचा स्वामी जो गुरु त्याबरोबर मैत्री नाहीं. ह्मणून सम राशी आठव्या बरोबर धेऊं नयेत. अशाच रीतीनें ग्राह्य आणि अग्राह्य ह्याचा विचार करावा. अर्थात साहाव्या राशीचा स्वामी आणि आठव्याचा स्वामी जर मित्र असते तर तें षट्काष्टक ग्राह्य झालें असतें. आतां द्विर्द्वादश सांगतों—द्विर्द्वादशकांमध्यें समराशीपासून द्वितीयाचा स्वामी आणि द्वादश राशीचा स्वामी हे जर मित्र असतील तर तें द्विर्द्वादशक शुभ जाणावें. तसें नसेल तर अशुभ जाणावें. आतां सिंहराशीविषयीं विशेष सांगतों—सिंह ही जरी विषम राशी आहे तरी ती राशी कन्येशीं युक्त झाली असतां शुभ जाणावी. आतां नाडीचा विचार सांगतों—ह्या श्लोकांत तृतीया विभक्त्यंत तीन पादांनीं तीन नाडी सांगितल्या आहेत असें जाणावें. १ मूल, इंद्र ह्म० २ ज्येष्ठा, अर्कभम् ह्म० ३ हस्त,पाशी ह्म० ४ शततारका,अजैकचरण ह्म० ५ पूर्वाभाद्रपदा, आदित्य ह्म० ६ पुनर्वसु, अर्यमा ह्म० ७ उत्तराफाल्गुनी, ईश ह्म० ८ आर्द्रा अश्विभ ह्म०९अश्विनी ह्या नवांनीं आद्यनाडी होते.याम्य ह्म० १ भरणी, इंदु ह्म० २ मृगशीर्ष, ईज्यभ ह्म० ३ पुष्य, मित्र ह्म० ४ अनुराधा, भाग्यभ ह्म० ५ पूर्वाभाद्रपदा, वसुभ ह्म० ६ धनिष्ठा, त्वाष्ट्र ह्म० ७ चित्रा,अंबु ह्म० ८ पूर्वाषाढा, अहिर्बुध्न्य ह्म० ९ उत्तराभाद्रपदा ह्या नउ नक्षत्रांनीं मध्यनाडी होते. बाकी उरलेल्या नउ नक्षत्रांनीं अंत्यनाडी होते. ह्या विवाहामध्यें वधु आणि वर ह्यांची एक नाडी असेल ह्मणजे वधु आणि वर ह्यांचें नक्षत्र एक असेल तर मरण होईल. आतां गोदावरीनदीच्या दक्षिण देशीं क्षत्रियादिकांनां दुसरी कन्या मिळत नसेल तर त्या विषयीं उपाय सांगतों तो असा कीं, गोदानदीचे दक्षिणेस सर्व वर्णामध्यें क्षत्रिय, वैश्य इत्यादि वर्णामध्यें कोठें कोठें सर्वही देशांत दुसरी कन्या मिळत नसेल आणि जी एकादी मिळत आहे तिची एक नाडी असेल व पार्श्वैकनाडी ह्मणजे आद्य किंवा अंत्यनाडी दोघांची एक असेल तर ती हितकारक समजावी. परंतु मध्य नाडी दोघांची एक असेल तर ती हितकारक नाहीं. तोच विचार रत्नकोश ग्रंथांत सांगितला आहे कीं, दोघांची आद्यनाडी एक असेल तर भर्ता मरण पावतो. मध्यनाडी एक असेल तर दोघेहि मरण पावतात. अंत्य नाडी दोघांची एक असेल तर कन्या मरण पावत्ये. ह्यांत संशय नाहीं. समासन्न एकनाडी असेल तर लवकर नाश होतो. दूरनाडी असेल तर वेळानें नाश पावतो. एकाचे मध्यें अंतर असेल तर एक वर्षानें दुष्ट परिणाम होतो.हें सर्व वाक्य ब्राह्मणाविषयीं आहे. उदरांत असेल तर निर्धनत्व,गर्भांत असेल तर मरण, पृष्ठभागीं असेल तर दुर्भाग्यपण येतें, ह्मणून एकनाडी वर्ज्य करावी. ज्योतिःप्रकाशांत सांगितलें आहे कीं, मध्यनाडी एक असेल तर स्त्रीपुरुषांचा दोघांचा नाश होतो. परंतु आद्य नाडी आणि अंत्यनाडी एक असेल तर नाश होतच नाहीं. ह्याची व्यवस्था तेथेंच अशी सांगितली आहे कीं, विवाहामध्यें अंत्य आणि आद्य ह्या दोन नाडी एक असल्या

तर त्या नित्य नाहींत असें जें वचन आहे तें सर्व गोदावरी नदीच्या दक्षिण दिशेकडील देशांतील क्षत्रियादिकांबद्दल समजावें. आतां पूर्वी सांगितलेले द्विर्द्वादश इत्यादिक शुभ केव्हां असतात तें सांगतों–ग्रहांची मैत्री असेल तर द्विर्द्वादश नवपंचक हीं असतांही शुभ आहे असें समजावें. वश्यादि सहा अनुकूल असल्यास षट्काष्टकही शुभ होतें असें जाणावें. ह्मणजे वश्य, भ, योनि, ग्रह, गण आणि नाडी हे यथायोग्य मिळत असल्यास षडष्टकांचा दोष नाहीं तें शुभच जाणावें. आतां स्त्री मनुष्यगणाची आणि वर हा राक्षस गणाचा असेल तेव्हां सत्कूट आणि मैत्री असेल तें मेलन शुभ समजावें ॥ ७ ॥ ८ ॥

## नृदूर, त्याचा अपवाद व दुःकूटाचीं दानें.

**रक्षः स्त्री नृ पुमान् यदा वशमुखैः षड्भिर्युतं शोभनम् ।**
**स्त्रीभान्ना निकटे नृदूरमशुभं खेटोडुमैत्र्योः शुभम् ॥**
**द्व्यर्के ताम्रसुवर्णमष्टरिपुके गोयुग्ममर्थांकके ।**
**रौप्यं कांस्यमथैकनाडियुजि गोस्वर्णादि दत्त्वोद्वहेत् ॥ ९ ॥**

श्लोकार्थ—वश्यादि सहा ह्मणजे १ वश्य, २ नक्षत्र, ३ योनि, ४ ग्रह, ५ कूट आणि ६ नाडी हीं जर शुभ असून कदाचित् कन्या राक्षस गणाची आणि वर मनुष्य गणाचा असेल तर तें शुभच समजावें. कन्येच्या नक्षत्रापासून पतीचें नक्षत्र जवळ असेल तर त्याला नृदूर असा दोष ह्मणतात तो अशुभ आहे. दोघांच्या राशीचे जे स्वामी असतील ते परस्पर मित्र असतील आणि योनींची मित्रता असेल तर नृदूर हा दोष शुभ आहे असें जाणावें, द्विर्द्वादशकाबद्दल सुवर्णाचें आणि तांब्याचें दान, षडष्टकाबद्दल गाय आणि बैल जोडप्याचें दान, नवपंचक असतां रुपें आणि कांस्य ह्यांचें दान, व वधू वरांचीं उभयतांची एक नाडी असतां गाय, सोनें, वस्त्र, अन्न हीं सर्व दानें करून मग विवाह करावा ॥ ९ ॥

**अथ यदा रक्षः स्त्री रक्षोगणा स्त्री नृ पुमान् नृगणः पुरुषः स्यात्तदा वशमुखैः षड्भिः वश्यभयोनिखेचरकूटनाडीत्येतैः षड्भिर्युतं तन्मेलनं शुभं स्यात् । अथ नृदूरं सापवादमाह–स्त्रीभादिति । स्त्रीभात् स्त्रीनक्षत्रात् ना इति नृनक्षत्रं यदि निकटे समीपे भवति तदा नृदूरं स्यात् । कथं भूतं नृदूरं अशुभं अशुभफलदं इदं नृदूरं खेटोडुमैत्र्योः सत्योः शुभं स्यात् । उडुमैत्री नक्षत्रमैत्री योनिमैत्रीतियावत् । अथ संकटे दुष्टकूटादौ दानमाह–द्व्यर्केति । द्व्यर्के द्विर्द्वादशे ताम्रसुवर्णादि दत्त्वा उद्वहेत् अष्टरिपुके षडष्टके गोयुग्मं गोमिथुनं दत्त्वा उद्वहेत् अर्थांकके पंचमनवके रौप्यं कांस्यं दत्त्वोद्वहेत् । अथैकनाड्यां दानमाह–एकनाडियुजि गोस्वर्णादि दत्त्वोद्वहेत् । एकनाडीयोगे गोस्वर्णान्नवस्त्राणि बहूनि दत्त्वोद्वहेत् । तथाच राजमार्तंडे । षडष्टके गोमिथुनं प्रदद्यात्कांस्यं सरौप्यं नवपंचमे च । नाड्यां च धेन्वन्नसुवर्णवस्त्रं द्विर्द्वादशे ब्राह्मणतर्पणं च । उद्वाहतत्त्वे । ताम्रं हेमधनव्यये रजतयुक्कांस्यं शरांके वृषं गां दद्याच्च षडष्टके द्विजभुजि स्वर्णं च नाडीयुताविति ॥ ९ ॥**

टीकार्थ—आतां जेव्हां कन्या राक्षस गणाची, पुरुष मनुष्य गणाचा असेल तेव्हां १ वश्य, २ नक्षत्र, ३ योनि, ४ ग्रह, ५ कूट, ६ नाडी ह्या साहांनीं चांगला योग असेल तर तें मेलन शुभ कारक समजावें. आतां नृदूर व त्याचा अपवादही सांगतों–स्त्रीचे नक्षत्रापासून पुरुषाचें नक्षत्र जर जवळ असेल तर नृदूर नांवाचा दोष असतो तो अशुभ आहे. परंतु तो अशुभ नक्षत्रांची मैत्री आणि योनीची मैत्री असेल तर शुभच समजावा. आतां संकट प्रसंगीं दुष्ट कूटांचें दान सांगतों–द्विर्द्वादशक असेल तर तांबें आणि सोनें दान करून विवाह करावा. षडष्टक असेल तर गाय आणि बैल दान करून विवाह करावा. नवपंचक असेल तर रुपें आणि कांसें दान करून विवाह करावा. आतां एक नाडी असेल तर त्याचें दान सांगतो–एक नाडी असतां गाय आणि सोनें इत्यादि दान करून विवाह करावा. एक नाडीचा योग असतां गाय, सोनें, अन्न, वस्त्र इत्यादि पुष्कळ दान करून विवाह करावा. तेंच राजमार्तंडांत सांगितलें आहे कीं, षडष्टकाबद्दल गाय व बैल द्यावा. नव पंचकाबद्दल रुपें आणि कांसें द्यावें. एक नाडीबद्दल गाय, अन्न, सुवर्ण, वस्त्रें हीं द्यावींत. द्विर्द्वादश असेल तर ब्राह्मण भोजन करावें. उद्वाह तत्त्वांत सांगितलें आहे कीं, धन व्यय ह्म० द्विर्द्वादशकाबद्दल तांबें आणि सोनें, शरांके ह्म० नवपंचकाबद्दल बैल आणि गाय, षडष्टकाबद्दल ब्राह्मणभोजन आणि एक नाडीबद्दल सुवर्ण दान करावें ॥ ९ ॥

वर्ण, वश्य, नक्षत्र, योनि ह्यांचे गुण.

भूर्वर्णैक्यवरोत्तमेऽथ वशभक्ष्येऽर्धं द्वयं मित्रयोः ।
खंवैराशनके धरारिवशकेऽथो सद्वयोरग्नयः ॥
मिश्रे तच्छकलं त्वथातिसुहृदोर्वेदास्त्रयो मित्रयोः ।
एकः स्याद्द्विषतोः स्वभावगुणयोर्द्वौ खं महद्वैरिणोः ॥ १० ॥

श्लोकार्थ—वधू राशीच्या वर्णापेक्षां वर राशीचा वर्ण उत्तम असेल अथवा दोघांच्या राशींचा वर्ण एक असेल तर १ गुण घ्यावा. आतां दोघांच्या राशी एकमेकांला भक्ष्य किंवा वश्य असतील तर ‐॥‐ गुण त्याच राशी एकमेकांला मित्र असल्यास २ गुण, शत्रु व भक्ष्य असतां मुळींच गुण नाहीं. शत्रु आणि वश्य असतां १ गुण जाणावा. दोघांचीं नक्षत्रें शुभ असतील तर ३ गुण. एकाचें शुभ आणि एकाचें अशुभ असल्यास १॥ गुण, दोघांच्या योनीची अति मैत्री असतां ४ गुण, सामान्य मैत्रीस ३ गुण, शत्रु असतां १ गुण. शत्रुत्व नाहीं व मित्रत्वही नाहीं असें असतां २ गुण आणि अति वैर असतां गुण नाहीं ॥ १० ॥

अथ गुणविचारं त्रिभिर्वृत्तैराह—तत्राऽऽदौ वर्णगुणविचारमाह—भूर्वर्णैक्येति । वर्णैक्यवरोत्तमे भूरेको गुणो ज्ञेयः वर्णयोरैक्यं यस्मिन्घटिते तद्वर्णैक्यं वर उत्तमो यस्मिन् तद्वरोत्तमं च उभयत्रापि एको गुणो ज्ञेयः अर्थाद्धीनवरे गुणाभावः । उक्तं च ज्योतिर्निबंधे । एको गुणः समे वर्णे तथा वर्णोत्तमे वरे । हीनवर्णे गुणः शून्यं केऽप्याहुः सदृशे दलमिति ॥ अथ वश्यगुणविचारमाह—वशभक्ष्ये अर्धं एकस्यार्धं गुणः वशभक्ष्यं यथा मनुष्याणां जलजा वशा भक्ष्याश्च तत्र अर्धगुणो ग्राह्य एतत्तु द्विजादौ ज्ञेयं द्विजादयस्तु कदाचिच्छ्राद्धे पाठीनजातीयमत्स्यभक्षका भवंति न सर्वेषां तस्माद्वधूवरजातिं विचार्य योजनीयं हीनजातौ शून्यं यतः खं वैराशनके इत्यस्मिन्नेव श्लोक उक्तत्वात् एवमेव सिंहस्य सर्वे वश्या भक्ष्याश्च भवंति।तत्र मनुष्या वैरभक्ष्यं वृश्चिकस्तु वैरी अन्ये वशभक्ष्यं अथ मित्रयोः परस्परं सुहृदोः द्वयं गुणद्वयं ज्ञेयं तत्र विचारः स्वजातौ मित्रत्वं प्रकटं मनुष्याणां मेषमृगाश्वमृगैः सह मित्रत्वं तत्र हीनजातीयानां पशवो वशभक्ष्यं तत्रार्धगुणः अन्यत्र द्वयं अथारिवशके धरा एको गुणः अरिवशकं यथा मनुष्याणां वृश्चिकः सिंहवृश्चिकयोर्नित्यं वैरं वृश्चिकदष्टः सिंहो मरणमाप्नोति इति लोके प्रसिद्धं तस्मादत्र गुणाभावः प्रथमं वशभक्षणे अन्यजनादित्युक्तं तस्मात्सुबुद्धिभिर्विचार्य वक्तव्यं । ममात्र वश्यविचारणे बुद्धिरेवं स्फुरिता अत्र यत् दुरुक्तं तत् बुधैः शोधनीयं। ननु वश्यभक्षणे कौर्प्यो न वश्यो हरेरित्येवोक्तं त्वया कथमुक्तं सिंहस्य मनुष्या वैरिभक्ष्यामिति। सत्यं तच्छ्लोकोक्तलक्षणं सर्वं सामान्यमस्ति अत एवोक्तं ग्रंथकर्त्रा अन्यजनादिति।सिंहस्तु नरगजादिप्रतापिमारणेऽत्युत्सुकोऽन्येषां मारणे उदासीनोऽसदृशत्वात् । उक्तं च । वैरभक्ष्ये गुणाभावो द्वयोः सख्ये गुणद्वयं । वशवैरे गुणश्चैको वशभक्ष्ये गुणार्धकमिति ॥ अथ तारागुणविचारमाह—सद्वयोः उभयतः सत्तारयोः सतोः अग्नयस्त्रयो गुणाः । एतदुक्तं भवति भे गण्येऽकद्वते इत्यनेन प्रकारेण उभयतोऽपि यदि सत्तारे भवतस्तदा त्रयो गुणा इत्यर्थः । मिश्रे तच्छकलमिति।मिश्रे एकतः शुभा तारा एकतः अशुभा एवंविधे मिश्रे सति तच्छकलं तेषां त्रयाणां शकलं सार्धैको गुण इत्यर्थः । अन्यथा गुणाभाव इत्यर्थात्सिद्धं । उक्तं च । एकतो लभ्यते तारा शुभा चैवाशुभाऽन्यतः । तदा सार्धो गुणश्चैकस्ताराशुद्धे मिथस्त्रयः । उभयोर्न शुभा तारा तदा शून्यं समादिशेत् ॥ अथ योनिगुणविचारमाह—अतिसुहृदोर्वेदाश्चत्वारो गुणा मित्रयोस्त्रयः । द्विषतोर्वैरिणोरेकः स्वभावगुणयोर्द्वौ महावैरिणोः खं शून्यं गुणः स्यात् । एवं पंचप्रकारेण योनिगुणा अस्य विवेकः । अष्टाविंशतिनक्षत्राणामश्वादयः सर्वाश्चतुर्दश योनयः तत्र सिंहेभं महिषाश्वमित्यादि यदुक्तं तन्महद्वैरम् तत्रापि महावैरे महिषाश्वं वानरमेषकं एतद्द्वयं उदासीनं स्वभावगुणं परस्परघाताभावात् अथैकयोनिषु अतिमित्रत्वं ज्ञेयं एकयोनिष्वपि गजयोः श्वानयोः मार्जारयोर्व्याघ्रयोः सिंहयोरेकयोनित्वेऽपि न मित्रत्वं परस्परकलहकारणात्। एतद्युग्मपंचकं स्वभावगुणमेतद्युग्मपंचकं तु महावैरस्थं महिषाश्वं वानरमेषमेतद्द्वयमित्येतद्युग्मसप्तकं । स्वभावगुणं व्याघ्रस्तु सर्पोंदुरुनकुलेषु उदासीनः सिंहोऽप्येवमेव उदासीनः। तथा एतौ व्याघ्रसिंहा

**अन्येषां वैरिणौ सर्पमार्जारयोर्वैरः अश्वमेषयोर्मैत्रं गोमहिष्योर्मैत्रं उंदुरुसर्पयोर्वैरं एवं शत्रुमित्रादिकं उदासीनत्वं च विचार्य उक्तवद्गुणा ज्ञातव्या औदासीन्ये स्वभावगुणवद्गुणग्रहणं उदासीनानां गुणा यद्यपि स्वभावगुणे माहिषाश्वे मेषवानरे च औदासीन्यं दृश्यते तस्मादेतद्वयं उदासीनं गुणग्रहणं कर्तव्यमित्यर्थाज्ज्ञायते । उक्तं च । महावैरे च वैरे च स्वभावे च यथाक्रमं । मैत्रे चैवातिमैत्रे च खेदुद्वित्रिचतुर्गुणा इति ॥ १० ॥**

**टीकार्थ**—आतां गुणांचा विचार तीन वृत्तांनीं सांगतो—त्या मध्यें अगोदर वर्णाचे गुणाचा विचार सांगतो—दोघांचा एक वर्ण असतां अथवा वधू पेक्षां वराचा उत्तम वर्ण असतां एक गुण समजावा. अर्थात् वधूपेक्षां वराचा वर्ण हीन असेल तर गुण नाहीं. हेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, दोघांचा एक वर्ण असतां अथवा वराचा वर्ण वधू पेक्षां उत्तम असतां एक गुण समजावा. वराचा वर्ण वधू पेक्षां हीन असेल तर बिलकूल गुण नाहीं. कित्येकांचें मत असें आहे कीं, एक वर्ण असतां दल ह्म० गुण आहे. आतां वश्याचे गुणांचा विचार सांगतो—वश्य आणि भक्ष्य असेल तर अर्धा गुण समजावा. वश व भक्ष्य असे कीं, मनुष्यांनां जलचर प्राणी वश आणि भक्ष्य आहेत. तेथें अर्धा गुण जाणावा. हें सर्व द्विजादिकांला जाणावें. कारण द्विजादिक कदाचित् श्राद्धाचे वेळीं पाठीन नांवाचे मत्स्य भक्षण करितात. परंतु हें सर्वांनां लागू पडणारें नाहीं ह्मणून वधू आणि वर ह्यांची जाति कोण आहे ह्याचा विचार करून त्याची योजना करावी. हीन जातीला शून्य गुण आहे, कारण " खंवैराशनके " ह्या वाक्यांत ह्याच श्लोकांत तसें सांगितलें आहे, अशाच रीतीनें सिंह राशीचे सर्वच वश्य आणि भक्ष्य आहेत ह्मणून तेथें मनुष्य हे वैर भक्ष्य आहेत. त्याचा वैरी फक्त वृश्चिकच आहे बाकीचे वश भक्ष्य आहेत. परस्पर मित्र असतील त्यांचे दोन गुण आहेत. त्याचा असा विचार आहे कीं, आपल्या जातींत परस्पर मित्रत्व असणें हें स्पष्ट आहे. आतां मनुष्याचें मेष मृग, अश्व मृग ह्यां बरोबर मित्रत्व आहे, त्यांत हीन जातीचे पशु आहेत ते वश आणि भक्ष्य आहेत तेथें अर्धा गुण आहे, अन्य ठिकाणीं दोन गुण आहेत. आतां शत्रु आणि वश ह्यांचा एक गुण आहे, ते असें कीं, मनुष्याचा विंचू हा शत्रु आणि वश आहे. सिंहाचा शत्रु वृश्चिक आहे, कारण सिंहास विंचूनें दंश केल्याबरोबर तत्काळ तो मरण पावतो असें लोकांत प्रसिद्ध आहे. ह्मणून येथें गुण मुळींच नाहीं. अगोदर वश आणि भक्षण सांगितलें, नंतर लोकांच्या व्यवहारावरून जाणून घ्यावें असें सांगितलें आहे. ह्मणून बुद्धिवान् लोकांनीं विचार करून बोलावें माझी ह्या वश्य विचाराविषयीं अशी बुद्धि चालत आहे, ह्या मध्यें जें कांहीं सांगण्यांत चुकलें असेल तें विद्वानांनीं सुधारून घ्यावें. आतां अशी शंका येते—वश्य आणि भक्ष्य ह्या मध्यें वृश्चिक हा सिंहास वश्य नाहीं असें तुह्मी सांगितलें आहे आणि सिंहाचे मनुष्य हे वैरी आणि भक्ष्य आहेत असेंही तुह्मी सांगितलें. हें खरें आहे त्या श्लोकांतील सर्व लक्षण सामान्य आहे, ह्मणूनच ग्रंथकार सांगत आहे कीं, सर्व बारीक विचार लोकव्यवहारावरून जाणावा. कारण कीं, सिंह हा मनुष्य, हत्ती इत्यादि प्रतापीनां मारण्याविषयीं अत्युत्सुक असतो, परंतु दुसऱ्या दुर्बळ प्राण्यांना मारण्याविषयीं उत्सुक असत नाहीं,कारण ते प्राणी आपल्या बरोबरीचे नाहींत. हेंच सांगितलें आहे कीं, वैर आणि भक्ष्य असेल तर गुण मुळींच नाहीं. दोघांचें सख्य असेल तर दोन गुण आहेत. वश्य आणि वैर असेल तर एक गुण वश्य आणि भक्ष्य असेल तर अर्धा गुण समजावा. आतां तारा गुणांचा विचार सांगतो—दोघांचे ग्रह चांगले ह्मणजे अनुकूल असतील तर तीन गुण आहेत. ह्याचा अर्थ असा आहे कीं, नक्षत्र गणून त्याला नवांनीं भागून इत्यादि प्रकारा वरून दोघांचे ग्रह सत् असतील तर तीन गुण समजावेत. मित्र ह्मणजे एकाबाजूनें शुभ आहे व दुसऱ्या बाजूनें अशुभ आहे असें असेल तर शकल ह्मणजे १॥ दीड गुण समजावा. तसें नसेल तर अर्थात् गुण नाहीं असें जाणावें. असें सांगितले आहे कीं, एकीकडून शुभ ग्रह आहे आणि एकीकडून अशुभ ग्रह आहे. त्या वेळेस १॥ गुण आहे आणि दोहोंकडूनही ग्रहांची शुभता असेल तर ३ गुण जाणावेत. दोघांचेही ग्रह शुभ नसतील तर गुण मुळींच नाहीं असें स्पष्ट सांगावें. आतां योनीचे गुणांचा विचार सांगतो—अतिशय मित्रत्व असेल तर चार गुण समजावेत, साधारण मित्रत्व असेल तर तीन गुण समजावेत, शत्रु असतील तर एक गुण, स्वभाव गुण असतील तर दोन गुण जाणावेत. महाशत्रु असतील तर गुण मुळींच नाहीं. अशा रीतीनें पांच प्रकारानें योनीचे संबंधीं गुण जाणावेत. अठ्ठावीस नक्षत्रांच्या अश्व इत्यादि चवदा योनी सांगितल्या आहेत. त्यांत सिंह हत्ती, रेडा घोडा ह्यांचें मोठें वैर आहे. जें महावैर ह्मणून सांगितलें त्यांतही रेडा घोडा, वानर मेष, हे दोन युग्म उदासीन जाणावे ह्मणजे स्वभाव गुण आहे, कारण हे परस्परांना ठार मारूं शकत नाहींत. आतां एक योनी असेल तर अतिशय मित्रपणा आहे असें जाणावें. परंतु एक योनी असूनही १ हत्ती, २ श्वान, ३ मांजर, ४ व्याघ्र, ५ सिंह हे अतिशय मित्र नाहींत, कारण ते परस्पर कलह करितात ही वर सांगितलेलीं ५ युग्में महा वैरी आहेत. महिष अश्व, वानर मेष हीं दोन युग्में मिळून हीं सात युग्में स्वभाव गुण आहेत. व्याघ्र हा सर्प, उंदीर, मुंगुस ह्यांविषयीं उदासीन आहे. तसाच सिंह ही त्यांविषयीं उदासीन आहे. परंतु हे व्याघ्र आणि सिंह हे दुसऱ्यांचे वैरी आहेत. सर्प आणि मार्जार ह्यांचें वैर आहे, अश्व आणि मेष ह्यांचें मित्रत्व आहे. गाय

आणि महिषी ह्यांचें मित्रत्व आहे, उंदीर आणि सर्प ह्यांचें वैर आहे. अशा रीतीनें शत्रुत्व, मित्रत्व, उदासीनत्व ह्यांचा विचार करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें गुण जाणावेत. उदासीनांचे गुण स्वभाव गुणाप्रमाणें जाणावेत. जरी स्वभाव गुण असलेल्या महिष अश्व, मेष वानर ह्यां विषयीं उदासीनत्व आहे असें दिसतें, ह्मणून ह्या युग्माचे उदासीनाचे गुण घ्यावेत असें अर्थात् सिद्ध होतें. असें सांगितलें आहे कीं, १ महा वैर, २ वैर, ३ स्वभाव, ४ मित्रत्व, ५ अतिमित्रत्व ह्या पांचांनां क्रमानें शून्य, एक, दोन, तीन, चार असे गुण जाणावेत ॥ १० ॥

### ग्रहांचे व गणांचे गुण.

**एकेशोभयमित्रयोः शरमिता अर्धं समारातिके ।**
**चत्वारः सममित्रके रिपुहिते भूमिर्द्युदासे त्रयः ॥**
**ना देवो मनुजा वधूरिह रसास्तद्वैपरीत्ये शराः ।**
**षट् साम्येऽसुरपपूरुषः सुरवधूरत्रैककोऽन्यत्र खम् ॥ ११ ॥**

श्लोकार्थ—वर आणि वधू ह्या दोघांच्या राशींचा स्वामी एकच असेल किंवा ते स्वामी परस्पर मित्र असतील तर तेथें ५ गुण जाणावेत. ते स्वामी सम आणि शत्रु असल्यास ॥- गुण, सम आणि मित्र असतां ४ गुण, शत्रु आणि मित्र असतां १ गुण, आणि दोघेही परस्परांशीं सम असतां ३ गुण घ्यावेत. वराचा देवगण आणि वधूचा मनुष्य गण असेल तर ६ गुण, ह्याच्या उलट ह्मणजे कन्येचा देवगण आणि वराचा मनुष्य गण असतां ५ गुण. दोघांचा एकगण असेल तर ६ गुण. वराचा राक्षस गण आणि कन्येचा देवगण असेल तर १ गुण. ह्यांशिवाय दुसऱ्या प्रकारचे गुण नाहींत ॥ ११ ॥

**अथ खेचरगुणविचारमाह–एक ईशो यस्मिन् तदेकशं उभयत्र मित्रे यस्मिन् तदुभयमित्रं एकेशं च उभयत्र मित्रं च एकेशोभयमित्रे तयोः शरमिताः पंच गुणा ग्राह्या उभयत्रापि पंच पंच ग्राह्या इत्यर्थः । अर्धं समारातिके सम उदासीनः अरातिः शत्रुः एवं यस्मिन् मेलने तत्समारातिकं तत्र अर्धं एकस्यार्धं गुणाः स्युः रिपुहिते अरिसुहृदि भूमिः एकः द्व्युदासे त्रयः द्वौ उदासीनौ यस्मिन् तत्र त्रयो गुणाः । अनुक्ते गुणाभावः । उक्तं च । यत्रैकाधिपतित्वे च मित्रत्वे गुणपंचकं । चत्वारः सममित्रे च द्वयोः साम्ये त्रयो गुणाः ॥ मित्रवैरे गुणश्चैकः समवैरे गुणार्धकं ॥ परस्परं खेटवैरे गुणः शून्यं समादिशेदिति ॥ अथ गणगुणविचारमाह–नादेव इति । यत्र ना नरो देवगणः वधूर्मनुजा मनुष्यगणा भवति इह रसाः षट् गुणा ग्राह्याः तद्वैपरीत्ये तयोर्वैपरीत्यं तस्मिन् शरमिताः पंच गुणा ग्राह्या एतदुक्तं भवति । यत्र नरो देवगणः वधूर्मनुष्यगणाऽत्र पंच गुणा ग्राह्या इत्यर्थः । षट् साम्ये गणसाम्ये षड्गुणा ग्राह्याः । यत्र असुरपपूरुषः दैत्यगणः पुरुषः सुरवधूः देवगणा स्त्री भवति अत्रैकः एकः गुणो ग्राह्यः अन्यत्र उक्तादन्यत्र खं शून्यं गुणो ग्राह्यः स्यात् ॥ ११ ॥**

टीकार्थ—आतां ग्रहाचा गुणविचार सांगतो–दोघांच्या राशीचे स्वामी मित्र असतील तर त्याचे गुण ५ आहेत. ह्मणजे दोघांस प्रत्येकीं पांच पांच गुण जाणावेत. ते स्वामी उदासीन आणि शत्रु असतील तर त्यांचा ॥ अर्धा गुण जाणावा. एक मित्र आणि एक शत्रु असे असतील तर १ एक गुण जाणावा. दोघेहीं उदासीन असतील तर ३ तीन गुण जाणावेत. ज्याविषयीं सांगितलें नाहीं तेथें गुण मुळींच नाहीं. असें सांगितलें आहे कीं, जेथें दोघां राशीचा एक स्वामी असतो तेथें आणि दोघे स्वामी मित्र असतील तर ५ गुण समजावेत. दोघे स्वामी सम आणि मित्र असतील तर ४ गुण जाणावेत. दोघांचें समत्व असेल तर ३ गुण जाणावेत. मित्र आणि वैर असतील तर एक गुण, जाणावा. सम आणि वैर असतील तर ॥- अर्धा गुण जाणावा. दोघे परस्परांचे वैरी असतील तर शून्य गुण जाणावा. आतां गणांचे गुणांचा विचार सांगतो–जेथें वर देवगणाचा आणि वधू मनुष्य गणाची तेथें ६ गुण जाणावेत. त्याच्या उलट असेल ह्मणजे वधूचा देव गण आणि वराचा मनुष्य गण असेल तेथें ५ गुण जाणावेत. दोघांचा गण एकच असेल तर ६ गुण आहेत. जेथें वराचा राक्षस गण आणि वधूचा देवगण असेल तर तेथें १ एक गुण जाणावा. ह्या सांगितल्याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं मुळींच गुण नाहीं ॥ ११ ॥

कूटाचे व नाडीचे गुण.

दुष्कूटे यदि योनिमैत्रमबलादूरं तदांभोधयः ।
नो चेत्खं त्वनयोर्यदैकमिह भूर्भांध्र्यैक्यके खं गुणः ॥
सत्कूटे वरदूरता भरिपुता षड्भिन्नराश्यैकभे ।
पंचान्यत्र सुकूटके च गिरयोऽथो नाडिभेदे गजाः ॥ १२ ॥

॥ इति घटितम् ॥

श्लोकार्थ—योनि मैत्री, स्त्री दूरता असून जरी दुष्कूट असेल तर ४ गुण जाणावेत. योनि मैत्री आणि स्त्री-दूरता हीं दोन्ही नसतील तर गुण मुळींच नाहीं. दोहोंपैकीं एक असेल तर १ गुण जाणावा. दोघांचें नक्षत्र आणि चरण एक असेल तर मुळींच गुण नाहीं. शुभ कूट असून जर नृदूरता आणि योनि वैर असेल तर ६ गुण जाणावेत. दोघांच्या राशि भिन्न आणि नक्षत्र मात्र एक असेल तर ५ गुण जाणावेत. ह्याशिवाय दुसऱ्या सर्व शुभ कूटाचे ७ गुण घ्यावेत, दोघांची नाडी भिन्न असतां ८ गुण जाणावेत ॥ १२ ॥

अथ कूटगुणविचारमाह–दुष्कूट इति । दुष्कूटे द्विर्द्वादशादौ सति यदि योनिमैत्रं अबलादूरं स्त्रीदूरं स्यात् तदांभोधयश्चत्वारो गुणा ग्राह्या नो चेद्यदि योनिमैत्रमबलादूरं न स्यात्तदा खं शून्यं गुणः स्यात् । अनयोर्योनिमैत्रस्त्रीदूरयोर्मध्ये यत्र एकं स्यात् इह भूरेको गुणः भांघ्र्यैक्यके एकनक्षत्रैकचरणे खं शून्यं गुणो ग्राह्यः । अथ सत्कूटे सति यदि वरदूरता भरिपुता उभयोर्वैरं योनिवैरं च स्यात्तदा रसाः षट् गुणा ग्राह्या भिन्नराश्यैकभे पंच भिन्नराशि च एकभं च अत्र पंच गुणा ग्राह्या उर्वरिते सुकूटे गिरयः सप्त गुणा ग्राह्याः । अथ नाडीविचारमाह–अथो नाडीति । नाडिभेदे गजा अष्टौ गुणा ग्राह्या अनुक्ते गुणाभावः ॥ १२ ॥ इति मुहूर्तमार्तंडे घटितम्॥

टीकार्थ—आतां कूट गुणांचा विचार सांगतो–द्विर्द्वादश इत्यादि दुष्कूट असूनही जर योनि मैत्री आणि स्त्रीदूर असेल तर तेथें ४ गुण घ्यावेत. आणि हीं दोन्ही नसून नुसतें दुष्कूट असेल तर मुळींच गुण नाहीं. ह्या दोहोंपैकीं ह्मणजे योनि मैत्री आणि स्त्री दूर ह्यांपैकीं एक असेल तर एक गुण जाणावा. दोघांचें नक्षत्र आणि चरण एक असेल तर मुळींच गुण नाहीं. आतां सत्कूट असून जर नृदूरता असेल, व दोघांचें वैर असेल; अर्थात् योनि वैर असेल तरी सुद्धां ६ गुण घ्यावेत. राशी भिन्न असून नक्षत्र एक असेल तर ५ गुण घ्यावेत. नुसतें सत्कूटच असेल तर ७ गुण घ्यावेत. आतां नाडी विचार सांगतो–दोघांची नाडी भिन्न असेल तर ८ गुण जाणावेत. ज्याविषयीं सांगितलें नाहीं त्याविषयीं गुण मुळींच नाहीं ॥ १२ ॥ या प्रमाणें मुहूर्त मार्तंडांतील घटित प्रकरण समाप्त झालें.

घटिताचे गुणमेलनाचें कोष्टक पुढील पृष्ठावर दिलें आहे.

## घटिताचे गुणमेलनाचें कोष्टक.

| | | रा. | मे. | मे. | मे. | वृ. | वृ. | वृ. | मि. | मि. | मि. | क. | क. | क. | सिं. | सिं. | सिं. | कं | कं. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | भा. | १ | १ | ·।· | ·।।।· | १ | ·।।· | ·।।· | १ | ·।।।· | ·।· | १ | १ | १ | १ | ·।· | ·।।।· | १ |
| रा. | भा. | न. | अ. | भ. | कृ. | कृ. | रो. | मृ. | मृ. | आ. | पु. | पु. | पु. | आ. | म. | पू. | उ. | उ. | ह. |
| मे | १ | अ. | ३६ | ३३ | ३२ | २४ | २१ | २२ | २७ | २८ | १९ | २३।। | ३१।। | २८ | २७।। | २१।। | ३२ | ११ | १२ |
| मे. | १ | भ. | ३४ | ३६ | ३४ | ३१ | २२।। | १४।। | १९ | २६ | २७ | ३१।। | ३३।। | २५।। | ३२।। | २४।। | ३२।। | २१।। | २० |
| मे | ·।· | कृ. | ३२।। | ३२ | ३६ | ३३ | १० | १६।। | २० | २२ | २१ | २५ | २३।। | २३।। | २३ | २६।। | २६।। | १५।। | १५।। |
| वृ. | ·।।। | कृ. | १८।। | १८।। | ३६ | ३६ | ३४ | ३२।। | २५।। | २५।। | २५।। | २२ | २४ | २० | १८ | २३।। | ३१।। | २८ | २८ |
| वृ. | १ | रो. | २३।। | २४।। | १३ | ३४ | ३६ | ३४।। | ३२।। | ३२ | २९ | २६ | १८ | १२ | १० | २४ | २७।। | ३४ | ३४ |
| वृ. | ·।।· | मृ. | २४ | ११ | ११।। | २२।। | ३६ | ३६ | ३५ | ३३ | २९।। | २६ | २० | २१ | १८ | १५ | २५ | ३१ | ३४ |
| मि. | ·।।· | मृ. | २८ | २९ | २३।। | २७।। | ३५ | ३६ | ३६ | ३४ | ३१ | २०।। | १३।। | १३।। | २२।। | १८ | २९।। | ३१।। | ३२।। |
| मि. | १ | आ | २० | १८ | २३ | ३३।। | ३२।। | ३४ | ३३ | ३६ | ३४ | २३ | २३।। | १५।। | २३।। | १९ | २१ | २४ | २४ |
| मि | ·।।। | पु. | ३० | २७।। | २३ | २७।। | ३०।। | ३१।। | ३०।। | ३४ | ३६ | ३४ | २३ | १६।। | २१।। | २५।। | २०।। | २३ | २४।। |
| क. | ·।· | पु. | २३।। | २९।। | २५।। | २२ | २५ | २६ | ३०।। | १३ | ३३ | ३६ | ३४ | ३२।। | २२ | २६ | २२ | १८।। | १८।। |
| क. | १ | पु. | ३० | २४ | २७ | २४ | २१ | १९ | १३।। | २४ | २३ | ३४ | ३६ | ३४ | २५ | २१ | ३० | १६।। | २६।। |
| क. | १ | आ. | २६ | २६ | २२।। | १३ | १२ | २० | १४।। | १५।। | १५।। | ३२ | ३४ | ३६ | २०।। | २१ | १४ | २१।। | २०।। |
| सिं. | १ | म. | २२ | २८।। | ३१ | १७ | १० | १८ | २१।। | २२।। | २०।। | २२ | २५ | २२।। | ३६ | ३६ | ३२ | १८।। | १५।। |
| सिं | १ | पू. | २६ | २४।। | ३२।। | २० | २४ | १६ | १९।। | २८ | २६।। | २९ | २३ | १९ | ३६ | ३६ | ३४ | ३० | २१।। |
| सिं. | ·।· | उ. | १७ | ३२ | ३२ | २० | २६ | २५ | २८ | २०।। | २०।। | २३ | ३१ | ३१ | ३२ | ३४ | ३६ | ३३ | १५ |
| कं. | ·।।। | उ. | १३ | ३२ | १६ | ३४ | ३४ | ३२।। | ३१।। | २३।। | २३।। | २० | २८ | २३।। | २३।। | २१ | ३४ | ३६ | ३५ |
| कं. | १ | ह. | १३ | २० | २७।। | २८ | ३३ | ३४ | ३३ | ३२।। | २३।। | २०।। | २८।। | २३।। | २४।। | २८।। | २० | ३५ | ३६ |
| कं. | ·।।· | चि. | १४ | ७ | २० | ३१ | २८ | २० | १९ | २६ | २४।। | २१।। | १३।। | २७।। | २९।। | १५।। | १४।। | ३०।। | ३३ |
| तू. | ·।।· | चि. | २३।। | १६ | १९।। | २४।। | २१ | १३ | २० | २७ | ३५।। | २२ | १३ | २७ | २५ | ११।। | १७।। | १८ | ३४ |
| तू. | १ | स्वा. | ३०।। | २९।। | १७।। | १२।। | १५।। | २७ | ३४ | ३३ | ३४।। | २२।। | २८ | १५ | १२।। | २४।। | २५।। | २६।। | ३४ |
| तू. | ·।।। | वि. | २२।। | २४।। | २१।। | १६।। | ११।। | ९।। | ३५।। | २७।। | २१ | २२।। | २२।। | १९।। | १७।। | १९।। | १७।। | १८।। | २५।। |
| वृ. | ·।· | वि. | १७।। | २५।। | १५।। | २० | १५ | २३ | १३ | १३।। | १३।। | २० | २० | ११।। | ११।। | २३।। | ११।। | १८।। | १९ |
| वृ. | १ | अ. | २४।। | १९।। | १९।। | २४।। | २८।। | २१।। | ११ | १६ | २०।। | १७ | १९ | २१ | २४ | २० | २८ | २७ | २० |
| वृ. | १ | ज्ये | १२ | १९।। | २४।। | २९।। | २३।। | २३।। | १३ | ३ | ५ | ११।। | २१ | २६ | २३ | २०।। | १५।। | १२ | १२ |
| ध. | १ | मू. | २८ | २८ | ३३ | २० | १४ | १४ | २१ | १३ | १३ | १०।। | १९।। | २६ | ३२।। | २६।। | १७ | १६।। | १३ |
| ध. | १ | पू. | ३४ | २६ | ३४।। | १५ | २० | १२ | १९ | २७ | २७ | २४।। | १६।। | २८।। | ३२।। | ३४।। | ३२ | ३२।। | २० |
| ध. | ·।· | उ. | ३२ | ३३ | ३४ | १६ | ११।। | १८ | २४ | २७ | २७ | २४।। | २४।। | १०।। | २३ | ३२ | ३२।। | १२ | १८।। |
| म. | ·।।। | उ | २८ | २६।। | १५।। | २६ | २३ | २९।। | २१।। | २३।। | २३।। | २८ | २८ | १४ | १६ | २०।। | २०।। | २७ | २७ |
| म. | १ | श्र. | २८ | २७ | २५ | २१ | २१ | २४ | २५ | २२।। | २३।। | २८ | २८ | १५ | १३ | १८ | १९।। | २६ | २७ |
| म. | ·।।· | ध. | २१ | १२ | २६ | ३१ | २८ | २० | ११ | १८ | १६।। | २० | १२ | २६ | २६ | १५ | १२ | १८।। | २० |
| कुं. | ·।।· | ध. | २१ | १२ | २६ | ३१।। | २८ | २० | १२ | १९ | १७।। | १४ | १६ | २० | २५ | ११।। | १८।। | १४।। | २९ |
| कुं. | १ | श. | १६ | २२ | २८ | २२।। | २६।। | २८ | २० | १२ | १२ | ८।। | १५ | २१ | २५।। | १९।। | ११।। | ७।। | १०।। |
| कुं | ·।।। | पू. | १९ | २६ | २० | ३४ | ३२।। | ३२।। | २४।। | १७ | १७ | १३।। | २१।। | १४ | १९।। | २५।। | १६।। | १२।। | १५ |
| मी. | ·।· | पू. | २१।। | २९।। | २३।। | ३३।। | २७ | २७ | २७ | २७ | १८ | १७ | २६ | ७।। | ३० | २३ | १४ | १८।। | १८ |
| मी. | १ | उ. | ३१।। | २३।। | ३१।। | ३१।। | २७ | १९ | १९ | २७ | २८ | २६ | १९ | २० | ३० | १५।। | २५ | २९ | २८ |
| मी. | १ | रे. | ३२ | ३० | १८।। | १८।। | १८ | २७ | २७ | ३६ | २६।। | २४।। | २३ | १३ | १८।। | २२ | २२ | २६ | २७ |

## घटिताचे गुणमेलनाचें कोष्टक.

| क. | तू. | तू. | तू. | वृ. | वृ. | वृ. | ध. | ध. | ध. | म. | म. | म. | कुं. | कुं. | कुं. | मी. | मी. | मी. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| -॥· | ·॥· | १ | ·।।।· | ·।· | १ | १ | १ | १ | ·।· | ·।।।· | १ | ·॥· | ·॥· | १ | ·।।।· | ·।· | १ | १ | |
| चि. | चि. | स्वा. | वि. | वि. | अ. | ज्ये. | मू. | पू. | उ. | उ. | श्र. | ध. | ध. | श. | पू. | पू. | उ. | रे. | |
| २४ | २२॥ | २९ | २३॥ | १९॥ | २४ | १५ | २१ | ३३ | ३१ | ३६ | २७ | २१ | २१ | १६ | १० | २२ | ३१ | ३४ | १ |
| ५ | १३॥ | १९॥ | २२॥ | १८॥ | १५॥ | १९॥ | ३४ | २६ | ३४ | २८॥ | २७॥ | ११ | ११ | २७ | २५ | ३०॥ | २४ | ३२ | २ |
| १९॥ | २७॥ | १५॥ | १९॥ | १६॥ | १८॥ | २७॥ | ३३॥ | २८ | २० | १४॥ | २४ | २५ | २६ | २७ | २० | २५॥ | २६॥ | १०॥ | ३ |
| २८ | २० | ७॥ | १२॥ | २०॥ | १६॥ | ३०॥ | २२॥ | २३॥ | ९॥ | १४ | २०॥ | ३१॥ | ३०॥ | ३१॥ | २४॥ | २१॥ | २१॥ | १४ | ४ |
| ३४ | १७ | १३॥ | ६॥ | १४ | २९॥ | २४॥ | १५ | ३१ | १२॥ | १८ | २६ | ३४॥ | ३३ | ३१॥ | ३१ | २८ | २८ | ३० | ५ |
| २१ | १० | २३ | १५॥ | २३॥ | २१॥ | २५॥ | १६ | १२ | १८ | २३॥ | ३४ | २१ | २० | २८ | २०॥ | २७ | २९ | २८ | ६ |
| २१ | २१ | ३४ | ३४॥ | २४ | ११ | १५॥ | २३ | १९ | १८ | २१॥ | २६ | १३ | १४ | २९ | २४॥ | २७ | २९ | २८ | ७ |
| ३४ | ३४ | ३४ | ३४ | २१॥ | १७ | ४ | १४ | २८ | २८ | २४॥ | २९ | १९ | २० | १३ | ८ | २०॥ | २८ | २८ | ८ |
| २७॥ | २७॥ | ३४ | २९ | १६॥ | २१॥ | ७ | १५ | २७ | २७ | २३॥ | २४॥ | १८ | १९॥ | १४ | १० | १९ | २८ | २८ | ९ |
| २२॥ | २२ | २८ | २३ | २१ | २६ | ११॥ | १०॥ | २३॥ | २६ | २६ | २७ | २१ | १४ | ८॥ | ११॥ | २० | ३६ | २५ | १० |
| १२॥ | १२ | २७ | २२॥ | २१ | १८ | ११ | १९॥ | १४॥ | २२॥ | २६ | २७ | २३ | ६ | १५ | १०॥ | ८ | १८ | २७ | ११ |
| २८॥ | २७ | ६ | १० | १६॥ | २० | २६ | २५ | १७॥ | ९॥ | २३ | २३ | २६ | ९ | २० | १३ | २४ | ३१ | १३ | १२ |
| २८॥ | २४॥ | १० | १९ | ३२॥ | २४॥ | ३२ | ३२॥ | १६॥ | १७ | ४ | ४ | १९ | २४॥ | २४॥ | १८ | १८ | १८ | १३॥ | १३ |
| १४ | १६॥ | २४॥ | १८॥ | २४॥ | २२॥ | ३०॥ | ३२॥ | २४॥ | ३२॥ | १९॥ | १८ | ५ | ९॥ | १८॥ | २४॥ | २४ | १६ | २४ | १४ |
| १९॥ | १५॥ | २५॥ | १५ | २१॥ | ३०॥ | २२॥ | २३ | ३२॥ | ३२॥ | १९॥ | १९ | १२ | १६॥ | १०॥ | १०॥ | १५ | २६ | २४ | १५ |
| ३० | २०॥ | ३०॥ | २२॥ | १८ | २७ | १३ | २४ | २९॥ | २९॥ | १६ | २६ | १८ | १६ | ९॥ | ११ | १८ | ३० | २८ | १६ |
| ३३ | २६ | ३२॥ | २४॥ | २० | २७ | १४ | १५ | २७ | २६॥ | २५ | २६ | २१ | १७ | १०॥ | १३ | १८ | ३० | २८ | १७ |
| ३६ | ३३ | २६ | ३०॥ | २४ | ११ | २५ | २६ | १२ | २२ | १८॥ | १९ | १८ | १९ | २२॥ | १७ | २० | १२ | २२ | १८ |
| ३४ | ३६ | ३२॥ | ३२॥ | ३२॥ | ७॥ | ११॥ | २१ | १२ | २२ | २६॥ | २६ | २४ | २४ | ३०॥ | २६ | २४ | ५ | ५ | १९ |
| २८ | ३३ | ३६ | ३६ | २३ | २०॥ | २७॥ | २३ | २७ | १८ | २३॥ | २१ | २७ | २७ | २८ | ३४ | २० | २१ | १३ | २० |
| ३२॥ | ३२॥ | ३३ | ३४ | ३६ | १७॥ | २१॥ | २६ | २० | १४ | १८ | १६ | ३० | ३० | ३१ | २० | १५॥ | १४॥ | ७ | २१ |
| २६ | १९॥ | २६॥ | २६ | ३२ | ३६ | ३१॥ | २८॥ | २३ | १७॥ | १३ | १५॥ | २४॥ | २४॥ | २५॥ | ११॥ | २६ | १५ | १९॥ | २२ |
| १२ | ८ | ३२ | १८ | ३३ | ३६ | ३६ | २४॥ | ३२॥ | ३०॥ | २६ | ३१ | १६ | ११ | २१ | २४॥ | ३१ | २५ | ३४ | २३ |
| २५ | २१॥ | १६॥ | २१॥ | २१॥ | ३६ | ३६ | ३६ | २७ | २५ | २१॥ | २५॥ | २१॥ | २४॥ | २६ | १०॥ | १६॥ | १८ | २८ | २४ |
| २७ | २७ | २६ | २७ | ३२॥ | १४॥ | २४ | ३४ | ३६ | ३२॥ | २२॥ | २६॥ | ३०॥ | २७ | २०॥ | १३॥ | १६ | २६ | २८ | २५ |
| १२ | १८ | १९ | २६ | ३१॥ | ४॥ | ३२॥ | ३४ | ३६ | ३६ | २४ | ३४ | १६॥ | १३॥ | २३॥ | २७ | ३०॥ | १७॥ | ३२॥ | २६ |
| २१ | २७ | १९ | १९ | २३॥ | ३२ | ३२॥ | ३२॥ | २४ | ३६ | ३६ | २६ | ३२॥ | ३३ | २२॥ | २९॥ | ३२ | ३२ | २४ | २७ |
| १७ | ३१॥ | ३१॥ | २३॥ | १९॥ | २७॥ | २२ | २८॥ | २५ | ३३ | ३६ | ३६ | ३२ | ३१॥ | १८॥ | ३१॥ | ३० | ३० | २२ | २८ |
| २० | २७ | २२॥ | १७॥ | १० | २७ | २३ | १९॥ | २८ | २७ | ३४ | ३६ | ३६ | ३६ | १९॥ | २९॥ | २७॥ | २९॥ | २२॥ | २९ |
| १७ | २४ | २९ | ३०॥ | २७ | १३ | २७ | २४॥ | ९॥ | १८ | ३२ | २७ | ३४ | ३६ | २५ | २५ | २४ | २४ | २२॥ | ३० |
| १७ | २५ | २७ | ३१॥ | २६ | १२ | २६ | २२॥ | १५॥ | २४॥ | २६॥ | २९ | ३१ | ३४ | ३६ | ३२॥ | २७॥ | ८ | १५॥ | ३१ |
| २५ | २३ | २८ | २३ | ७ | २१ | १९ | ३२॥ | २४ | २४ | २६ | १८॥ | २५ | ३३॥ | ३६ | ३६ | १८ | १०॥ | २७॥ | ३२ |
| १७॥ | ३१ | ३३ | ३३ | २७॥ | २७॥ | ३४ | १६॥ | १९॥ | ३०॥ | ३२॥ | २३॥ | १८॥ | ३२॥ | ३३ | ३३ | ३६ | ३४ | २१॥ | ३३ |
| २० | १३ | २०॥ | १४॥ | २७ | २६ | १३ | २३॥ | ३०॥ | ३१ | २९॥ | ३०॥ | ३१ | १७॥ | १० | १७॥ | ३४ | ३६ | ३०॥ | ३४ |
| ११ | ५ | २१ | १३॥ | २६ | १९ | ३४ | ३१॥ | २३॥ | ११॥ | २९॥ | २१॥ | २२ | ८॥ | १७॥ | २० | ३३ | ३६ | ३६ | ३५ |
| १२ | १८ | १२ | ८ | १८॥ | २७ | २९ | २८ | ३० | २२॥ | २९॥ | २३ | २९॥ | १७॥ | १७॥ | २०॥ | ३०॥ | ३४ | ३४ | ३६ |

## विवाहकाल.

स्त्रीणामष्टमवर्षतस्त्रिषु नृणां तीर्णव्रतानामयु- ।
क्ष्वब्देष्वत्र च राधमाघयुगयोर्मार्गे विवाहः शुभः ॥
ज्येष्ठं पूर्वजयोस्त्यजेद्धिमरुचिं ज्ञेज्योनखेटान्वितम् ।
यन्मासादिजनुर्भवं प्रथमके गर्भे त्यजेन्नानुजे ॥ १३ ॥

श्लोकार्थ—पुरुषाचा विवाह करण्याचा काळ असा कीं, वेद–व्रतें, झाल्यावर समावर्तना नंतर विषमवर्षी करावा, आणि स्त्रियांचा जन्मापासून ८–९–१० हा काळ मुख्य आहे. वैशाख, ज्येष्ठ,माघ, फाल्गुन, मार्गशीर्ष हे पांच महिने विवाहाला शुभ आहेत. वधू व वर दोघे पहिल्या गर्भांत झालेलीं असतील तर ज्येष्ठ मास विवाहास वर्ज्य आहे. बुध आणि गुरु ह्यांशिवाय दुसऱ्या ग्रहांनीं युक्त असलेला चंद्र सोडावा. पूर्वीच्या त्याज्य प्रकरणांत सांगितलेलें जन्म मासादि जें अशुभ आहे तें पहिल्यानें गर्भांत झालेल्यांला सोडावें, कनिष्ठाला सोडण्याचें कारण नाहीं ॥ १३ ॥

अथ स्त्रीणां विवाहकालमाह–स्त्रीणामिति । स्त्रीणामष्टमवर्षतः सकाशात् त्रिषु वर्षेषु विवाहः शुभः स्यात् अष्टमनवमदशमेषु शुभः स्यादित्यर्थः । तथा च संवर्तः । अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा च रोहिणी । दशवर्षा भवेत्कन्या द्वादशे वृषली मतेति ॥ गौरीदानान्नागलोकं वैकुंठे रोहिणीं ददत् । कन्यादानाद्ब्रह्मलोकं रौरवं तु रजस्वलेति ॥ रजस्वलेति वृषलीपर्यायः । तथा च कारिकायामुक्तं । षडब्दमध्ये नोद्वाह्या कन्या वर्षद्वयं यतः । सोमो भुंक्ते ततस्तद्वद्गंधर्वश्च तथाऽनल इति ॥ अस्य वाक्यस्य सहायिनी श्रुतिरपि । सोमः प्रथमो विविद इत्युपक्रम्य सोमोददद्गंधर्वाय गंधर्वो दददग्नय इत्यंता । नन्वस्य विरोधो ब्रह्मपुराणे गौतमीमाहात्म्ये भानुतीर्थवर्णने विष्टिभानुसंवादे दृश्यते । भानुरुवाच । चतुर्थाद्वत्सरादूर्ध्वं यावन्न दशमात्ययः । तावद्विवाहः कन्यायाः पित्रा कार्यः प्रयत्नत इति ॥ सत्यं । अत्र पुराणवाक्यं शूद्रादिविषयं न श्रौतस्मार्तब्राह्मणादिविषयं इत्यविरोधः सप्तमवर्षं विषमत्वान्नारदादिभिः स्त्रीविवाहे नांगीकृतं तस्माच्छास्त्रतत्ववेदिनाऽऽचार्येण सर्ववर्णानामविरुद्धमेवोक्तं स्त्रीणामष्टमवर्षतस्त्रिष्विति । कथितकालादूर्ध्वं कदाचिद्वरालाभनिमित्तादौ समवर्षेषु द्वादशचतुर्दशषोडशेषु विवाहो ग्रंथांतरे उक्तः । कालनिर्णयदीपिकाविवरणे स्वयंवरार्थं कालद्वयमुक्तं जीवत्पितृकाया ऋतौ वर्षत्रयानंतरं स्वयंवरकालः । अदातृकाया अपि ऋतौ वर्षत्रयानंतरं स्वयंवरकालः । अदातृकाया इत्येतत्सर्ववर्णसाधारणं । कन्याप्रदातारः कालनिर्णयदीपिकायामुक्ताः । पिता पितामहो भ्राता माताबंधुर्यदा नहि । ऋतौ वर्षत्रयादूर्ध्वं कन्या कुर्यात्स्वयंवरमिति ॥ बौधायनोऽप्याह–वर्षाणि त्रीण्यृतुमती कांक्षेत पितृशासनं । ततश्चतुर्थे वर्षे तु विंदेत सदृशं पतिमिति । अथ पुंसां विवाहकालमाह–नृणामिति । नृणां तीर्णव्रतानां कृतव्रतविसर्गाणां अयुग्मेषु विषमेषु अब्देषु वर्षेषु विवाहः शुभः स्यात् । नुर्विशेषे उक्तवर्षेषु कर्तव्य इत्याह–अत्र राधमाघयुगयोः अत्र विषमवर्षेषु राधो वैशाखः माघः प्रसिद्धः अनयोर्युगे युगले राधयुगं वैशाखज्येष्ठौ माघयुगं माघफाल्गुनावित्यर्थः । मार्गे मार्गशीर्षे विवाहः शुभः स्यात् । एते पंच मासा बहुसंमताः । एषु ज्येष्ठं ज्येष्ठमासं पूर्वजयोः प्रथमजातयोः द्वयोस्त्यजेत् अर्थादेकतरे ज्येष्ठे सति न त्यजेत् । दोषांतरमाह–हिमरुचिं चंद्रं ज्ञेज्योनखेटान्वितं बुधगुरुरहितान्यग्रहयुक्तं पापग्रहशुक्राणामन्यतमयुक्तं त्यजेदनिष्टफलश्रवणात् । मासाद्यं जनिसंभवमिति त्याज्यप्रकरणोक्तं यत्तस्य विशेषनिर्णयमाह–यन्मासादीति । स्पष्टार्थं । नारदः । न जन्ममासे नक्षत्रे न जन्मदिवसेऽपि वा । आद्यगर्भे सुतस्यापि दुहितुर्वा करग्रह इति ॥ १३ ॥

**टीकार्थ—**आतां स्त्रियांच्या विवाहाचा काळ सांगतों–स्त्रियांना आठवर्षांपासून तीनवर्षांपर्यंत म्हणजे ८–९–१० अशीं तीन वर्षे शुभकाळ आहे.तेंच संवर्तामध्यें सांगितलें आहे कीं, आठ वर्षांची स्त्री गौरी या नांवाची असते. नऊवर्षांची रोहिणी या नांवाची असते, दहावर्षांची कन्या ह्या नांवाची असते, बारा वर्षांची स्त्री वृषली म्हणजे शूद्रीण समजावी. गौरीचें दान केल्यापासून नाग लोकाची प्राप्ति होते, रोहिणीचें दान केल्यापासून वैकुंठ लोकाची प्राप्ति होते. कन्येचें दान केल्यापासून

ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. रजस्वलेचें दान केल्यानें रौरव नरकाची प्राप्ति होते. रजस्वला ह्मणजे वर सांगितलेली वृषली समजावी. तेंच कारिकेंत सांगितलें आहे कीं, सहावर्षांपर्यंत कन्येचा विवाह करूं नये कारण कीं, दोन वर्षांपर्यंत चंद्रमा भोगीत असतो,पुढें दोनवर्षे पर्यंत गंधर्व भोगीत असतो,त्या पुढें दोनवर्षे पर्यंत अग्नि भोगीत असतो.ह्या वाक्याला साहाय्य देणारी ह्मणजे मूळ भूत प्रमाण श्रुतिही आहे, ती अशी कीं, चंद्रमानें प्रथम भोगली नंतर त्या चंद्रानें गंधर्वाला भोगण्याकरितां दिली. नंतर गंधर्वानें अग्नीला भोगण्या करितां दिली अशी आहे. आतां अशी शंका येते कीं,ब्रह्मपुराणांत गौतमी महात्म्यामध्यें भानुतीर्थवर्णनाचेवेळीं विष्टिभानु ह्यांचा संवाद झाला असतां भानु सांगतो कीं, चवथ्यावर्षापासून तों दहावर्षांपर्यंत कन्येचा विवाह बापानें मोठ्या प्रयत्नानें करावा.हें ह्मणणें खरें आहे परंतु हें पुराण वाक्य शूद्रादिकांविषयीं आहे,श्रौतस्मार्तकर्माधिकारी ब्राह्मण, क्षत्रियादि विषयक नाहीं ह्मणून त्याचा आपल्या संवर्तस्मृतीला विरोध नाहीं. सातवें वर्ष विषम असल्यामुळें नारदादिकांनीं स्त्रीचे विवाहास घेऊं नये असें ह्मटल्यामुळें तें त्याज्य आहे. ह्मणूनच शास्त्राचें तत्व जाणणाऱ्या आचार्यानें सर्व वर्णांना विरुद्ध नाहीं असा ८–९–१० वर्षांचा काळ सांगितला. ह्या सांगितलेल्या ८–९–१० ह्या काळाचें उल्लंघन उत्तम वर न मिळाल्यामुळें कदाचित् झालें तर समवर्षी ह्मणजे १२–१४–१६ ह्या वर्षी विवाह करावा, असें दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे. कालनिर्णयदीपिका विवरणांत स्वयंवरा करितां दोन काळ सांगितले आहेत.आईबाप जिवंत असलेल्या कन्येस ऋतुप्राप्त झाल्यावर तीनवर्षे पर्यंत बापाची लग्नाची वाट पाहून मग कन्येनें आपल्या इच्छेनें वर पसंत करावा. ज्या कन्येचें दान करणारा ह्मणजे दाता कोणी नाहीं, तिनें ऋतु आल्या नंतर तीनवर्षपर्यंत वाट पाहून मग स्वयंवर करावा. असे दोन काल सांगितले आहेत. जिचा दाता नाहीं हें सर्व वर्णांना साधारण वचन आहे. कन्येचें दान करणारे कोण कोण अधिकारी आहेत हें कालनिर्णय दीपिकेंत सांगितलें आहे तें असें कीं, बाप, बापाचा बाप, भाऊ, आई, बंधु ह्मणजे चुलतबंधु, आतेबंधु, मामेबंधु वगैरे इतके दाते जर नसतील तर ऋतु येऊन तीन वर्षे झाल्यावर मग कन्येनें स्वतःच वर पाहून स्वयंवर करावा. बौधायन ही सांगतो कीं, ऋतु आल्यावरही कन्येनें बापाची तीनवर्षे पर्यंत वाट पाहावी, बापानें विवाह नाहींच केला तर मग चवथ्यावर्षी कन्येनें आपल्या मनासारखा पति स्वयंवरानें वरावा. आतां पुरुषांचा विवाह काल सांगतों–व्रतें संपल्यावर विषमवर्षी पुरुषाचा विवाह करणें शुभ आहे,पुरुषाविषयीं सांगितलेल्या वर्षी विवाह करावा. त्यांतील विशेष सांगतों–विषमवर्षामध्येंही वैशाखयुग्म ह्मणजे वैशाख आणि ज्येष्ठ, माघ युग्म ह्मणजे माघ आणि फाल्गुन हे चार महिने आणि मार्गशीर्ष ह्या पांच महिन्यांत विवाह करणें शुभ आहे. हे पांच महिने सर्व संमत आहेत. ह्यां पैकीं ज्येष्ठ महिना प्रथम झालेल्या पुत्र आणि कन्येस वर्ज्य आहे. अर्थात् एक पुरुष किंवा कन्या ज्येष्ठ असेल तर ज्येष्ठमास सोडण्याचें कारण नाहीं. दुसरा दोष सांगतों–बुध आणि गुरु ह्यां शिवाय, दुष्टपापग्रहांनीं आणि शुक्र ह्यानीं युक्त झालेला चंद्र सोडावा. कारण त्याचें अनिष्टफल आहे, असें वचनावरून ऐकण्यांत येत आहेत. " मासादं जनिसंभवं " ह्या त्याज्य प्रकरणांत जें सांगितलें त्याचा निर्णय सांगतों–जें मासादि त्याज्य असेल तें वर सांगितल्या प्रमाणें समजावें नारद सांगतो कीं, पहिल्या गर्भांतला पुत्र अथवा कन्या कोणी असो, त्याच्या जन्ममासीं, जन्मदिवशीं, जन्मनक्षत्रीं विवाह करूं नये ॥ १३ ॥

## विवाहनक्षत्रें आणि वेध.

मूलांत्यार्कमघास्थिरेंद्वनिलयुङ्मैत्रं विवाहे शुभम् ।
पापत्यक्तमनिंदुभुक् खलयुतं भोग्यं च विद्धं च भम् ॥
विश्वेंद्वोर्यमभित्रयोर्द्विकभयोः पैत्र्यर्क्षहर्योर्मिथो- ।
ऽन्त्यार्यम्णोः पुनरस्रपोर्वरुणभस्वात्योरुभाहस्तयोः ॥ १४ ॥

श्लोकार्थ—विवाह करण्यास योग्य अशीं अकरा नक्षत्रें आहेत तीं अशीं कीं, १ मूळ, २ रेवती, ३ हस्त, ४ मघा, ५ रोहिणी, ६ उत्तराफ०, ७ उत्तराषा०, ८ उत्तराभा०, ९ मृगशीर्ष, १० स्वाती, ११ अनुराधा हीं होत. हीं नक्षत्रें पाप ग्रहानें युक्त नसावींत परंतु त्या नक्षत्राशीं चंद्राचा योग असावा. तशींच खल ग्रहानें युक्त, भोग्य आणि विद्ध अशीं नक्षत्रें विवाहाला शुभ नाहींत, आतां वेध होणाऱ्या नक्षत्रांचीं जोडपीं अशीं कीं, उत्तराषाढा मृग, भरणी अनुराधा, रोहिणी अभिजित्, रेवती उत्तराफ०, पुनर्वसु मूळ, शततारका स्वाती, उत्तराभा० हस्त ह्या पंच शलाक नक्षत्रांत परस्पर वेध होतो ॥ १४ ॥ मघा मूळ

**अथ विवाहनक्षत्राणि सवेधान्याह—मूलांत्यार्केति। मूलं प्रसिद्धं अंत्यं रेवती अर्कों हस्तः मघा प्रसिद्धा स्थिराणि रोहिण्युत्तरात्रयं इंदुर्मृगः अनिलं स्वाती एभिः सहितं मैत्रं अनुराधा विवाहे शुभं शुभफलदं। अथैतेषूक्ते निंद्यमाह-पापत्यक्तं असत् अनिंदुभुक् चंद्राभुक्तं अशुभं एतदुक्तं भवति पापग्रहत्यक्तं नक्षत्रं चंद्रभुक्तिरहितं न शुभं स्यात् खलयुक्तं पापग्रहयुक्तं भोग्यं विद्धं न शुभं स्यात्। अथ वेधमाह-विश्वेंद्वोः उत्तरामृगयोः यममित्रयोः भरण्यनुराधयोः द्विकभयोः कस्य भे कभे द्वे च ते कभे च द्विकभे रोहिण्यभिजितौ तयोः। पैत्र्यर्क्षहर्योः मघाश्रवणयोः मिथः परस्परं अंत्यार्यम्णोः रेवत्युत्तराफाल्गुन्योः पुनरस्रपोः पुनर्वसुमूलयोः वरुणभस्वात्योः शततारास्वात्योः उभाहस्तयोः उत्तराभाद्रपदाहस्तयोः मिथः परस्परं वेधः स्यात् इत्युत्तरश्लोकेनान्वयः ॥ १४ ॥**

**टीकार्थ—**आतां विवाहाचीं नक्षत्रें वेधसहित सांगतो—१ मूल २ अंत्य ह्म० रेवती ३ अर्क ह्म० हस्त ४ मघा ५ स्थिर ह्म० रोहिणी उत्तरातीन ह्म० ६ उत्तराफा० ७ उत्तराषा० ८ उत्तराभा० ९ इंदु ह्म० मृग १० आनिल ह्म० स्वाती ११ मैत्र ह्म० अनुराधा इतकीं नक्षत्रें विवाहास शुभ आहेत आतां हीं नक्षत्रें पापग्रहांनीं सोडलेलीं असून चंद्राच्या भोगानें रहित नसावींत अर्थात् चंद्रानें भोगलेलीं असावींत. पापग्रहानें युक्त पापांनीं भोग्य आणि पापानें विद्धहीं शुभ नाहींत. आतां वेध सांगतों-विश्व ह्म० उत्तरा इंदु ह्म० मृगशीर्ष ह्या दोहोंचा वेध आहे. यम ह्म० भरणी मित्र ह्म० अनुराधा ह्याचा वेध आहे. दोन कचीं ह्मणजे ब्रह्मदेवाचीं नक्षत्रें ह्म० भरणी आणि अभिजित् ह्यांचा वेध आहे. पैत्र्यर्क्ष ह्म० मघा हरि ह्म० श्रवण ह्याचा वेध आहे. अंत्य ह्म० रेवती अर्यमा ह्म० उत्तराफ० ह्यांचा वेध आहे. पुनर्वसु आणि अस्रप ह्म० मूल ह्यांचा वेध आहे. वरुणभ ह्म० शततारका आणि स्वाती ह्यांचा वेध आहे. उभा ह्म० उत्तराभा० आणि हस्त ह्यांचा वेध आहे. ह्यांचा वेध कसा कसा असतो तो पुढें सांगावयाच्या शलाका चक्रांत आहे ॥ १४ ॥

### वेधनिर्णय.

**वेधोऽयं करपीडने निगदितो नान्येषु तेषु स्मृतः।<br>वेधः सप्तशलाकके शिवदिशः कार्शानवाद्यैर्युते ॥<br>वेधोंत्यादिमयोर्द्विकत्रिमितयोरंघ्र्योर्मिथः सद्ग्रहैः।<br>विद्धे भे चरणं त्यजेत्खलखगैः सर्वं त्विहांघ्रिं क्वचित् ॥ १५ ॥**

**श्लोकार्थ—**मागच्या श्लोकांतील वेध विवाहाला मात्र सांगितला तो अन्यकर्माला घेऊं नये. उभ्या सात रेघांवर आडव्या सात रेघा काढून त्या चक्रांत ईशान्य दिशेपासून कृत्तिकादि सर्व नक्षत्रें मांडून त्या सप्तशलाका चक्रांत होणारा वेध विवाहावांचून सर्व कर्माला सांगितला आहे. ज्या दोन नक्षत्रांचा वेध होतो, त्यांतील एकाच्या प्रथम चरणास ग्रह असतां दुसऱ्याच्या चतुर्थचरणास वेध होतो, आणि दुसऱ्या चरणाला असतां तिसऱ्या चरणाला वेध होतो. शुभ ग्रहांनीं वेध होत असलेल्या नक्षत्राचा विद्ध चरण सोडावा. खलग्रहांनीं वेध होणारें सर्व नक्षत्र सोडावें. अन्य मुहूर्त नसल्यास चरणही सोडावा ॥ १५ ॥

**अथ कर्मविशेषेण वेधनिर्णयमाह-वेधोऽयमिति। अयं वेधः करपीडने विवाहे पूर्वं मुनिभिर्निगदितः नान्येषु अन्येषु शुभकर्मसु अयं वेधो नोक्त इत्यर्थः। तेषु विवाहान्यकर्मसु सप्तशलाकके स्मृतः किंभूते सप्तशलाकके चक्रे शिवदिशः ईशान्याः सकाशात् कार्शानवाद्यैर्युते कृशानुः देवता यस्येति कार्शानवं कृत्तिका सा आद्या येषां तानि तैर्युते ईशान्यादिप्रदक्षिणं कृत्तिकादिनक्षत्रयुक्तमित्यर्थः। विवाहादृते सर्वकर्मसु सप्तशलाकाचक्रे वेधोऽवलोकनीय इति। अथ पादवेधमाह-वेधोंऽत्यादिमयोरिति, अंत्यादिमयोः चतुर्थप्रथमयोः द्विकत्रिमितयोः द्वितीयतृतीयोः अंघ्र्योश्चरणयोः मिथः परस्परं वेधः स्यात्। अथास्य निर्णयमाह—सत्खगैः शुभग्रहैः भे नक्षत्रे विद्धे सति चरणं त्यजेत् खलखगैः पापग्रहैः विद्धे सति सर्वं नक्षत्रं त्यजेदित्यर्थः। इहास्मिन् पापविद्धे क्वचिदन्यमुहूर्तालाभे सति अंघ्रिं चरणं विद्धं त्यजेदित्यर्थः। उक्तं च मांडव्येन। धिष्ण्यं सौम्यग्रहैर्विद्धं पादमात्रं परित्यजेत्। क्रूरैस्तु सकलं त्याज्यमिति वेधविनिश्चय इति। वैद्यनाथः। वेधमाद्यंतयोरंघ्र्योरन्योन्यं द्वितृतीययोः। क्रूरैरपि त्यजेत्पादं केचिदूचुर्महर्षय इति ॥ १५ ॥**

**टीकार्थ**—आतां विशेष कर्माकरितां वेधाचा निर्णय सांगतों–हा चवदाव्या श्लोकांतील पंचशलाकानक्षत्रांचा वेध विवाहामध्यें त्याज्य करावा असें पूर्वीच्या मुनींनीं सांगितलें आहे,दुसऱ्या कोणत्याही शुभकार्यां मध्यें हा वेध शोधावयास सांगितलें नाहीं. विवाहाशिवाय दुसऱ्या कर्माविषयीं सप्तशलका वेध सांगितला आहे तो असा कीं, सात रघा उभ्या व सात रेघा आडव्या काढून मग ईशान्य दिशेपासून कृत्तिका नक्षत्रा पासून प्रदक्षिणेच्या क्रमानें कृत्तिकानक्षत्र घेऊन एकसारख्या वरती सात रेघांवर सात, उजव्या हाताकडच्या सात रेघांवर सात, खालच्या सात रेघांवर सात, डाव्या हाताकडच्य सात रेघांवर सात मिळून २८ अठ्ठावीस नक्षत्रें मांडावीत ह्मणजे सप्तशलाका नक्षत्रांचें चक्र होत त्यावर वेध पहावा. आतां पादाचा वेध सांगतों–तो असा, पहिला आणि चवथ्यापादाचा वेध होतो. दुसऱ्या आणि तिसऱ्या पादाचा वेध होतो. आतां ह्याचा निर्णय सांगतों–शुभग्रहांनीं नक्षत्र विद्ध झालें असेल तर त्या नक्षत्राचा एक चरण सोडावा. आणि पापग्रहांनीं विद्ध असेल तर तें सर्व नक्षत्र सोडावें. आतां कदाचित् पापग्रहांनीं वेध असून दुसरे नक्षत्राचा मुहूर्त न मिळेल तर एक चरण सोडूनही कार्य करावें. हाच अर्थ मांडव्यानें सांगितला आहे कीं, शुभग्रहानी वेधलेलें नक्षत्र असेल त्याचा एक चरण सोडावा. क्रूरांनीं वेधलेलें नक्षत्र असेल तें सर्व नक्षत्र सोडावें असा वेधाचा निश्चय आहे. वैद्यनाथ असें सांगतो कीं, पहिला आणि चवथा ह्या दोन पादांचा वेध असतो व दुसरा आणि तिसरा ह्या दोन पादांचा वेध असतो क्रूरग्रहानीं नक्षत्रांचा वेध झाला असेल तरीसुद्धां त्या नक्षत्राचा एक पाद सोडावा असें कित्येक महा ऋषि बोलतात ॥ १५ ॥

( उभ्या पांच रेघांवर आडव्या पांच रेघा काढून त्यांच्या कोनावर दोन दोन रेघा काढिल्या ह्मणजे तें पंचशलाका चक्र होतें. त्यांत ईशान्य दिशेपासून कृत्तिकादि नक्षत्रें मांडावीं आणि त्यांवरून पंचशलाका वेध पहावा. ) पुढच्या आकृतीं वरून दोनही चक्रांचे वेध स्पष्ट समजतील.

विवाह पंचशलाकाचक्रं.

कृ रो मृ आ पु पु आ
भ अ रे उ पू श ध
म पू उ ह चि स्वा वि
श्र अ ह पू मू ज्ये अ

सप्तशलाकाचक्रं. व्रतबंधादि

कृ रो मृ आ पु पु आ
भ अ रे उ पू श ध
म पू उ ह चि स्वा वि
श्र अ उ पू मू ज्ये अ

**सप्तशलाका वेधाचीं नक्षत्रें.**

**॥ क्षेपकः ॥ भाग्याद्ये पितृयाम्यभेऽग्निहरिभे विश्वेंदुभेऽत्यार्यमे ।**
**पुष्येंद्रे द्विकभे स्मरारिजलभे चित्राजपादे मिथः ॥**
**मूलर्क्षादितिभे द्विदैववसुभे सार्पानुराधे व्यधो– ।**
**ऽहिर्बुध्न्यार्कभयोश्च पाश्यनिलयोः सप्ताह्वचक्रे स्मृतः ॥ १ ॥**

**क्षेपकार्थ**— पुढें दाखविलेल्या दोन दोन नक्षत्रांचा परस्परांस वेध होतो जसा पूर्वाफाल्गुनीला कोणी ग्रह असतां अश्विनीला वेध होवो आणि अश्विनीला कोणी अग्रह असतां पूर्वाफाल्गुनीला वेध. होतो. जसे—भाग्य ह्म० पूर्वाफाल्गुनी आणि आद्य ह्म० अश्विनी ह्यांचा वेध. पितृ ह्म० मघा यम ह्म० भरणी ह्यांचा वेध. अग्नि ह्म० कृत्तिका हरि ह्म० श्रवण ह्यांचा वेध. विश्व ह्म० उत्तराषाढा इंदु ह्म० मृगशीर्ष ह्यांचा वेध.अंत्य ह्म० रेवती आणि अर्यमा ह्म० उत्तराफा० ह्यांचा वेध. पुष्य ह्म० पुष्य आणि इंद्र ह्म० ज्येष्ठा ह्यांचा वेध. दोन कचीं ह्म० ब्रह्मदेवाचीं नक्षत्रें ह्म० रोहिणी आणि अभिजित् ह्यांचा वेध. स्मरारी ह्म० शिव त्याचें नक्षत्र आर्द्रा आणि जलाचें ह्म० पूर्वाषाढा ह्यांचा वेध. चित्रा आणि अजपात् ह्म० पूर्वाभाद्रपदा ह्यांचा वेध. मूल आणि अदिति ह्म०पुनर्वसु ह्यांचा वेध.दोन देवाचें नक्षत्र ह्म०

विशाखा आणि वसुचें नक्षत्र ह्म० धनिष्ठा ह्यांचा वेध. सर्प ह्म० आश्लेषा आणि अनुराधा ह्यांचा वेध. आहिर्बुध्न्य ह्म० उत्तराभाद्रपदा आणि अर्क ह्म० हस्त ह्यांचा वेध. पाशी ह्म० शततारका अनिल ह्म० स्वाती ह्यांचा वेध. ह्मणजे या दोघांना परस्परांचा वेध आहे ह्मणजे ह्यांपैकीं एका नक्षत्राला जर दुष्टग्रहाचा वेध असला तर त्यामुळें तें दुसरें नक्षत्रही विद्ध समजावें. जसें अश्विनीनक्षत्र जर एकाद्या पापग्रहानें विद्ध असेल तर त्यामुळें पूर्वाफाल्गुनीही पापानें विद्ध समजावी किंवा पूर्वाफाल्गुनीपापानें विद्ध असली तर अश्विनीही पापानें विद्ध समजावी ॥ १ ॥

### वेधाचे अपवाद व लत्ता.

**लग्नेशे भवगेऽथ वा शशिनि सदृष्टे शुभे वांऽगगे ।**
**होरायां च शुभस्य वा व्यधभयं नास्तीति पूर्वे जगुः ॥**
**भौमात्र्याकृतिषट्जिनाष्टनखभं हंत्यग्रतो लत्तया ।**
**खेटोऽर्कोऽर्कमितं शशी मुनिमितं पूर्णो न सन्मालवे ॥ १६ ॥**

श्लोकार्थ—आ पण जें लग्न इष्ट धरलेलें असेल त्याचा स्वामी लाभस्थानीं ह्मणजे १ अकरावे स्थानीं असतां किंवा २ शुभ ग्रहाची पूर्ण दृष्टि चंद्रावर असतां अथवा ३ शुभ ग्रह लग्नीं असतां किंवा ४ ती होरा शुभ ग्रहाची असतां वेधाचा दोष नाहीं असें पूर्व ऋषींचें मत आहे. ह्या प्रमाणें हे चार वेधाचे अपवाद जाणावेत, आतां लत्तेचा विचार सांगतो—तो असा कीं,मंगळ हा ग्रह ज्या नक्षत्रीं असतो त्या नक्षत्रापासून पुढील तिसऱ्या नक्षत्रावर लत्ता मारतो, बुध २२ व्या नक्षत्रावर, गुरु साहाव्या नक्षत्रावर, शुक्र २४ व्या नक्षत्रावर, शनि ८ व्या नक्षत्रावर, राहु २० व्या नक्षत्रावर रवि १२ व्या नक्षत्रावर आणि पूर्ण चंद्र ७ व्या नक्षत्रावर लत्ता मारितो असा नियम आहे. ज्या नक्षत्रावर, लत्ता पोहोंचते तें नक्षत्र मालव देशांत मंगल कार्याला शुभ नाहीं अर्थात् अन्य देशीं शुभ आहे, तेव्हां लत्तेचा दोष नाहीं असें सिद्ध झालें ॥ १६ ॥

**अथ वेधभंगमाह-लग्नेश इति। लग्नेशे लग्नस्वामिनि भवगे एकादशगे सति वेधस्य दोषो नास्तीत्येको भंगः। अथवा शशिनि सदृष्टे सति द्वितीयो भंगः। वा इत्यथवा शुभे शुभग्रहे चंद्रवर्जिते अंगगे लग्नगे सति तृतीयो भंगः। शुभस्य होरायां चेति चतुर्थो भंगः। एषामन्यतमे सति व्यधभयं नास्तीति पूर्वे मुनयो जगुः आहुः तथा च वसिष्ठः। लग्ने शुभे सौम्ययुतेक्षिते वा। लग्नाधिनाथो भवगस्तथा वा। कालाख्यहोरा च तथा शुभस्य भवेद्धि दोषस्य तथा विभंग इति। उद्वाहतत्त्वेऽपि। सद्ग्रहदृक्तनुगे शुभे व्यधभयं नो वाऽयगे लग्नपे। होरायां च शुभस्य वा शशिनि सदृष्टेऽपि चार्यैरुडो रिति। अथ लत्तामाह-भौमादिति। भौमात्तकारात् खेटो ग्रहः राहुनः क्रमाञ्याकृत्यादि भं नक्षत्रं अग्रतो लत्तया हंति भौमः तृतीयं बुधः आकृतिर्द्वाविंशतिमितं गुरुः षष्ठं शुक्रः जिनामितं चतुर्विंशं शनिरष्टमं राहुर्नखमितं विंशं लत्तया हंति अर्कः सूर्यः अर्कमितं द्वादशं शशी पूर्णचंद्रमाः मुनिमितं सप्तमं। अग्रतो लत्तया हंति तत् हतं नक्षत्रं मालवे मालवदेशे न सत् न शुभं स्यात् उक्तं च। लत्ता मालवके देशे पातं कोशलके तथा। एकार्गलं तु काश्मीरे वेधं सर्वत्र वर्जयेत् ॥ १६ ॥**

**टीकार्थ**—आतां वेधाचा भंग सांगतो—लग्नाचा स्वामी भव ह्म० अकरावे स्थानीं असेल तर १ वेधाचा दोष नाहीं. २ चंद्रावर शुभ ग्रहाची पूर्ण दृष्टि असेल तर वेधाचा दोष नाहीं. ३ चंद्राशिवाय दुसरा शुभ ग्रह लग्नस्थानीं असेल तर वेधाचा दोष नाहीं. ४ शुभ ग्रहाचा होरा असेल तर वेधाचा दोष नाहीं. ह्या चारां पैकीं एक जरी भंग असला तरी वेधाचा दोष नाहीं असें पूर्वीचे मुनी सांगतात. तेंच वसिष्ठ सांगतो—लग्नीं शुभ ग्रह असेल अथवा लग्नावर शुभ ग्रहांची पूर्ण दृष्टि असेल, किंवा लग्नाचा स्वामी एकादशस्थानीं असेल किंवा कालाची होरा शुभ ग्रहाची असेल तर ह्या चार प्रकारांपैकीं एक प्रकार असला तरी वेधाचा दोष नाहीं. उद्वाह तत्वांत सांगितलें आहे कीं, तनुस्थानीं शुभ ग्रह असेल, अथवा लग्न स्थानींच्या ग्रहावर शुभ ग्रहाची दृष्टि असेल, किंवा लग्नाचा स्वामी अकरावे स्थानीं असेल, किंवा होराही शुभ ग्रहाची असेल किंवा चंद्रावर शुभ ग्रहांची पूर्ण दृष्टि असेल तर वेधाचा दोष नाहीं. आतां लत्ता सांगतो—मंगळापासून तो राहू पर्यंत क्रमानें त्रि ह्म० ३ आकृति ह्म० २२ षट् ह्म० ६ जिन ह्म० २४ अष्ट ह्म० ८ नख ह्म० २० इतक्याव्या नक्षत्रावर क्रमानें मंगळ, बुध, गुरु,शुक्र,शनि आणि राहु लाथ मारितो.आणि रवि, रवि ह्म० १२ व्या नक्षत्रावर लाथ मारतो. आणि

पूर्व चंद्रमा मुनि म्ह० सातव्या नक्षत्रावर लाथ मारतो, ज्या नक्षत्रावर लाथ पोंहचते तें नक्षत्र माळव्या प्रांतांत वर्ज्य आहे असें सांगितलें आहे कीं, लत्तेचा दोष माळव्यांत आहे, पाताचा दोष कोसल म्ह० अयोध्येंत आहे. एकार्गलाचा दोष काश्मीर देशांत आहे आणि वेधाचा दोष सर्व ठिकाणीं आहे म्हणजे तो सर्व ठिकाणीं वर्ज्य करावा ॥ १६ ॥

ग्रहण दोष व संक्रांती दोष.

षण्मासं ग्रहणोडु चंद्रतनुगं विद्धर्क्षजन्मर्क्षके ।
त्याज्ये जन्मभलग्नके तनुगते सूर्यान्मनूडु त्यजेत् ॥
दंतद्व्यंकदृशोऽर्कतो युगगजास्तर्काः खबाणेंदवो ।
नाडीः संक्रमणे त्यजेद्दिविषदां प्रायो रवेर्दूषिताः ॥ १७ ॥
( पाठभेदः ॥ त्याज्याः संक्रमणे रवींदुकुजसौम्यानां रदद्व्यंकदृक् ।
नाड्योऽब्ध्यष्टगुरोः शनेः खतिथयः शुक्रस्य षण्णाडिकाः ॥ १७ ॥)

श्लोकार्थ—ग्रहण ज्या वेळेस लागतें त्या वेळेस जें नक्षत्र असेल तें नक्षत्र ग्रहणानंतर सहा महिनेपर्यंत जर लग्नीं अथवा चंद्रीं आहे तर तें लग्न आणि तो चंद्र शुभ कर्माला वर्ज्य आहे. चंद्र ज्या दिवशीं ज्या नक्षत्रावर जातो तें नक्षत्र त्या दिवसाचें दिवस नक्षत्र असें समजावें. म्हणून चंद्रीं नक्षत्र म्हणजे दिवस नक्षत्र असें जाणावें. प्रत्येक लग्नांत सव्वा दोन नक्षत्रें असतात. उदाहरण पहा कीं, जर अश्विनी नक्षत्रावर ग्रहण लागलें असेल तर मेष लग्नाचे १३ अंश २० कला भोगेपर्यंत अश्विनी असतें म्हणून तें लग्न गत नक्षत्र समजावें, पुढें २६ अंश ४० कला होईपर्यंत भरणी लग्न गत होतें ह्या प्रमाणें लग्न गत नक्षत्र जाणावें. आतां विद्ध नक्षत्र आणि जन्म नक्षत्र जर लग्न गत होतील तर तीं नक्षत्रें सोडावीं. जन्म राशि आणि जन्म लग्न हीं जर इष्ट लग्नीं असतील तर तीं सोडावींत. ज्या नक्षत्रावर सूर्य असेल त्यापासून चौदावें नक्षत्र सोडावें. एका राशीवरून दुसऱ्या राशीवर ग्रहांचें जाणें ह्याला संक्रमण म्हणतात. आतां रवीच्या संक्रमणाच्या ३२ घटिका, चंद्राच्या २० घटिका, मंगळाच्या ९ घटिका, बुधाच्या २ घ० गुरूच्या ८४ घ० शुक्राच्या ६ घ० शनीच्या १५० घटिका ह्या प्रमाणें संक्रमणाचे पूर्वी अर्ध्या आणि संक्रमण झाल्यावर अर्ध्या सोडाव्यात. रविच्या घटिका फारच दोषयुक्त आहेत ॥ १७ ॥

अथ दोषांतराण्याह-षण्मासमिति । षण्मासं षण्मासपर्यंतं ग्रहणोडु ग्रहणनक्षत्रं चंद्रतनुगं चंद्रगतं लग्नगतं च त्याज्यं चंद्रगतमिति यस्मिन्दिने चंद्रमसा युक्तं भवति तच्चंद्रगतं दिननक्षत्रमिति यावत् । तनुगं यथाऽश्विन्यां ग्रहणे जाते त्र्यंशत्रयोदशभागांतरमेषलग्ने सति अश्विनीलग्नस्था स्यात् एवं भरण्याद्यपि ग्रहणोडु इत्यनेनैवान्यान्यप्युत्पातदुष्टानि त्याज्यानि । विद्धर्क्षं विद्धनक्षत्रं जन्मर्क्षं जन्मनक्षत्रमेते उभे तनुगे त्याज्ये । भं च लग्नं च भलग्ने जन्मनि भलग्ने जन्मभलग्ने त एव जन्मभलग्नके जन्मराशिजन्मलग्ने तनुगे त्याज्ये लग्नांतर्गतनक्षत्रज्ञानाय स्वकल्पितसूत्रं । नवघ्नं तनुवेदाप्तं सैकं स्यात्तारकं तनौ । अर्कर्क्षात् सूर्यनक्षत्रात् मनूडु चतुर्दशनक्षत्रं त्यजेत् । अथ सूर्यादीनां राशिसंक्रमणे त्याज्यघटिका आह-त्याज्या इति । रविचंद्रकुजसौम्यगुरुशुक्रमंदानां संक्रमणे क्रमेण रदद्व्यंकदृगित्यादय उक्तसंख्यनाड्यस्त्याज्याः । तद्यथा रविसंक्रमणे रदनाड्यो द्वात्रिंशद्घटिका वर्ज्याः संक्रमणकालात्पूर्वतः षोडश घटिकाः परतः षोडश घटिका एवं द्वात्रिंशद्घटिकास्त्याज्या इत्यर्थः । तथा च चंद्रसंक्रमणे द्वे नाड्यौ भौमसंक्रमणे नव घटिका बुधसंक्रमणे द्वे घटिके त्याज्ये गुरोः संक्रमणे अब्ध्यष्टौ चतुरशीतिघटिकाः शनेः संक्रमणे खतिथयः १५० पंचाशदधिकशतघटिकाः । शुक्रस्य षट् नाडिकास्त्याज्या इत्यर्थः अत्र बाहुल्येन सर्वापेक्षया रवेः संक्रमणनाड्यो बहुभिराचार्यैर्दूषिता इत्यर्थः ॥ १७ ॥

---

१ धनुश्चिह्नान्तर्गतयोर्द्वयोः श्लोकार्धयोः पाठतो भेदः परं चार्थतस्त्वैक्यमेवास्त्यथापि द्वितीयार्धान्तिमचरणेऽस्ति किंचिदर्थाधिक्यमत एवात्र ग्रन्थकर्त्रा द्वयोः संग्रहः कृतोऽस्तीति सुधीभिरूह्यम्.

टीकार्थ—आतां दुसरे दोष सांगतो–ग्रहणाचें जें नक्षत्र असेल तें सहा महिने पर्यंत सोडावें आणि चंद्राचें जें नक्षत्र ह्मणजे दिन नक्षत्र सोडावें ह्याचा अर्थ असा कीं, ज्या दिवशीं चंद्रानें युक्त नक्षत्र असतें तें नक्षत्र चंद्रगत असें समजावें त्यालाच दिवस नक्षत्र असेंही नांव आहे, तें नक्षत्र तनु ह्मणजे लग्नीं असेल तें लग्न सोडावें. जसें कीं, आश्विनी नक्षत्रावर ग्रहण झालें असेल तर १३ अंश आणि २० कलां पर्यंत मेष लग्न असतें तेथपर्यंत अश्विनीचें लग्न आहे असें जाणावें. ह्याचप्रमाणें भरणी इत्यादिकांचें समजावें. अशाच रीतीनें दुसरींही उत्पातादिकांचीं दुष्ट नक्षत्रें सोडावींत. विद्ध नक्षत्र आणि जन्म नक्षत्र हीं दोन्ही लग्नीं असतील तर तें लग्न सोडावें. सूर्यें नक्षत्रापासून १४ चवदावें नक्षत्र सोडावें. आतां सूर्य इत्यादिग्रह एक राशीवरून दुसऱ्यावर गेले असतां त्यावेळेस किती घटिका सोडाव्यात तें सांगतो–रवि इत्यादि ग्रहांच्या घटिकांचा क्रम असा कीं, रविच्या रद ह्म० ३२ घटिका ह्म० संक्रमणाच्या पूर्वी १६ आणि संक्रमणोत्तर १६ घटिका सोडाव्या. ह्याचप्रमाणें चंद्राच्या २ घटिका ह्म० अगोदर १ आणि मग १ घटिका सोडावी. मंगळाच्या ९ घटिका ह्म० अगोदर ४॥ आणि नंतर ४॥ घटिका सोडाव्यात. बुधाच्या २ घटिका अगोदर १ आणि मग १ घटिका सोडावी. गुरूच्या ८४ घटिका पैकीं अगोदर ४२ आणि नंतर ४२ घटिका सोडाव्यात. शनीच्या १५० घटिका पैकीं अगोदर ७५ आणि नंतर ७५ घटिका सोडाव्यात. शुक्राच्या ६ घटिकां पैकीं अगोदर ३ आणि नंतर३ घटिका टाकाव्यात. कारण त्या घटिका दोषयुक्त असतात. ह्या सर्व ग्रहांपेक्षां बहुत करून रवीच्या संक्रमणाच्या घटिका सोडाव्यात ह्या विषयीं सर्व आचार्यांचें मत आहे ॥ १७ ॥

## संधि दोषादि व भद्राकरणाचा काळ.

षट्षष्टिर्ऋतुसंधितस्तिथिभयुक्संधौ द्विनाड्यौ ग्रहात् ।
तत्पादैर्दिवसांत्रिवेदषडिभान्प्रागर्धितान् संत्यजेत् ॥
उत्पातेऽह्यहमुद्रमं च शिखिनो राकाष्टमीप्राग्दले ।
विष्ट्यंत्ये कृतरुद्रयोरबहुले कृष्णे निरेकेष्विह ॥ १८ ॥

श्लोकार्थ—सर्व ऋतूंच्या ह्मणजे वसंत, ग्रीष्म इत्यादि सहा ऋतूंच्या संधीपासून ६६ घटिका त्याज्य आहेत. तिथि, नक्षत्र आणि योग ह्यांच्या संधीच्या २ घटिका त्याज्य आहेत. एक पादग्रहण असतां ३ दिवस, द्विपादाला ४ दिवस, त्रिपादाला ६ दिवस आणि पूर्ण ग्रासाला ८ दिवस त्याज्य आहेत. पैकीं ग्रहण लागण्याचे पूर्वी अर्धे आणि नंतर अर्धे सोडावेत. भूकंप, मोठा उल्कापात इत्यादि उत्पातापुढें ७ दिवस सोडावेत. जों पर्यंत धूमकेतु उदय पावत असेल तोंपर्यंत शुभ कार्य करूं नये. शुक्ल पक्षामध्यें पूर्णिमा, अष्टमी ह्या दोन तिथींच्या पूर्वार्धांत आणि चतुर्थी एकादशी ह्या दोहोंच्या उत्तरार्धांत बहुत करून भद्राकरण येत असतें ह्या तिथींतून एक तिथी कमी केल्यानें कृष्णपक्षांत भद्रा येणाऱ्या समजाव्या त्या अशा कीं, कृष्णपक्षांत चतुर्दशी आणि सप्तमी ह्यांच्या पूर्वार्धांत आणि तृतीया दशमी ह्यांच्या उत्तरार्धांत भद्राकरण नियमानें येत असतें ॥ १८ ॥

अथ संधिदोषमाह–षडिति । ऋतुसंधितो वसंतादिऋतुप्रवृत्तेः षट्षष्टिः षड्भिरधिका षष्टिः ६६ घटीनां षट्षष्टिस्त्याज्येत्यर्थः । ऋतुप्रवृत्तिलक्षणं रत्नमालायां । मृगादिराशिद्वयभानुभोगात् षडर्तवः स्युः शिशिरो॥वसंतः ग्रीष्मश्च वर्षा च शरच्च तद्वद्धेमंतनामा कथितोऽत्र षष्ठ इति । तिथिभयुक्संधौ तिथिनक्षत्रयोगानां संधौ द्विनाड्यौ पृथक् द्वे द्वे घटिके त्याज्ये । अथ पूर्वमुक्तं ग्रहजनिप्रांतोर्ध्वं सूतकमिति तत्र ग्रहणलक्षणसूतकमाह–ग्रहादिति।ग्रहणतःसकाशादुपरि तत्पादैस्तच्चरणैर्ग्रहपादैः त्रिवेदषडिभान् ३।४।६।८ दिवसांस्त्यज्येत् । एतदुक्तं भवति पादैकमात्रग्रहणे त्रीन् दिवसांस्त्यजेत् । अर्धग्रहणे चतुरो दिवसांस्त्यजेत । त्रिपादग्रहणे षट् दिवसांस्त्यजेत् । सर्वग्रहणेऽष्ट दिवसांस्त्यजेत्प्राग्ग्रहणात् प्राक् प्रथमतः अर्धितान् त्रिवेदादीन् दिवसांस्त्यजेत् । एतदुक्तं भवति पादग्रहणे त्रयाणामर्धं तद्यथा पादग्रहणे ग्रहणात्पूर्वं सार्धैकदिवसं नवति ९० घटिकास्त्याज्याः । अर्धग्रहणे चतुर्णामर्धं द्वौ दिवसौ पादत्रयग्रहणे षण्णामर्धं त्रीन् सर्वग्रहणेऽष्टानामर्धं चतुरो दिवसान् ग्रहणात्पूर्वं त्यजेत् । उपरागो ग्रहो राहुग्रस्ते त्विंदौ च पूष्णि चेत्यमरः । शार्ङ्गीयविवाहपटले । सर्वग्रासे दिनान्यष्टौ शुभकार्येषु वर्जयेत् । त्रिभागोने षट्दिवसानर्धग्रासे चतुर्दिनं ॥ चतुर्थांशे त्रिरात्रं तु ग्रहणे चंद्र-

सूर्ययोरीति । अत्राप्यंतरालेऽनुपातो ज्ञेयः । तथाचाऽऽर्ष्टिषेणः । ग्रहणात्रिदिनं पूर्वं परतो दिनसप्तकमिति सर्वग्रहणविषयं ॥ ज्योतिःप्रकाशेऽपि खग्रासे सर्वपादोनं खंडाद्यल्पे तु वासराः । गजाश्वेष्वब्धिरामाब्जा नेष्टाः स्युः प्राग्दले ग्रह इति । अथोत्पाते वर्ज्यकालमाहोत्पातेऽद्यहमिति । उत्पाते भूकंपनिर्घातमहोल्कानिपातादिकेऽद्यहं । अद्रिमितानामह्नां समाहारोऽद्यहं सप्ताहमित्यर्थः । उत्पाते जाते सति सप्ताहं शुभकर्माणि त्यजेदित्यर्थः । दोषांतरमाह–उद्गमं च शिखिनः केतोः उद्गमं उदयं त्यजेत् यावत्केतूदयस्तावन्मंगलं न कुर्यादित्यर्थः । तथा चाऽऽर्ष्टिषेणः । परं सप्ताहमुत्पाते त्यजेत्केतूदये शुभमिति । भद्राकालमाह–राकाष्टमीप्राग्दले विट् स्यात् राका पूर्णिमाऽष्टमी प्रसिद्धा अनयोस्तिथ्योः प्राग्दले पूर्वार्धे विट् विष्टिः स्यात् कृतरुद्रयोः प्रांत्ये कृतं चतुर्थी रुद्र एकादश्यनयोः प्रांत्ये विट् स्यात् । एतद्भद्राचतुष्टयमबहुले शुक्लपक्षे स्यात् कृष्णे निरेकेष्विहोक्तेषु तिथिषु निरेकेष्वेकरहितेषु कृष्णे कृष्णपक्षे विट् स्यात् । भद्रापवादः शार्ङ्गीयविवाहपटले दूषितोऽतः कारणादत्र नोक्तः ॥ १८ ॥

**टीकार्थ**—आतां संधि दोष सांगतो–वसंत इत्यादि ऋतु सहा आहेत त्या प्रत्येक ऋतूच्या आरंभापासून ६६ घटिका त्याज्य आहेत. ऋतुचा आरंभ होतो त्याचें लक्षण रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, मृगराशीपासून दोन दोन राशींना सूर्याचा योग झाल्यामुळें क्रमानें सहा ऋतु होतात. जसें मकर, कुंभ ह्या० शिशिर ऋतु, मीन, मेष ह्या०वसंत, वृषभ, मिथुन ह्या० ग्रीष्म, कर्क, सिंह ह्या० वर्षा, कन्या, तूळ ह्या० शरत, वृश्चिक, धन ह्या० हेमंत, तिथि, नक्षत्र आणि योग ह्यांच्या संधी मध्यें प्रत्येकास दोन दोन घटिका त्याज्य आहेत, ह्या० तिथीस २ घ० नक्षत्रास २घ० योगास २ घ० सोडाव्यात. आतां पूर्वी सांगितलें होतें कीं, ग्रहादिकांचें सूतक असतें त्यांपैकीं ग्रहणाचें सूतक सांगतो–चतुर्थांश ग्रास असेल तर ग्रहणापासून ३ दिवस, अर्धा ग्रास असेल तर ४ दिवस, पाऊण ग्रास असेल तर ६ दिवस, संपूर्ण ग्रास असेल तर ८ दिवस सूतक समजून तितके दिवस सोडावेत. ह्याचा अर्थ असा कीं, चंद्राचा चवथ्या भागाचा ग्रास असेल तर ३ दिवस सोडावे ह्मणजे ग्रहणाचे पूर्वी १॥ दिवस आणि नंतर १॥ दिवस ह्मणजे अगोदर ९० घटिका आणि नंतर ९० घटिका सोडाव्यात. अर्धा ग्रास असेल तर ४ दिवस म्हणजे अगोदर २ दिवस नंतर २ दिवस. तीन पाद ग्रास असेल तर ६ दिवस पैकीं, अगोदर ३ दिवस नंतर ३ दिवस. सर्व ग्रास असेल तर ८ दिवस पैकीं अगोदर ४ दिवस नंतर ४ दिवस सोडावेत. ग्रहण ह्मणजे चंद्राचा आणि सूर्याचा ग्रास राहूनें केला ह्मणजे जेवढा काळ ग्रास असतो तेवढा काळ ग्रहण असें समजावें. शार्ङ्गीय विवाह पटलांत सांगितलें आहे कीं, सर्व ग्रास असेल तर आठ दिवस शुभ कार्याला वर्ज्य करावेत. तीनभाग ग्रास असेल तर साहा दिवस सोडावेत. अर्धा भाग ग्रास असेल तर चार दिवस सोडावेत. चवथा भाग ग्रास असेल तर तीन दिवस सोडावेत, येथेंच मध्यें अनुपात आहे तो जाणावा. तेंच आर्ष्टिषेण सांगतो कीं, ग्रहणाचे पूर्वी ३ दिवस आणि नंतर ७ दिवस असें सांगितलें आहे हें सर्व ग्रहणा विषयीं आहे. ज्योतिःप्रकाश ग्रंथांत असें सांगितलें कीं, खग्रास, तीन भाग ग्रास अर्धाग्रास, पादग्रास, अल्प मात्र, दिसतें न दिसतें ह्यांस क्रमानें गज ८ अश्व ७ इषु ५ अब्धि ४ राम ३ अब्ज १ इतके दिवस शुभ कार्यास इष्ट नाहींत. आतां उत्पातांचा वर्ज्य काळ सांगतो–भूमिकंप, निर्घात, महोल्कापात इत्यादिकांमध्यें सात दिवस पर्यंत शुभ कार्य करूं नये. दुसरा दोष सांगतो–धूमकेतु आकाशांत जों पर्यंत उगवत आहे तोंपर्यंत शुभ कार्य करूं नये, तेंच आर्ष्टिषेण सांगतो–कीं, उत्पात झाला असतां सात दिवस आणि धूमकेतूचा उदय झाला असतां सात दिवस पर्यंत शुभ कार्य करूं नये. आतां भद्राकाल सांगतो–राका ह्मणजे पूर्णिमा, अष्टमी ह्या दोन तिथींचा पूर्व भाग विष्टि समजावी. तशीच कृत ह्या० चतुर्थी रुद्र ह्या० एकादशी ह्या दोन तिथींचे उत्तरार्ध ही विष्टि समजावी. अशी ही चार प्रकारची भद्रा शुक्ल पक्षांतील समजावी. आतां कृष्ण पक्षांतील भद्रा अशी समजावी कीं, पूर्वीच्या तिथींत एक तिथी कमी करावी ह्मणजे विष्टि समजावी. जसें १४–७ ३–१० ह्या चार दिवशीं क्रमानें १४–७ पूर्वार्धांत आणि ३–१० ह्यांचे उत्तरार्धांत विष्टि समजावी. भद्रेचा अपवाद शार्ङ्गीय विवाह पटलांत दोषित केला आहे ह्मणून येथें तो सांगितला नाहीं ॥ १८ ॥

### गंडांत, चंडायुध, एकार्गल.

सार्पैंद्रांतिमभांततोऽब्धिघटिकं पूर्णांततोऽब्ध्यर्धकम् ।
कीटांत्यालिविरामतः कुघटिकं गंडांतमूर्ध्वाधरम् ॥
सावैशूल्यहगाख्ययोगविरतौ भं तत्र चंडायुधम् ।
दुर्योगे दिनभाच्च साभिजिदयुग्भेऽर्कस्तदेकार्गलः ॥ १९ ॥

श्लोकार्थ—नक्षत्राचें गंडांत असें कीं, आश्लेषा, ज्येष्ठा आणि रेवती ह्या तीन नक्षत्रांच्या शेवटच्या २ घटिका आणि मघा, व मूळ, अश्विनी ह्या तीन नक्षत्रांच्या आरंभींच्या दोन घटिका मिळून ४ घटिका गंडांत समजावें. आतां तिथींचें गंडांत असें कीं, पूर्णा ह्मणजे पंचमी, दशमी, पूर्णिमा आणि अमावास्या ह्या चार तिथींची शेवटची एक घटिका तशीच षष्ठी, एकादशी, प्रतिपदा ह्यांचे आरंभींची १ घटिका मिळून २ घटिका तिथिगंडांत जाणावें. आतां राशींचें गंडांत असें कीं, कर्क, मीन, वृश्चिक ह्या तीन लग्नांची शेवटची -॥- घटिका, तशीच सिंह, मेष, धन ह्या लग्नांची आरंभींची -॥- घटिका मिळून १ घटिका लग्नगंडांत जाणावें. आतां चंडायुध सांगतो—तें असें कीं, साध्य, वैधृति, शूल, व्यतीपात, हर्षण आणि गंड हे सहा योग संपण्याचे वेळेस जें नक्षत्र असतें त्यास चंडायुध असें नांव आहे. आतां एकार्गल सांगतो—तें असें कीं, विष्कंभ, अतिगंड, शूल, गंड, व्याघात, वज्र, व्यतीपात, परिघ, वैधृति हे ९ दुर्योग असतां दिवस नक्षत्रापासून अभिजितासह महा नक्षत्रापर्यंत मोजून त्यांत सूर्य विषम नक्षत्रीं असेल तेव्हां एकार्गल दोष आहे असें जाणावें ॥ १९ ॥

**अथ गंडांतलक्षणमाह—सार्पेंद्रांतिमभेति । सार्पमाश्लेषा इंद्रो ज्येष्ठा अंतिमभं रेवती एषामंतः तस्मात्कालात्प्राक्परं पूर्वापरतोऽब्धिघटिकं गंडांतं स्यात् । अब्धयश्चत्वारो घटिका यस्मिन्नित्यब्धिघटिकं चतुर्घटिकमित्यर्थः । एतदुक्तं भवति उक्तनक्षत्रांतात्पूर्वतो घटिकाद्वयं परतो घटिकाद्वयमेवं घटिकाचतुष्टयं नक्षत्रगंडांतम् । अथ तिथिगंडांतमाह—पूर्णांततोऽध्यर्धकं पूर्णाः पंचमीदशमीपूर्णिमाऽमास्तासामंततः अध्यर्धकं द्विघटिकं गंडांतं पूर्वापरतः स्यात् । अथ लग्नगंडांतमाह—कीटांत्यालिविरामतः कुघटिकं कीटः कर्कटकोऽन्त्यो मीनः अलिर्वृश्चिकः एषां विरामोऽवसानं तस्मात्कुघटिकं प्रागर्धघटिका परतोर्धघटिका एवमेकघटिकं लग्नगंडांतं स्यात् । अथ चंडायुधमाह—सावैशूव्येति । सा साध्ययोगः वै वैधृतिः शू शूलः व्य व्यतीपातः ह हर्षणः ग गंडः एतदाख्ययोगानां विरतिरवसानं तत्र यद्भं नक्षत्रं तस्माच्चंडायुधं स्यात् चंडं प्रचंडं महत् एवंविधमायुधं यस्य स्यात् तस्मात्तन्नक्षत्रं वर्ज्यमित्यर्थः । अथैकार्गलमाह—दुर्योगे दिनभादिति । विष्कंभातिगंडशूलगंडव्याघातवज्रव्यतीपातपरिघवैधृतयो नव दुर्योगाः। एषामन्यतमे सति दिनभाद्दिननक्षत्रात् साभिजिद्युग्मे अभिजिता सह अयुग्मे विषमनक्षत्रे यदाऽर्कः सूर्यो भवति तदैकार्गलः स्यादेकाऽर्गला शुभावरोधिनी यस्मिन्नित्येकार्गलः शुभफलावरोधक इत्यर्थः ॥ १९ ॥**

**टीकार्थ**—आतां गंडांत लक्षण सांगतो—सार्प ह्म० आश्लेषा, इंद्र ह्म० ज्येष्ठा, अंतिम ह्म० रेवती ह्या तीन नक्षत्रांच्या शेवटचा जो काळ त्याच्या पूर्वीच्या २ घटिका आणि आरंभींच्या २ घटिका मिळून ४ घटिका हें तिथिगंडांत समजावें, त्याचा अर्थ असा होतो कीं, जें नक्षत्र असेल त्याच्या शेवटच्या २ घटिका व त्याचे पुढल्या नक्षत्राच्या २ घटिका तसेंच रेवतीच्या शेवटल्या २ घटिका घेतल्या वर त्याच्या पुढचें नक्षत्र जें अश्विनी त्याच्या आरंभींच्या २ घटिका मिळून ४ घटिका नक्षत्र गंडांत समजावें. असेंच आश्लेषाच्या शेवटल्या २ घटिका आणि मघाच्या आरंभींच्या २ घटिका मिळून ४ घटिका नक्षत्र गंडांत. ह्याचप्रमाणें ज्येष्ठाच्या शेवटच्या २ घटिका आणि मुळाच्या आरंभींच्या २ घटिका मिळून ४ घटिका नक्षत्र गंडांत समजावें. आतां तिथि गंडांत सांगतो—पूर्णा ह्म० पंचमी, दशमी, पूर्णिमा, आणि अमावास्या ह्यांच्या शेवटच्या २ घटिका ह्मणजे पंचमीची शेवटीची १ घटिका षष्ठीची आरंभींची १ घटिका मिळून २ घटिका तिथि गंडांत. तसेंच दशमीची शेवटची १ घटिका आणि एकादशीची आरंभींची १ घटिका मिळून २ घटिका तिथि गंडांत. ह्याचप्रमाणें पूर्णिमा आणि अमावास्या ह्यांची शेवटीची १ घटिका आणि दोनहि प्रतिपदेची १ आरंभींची एकेक घटिका मिळून दोन दोन घटिका तिथि गंडांत समजावें. आतां लग्न गंडांत सांगतो—कीट ह्म० कर्क, अंत्य ह्म० मीन, अलि ह्म० वृश्चिक ह्या तीन लग्नांचे शेवटची १ घटिका ह्म० पूर्वीची -॥- घटिका आणि पलीकडची -॥- घटिका मिळून १ घटिका पर्यंत लग्न गंडांत समजावें. जसें कीं, कर्कांची शेवटची -॥- घटिका आणि त्याचे पुढच्या सिंहाची आरंभींची -॥- घटिका मिळून १ घटिका लग्न गंडांत समजावें. तसेंच मीनाची शेवटची -॥- घटिका आणि मेषाची आरंभींची -॥- घटिका मिळून १ घटिका लग्न गंडांत समजावें. ह्याचप्रमाणें वृश्चिकाची शेवटली -॥- घटिका आणि धनाची आरंभींची -॥- घटिका मिळून १ घटिका लग्न गंडांत समजावें. आतां चंडायुध सांगतो—सा साध्ययोग, वै वैधृति शू शूल, व्य व्यतीपात, ह हर्षण, ग गंड, हे साहा संपतांना जें नक्षत्र असतें त्याला चंडायुध असें समजावें. त्याच्या चंडायुध नांवाचा अर्थ असा आहे कीं, त्या जवळ प्रचंड आयुध आहे अर्थात् फार तीक्ष्ण शस्त्र त्याचे जवळ आहे ह्याकारितां

तें शुभ कर्मांमध्यें वर्ज्य करावें. आतां एकार्गल सांगतों-१ विष्कंभ, २ अतिगंड, ३ शूल, ४ गंड, ५ व्याघात, ६ वज्र, ७ व्यतिपात, ८ परिघ, ९ वैधृति ह्या नवांना दुर्योग ह्मणतात. ह्यांपैकीं एखादा दुर्योग असतां दिवस नक्षत्रापासून तों अभिजीतासह वर्तमान विषम नक्षत्रीं जेव्हां सूर्य असतो तेव्हां एकार्गल नांवाचा दोष होतो हा शुभ कर्माला अवरोध करणारा आहे ॥ १९ ॥

### यामार्ध, कुलिक, काल, कंटक, यमघंट.

सूर्याद्यामदलं दिवैव निगमाश्व्यश्वीषुनागत्रिषट् ।
संख्याकं कुलिकं दिवेंद्ररविदिङ्नागर्तुवेदद्विकम् ॥
व्येकं तन्निशि षोडशांशमपरे तिथ्यंशमुज्झंति तैः ।
कालं कंटकमैनिघंटममरेज्यज्ञास्फुजिद्भ्यः क्रमात् ॥ २० ॥

श्लोकार्थ—रविवारापासून तों शनिवारापर्यंत सात वार आहेत त्याच्या अनुक्रमानेंच ४-७-२-५-८-३-६ हीं यामार्धें ह्मणजे अर्धे प्रहर अशुभ आहेत ह्यांचा दोष दिवसासच आहे अर्थात् रात्रीचे कार्यास दोष नाहीं. तसेंच रविवारापासून शनिवारापर्यंत क्रमानें १४-१२-१०-८-६-४-२ इतके अंश कुलिक दोष जाणावेत, हे दिवसाचे कुलिक. आतां ह्या प्रत्येकांत एकेक कमी केला ह्मणजे रात्रीचे येतात, जसें १३-११-९-७-५-३-१ इतके अंश रात्रीचे कुलिक आहेत असें जाणावें. दिवसाचे जे कुलिक सांगितले आहेत ते गुरुवारापासून मोजिल्यानें काळ होतात. तेच बुधवारापासून मोजिल्यानें कंटक होतात. आणि तेच शुक्रवारापासून मोजिल्यानें यमघंट होतात. कोणी दिनमानाचे १६ भाग करितात. कितीएक १५ भाग करितात, प्रत्येक भागास मुहूर्त हें नांव आहे. वर सांगितलेले सर्व दोष शुभ कार्याला सोडावेत ह्याचा खुलासा खालील कोष्टकांत आहे. ॥ २० ॥

कोष्टक.

| वार. | यामार्ध. | कुलिक. दिवा. | कुलिक. रात्रौ. | काल. | कंटक. | यमघंट. |
|---|---|---|---|---|---|---|
| रवि. | ४ | १४ | १३ | ८ | ६ | १० |
| सोम. | ७ | १२ | ११ | ६ | ४ | ८ |
| मंगळ. | २ | १० | ९ | ४ | २ | ६ |
| बुध. | ५ | ८ | ७ | २ | १४ | ४ |
| गुरु. | ८ | ६ | ५ | १४ | १२ | २ |
| शुक्र. | ३ | ४ | ३ | १२ | १० | १४ |
| शनि. | ६ | २ | १ | १० | ८ | १२ |

अथ वारदोषमाह-सूर्यात्सकाशाद्वारेषु क्रमेण निगमादिकं यामदलं यामार्धमुज्झंति त्यजंति मुनय इति शेषः । निगमाश्चत्वारः तन्मितं रवौ सप्तमितं चंद्रे अश्विनौ द्वौ तन्मितं भौमे इषुमितं बुधे नागा अष्टौ तन्मितं गुरौ त्रिमितं शुक्रे षण्मितं शनावेतद्यामदलं दिवैवोज्झंति न रात्रौ । अथ कुलिकादीनाह-इनादौ सूर्यादौ वारे दिवा इंद्रादिकं षोडशांशं दिनमानस्य षोडशांशो ग्राह्यः।तेन गण्यास्ते षोडशांशा ग्राह्या इत्यर्थः । तं कुलिकमुज्झंति । अपरे तिथ्यंशं पंचदशांशं कुलिकमुज्झंति । तन्निशि तद्रात्रौ च व्येकं एकरहितं इंद्रादिकं षोडशांशं पंचदशांशमुज्झंति । तद्यथा । रवौ दिवा इंद्रमितं चतुर्दशं तद्रात्रौ त्रयोदशं सोमे दिवा द्वादशं तद्रात्रौ एकादशमित्यादि । अथ तैरेव इंद्रादिभिर्मुहूर्तैरमरेज्यज्ञास्फुजिद्भ्यः सकाशात् क्रमात् कालं कंटकमैनिघंटं इनस्यापत्यं पुमानैनिर्यमस्तस्य घंटो यमघंट इत्यर्थः तमुज्झंति एतदुक्तं भवति । अमरेज्यो गुरुः तस्मात्सकाशात् तैरेवेंद्रादिभिर्मुहूर्तैः कालमुज्झंति ज्ञात् बुधात् तैरेवेंद्रादिभिः कंटकं आस्फुजिच्छुक्रः तस्मात्सकाशात् तैरेवेंद्रादिभिर्मुहूर्तैरैनिघंटं यमघंटमुज्झंति ॥ २० ॥

टीकार्थ—आतां वार दोष सांगतों–रविवारापासून शनिवारापर्यंत क्रमानें निगम ह्म० ४ रविवारीं, अद्रि ह्म० ७ सोमवारीं, अश्वि ह्म० २ मंगळवारीं, इषु ह्म० ५ बुधवारीं, नाग ह्म० ८ गुरुवारीं, त्रि ह्म० ३ शुक्रवारीं, षट् ह्म० ६ शनिवारीं हे यामार्ध ह्म० यामाचे अर्ध भाग दिवसास त्याज्य आहेत रात्रीस त्याज्य नाहींत. आतां कुलिक सांगतों–सूर्य इत्यादिकांचे वारामध्यें दिवसास क्रमानें १४–१२–१०–८–६–४–२ हे दिनमानाचा सोळावा अंश ह्मणजे मुहूर्त समजावे. ते कुलिक संज्ञक आहेत. दुसरे कित्येक दिनमानाचा पंधरावा अंशच मानतात. त्याला कुलिक समजून त्याचा त्याग करितात. हेच कुलिक रात्रीचे घ्यावयाचे ह्मणजे त्यांतून एकएक कमी करावा. जसें रविवारीं दिवसास १४ वा आहे तर त्याच रात्रीं १३ वा. सोमवारीं दिवसास १२ वा आहे तर रात्रीं ११ वा कुलिक दोष समजावा. ह्याचप्रमाणें मंगळवारीं दिवसास १० रात्रीस ९, बुधवारीं दिवसास ८ रात्रीस ७, गुरुवारीं दिवसास ६ रात्रीस ५, शुक्रवारीं दिवसास ४ रात्रीस ३ शनिवारीं दिवसास २ रात्रीं १, असा क्रम जाणावा. आतां हे इंद्र ह्म० १४ इत्यादिक वर मुहूर्त सांगितले आहेत त्यांनींच काळ होतात ते असे कीं, तेच अमरेज्य ह्म० गुरुवारापासून मोजल्यानें काळ होतात. ज्ञ ह्म० बुधवारापासून मोजल्यानें कंटक होतात. आस्फुजित् ह्म० शुक्रवारापासून मोजल्यानें ऐनिघंट ह्म० यमघंट होतात. इन ह्म० सूर्य त्याचा पुत्र तो ऐनि असा शब्द होतो त्याचा घंट मिळून यमघंट होतात हे सर्व दोष शुभकार्याकरितां सोडतात ॥ २० ॥

## दुर्मुहूर्त, महापात व मृत्युयोग.

शुक्रेंद्वीज्ययमेषु गोंकरविभूतुल्या मुहूर्ता दिवा ।
दुष्टाः स्युः कुजनिश्यगो य इतरे संत्यर्धयामादिषु ॥
प्रेक्ष्यः संप्रति वृद्धितुर्यचरणे ब्रह्मद्वितीयेऽपमः ।
सूर्याद्या अनुविश्वपाशियमलेंद्वह्यर्कभैर्मृत्युदाः ॥ २१ ॥

श्लोकार्थ—दुर्मुहूर्त सांगतों–ते असे कीं, शुक्रवारीं दिवसास ९ मुहूर्त, सोमवारीं ९ वा, गुरुवारीं १२ वा, शनिवारीं १ आणि मंगळवारीं रात्रीस ७ वा इतके दुर्मुहूर्त आहेत, ह्याशिवाय जे दुसरे दुर्मुहूर्त आहेत ते यामार्धांत येतात ह्मणून येथें निराळे सांगितले नाहींत, आतां ग्रंथकार असें सांगत आहे कीं, हा ग्रंथ १४९३ ह्या शकीं रचिला आहे त्यावेळेस वृद्धि योगाचे चवथ्या चरणांत आणि ब्रह्मयोगाच्या दुसऱ्या चरणांत महापात येत असतो तो पाहावा ( महापात काढण्याचा प्रकार गणित ग्रंथांत आहे तो पंचांगांत गणितानें सिद्ध करून व्यतीपात पात–प्रवृत्ति आणि वैधृति पात–प्रवृत्ति लिहिली असते तेच महापात होत. ) आतां मृत्यु योग सांगतों–अनुराध नक्षत्र रविवारीं, उत्तराषाढा सोमवारीं, शततारका मंगळवारीं, अश्विनी बुधवारीं, मृगशीर्ष गुरुवारीं, आश्लेषा शुक्रवारीं, हस्त शनिवारीं अशीं नक्षत्रें असतां मृत्युयोग होतो ॥ २१ ॥

अथ दुर्मुहूर्तानाह–शुक्रेति । शुक्रः प्रसिद्धः इंदुश्चन्द्र इज्यो गुरुर्यमः शनिरेषु क्रमेण गोंकरविभूतुल्या मुहूर्ता दिवा दुष्टाः स्युः दुर्मुहूर्ता इत्यर्थः । कुजनिश्यगः कुजनिशि अगः सप्तमो मुहूर्तो दुर्मुहूर्तः । ग्रंथांतरे अर्यम्णोऽर्के तुहिनांकरणे राक्षसब्राह्मसंज्ञावित्यादि बहवो दुर्मुहूर्ता उक्ताः । अत्र स्वल्पा उक्तास्तेषां परिहारमाह–य इतरे दुर्मुहूर्ता ग्रंथान्तरे पठितास्ते सर्वे अर्धयामादिषु संति अतोऽत्र मया नोक्ताः यत अर्धयामादीनां त्यागे तेऽपि त्यक्ताः स्युः किं ग्रंथविस्तरेणेति भावः । एतत्तु सुज्ञा ज्ञास्यंति यथा रवौ चतुर्दशो मुहूर्तो दुर्मुहूर्तः कुलिकोऽपि चतुर्दशोऽत्र मुहूर्तः तयोरेकत्र सद्भाव इत्यन्येऽपि विचारगम्याः । नन्वेवं चेत्तर्हि पूर्वैर्व्यर्थं पठितं मैवं तैस्त्वनाधिकाधिकदोषविवक्षयोक्तमिति न दोषः । अथ पातसंभवकालमाह–प्रेक्ष्य इति । संप्रति सांप्रतं वृद्धितुर्यचरणे वृद्धियोगस्य चतुर्थचरणे तथा ब्रह्मद्वितीये ब्रह्मयोगस्य द्वितीयचरणेऽपमः क्रांतिपातो विलोक्यो ब्रह्मसिद्धांताद्युक्तप्रकारेण विलोक्य इत्यर्थः । अथ मृत्युं सर्वत्र वर्जयेदित्युक्तत्वात् मृत्युयोगमाह–सूर्याद्या इति । सूर्याद्या अर्कादयः क्रमेण अन्वादिभिर्नक्षत्रैः सह मृत्युदाः स्युः । अनु अनुराधा विश्वे उत्तराषाढा पाशी शततारका यमलौ अश्विनी इंदुर्मृगः अहिराश्लेषा अर्कभं हस्तः एतदुक्तं भवति अर्कः अनुराधया सह युक्तो मृत्युदः सोम उत्तराषाढया भौमः शततारकया बुधः अश्विन्या गुरुर्मृगेण शुक्र आश्लेषया शनिर्हस्तेन सहितो मृत्युदः स्यादित्यर्थः ॥ २१ ॥

टीकार्थ—आतां दुर्मुहूर्त सांगतों–१ शुक्र, २ इंदु ह्म० सोम, ३ इज्य ह्म० गुरु, ४ यम ह्म० शनि इतक्या ह्या ४ वारीं दिवसास अनुक्रमानें शुक्रवारीं ९ वा सोमवारीं ९ वा गुरुवारीं १२ वा शनिवारीं १ ला इतके आणि कुज ह्म० मंगळवारीं निशि ह्म० रात्रीस अग ह्म० ७ वा मुहूर्त इतके हे पांच मुहूर्त दुर्मुहूर्त आहेत. दुसऱ्या ग्रंथामध्यें रविवारीं अर्यम मुहूर्त आणि सोमवारीं राक्षस आणि ब्राह्म हे मुहूर्त दुर्मुहूर्त आहेत असें सांगितलें आहे. ह्या ग्रंथांत तर फारच थोडे सांगितले आहेत त्याचा परिहार असा कीं, दुसरे जे दुर्मुहूर्त सांगितले आहेत ते सर्व अर्ध यामादिकामध्यें येतात ह्मणून ते मी येथें सांगितले नाहींत. कारण अर्धयामांचा त्याग केला ह्मणजे त्या मुहूर्तांचाही त्याग केल्या सारखा होतो. ह्मणून विनाकारण ग्रंथाचा विस्तार केला नाहीं, हें तर सुज्ञ समजतातच कीं, रविवारीं १४ मुहूर्त हा दुर्मुहूर्त आहे आणि कुलिक चवदावा आहे. ह्यास्तव तो त्याज्य आहे. ते दोन्ही एकाच ठिकाणीं आल्यामुळें तो त्याज्य ठरला ह्या प्रमाणें व दुसरेही विचारानें समजण्या जोगे आहेत आतां अशी शंका येते कीं, जर असें आहे तर प्राचीन विद्वानांनीं सांगितलेलें व्यर्थ आहे तर तसें ह्मणूं नका. कारण कीं, त्यांनीं कमी किंवा जास्ती आहेत ह्या सांगण्याच्या इच्छेनें सांगितले आहेत ह्मणून त्यांच्या सांगण्यास दोष नाहीं. आतां पाताच्या उत्पत्तिचा काल सांगतो–हल्लीं महापात वृद्धि योगाच्या चवथ्या चरणांत आणि ब्रह्म योगाच्या दुसऱ्या चरणांत येत असतो तो क्रांतिपात ब्रह्मसिद्धांतांत सांगितल्याप्रमाणें पाहाणें योग्य आहे. आतां मृत्युयोग सर्व कामांत सोडावा असें सांगितलें आहे. ह्मणून मृत्युयोग सांगतों–रविवारापासून क्रमानें अनु ह्म० अनुराधा रविवारीं, विश्वे ह्म० उत्तराषाढा सोमवारीं, पाशी ह्म० शततारका मंगळवारीं, यमल ह्म० अश्विनी बुधवारीं. इंदु ह्म० मृगशीर्ष गुरुवारीं, अहि ह्म० आश्लेषा शुक्रवारीं, अर्क ह्म० हस्त शनिवारीं आलें असतां मृत्युयोग होतो. याचा अर्थ असा कीं, रविवार अनुराधा नक्षत्रानें युक्त असेल तर तो मृत्यु देणारा आहे, सोमवार उत्तराषाढानं, मंगळवार शततारकेनें बुधवार अश्विनीनें, गुरुवार मृगानें, शुक्रवार आश्लेषेनें, शनिवार हस्तानें युक्त असेल तर मृत्यु देणारा असतो ॥ २१ ॥

### विषघटी व त्यांचे अपवाद.

**पंचाश ५० ज्जिन २४ खाग्नय ३० श्च खकृता ४० आखंडला १४ मूर्छना २१ ।**
**त्रिंश ३० द्विंश २० रदाः ३२ खराम ३० नख२० धृत्ये १८काश्विनौ २१ विंशतिः२० ॥**
**शर्क्रे १४ द्रौ १४ दश १० वासवा १४ रसशराः ५६ सिद्धा २४ नखा-२० शा १० दिशो**
**। १० धृत्य १८ष्टी १६ जिन २४खाग्नयोऽ-३० श्वित इमाभ्योग्रेऽब्धिनाड्यो विषम् ॥ २२ ॥**

**नक्षत्रस्य गतैष्ययोगगुणितः स्वस्वध्रुवः षष्टिहृ-।**
**त्स्पष्टः स्यादत ऊर्ध्वमब्धिघटिकाः स्पष्टाः स्युरेवं कृताः ॥**
**चंद्रः सौम्यभगोऽथवा शुभसुहृद्दृष्टोऽथवा स्वांशगः ।**
**कोणास्ताभ्रसुखेषु वा विषभयं हंतीह सांगेऽगपः ॥ २३ ॥**

श्लोकार्थ—खालील अश्विनीपासून रेवतीपर्यंत सर्व नक्षत्रांच्या घटिका सांगितल्या आहेत त्या सांगितलेल्या घटिका पुढें ४ घटिका विष घटी समजाव्यात. त्या शुभ कार्याला वर्ज्य आहेत. ( उदाहरण:–अश्विनी ५० घटिका भोगल्यावर पुढें ५१–५२–५३–५४ ह्या ४ घटिका विष घटी समजाव्यात, नक्षत्र पूर्ण ६० घटिका असेल तर हा नियम आहे, परंतु साठांपेक्षां कमी किंवा जास्ती नक्षत्र असेल तेव्हां २३ श्लोकांत सांगितलेल्या रीतीनें गणित करून विष घटिका उत्पन्न कराव्यात. ) ॥ २२ ॥

नक्षत्राच्या गतैष्य योगाच्या सर्व घटिकांनीं आपापल्या ध्रुवाला गुणावें, आणि त्या गुणाकाराला ६० नीं भागावें, भागाकार येईल तो स्पष्ट ध्रुव होतो, तितक्या घटिका. नंतर वरच्या प्रमाणेंच ४ घटिकांला गुणून व भागून भागाकार येईल तितक्या घटिका त्या नक्षत्राच्या स्पष्ट विषघटी जाणाव्या, ( उदाहरण:–सोमवारीं रेवती ३५ घटिका त्या ६० त वजा करून बाकी २५ घटिका गत आणि मंगळवारीं ३९ घटिका अश्विनी एष्य ह्मणून २५+३९=६४ घ० ह्यांनीं अश्विनीचा ध्रुवक ५० ह्याला गुणून गुणाकार ३२०० आला, त्याला ६० नीं भागून ५३ घ० २० पळें आलीं, आतां गतैष्ययोग ६४ ह्यांनीं ४ ला गुणून गुणाकार २५६ त्याला ६० नीं भागून भागाकार ४ घ० १६ प० आला; ह्मणून अश्विनी नक्षत्र ५३ घ० २० प० भोगल्यानंतर ४ घ० १६ प० विषघटी उत्पन्न झाल्या. ) चंद्र शुभ ग्रहाच्या राशीला असतां किंवा त्याचा शुभ असून मित्र अशा

ग्रहानें चंद्र दृष्ट असतां, अथवा चंद्र स्वनवांशीं असतां, अथवा लग्नापासून ९।५।७।१०।४ ह्या स्थानीं चंद्र असतां किंवा इष्ट लग्नाचा अधिपति ९।५।७।१०।४।१ ह्या स्थानीं असतां तो विषभयाचा नाश करितो. विषघटींचे हे पांच अपवाद आहेत ॥ २३ ॥

**विषघटी कोष्टक.**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी. | ५० | पुष्य. | २० | स्वाती. | १४ | श्रवण. | १० |
| भरणी. | २४ | आश्लेषा. | ३२ | विशाखा. | १४ | धनिष्ठा | १० |
| कृत्तिका. | ३० | मघा. | ३० | अनुराधा. | १० | शततारका. | १८ |
| रोहिणी. | ४० | पूर्वा. | २० | ज्येष्ठा. | १४ | पूर्वाभाद्रपदा. | १६ |
| मृग. | १४ | उत्तरा. | १८ | मूळ. | ५६ | उत्तराभाद्रपदा. | २४ |
| आर्द्रा. | २१ | हस्त. | २१ | पूर्वाषाढा. | २४ | रेवती. | ३० |
| पुनर्वसु. | ३० | चित्रा. | २० | उत्तराषाढा. | २० | | |

**अथ विषघटिका आह—पंचाशदिति । अश्विनः सकाशात् नक्षत्रेषु इमाभ्यः पंचाशज्जिनेंत्यादिभ्यो घटिकाभ्योऽग्रे परतोऽब्धिनाड्यश्चतुर्नाड्यो विषं स्यात् एतदुक्तं भवति अश्विन्यां पंचाशद्घटिकाभ्योऽनंतरं चतुर्नाड्यो विषं । एवमन्यत् । अत्रांकन्यास एव व्याख्यानम् ॥ २२ ॥ अथैषां ध्रुवकाणां स्पष्टीकरणमाह–नक्षत्रस्येति । नक्षत्रस्य गतैष्ययोगेन गुणितः स्वस्वध्रुवः पंचाशज्जिनादिः षष्टिहृत् स्पष्टः स्यादत ऊर्ध्वं स्पष्टध्रुवानंतरं अब्धिघटिकाश्चतुर्नाड्यो विषं स्यात् । एवमुक्तप्रकारेण कृताः सत्यः स्पष्टाः स्युः । एतदुक्तं भवति । ध्रुववच्चतुर्नाड्योऽपि नक्षत्रगतैष्ययोगगुणिताः कार्याः षष्टिहृताः कार्याः ताः स्पष्टाः स्युः स्पष्टानंतरं चतुर्नाड्यो विषाख्या ज्ञेयाः। अथ विषघटीनामपवादमाह–चंद्र इति । चंद्रः सौम्यभगः शुभग्रहराशिगः सन् विषभयं हंति । अथवा शुभसुहृद्दृष्टः शुभश्चासौ सुहृच्च तेन दृष्टः सन् विषभयं हंति । अथवा स्वांशगः स्वनवांशे वर्तमानः सन् विषभयं हंति वा इत्यथवा कोणास्ताभ्रसुखगोऽपि चंद्रो विषभयं हंति कोणे पंचमनवमे अस्तभं सप्तमं अभ्रं दशमं सुखं चतुर्थं एतत्स्थानगोऽपि चंद्रः विषभयं हंतीत्यर्थः । अत्रास्मिन् कोणादिस्थाने सांगे सलग्ने वर्तमानः अंगपो लग्नपो विषभयं हंतित्यर्थः । एवं पंच भंगाः संति । ननु सप्तमः खेटो विवाहे निंदितः कथमत्र चंद्रो गृहीतः सत्यमिदं वाक्यं सर्वकर्मसाधारणं तस्मान्निंदितं स्थानं वर्जयित्वाऽन्यत्र ग्राह्यः । तथा च बृहस्पतिः । चंद्रो विषघटीदोषं हंति केंद्रत्रिकोणगः । लग्नं विना शुभैर्दृष्टः केंद्रे वा लग्नपे तथा । फलप्रदीपे। विषनाड्युत्थितं दोषं हंति सौम्यर्क्षगः शशी । मित्रदृष्टोऽथवा स्वीयवर्गस्थो लग्नपोऽपि च ॥ २३ ॥**

**टीकार्थ**—आतां विषघटिका सांगतों–अश्विनी नक्षत्रापासून पन्नास इत्यादि घटिका सांगितल्या आहेत त्या श्लोकांत आहेत त्या घटिकांपुढें ४ घटिका विष असतें ह्मणून अश्विनीच्या पन्नास घटिका भोगून झाल्यावर ४ घटिका विष घटिका आहेत ह्याच प्रमाणें बाकीच्या नक्षत्रांचेंही समजावें ह्या श्लोकांची टीका ह्मणजे नुसते अंक ठेवणें हेंच आहे ॥२२॥ आतां ह्याचे ध्रुवकांचें स्पष्टी करण सांगतों–ते असें कीं, नक्षत्राचा जो ध्रुव ह्मणजे५० इत्यादि असेल त्याला गत आणि एष्य अशा योगानें गुणित करावा. नंतर त्या ६० नीं भागाव्यात. नंतर जो भागाकार येईल तो स्पष्ट ध्रुव जाणावा. ध्रुवाप्रमाणेंच ४ घटिकांला गुणून व भागून जो भागाकार येईल तितक्या घटिका त्या नक्षत्राच्या स्पष्ट घटी जाणाव्यात असें उदाहरण श्लोकाच्या अर्थांत दिलें आहे तें तेथें पहावें. आतां विष घटीचा अपवाद सांगतों–ते अपवाद पांच आहेत ते असें कीं, १ चंद्र हा शुभ ग्रहाच्या राशीवर असेल तर विष घटींचा नाश होतो. २ शुभ असून मित्र अशा ग्रहानें पाहिलेला चंद्र विषघटीचा नाश करतो. ३ चंद्र आपल्या नवांशामध्यें असेल तर तो विषघटीचा नाश करतो. ४ किंवा कोण ह्मo ९–५ अस्त ह्मo ७ अभ्र ह्मo १० सुख ह्मo ४ अर्थात् ९–५–७–१०–४ ह्या ठिकाणीं असलेला चंद्र विषघटीचा नाश करितो. ५ अथवा लग्नाचा अधिपति ९–५–७–१०–४ आणि लग्नीं १ ह्या स्थानीं असेल तर तो विषघटीचा नाश करितो अशा रीतीनें विषघटींचे पांच अपवाद आहेत. आतां अशी शंका येते कीं, सप्तम स्थानचा ग्रह विवाहामध्यें निंद्य सांगितला आहे असें असतां येथें चंद्र कसा ग्राह्य केला ? बरोबर आहे, हें वाक्य सर्व कर्मांस साधारण आहे ह्मणून निंदित स्थान सोडून दुसरे ठिकाणचा चंद्र घ्यावा. तसेंच बृहस्पति सांगत आहे कीं, केंद्रांत ह्मo१–४–७–१० ह्या स्थानचा आणि त्रिकोण ह्मo ५–९ ह्या स्थानचा चंद्र विषघटी दोषाचा नाश करतो, परंतु तो चंद्र लग्नीं नसावा आणि शुभग्रहांनीं

पाहिलेला असावा. अथवा लग्नाचा अधिपति केंद्रीं ह्म० १-४-७-१० ह्या स्थानीं असेल तर तो विषघटीचा नाश करतो. फलप्रदीप ग्रंथांत असें सांगितलें आहे. कीं, चंद्र हा शुभग्रहांचे राशीवर असेल आणि तो मित्रांनीं दृष्ट असेल तर तो विषघटीचा नाश करितो अथवा लग्नाचा अधिपति आपल्या स्वीय वर्गामध्यें असेल तर तोही विषघटीचा नाश करितो ॥ २३ ॥

## विवाहाचे अशुभ व शुभ ग्रह.

लग्ने चंद्रखला रिपौ शशिसितौ सर्वे द्युने खे बुधोऽ- ।
ब्जोंऽत्येऽगुः सुखगोऽष्टमाः कुजशुभाः शुक्रस्तृतीयः शुचे ॥
लाभे सर्वखगाः शुभा अखिलगाख्यष्टारिगाः स्युः खलाः ।
चंद्रख्यंबुधने श्रियेंशभदृकेट् स्यान्मृत्यवेऽष्टारिगः ॥ २४ ॥

श्लोकार्थ—विवाहाच्या इष्टलग्नीं चंद्र व खलग्रह, षष्ठस्थानीं चंद्र व शुक्र, सप्तमस्थानीं शुभ व पाप हे सर्व ग्रह, दशमस्थानीं बुध, द्वादश चंद्र, चतुर्थ राहु, अष्टमस्थानीं मंगळ व शुभग्रह आणि तृतीय शुक्र हे सर्व शोककारक जाणावे. एकादशस्थानीं सर्व ग्रह, पूर्वींच्या निंद्य स्थानावांचून सर्व स्थानीं शुभ ग्रह अष्टम मंगळावांचून ३।८।६ या स्थानीं खलग्रह आणि ३।४।२ ह्या स्थानीं चंद्र हे विवाहाला लक्ष्मीप्रद होत, इष्टनवांश, लग्न, द्रेष्काण ह्यांचे स्वामी अष्टम व षष्ठ असतां मृत्युकारक जाणावे ॥ २४ ॥

अथ विवाहलग्ने इष्टानिष्टग्रहानाह—लग्ने चंद्रेति । चंद्रश्च खलाश्च ते चंद्रखलाः लग्ने वर्तमानाः शुचे शोकाय भवंति तथा रिपौ षष्ठे शशिसितौ चंद्रशुक्रौ तथा सर्वे द्युने सर्वे क्रूरसौम्याः द्यूने सप्तमे तथा खे दशमे बुधः तथा अब्जश्चंद्रोंऽत्ये अगुः राहुः सुखगश्चतुर्थगः न विद्यंते गावः किरणा यस्येत्यगुः राहुः । राहुस्तमोऽगुरसुरश्चेति बृहज्जातके राहुनामानि । तथा अष्टमाः कुजशुभाः कुजश्च शुभाश्च ते तथा शुक्रस्तृतीय इति स्पष्टार्थं एते प्रत्येकं उक्तस्थानगाः. शुचे शोकाय भवंति । अथेष्टानाह—लाभे एकादशे सर्वखगाः तथा शुभाः सौम्यग्रहा अखिलगाः निंद्यं विना सर्वस्थानगा तथा खलाः क्रूराः ख्यष्टारिगाः तृतीयाष्टषष्ठगाः तत्राष्टमे भौमो निंदितः तं विना पापाष्टमा ग्राह्याः चंद्रख्यंबुधने ततीयचतुर्थद्वितीये चंद्रः एते प्रत्येकं श्रियै लक्ष्म्यै भवंति श्रीकारका इत्यर्थः । एवं शुभाशुभग्रहानुक्त्वा तत्र विशेषमाह—अंशभदृकेट् अष्टारिगः सन् मृत्यवे स्यात् । अंशो नवांशः भं लग्नं दृको दृक्काणः एषामीट् स्वामी नवांशस्वामी लग्नस्वामी दृक्काणस्वामी एते प्रत्येकं अष्टषष्ठगा मृत्यवे मृत्युहेतवो भवंतीत्यर्थः ॥ २४ ॥

टीकार्थ—विवाहलग्नीं इष्टग्रह कोणते व अनिष्ट ग्रह कोणते हें सांगतों—लग्नीं चंद्र आणि पापग्रह असतील तर ते शोक करणारे होतात. तसेंच शत्रु षष्ठस्थानीं ह्मणजे शत्रुस्थानीं चंद्र आणि शुक्र असतील, किंवा सप्तमस्थानीं सर्वच पापग्रह असतील, आणि दशमस्थानीं बुध असेल, बारावे स्थानीं चंद्र असेल. तसेंच सुख ह्मणजे चतुर्थस्थानीं राहू असेल त्या राहुला अगु असें नांव आहे, कारण त्याला गो ह्मणजे किरण नाहीं ह्यास्तव अगु असें राहूचें नांव आहे. बृहज्जातकांत राहूचीं नावें राहु, तम, अगु, असुर अशीं आहेत, तसेंच अष्टमस्थानीं मंगळ आणि शुभग्रह असतील तृतीयस्थानीं शुक्र असेल इतके हे सर्व ग्रह प्रत्येकजण त्या त्या स्थानीं असलेले शोककारक होतात. आतां इष्टग्रह कोणते तें सांगतों—लाभस्थानीं ह्मणजे अकरावे स्थानीं सर्व ग्रह शुभकारक आहेत. निंद्य सांगितलेल्या स्थाना शिवाय बाकी सर्व ठिकाणीं शुभग्रह असलेले शुभकारक होत. पापग्रह ह्म० क्रूरग्रह ३-६-११ ह्या स्थानीं असलेले शुभकारक आहेत. पैकीं मंगळ हा अष्टमस्थानीं निंदित सांगितला आहे त्याशिवाय दुसरे पापग्रह अष्टमस्थानीं शुभकारक आहेत. चंद्र हा ३-४-२ ह्या स्थानाचा शुभकारक आहे. ह्मणजे हा प्रत्येक लक्ष्मीदायक आहे. अशारीतीनें शुभ आणि अशुभ ग्रह सांगून आतां त्यांतील विशेष सांगतों—नवांशाचा, लग्नाचा, आणि दृक्काणाचा स्वामी हे प्रत्येकजण अष्टम आणि षष्ठस्थानीं असलेले मृत्युकारक आहेत ॥ २४ ॥

## अशुभ ग्रहांचे अपवाद.

कन्यातौलिकशत्रुगेहगभृगुः षष्ठोऽपि नो भंगकृ- ।
द्भौमो मृत्युगतोऽपि शत्रुशशिनोर्गेहस्थितो वाऽङ्कगः ॥

शुक्लेऽत्यारिविधुः सुवर्गदृगितः स्वोजोयुजीज्ये तनौ ।
शुक्रे वा शुभदोऽथ कंटकनिजांशेज्येक्षितः सग्रहः ॥ २५ ॥

श्लोकार्थ—कन्या, धन आणि शत्रुराशि ह्मणजे सिंह, कर्क ह्या ४ राशींला शुक्र असून षष्ठस्थानीं असतां तो अशुभ नाहीं. मिथुन, कन्या, कर्क ह्या राशींला शुक्र असून अस्तंगत मंगळ अष्टमस्थानीं असला तर तोही अशुभ नाहीं, बलवान् गुरु किंवा शुक्र इष्टलग्नीं असेल आणि शुक्लपक्ष असून चंद्र शुभग्रहाच्या वर्गी व शुभग्रहाच्या दृष्टीनें युक्त असेल तर तसा चंद्र द्वादश किंवा षष्ठ असतांही शुभ फळ देतो, बुध, गुरु शिवाय अन्य ग्रहानें युक्त चंद्र अशुभ खरा, परंतु त्यावर केंद्रस्थानीं असून स्वनवांशीं असणाऱ्या गुरूची दृष्टि असतां तोच शुभ जाणावा ॥२५॥

**अथ कतिचिद्दोषाणामपवादमाह–तत्र प्रथमं भृगुषष्ठापवादमाह–कन्यातौक्षिकेति । कन्या प्रसिद्धा शुक्रस्य नीचं तौक्षिको धनुर्धरः शत्रुगेहं पूर्वोक्तं भृगुभुवः शत्रू रवींदू इति । तत्र रवेर्गृहं सिंहः इंदोर्गृहं कर्क एषां कन्यादीनां अन्यतमगेहगतो भृगुः षष्ठोऽपि नो भृंगकृत्स्यात् लग्नभंगकरो न भवतीत्यर्थः तथा च कश्यपः । नीचगे तत्तुरीये वा शत्रुक्षेत्रगतेऽपि वा । भृगुषष्ठोद्भवो दोषो नास्तीत्यत्र न संशयः। अथ कुजाष्टमदोषापवादमाह–भौमो मृत्युगतोऽपि अष्टमगतोऽपि शत्रुशशिनोर्गेहस्थितो यदि भवति वा इत्यथवा अर्कगः अस्तंगतोऽपि यदि भवति तदा नो भंगकृत्स्यात् । अस्य शत्रुर्बुधः कुजस्य विदरिरिति प्रागुक्तः तस्य गृहं कन्या मिथुनं च शशिगृहं कर्कटः तस्य नीचं एषामन्यतमस्थः अस्तंगतो वा अष्टमगतोऽपि भौमो लग्नभंगकरो न भवतीत्यर्थः । अस्तगं इति पाठे । स एवार्थः तथा च कश्यपः । अस्तगे नीचगे भौमे शत्रुक्षेत्रगतेऽपि वा ।कुजाष्टमोद्भवो दोषो न किंचिदवशिष्यत इति । अथ द्वादशषष्ठचंद्रापवादमाह–शुक्लेति । शुक्लपक्षेंऽत्यारिविधुर्द्वादशषष्ठचंद्रः सुवर्गदृगितः वार्गाश्च दृशश्च वर्गदृशः शोभनानां वर्गदृशः सुवर्गदृशः ता इतः प्राप्तः सुवर्गदृगितः शुभवर्गशुभदृष्टियुक्त इत्यर्थः । एवंविधो विधुः शुभदः स्यात् कस्मिन् सति इज्ये गुरौ शुक्रे वा तनौ लग्ने सति कथंभूते गुरौ स्वोजोयुजि सुतरामोजः स्वोजः उत्कृष्टबलं तेन युनक्तीति स्वोजोयुक् तस्मिन् स्वोजोयुजि अतिबलिष्ठे सतीत्यर्थः शुक्रस्याप्येतद्विशेषणं एतदुक्तं भवति बलिष्ठे गुरौ शुक्रे वा लग्नस्थे सति शुक्लपक्षे चंद्रमाः सुवर्गदृष्टिसहितः यदि भवति तदा द्वादशषष्ठगोऽपि शुभद इति भंगकरो न स्यादन्यथा न । मुहूर्तदर्पणे। कवौ गुरौ वा बलिनि स्थिते तनौ शुभेन दृष्टः शुभवर्गगः शशी । विवर्धमानः शुभकृच्च नाशुभं करोति तिष्ठन्नपि रिःफषष्ठयोरिति ॥ अथ सग्रहचंद्रदोषापवादमाह–सग्रहः ग्रहेण ग्रहाभ्यां ग्रहैर्वा सहवर्तमानः सग्रहः बुधगुरुवर्ज्यान्यग्रहयुक्त इत्यर्थः। यतः पूर्वमुक्तं हिमरुचिं ज्ञेज्योनखेटान्वितामिति । एवंविधः सग्रहः विधुः केंद्रनिजवर्गेज्येक्षितः सन् शुभदः स्यात् केंद्रं प्रसिद्धं निजवर्गो निजांशः तत्र वर्तमान इज्यः केंद्रनिजवर्गेज्यः तेन ईक्षितः अवलोकितः सग्रहः चंद्रमाः शुभदः भंगकरो न स्यात्। उक्तं च । गुरुः स्वकीयवर्गस्थो बलवान्कंटकाश्रितः । पश्यन् सग्रहशीतांशुं तद्दोषं विलयं नयेदिति ॥ २५ ॥**

**टीकार्थ**–आतां किती एक दोषांचा अपवाद सांगतों–पैकीं अगोदर षष्ठस्थानच्या शुक्राचा अपवाद सांगतों–कन्या, तौक्षिक ह्म० धनु, शत्रुगृह ह्म० शुक्राचे शत्रु रवि आणि इंदु त्यांचीं गृहें ह्म० रविचें सिंह, चंद्राचें कर्क ह्या ह्मणजे कन्या धन, सिंह, आणि कर्क ह्या चारांपैकीं कोणत्याही एकराशीस जर शुक्र असेल आणि तो जरी षष्ठस्थानचा असेल तरी तो अशुभ नाहीं. अर्थात् लग्नाचा भंग करणारा होत नाहीं. तेंच काश्यप सांगतो कीं, नीचेचा ह्म० कन्या राशीचा कारण शुक्राची उच्चराशी मीन आहे त्यापासून सातवी राशी कन्या आहे ह्मणून ती शुक्राची नीच राशी आहे. त्या नीच राशीचा, त्या कन्येपासून चवथ्या ह्मणजे धनराशीचा, आणि शुक्राचे शत्रु जे रवि आणि चंद्र ह्या दोघांच्या राशीचा ह्मणजे सिंह आणि कर्कराशीचा शुक्र असून तो जरी षष्ठस्थानचा असेल तरी तो दोष करणारा नाहीं. आतां अष्टमस्थानच्या मंगळाचा अपवाद सांगतों–मंगळ मृत्युस्थानीं ह्मणजे अष्टमस्थानीं जरी असला परंतु तो आपल्या शत्रुच्या ह्मणजे बुधाच्या अथवा चंद्राच्या गृहीं असेल तर तो मंगळ दोष करणारा नाहीं अथवा मंगळ सूर्याबरोबर अर्थात् अस्तंगत असेल तर तो भंगकरणारा होत नाहीं. मंगळाचा शत्रु बुध आहे असें पूर्वीं सांगितलें आहे. त्या बुधाचें गृह कन्या आणि मिथुन, अशीं दोन आहेत. चंद्राचें गृह कर्क आहे तेव्हां कन्या, मिथुन, कर्क इतक्या राशीचा व नीचीचा असा मंगळ जरी अष्टमस्थानीं असला अथवा अस्तंगत मंगळ दोष-

१ भृगुजस्यारी रवीन्दू हिताविति पूर्वपाठो गतोऽस्त्यत्र तु एवं वर्तते ।

करणारा नाहीं. तेंच काश्यप सांगतो कीं, अस्तंगत असलेला, नीचींचा असलेला, शत्रूच्या घरीं असलेला, असा मंगळ जरी अष्टमस्थानचा असला तरी तो दोष करणारा नाहीं आतां बाराव्या आणि सहाव्या चंद्राचा अपवाद सांगतों—शुक्लपक्षामध्यें बाराव्या आणि सहावा चंद्र असून तो जर शुभवर्गीतील ग्रहांच्या दृष्टीनें युक्त असेल तर असा चंद्रमा शुभकरणारा आहे. परंतु गुरु किंवा शुक्र तनुस्थानीं ह्मणजे लग्नीं असावा आणि तो गुरु आणि शुक्र हे दोघे अतिशय बलिष्ठ असावेत. अर्थात् इतका अर्थ निघाला कीं, अतिशय बलिष्ठ गुरु किंवा शुक्र लग्नीं असून शुक्लपक्षांतील चंद्र सुवर्गीच्या दृष्टीनें युक्त असेल तर तो बारा आणि सहा ह्या स्थानचा दोष करणारा नाहीं इतकें नसेल तर तो दोषकारक आहे. मुहूर्तदर्पणांत सांगितलें आहे कीं, जरी चंद्र षष्ठ आणि द्वादशस्थानीं असला परंतु लग्नीं अति बलिष्ठ गुरु किंवा शुक्र असेल आणि तो चंद्र शुभग्रहांनीं दृष्ट असेल आणि शुभवर्गीत राहिला असेल व दररोज वृद्धिंगत होणारा अर्थात् शुक्लपक्षांतील असेल तर तो शुभ करणारा होतो कधींही अशुभ करीत नाहीं. आतां दुसऱ्या ग्रहासह असलेल्या चंद्राचा अपवाद सांगतो—तो चंद्र एका ग्रहानें, दोन ग्रहांनीं अथवा तीन ग्रहांनीं युक्त असावा ह्मणजे बुध आणि गुरु ह्या दोहों शिवाय दुसऱ्या कोणत्याही ग्रहांनीं युक्त असावा असें ह्मणण्याचें कारण कीं, पूर्वी चंद्र हा गुरु व बुध ह्यांनीं युक्त चंद्र ग्राह्य असें सांगितलें आहे. ह्मणून बुध व गुरु शिवाय दुसऱ्या ग्रहांनीं युक्त असा चंद्र अशुभ खरा परंतु त्यावर केंद्रांत ह्म० १-४-७-१० ह्या स्थानामध्यें राहणारा असेल आणि आपल्या नवांशांत राहणाऱ्या अशा गुरूची दृष्टि असेल तर तो शुभ जाणावा. असें सांगितलें आहे कीं, आपल्या नवांशांत राहणारा, आणि केंद्रांत ह्म० १-४-७-१० ह्या स्थानीं रहाणारा असा गुरु जर अन्य ग्रहांनीं युक्त असलेल्या चंद्राला पाहील तर त्या चंद्राचा दोष नाहींसा करितो ॥ २५ ॥

### सामान्य दोषांचे अपवाद व भावफळ.

**दोषाणां शतमिंदुजः शतयुगं शुक्रो गुरुर्घातये- ।**
**ल्लक्षं कंटककोणगोंगमिनचंद्रौजस्विपातादिकान् ॥**
**भंगा ये विबला न तेऽत्र सफलाः संध्यंशतुल्योऽफलः ।**
**स्याद्भावांशसमो ग्रहोऽखिलफलः संध्यूर्ध्वगः स्यात्परः ॥ २६ ॥**

श्लोकार्थ—इष्टलग्नापासून केंद्रस्थानीं व कोणस्थानीं ह्मणजे १।४।७।१०।९।५ या स्थानीं बुध असतां १०० दोषांशा, त्याच स्थानीं शुक्र असतां २०० दोषांचा आणि त्याच स्थानीं गुरु असतां १००००० दोषांचा नाश करितो, सूर्याच्या व चंद्राच्या बळानें युक्त लग्न, महापात, एकार्गल, उपग्रह, लत्ता, जामित्र, कर्तरी इत्यादि दोषांचा नाश करितें, दोषांचा नाश करणारे बलिष्ठ असतां ते दोषांच्या नाशाविषयीं समर्थ होतात, निर्बल असतां दोष नाश करित नाहींत. पुढच्या श्लोकांत भाव व त्यांचे संधी आहेत. संधीच्या अंशां इतके ग्रहाचे अंश असतील तर तो ग्रह निष्फल होय. भावाच्या अंशां इतके ग्रहाचे अंश असतां तो संपूर्ण फळ देतो. संधीच्या पुढें असणारा ग्रह पुढच्या भावाचें फळ देतो ॥ २६ ॥

**अथ सामान्यदोषापवादमाह-दोषाणामिति । कंटककोणगः केंद्रकोणग इंदुजः बुधः दोषाणां शतं घातयेत् तत्स्थः १।४।५।७।९।१० शुक्रः दोषाणां शतयुगं द्विशतं घातयेत् तत्स्थः १।४।५।७।९।१० बृहस्पतिः दोषाणां लक्षं घातयेत् । अपवादांतरमाह-अंगे लग्नं इनचंद्रौजस्विपातादिकान् घातयेत् इनचंद्रयोः सूर्यचंद्रयोः ओजो बलमस्यास्तीति इनचंद्रौजस्वि एवंविधं लग्नं पातादिकान् घातयेत् । उक्तं च वसिष्ठेन । एकार्गलोपग्रहपातलत्ताजामित्रकर्तर्युदयादिदोषाः ॥ नश्यंति चंद्रार्कबलोपपन्ने लग्ने यथार्काभ्युदयेऽधकार इति । अथ दोषापवादभंगमाह-भंगा इति । ये भंगा दोषभंगा विबला गतबला निर्बलास्तेत्र दोषभंगविषये सफला न भवंति दोषभंगसमर्था न भवंतीत्यर्थः । तस्माद्दोषभंगकर्तां बलं विचार्य दोषभंगमादिशेदितिभावः । उक्तं च । सामान्येनोदिता दोषा भंगास्तेषां तु तद्विदैः । यदि ते बलहीनाः स्युः प्रध्वंसाभावतां ययुः ॥ अथ भावशुद्धिमाह-संध्यंशतुल्योऽफल इति । संध्यंशतुल्यः संधिभागसमानो ग्रहः अफलः स्यात् । सदसत्फलदो न भवति भावांशतुल्यो ग्रहः अखिलफलदः स्यात् । संपूर्णफलदो भवति अर्थान्मध्येऽनुपातात्फलं वेद्यं । विशेषफलमाह-संध्यूर्ध्वगः स्यात्पर इति । संध्यूर्ध्वगः संध्यंशादिकः परः स्यात् परभावफलदः स्यादित्यर्थः ॥ २६ ॥**

**टीकार्थ**—आतां सामान्य दोषांचा अपवाद सांगतों-कंटक केंद्र व कोण ह्मणजे १-४-७-१०-९-५ ह्या

स्थानीं राहणारा आणि इंदूचा पुत्र ह्म० बुध हा १०० दोषांचा नाश करणारा आहे. त्याच ठिकाणीं राहणारा शुक्र २०० दोषांचा नाश करणारा आहे. त्याच ठिकाणचा गुरु १००००० दोषांचा नाश करणारा आहे. दुसरे अपवाद सांगतों–ज्या लग्नावर चंद्र आणि सूर्य ह्यांचें बल आहे असें जें लग्न तें पात इत्यादिकांचा नाश करतें. वसिष्ठानें सांगितलें आहे कीं, जसा सूर्याचा उदय झाला असतां अंधकाराचा नाश होतो. त्याप्रमाणें सूर्य आणि चंद्र ह्या दोघांचें बल असलेलें लग्न हें एकार्गल, उपग्रह, पात, लत्ता, जामित्र कर्तर्युदय इत्यादि दोषांचा नाश करतें. आतां दोषांचे अपवादांचा भंग सांगतों–जे दोषाचे भंग सांगितले ते भंग जर निर्बल असतील तर ते दोषांचा भंग करण्यास समर्थ होत नाहींत. ह्मणून दोषांचा भंग करणारे जे असतील त्यांच्या बलाचा विचार करून मग दोषांचा भंग कसा आहे वगैरे सांगावें, असें सांगितलें आहे कीं, समान रीतीनें जे भंग सांगितले आहेत ते भंग करणारे ग्रहादिक जर निर्बल असतील तर त्यापासून भंगाचा नाश होणार नाहीं असें त्यांतील बलाबल जाणणाऱ्यांनीं विचारून सांगावें. आतां भावाची शुद्धि सांगतो-संधीच्या अंशां इतके ज्याचे अंश आहेत असा ग्रह कांहीं फल देणारा होत नाहीं तर तो सत् किंवा असत् त्या दोन प्रकारचेंही फळ देत नाहीं. भावाचे अंशा इतके अंश असलेला ग्रह संपूर्ण फळ देतो.अर्थात् मध्य भागीं असलेला मध्यम फल देतो.विशेष फल सांगतो–संधीच्या अंशाचे पुढें रहाणारा ग्रह पुढच्या भावाचें फल देणारा होतो ह्याचे पुढील श्लोकांत भाव आणि त्याचे संधी सांगितले आहेत ॥ २६ ॥

### केशवींतील नतसाधन.

( रात्रेः शेषमितं युतं दिनदले नाह्नोगतं शेषकम् ॥
विश्लेष्यं खलु पूर्वपश्चिमनतं त्रिंशच्च्युतं चोन्नतम् ॥ १ ॥)

अर्थ—मध्यरात्रीनंतर उदयपर्यंतच्या शेषघटिका आणि पूर्वी अस्तापासूनच्या गतघटिका दिनमानाच्या अर्धानें युक्त कराव्या, दिवसास मध्यान्हा पूर्वीच्या गतघटिका आणि पुढच्या शेषघटिका दिनमानाच्या अर्धातून वजा कराव्या ह्मणजे क्रमानें पूर्व व पश्चिम नत होतें, ( उदाहरणः— शके १८१७ आश्विन शुद्ध १५ गुरुवार रोजीं सूर्योदयापासून इष्टकाळ ८ घटिका ३० पळें ह्या वेळीं नत करावयाचें, त्या दिवशीं दिनमान २९ घ० ३४ प० त्याचें अर्ध १४ घ० ४७ प० ह्यांतून इष्टकाळ ८ घ० ३० प० वजा करून बाकी ६ घ० १७ प० हें पूर्वनत झालें; कारण इष्टकाळ दिवसाच्या गतघटींत आहे, ह्याच दिवशीं रात्रौ ६ घ० इष्टकाळ मानिला तर दिनमानाचें अर्ध १४ घ० ४७ प० ह्यांत ६ घ० युक्त केल्यानें २०|४७ हें पश्चिमनत होईल,) ३० तून नत वजा केलें ह्मणजे उन्नत होतें ॥ १ ॥

### स्थूलमानाचें भावसाधन.

भागाः स्युर्नतनाडिका रसहतास्तद्धीनयुक्प्राक्परे ।
सूर्यः खं सरसं सुखं कथितवल्लग्नं सषड्भं मदः ॥
व्यस्ताभ्रत्रिलवोऽथ हकूच्युत उभौ योज्यौ कुदघ्नौ पृथक् ।
लग्ने चांबुनि ते सषट्तनुमुखाः संधिर्द्वियोगोर्धकः ॥ २७ ॥
( पाठांतरं ॥ व्यस्ताभ्रारिलवोऽथ भूच्युत इमौ भूयोंगपातालयोः ।
क्षेप्यौ षड् तनुतः ससंधय इमे षड्भान्विताः स्युः पुरे ॥ २७ ॥ )

श्लोकार्थ—नतघटींना ६ नीं गुणून गुणाकार येईल ते अंश होतात, मग ते अंश इष्टकाळच्या स्पष्टरवींतून पूर्वनत असतां वजा करावे. आणि पश्चिमनत असतां स्पष्टरवींत मिळवावे, ह्मणजे तो दशम भाव होतो दशमभावांत ६ राशि मिळविल्या ह्मणजे तो चतुर्थभाव होतो पुढें ( विवा०प्र०श्लोक ३१यांत ) सांगितल्या प्रमाणें लग्न करावें, ह्मणजे तो प्रथमभाव होतो. यांत सहा राशि मिळविल्या ह्मणजे तो सप्तमभाव होतो, नंतर दशमभावांतून सप्तमभाव वजा करून बाकीला ६ नीं भागावें, राश्यादि भागाकार येईल तो १ तून वजा करून बाकी काढावी, मग

१ व्यस्ताभ्रेति गतार्धार्थस्यैव पाठान्तरेणार्थं ग्रथनमतेत्.

राश्यादि भागाकार फिरून फिरून लग्नांत मिळवावा, आणखी वरील बाकी पुनः पुनः चतुर्थभावांत मिळवावी, ह्मणजे लग्नापासून संधी सहित ६ भाव तयार होतात, त्या प्रत्येकांत ६ राशि मिळवाव्या ह्मणजे सप्तमादि पुढचे ६ भाव तयार होतात. ( उदाहरणः— ६ घ० १७ प० पूर्वनत आहे, त्याला ६ नीं गुणून ३७ अं० ४२ क० झाल्या. इष्टकाळचा रवि ५।१६।०।४ त्यांतून नतपूर्व आहे ह्मणून ३७।४२ वजा करून बाकी ४।८।१८।४ हा दशमभाव झाला. त्यांत ६ राशि मिळवून १०।८।१८।४ हा चतुर्थ भाव. लग्न ७।३।२७।४५ हा प्रथमभाव. ह्यांत ६ राशि मिळवून १।३।२७।४५ हा सप्तमभाव. आतां ४।८।१८।४ दशम, त्यांतून १।३।२७।४५ सप्तम वजा करून बाकी ३।४।५०।१९ हिला ६ नीं भागून राश्यादि भागाकार ०।१५।४८।२३ हा १ तून वजा करून बाकी ०।१४।११।३७ निघाली. लग्न ७।३।२७।४५ ह्यांत राश्यादि भागाकार ०।१५।४८।२३ मिळवून ७।१९।१६।८ हा प्रथमद्वितीयांचा संधि झाला. त्यांत पुनः ०।१५।४८।२३ मिळवले ह्मणजे ८।५।४।३१ हा द्वितियभाव असेंच पुढें करीत गेलें ह्मणजे पुढचे संधी व भाव होतील. पूर्वीची बाकी ०।१४।११।३७ ही चतुर्थभाव १०।८।१८।४ ह्यांत मिळविली ह्मणजे १०।२२।२९।४१ हा चतुर्थपंचमांचा संधि. त्यांत फिरून बाकी मिळविली ह्मणजे ११।६।४१।१८ हा पंचमभाव. असेंच पुढें करीत जावें ह्मणजे सर्व भाव होतील. दोन भावांची बेरीज करून तिचें अर्ध केलें ह्मणजे तें त्या दोहोंचा संधि होतो. ) सर्वभाव आणि त्याचे संधि पुढील कोष्टकांत आहेत ॥ २७ ॥

**संध्यंशतुल्य इत्याद्युक्तं तत्र के ते संधयः के ते भावा इत्यपेक्षायां तत्साधनं किंचित्स्थूलमेकेन वृत्तेनाऽऽह–भागाः स्युरिति।नतनाडिका रसहता भागाः स्युः। नतसाधनं जातकपद्धतावुक्तं। रात्रेः शेषमितं युतं दिनदले नाह्नो गतं शेषकं विश्लेष्यं खलु पूर्वपश्चिमनतमिति। एतदुक्तं भवति । सूर्येष्टलग्नाभ्यामिष्टकालं साधयित्वा नतं च साधयित्वा तदिष्टकालभवं नतं षड्गुणं क्षतभागाः स्युरित्यर्थः। प्राक्पश्चिमनतेन क्रमेण तन्न्यूनयुक् सूर्यः तैर्भागैर्न्यूनयुक् पूर्वनते सति न्यूनः पश्चिमनते सति युक् युक्तः तात्कालिकः सूर्यः खं स्यात् दशमभावः स्यादित्यर्थः। तत् खं दशमः भावः सरसं षड्राशियुक्तं सत् सुखं चतुर्थभावः स्यात् कथितवल्लग्नं प्रोक्तवल्लग्नं ज्ञेयं तत्सषड्भं षड्राशियुक्तं सत् मदः सप्तमभावः स्यात्। एवं भावचतुष्टयं साधयित्वाऽतर्भावसाधनमाह–व्यस्ताभ्रत्रिलव इति । विगतः अस्तः अस्तभावो तस्मात्तद्व्यस्तं तच्च तत् अभ्रं च व्यस्ताभ्रं सप्तमभावरहितदशमभाव इत्यर्थः। तस्य त्रिलवो राश्यादिको ग्राह्यः अथ दृक्च्युतः द्विपतितः कार्यः एतौ उभौ केवलत्रिलवदृक्च्युतत्रिलवौ पृथक् पृथक् कुदस्रौ संतौ पृथक् पृथक् लग्ने अंबुनि च योज्यौ अयमर्थः। कुघ्नः त्रिलवो लग्ने योजितः सन् द्वितीयभावो भवति। दस्रो लग्नयोजितः सन् तृतीयभावो भवति। अथ दृक्च्युतः त्रिलवः कुघ्नः अंबुनि पूर्वसाधिते चतुर्थभावे योजितः सन् पंचमभावो भवति । तत्रैव दस्रोंबुनि योजितः षष्ठभावो भवति । ते षडनंतरसाधिता भावाः सषड्भ षड्राशिसहिताः कार्याः । ते तु सप्तमा ज्ञेयाः लग्नं सषड्भं मद इति यावत्। ते तु लग्नमुखा लग्नादयो भावाः स्युः । अथ संधिसाधनमाह–संधिर्द्वियोगोर्धक इति। द्वयोर्भावयोर्योगः अर्धितः संधिः स्यादिति स्पष्टम्॥ २७॥ अथ पाठांतरस्य व्याख्या–व्यस्तेति। सप्तमभावरहितस्य अरिलवः षड्भागो राश्यादिकः स पृथक् भूच्युत एकस्मात्पतित इमौ उभौ भूयः वारंवारमंगपातालयोः प्रथमचतुर्थभावयोः क्षेप्यौ ततुतः लग्नात् ससंधयः संधिसहिताः षड्भावाः स्युः। इमे भावाः षड्भावान्विताः संतः परे ससंधयो भावाः स्युः एवं भावसंधिसाधनं कृत्वा संध्यंशतुल्यो फल इति प्रागुक्तं ग्रहफलं विचार्य अंतरे अनुपातः भावसंध्यंतरेणाप्तं संधिखेटांतरात्फलमिति जातकपद्धतेः। एतत्स्थूलभावानयनं। सूक्ष्मं तु जातकपद्धताववगंतव्यम्॥ २७॥**

**टीकार्थ—**संधीच्या अंशांशी तुल्य ग्रह असें पूर्वी सांगितलें आहे त्यामध्यें ते संधि कोणते व भाव कोणते अशी अपेक्षा आली असतां त्यांचें स्थूलमानाचें साधन एका वृत्तानें सांगतो—नत कसें साधावें हें जातक पद्धतींत सांगितलें आहे. जो गुणाकार येतो तो नतपूर्व असेल तर रवि मधून वजा करावा आणि नत पश्चिम असेल तर तो गुणाकार रवीमध्यें मिळवावा. सूर्य आणि इष्ट लग्न ह्यांपासून इष्ट काळ साधावा आणि नतही सिद्ध करावें. जें इष्ट काळाचें नत असेल त्याला ६ नीं गुणावें आणि तें नत पूर्व असेल तर सूर्यांतून वजा करावें आणि पश्चिम नत असेल तर सूर्यांत मिळवावें, नंतर जो सूर्य येतो तो दशम भाव समजावा. त्या दशम भावांत ६ राशि मिळविल्या असतां तो सुख ह्मणजे चतुर्थभाव झाला.

पुढें विवाहप्रकरणाचे ३१ वे श्लोकांत सांगितल्याप्रमाणें लग्न तयार करावें तोच प्रथम भाव समजावा. त्या प्रथम भावांत ६ राशि मिळविल्या असतां मद ह्म० सप्तम भाव तयार होतो. अशा रीतीनें दशम भाव, चतुर्थ भाव, प्रथमभाव आणि सप्तम भाव असे चार भाव तयार केल्यावर मग आंतील भावांचें साधन सांगतों–ख ह्म० दशम भावांतून अस्त ह्म० सप्तमभाव वजा करावा. त्याचे राशि,अंश,कला वगैरे भाग घ्यावेत, तो दोन ठिकाणीं मांडावा हे दोन त्रिलवादि घेतले आहेत त्यांपैकीं एकांतून वजा करून जी बाकी येईल ती लग्नांत मिळविली असतां द्वितीय भाव तयार होतो. दुसऱ्यांतून दोन वजा करून जी बाकी ती लग्नांत मिळविली असतां तिसरा भाव होतो. पुनः राश्यादि भाव दोन ठिकाणीं मांडलेला असेल त्या पैकीं एका भागांतून एक वजा केल्यावर जी बाकी राहील ती चतुर्थ भावांत मिळविली असतां पंचम भाव तयार होतो, तोच चतुर्थ भावांत मिळविला असतां षष्ठ भाव तयार होतो, असे सहा भाव साधून तयार केल्यावर मग त्यांत सहा राशी मिळविल्या असतां;सातवा भाव तयार होतो म्हणजे लग्नांत सहा राशी मिळविल्या असतां मद ह्म०सप्तम भाव तयार होतो. अशा रीतीनें लग्नादि भाव सांगितले. आतां संधि साधन सांगतो–दोन भावांची बेरीज करून त्याचें अर्ध केलें असतां तें त्या दोन भावांचा संधि होतो .पाठांतरव्याख्यानार्थ श्लोकार्थांतच सोदाहरण सांगितला आहे. ॥ २७ ॥

### तन्वादि द्वादश भाव.

| तनु. | धन. | सहज. | सुहृत्. | सुत. | रिपु. | जाया. | मृत्यु. | धर्म. | कर्म. | आय. | व्यय. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| ७ | ८ | ९ | १० | ११ | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ३ | ५ | ६ | ८ | ६ | ५ | ३ | ५ | ६ | ८ | ६ | ५ |
| २७ | ४ | ४१ | १८ | ४१ | ४ | २७ | ४ | ४१ | १८ | ४१ | ४ |
| ४५ | ३१ | १७ | ४ | १८ | ३२ | ४५ | ३१ | १७ | ४ | १८ | ४५ |
| ७ | ८ | ९ | १० | ११ | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १९ | २० | २२ | २२ | २० | १९ | १९ | २० | २२ | २२ | २० | १९ |
| १६ | ५२ | २९ | २९ | ५२ | १६ | १६ | ५२ | २९ | २९ | ५२ | १६ |
| ८ | ५४ | ४० | ४१ | ५५ | ८ | ८ | ५४ | ४० | ४१ | ५५ | ९ |

### कर्तरी व तिचे अपवाद.

इंदोर्वा हरिजाद्व्ययस्वगतयोः स्यात्क्रूरयोः कर्तरी ।
स्वे वक्रयंत्यऋजुर्महत्यथ गुरौ रिःफे शुभे वा तनौ ॥
स्वेऽब्जे सौम्यखगेऽपि वा गुरुभृगुज्ञैः केंद्रकोणेषु वा ।
चेत्स्तः कर्तरिकारकौ दिविचरौ नीचास्थितौ सा न हि ॥ २८ ॥

श्लोकार्थ—चंद्रापासून किंवा लग्नापासून १२।२ ह्या स्थानीं खलग्रह असतां कर्तरी होतो. द्वितीयस्थानचा ग्रह वक्र ह्म० मागें येणारा, आणि द्वादशस्थानचा ऋजु ह्म० सरळ पुढें जाणारा असे खलग्रह असतां तिला महती कर्तरी ह्मणतात. गुरु बारावा असतां किंवा शुभग्रह लग्नीं असतां; अथवा द्वितीयस्थानीं चंद्र किंवा शुभग्रह असतां; किंवा गुरु, शुक्र, बुध केंद्रीं व कोणीं असतां; अथवा कर्तरी करणारे पापग्रह नीचस्थानीं असतां वरील दोन्ही कर्तरींचा दोष नाहीं. कर्तरीचे हे ६ अपवाद आहेत ॥ २८ ॥

अथ कर्तरीदोषलक्षणं सापवादमाह–इंदोर्वेति ।इंदोश्चंद्रात्सकाशात् वा इत्यथवा हरिजाल्लग्नात्सकाशात् व्यय १२ स्व २ गतयोः व्ययं द्वादशं खं द्वितीयं तदुभयत्र गतयोः पापग्रहतोः सतोः कर्तरी स्यात् । अथ महाकर्तरीलक्षणमाह–स्वे इति । स्वे द्वितीये स्थितः क्रूरो यदि वक्री स्यात् ।अंत्ये द्वादशे स्थितः क्रूरः ऋजुः मार्गगामी स्यात् तदा महती कर्तरी स्यात् । उक्तं च । अग्राभिमुखयोः पापग्रहयोर्ऋजुवक्रयोः । सा कर्तरीति विज्ञेया दंपत्योर्गलकर्तरीति ॥ एवं कर्तरीलक्षणमुक्त्वा तद्भंगमाह–गुरौ रिःफे प्रांत्ये द्वादशे सति सा कर्तरी न स्यादेवेत्येको भंगः। वा इत्यथवा शुभे ग्रहे बुधगुरुशुक्राणामन्यतमे तनौ लग्ने सति सा नेति द्वितीयो भंगः । स्वे द्वितीयेऽब्जे चंद्रे सति सा नेति तृतीयो भंगः ।

वा इत्यथवा सौम्यखगे द्वितीये सति सा नेति चतुर्थो भंगः । वा इत्यथवा केंद्र १।४।७।१० त्रिकोणेषु ५।९। गुरुभृगुबुधैः गुरुशुक्रबुधैः सद्भिः " कालाचेति" सप्तम्यर्थे तृतीया । सा कर्तरी न स्यादेवेति पंचमो भंगः । वा इत्यथवा कर्तरिकारकौ क्रूरौ द्विविचरौ नीचास्थितौ यदा स्यातां तदा सा न स्यादिति षष्ठो भंगः । हि अवधारणे ॥ २८ ॥

टीकार्थ—आतां कर्तरी दोषांचें लक्षण अपवादांसह सांगतो—चंद्रापासून अथवा हरिज ह्म० लग्न ह्यापासून व्यय ह्म० १२ स्व ह्म० २ ह्या स्थानीं पापग्रह असतील तर ती कर्तरी नांवाचा दोष होतो. आतां महाकर्तरी नांवाचा दोष सांगतो—द्वितीय स्थानचा ग्रह वक्र ह्मणजे मागें येणारा आणि द्वादश स्थानचा ग्रह सरळ पुढें जाणारा असेल तर ती महाकर्तरी समजावी. असें सांगितलें आहे कीं, लग्ना जवळ पापग्रह असून ते जर वक्र आणि सरळ जाणारे असतील तर ती कर्तरी समजावी, ती दंपतीच्या ह्म० स्त्रीपुरुषांच्या गळ्याला कापणारी आहे. अशा रीतीनें कर्तरीचें लक्षण सांगून तिचा भंग सांगतो— १ गुरु हा जर द्वादशस्थानीं असेल तर कर्तरीचा भंग होतो. २ अथवा लग्नीं शुभ ग्रह ह्मणजे बुध, गुरु आणि शुक्र ह्यांपैकीं एकादा असेल तर कर्तरीचा भंग होतो. ३ द्वितीय स्थानीं चंद्र असेल तर कर्तरीचा भंग होतो. ४ किंवा द्वितीय स्थानीं कोणी ही सौम्य ग्रह असेल तर कर्तरीचा भंग होतो. ५ अथवा केंद्रीं ह्म० १–४–७–१० आणि त्रिकोण ह्म० ९–५ ह्या स्थानीं गुरु, शुक्र आणि बुध हे असतील तर कर्तरीचा भंग होतो. ६ किंवा कर्तरी करणारे क्रूर ग्रह जर नीच स्थानचे असतील तर कर्तरीचा भंग होतो. अशा रीतीनें सहा प्रकारांनीं कर्तरीचा भंग निश्चयानें सांगितला आहे॥ २८॥

### पंचकदोष व त्याचा अपवाद.

लग्नं सेतातिथि ग्रहैर्हृदिभदग्वेदर्तुभूशेषकैः ।
रोगाग्नीनहरात्ययास्त्यज रुजं रात्र्यर्कमौंजीषु च ॥
अग्निं भौमगृहद्युषु द्युशनिसेवेंदुष्विनं हारमी- ।
ज्यारेतिष्वपरं विवाहसितवित्संध्यासु हीने तनौ ॥ २९ ॥

श्लोकार्थ—अभीष्टलग्न शुक्लप्रतिपदादि गततिथींनीं युक्त करून त्या संख्येला ९ नीं भागावें, बाकी ८ राहिली तर रोगपंचक; २ असल्यास अग्निपंचक; ४ असतां राजपंचक; ६ असेल तर चोरपंचक आणि १ बाकी उरेल तर त्या लग्नाला मृत्युपंचक आहे असें समजावें. ३।५।७।० बाकी राहील तर तें लग्न निष्पंचक जाणावें. ( उदाहरणः—भाव साधिलेलें लग्न वृश्चिक ८ त्या दिवशीं तिथि पूर्णिमा ह्मणून गततिथि १४ त्यांत ८ मिळवून २२ ह्यांला ९ नीं भागून ४ बाकी राहते ह्मणून वृश्चिक लग्नाला राजपंचक आहे. ) रात्रीस, रविवारीं व उपनयनीं रोगपंचक सोडावें. मंगळवारीं गृहकर्मास आणि दिवसास अग्निपंचक वर्ज्य. दिवसास, शनिवारीं सेवाकर्मीं व सोमवारीं राजपंचक त्याज्य. गुरुवारीं, मंगळवारीं व यात्रेला चोरपंचक वर्जावें. विवाहीं, शुक्रवारीं, बुधवारीं आणि संध्यासमयीं मृत्युपंचक सोडावें. लग्न निर्बल असतां पंचक पहावें. लग्न बलवान् असेल तर पंचकाचा दोष नाहीं ॥ २९ ॥

अथ पंचकदोषं सापवादमाह–लग्नमिति।लग्नमिष्टलग्नं सेतातिथि इता चासौ तिथिश्च इतातिथिर्गततिथिः तया सह वर्तमानं सेततिथि ग्रहैर्हृत् नवभक्तं कार्यं इभदग्वेदर्तुभूशेषकैः इभा अष्टौ दृशौ द्वे वेदाश्चत्वार ऋतवः षट् भूरेक एतन्मितैः शेषकैः कृत्वा क्रमेण रोगाग्नीनहरात्ययाः स्यू रोगः प्रसिद्धो अग्निः प्रसिद्ध इनो राजा । राजाऽधिपः पतिः स्वामी नाथः परिवृढः प्रभुः । ईश्वरो विभुरीशानो भर्तेंद्र इन ईशितेति धनंजयः । हरश्चौरः अत्ययो मृत्युः एते पंचकाः स्युरित्यर्थः । एतदुक्तं भवति । लग्नं शुक्लप्रतिपदादिगततिथियुक्तं कृत्वा नवभिर्हृत्वाऽष्टशेषे रोगः द्विशेषेऽग्निः चतुःशेषे राजा षट्शेषे चौरः एकशेषे मृत्युः । अथैते कुत्र वर्ज्या इत्याह–राऽयर्कमौंजीषु रुजं त्यज रात्रावर्के आदित्यवारे मौंज्यां रुजं त्यज । भौमगृहद्युषु अग्निं त्यज भौमे भौमवारः गृहं प्रसिद्धं द्युः दिवा एषु अग्निं अग्निपंचकं । द्युशनिसेवेंदुषु इनं त्यज द्युः दिवा शनिः शनिवारः सेवा स्वामिसेवनं इंदुः सोमवारः एषु इनं राजानं राजपंचकं त्यज । इज्यारेतिषु हारं त्यज चौरं त्यज इज्यो गुरुवार आरो भौमवारः इतिर्गतिर्यात्रेति यावत् आसु चौरं त्यजेत्यर्थः । विवाहसितवित्संध्यासु अपरं उर्वरितं मृत्युमित्यर्थः ।

**विवाहः प्रसिद्धः सितः शुक्रवारः वित् बुधवारः संध्या संध्याकालः आसु मृत्युं त्यजेति । अस्याप वादमाह–कस्मिन्सति तनौ लग्ने हीने हीनबले सति बलिष्ठे लग्ने सति एषां किमपि न बाध इत्यर्थः। तथा च ज्योतिःप्रकाशे । रोगं चौरं त्यजेद्रात्रौ दिवा राजाग्निपंचकं । उभयोः संध्ययोर्मृत्युमन्यकाले न निंदितमिति ॥ तत्रापि यत्र लग्नं चेद्बलाढ्यं तच्च निष्फलमिति । बलं जातकाज्ज्ञेयं । लघुजातके । अधिपयुतो दृष्टो वा बुधगुरुनिरीक्षितश्च यो राशिः । स भवति बलवान्न यदा युक्तो दृष्टोऽपि वा शेषैरित्यादि ॥ २९ ॥**

टीकार्थ—आतां पंचक दोष आणि त्यांचा अपवाद सांगतो–जें इष्ट लग्न असेल त्यांत गततिथि मिळवाव्यात आणि त्या बेरीजेला नवांनीं भागावें. भागून बाकी इभ ह्म० ८ दक् ह्म० २ वेद ह्म० ४ ऋतु ह्म० ६ भू० ह्म० १ अशी राहील तर अनुक्रमानें ८ बाकीस रोगपंचक,२ असल्यास अग्निपंचक, ४ असल्यास इन पंचक, ह्म० राजपंचक ६ असल्यास हर ह्म० हरण करणारा चोर त्याचें पंचक, १ असल्यास अत्यय ह्म० मृत्यु त्याचें पंचक जाणावें. ह्याचा अर्थ असा झाला कीं, लग्नाची जी संख्या असेल ह्म० लग्न १–१२ पर्यंतचा जो अंक असेल त्या अंकांत शुक्लप्रतिपदेपासून जेवढ्या तिथि गेल्या असतील तेवढ्या त्यांत मिळवाव्यात आणि त्या संख्येला नवांनीं भागून बाकी आठ उरल्यास रोग, दोन उरल्यास अग्नि, चार उरल्यास राजा, सहा उरल्यास चोर, एक उरल्यास मृत्यु असें जाणावें. आतां हीं पंचकें कोठें व केव्हां वर्ज्य करावींत हें सांगतो–रविवारीं रात्रीस, मौंजीबंधनास रोगपंचक वर्ज्य आहे. मंगळवारीं, गृहाचे कार्यास,दिवसास अग्नि पंचक वर्ज्य आहे. सोमवारीं दिवसास, सेवेच्या कामीं राजपंचक वर्ज्य आहे. इज्य ह्म० गुरुवारीं आणि आर ह्म० मंगळवारीं यात्रेचे कामीं चोरपंचक वर्ज्य आहे. सित ह्म० शुक्रवार वित् ह्म०बुधवार ह्या दोन वारीं विवाहाचे कामीं संध्या काळीं उरलेलें ह्मणजे मृत्यु पंचक त्याज्य आहे. ह्या पंचकांचा दोष लग्न हीनबल असतां जाणावा. परंतु जर लग्न बलिष्ठ असेल तर ह्या पंचकांचा बिलकूल दोष नाहीं. तेंच ज्योतिःप्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, रात्रीस चौर आणि रोग हीं पंचकें सोडावींत. दिवसास राजा आणि अग्नि हीं पंचकें सोडावींत. दोन संध्येच्या वेळेस मृत्युपंचक सोडावें, दुसऱ्या वेळीं पंचकाचा दोष नाहीं. सांगितलेल्या पांच ठिकाणीं पांच पंचकें वर्ज्य करावींत हें खरें, परंतु त्यावेळेस जर लग्न बलिष्ठ असेल तर तें पंचक निष्फळ आहे ह्म० त्यापासून कांहीं नाश होणार नाहीं, आतां लग्न बलिष्ठ आहे किंवा कसें आहे हें जातकापासून जाणावें. तेंच लघु जातकांत सांगितलें आहे कीं, लग्नाचा राशि जर आपल्या स्वामीनीं युक्त असेल, किंवा स्वामीनीं पूर्ण दृष्ट असेल, किंवा बुध आणि गुरु ह्या दोघांनीं दृष्ट असेल तर तो राशि बलवान् आहे असें समजावें. परंतु ज्यावेळेस स्वामीनें युक्त नाहीं, दृष्ट नाहीं, व दुसऱ्या शुभग्रहांनीं दृष्ट नाहीं, तर तो लग्नाचा राशि बलवान् नाहीं असें जाणावें ॥ २९ ॥

### राशिशुद्धि व अंशशुद्धि.

**जन्मर्क्षोदयतो मृती तदधिपौ तद्गाश्च ये तद्भवा- ।**
**स्तद्धं चांगगमंतकृत्खलु न चेत्तत्स्वामिमित्रैकता ॥**
**शस्तोंऽशो घटभीरुयुग्मधनुषां विज्ञास्तभांशौ तथा ।**
**चंद्रापुण्ययुतौ मृतिं वितनुतो दैन्यं च हीनौजसः ॥ ३० ॥**

श्लोकार्थ—जन्मराशि व जन्मलग्न ह्यांपासून अष्टम लग्न, त्याचा अधिपति, आणि अष्टमस्थानीं असणारे जे ग्रह, त्यांचे नवांश व राशि, इष्टलग्नीं असून जर जन्मलग्न व जन्मराशि ह्यांचे स्वामी, आणखी अष्टमाचे स्वामी ह्यांची परस्पर मैत्री नसेल, किंवा त्या दोहोंचा स्वामी एकच नसेल, तर ते मृत्युकारक होतात. परंतु मैत्री असतां अथवा स्वामी एक असतां शुभ होत. तूळ, मिथुन, कन्या, धन यांचे नवांश शुभ होत. बुधावांचून अस्तंगत ग्रहांचे राशि व नवांश तसेच चंद्रानें व खलग्रहांनीं युक्त राशि व नवांश मृत्यु करितात. बलहीन ग्रहाचे राशि व नवांश दीनत्व करितात ॥ ३० ॥

**अथ भनवांशयोः शुद्धिं सापवादमाह–जन्मर्क्षेति । जन्मर्क्षोदयतो जन्मराशिजन्मलग्नाभ्यां सकाशात् मृती येऽष्टमभवने यौ तदधिपौ तयोर्मृत्युभवनयोः स्वामिनौ ये च तद्गाः मृत्युभवनगताः स्युः तेषामंशो नवांशो अंगगो लग्नगतः च परं तेषां भं राशिः अंगगं लग्नगतं सत्तदा खलु निश्चयेनांतकृत् मरणकृत् स्यात् तदा कदाचिद्यदि तत्स्वामिमित्रैकता न स्यात् तयोर्जन्ममृत्युभवनयोः स्वामिनौ तत्स्वामिनौ तयोः । अथवाऽयमर्थः तयोर्जन्मनिधनभयोः स्वामिनौ तत्स्वामिनौ तयोर्यदि मित्रैकता**

न स्यात् मित्रं च एकश्च मित्रैकौ मित्रैकयोर्भावो मित्रैकता सा चेन्न स्यादनेन सर्वस्योक्तस्य सार्थकता भवति यदि तयोर्मित्रता स्यादथवा एकता स्यात्तदा नायं दोष इत्यर्थसिद्धं । वसिष्ठः । यस्याष्टलग्ने तदधीश्वरे वा राशौ तदीशेऽथ विलग्नगे वा । स मृत्युमाप्नोति तदा मनोजस्त्रिनेत्रभालाग्निबकवह्निनेवेति ॥ अन्यच्च । जन्मर्क्षजन्मलग्नाभ्यां रंध्रेशावष्टमौ च यौ । विलग्नसंस्थितावेतौ तदंशानपि त्यजेदिति ॥ चूडामणौ । लग्नं व्यालिवृषं त्याज्यमष्टमं सर्वकर्मसु । तत्राप्येके शस्तमेव तत्तत्रैव दोषकृत् ॥ न दोषोऽष्टमलग्नस्य यदि जन्मेशरंध्रपौ । सुहृदौ चेत्तदा कार्यं मंगलं मुनयो विदुरिति ॥ चतुर्थद्वादशभवनयोर्दोषो नाभोक्तो यतश्चतुर्थं द्वादशं लग्नं शस्तं यदि गुणान्वितमिति पूर्वाचार्यमतं हृदि धृत्वा सगुणमेवांगीकृतं तत्पुरस्ताद्दर्शयति । न च तनुं पंचेष्टखेटोन्वितां तनुं लग्नं इष्टाश्च ते खेटाश्च इष्टखेटाः पंच च ते इष्टखेटाश्च पंचेष्टखेटाः इष्टग्रहैः पंचभिः शुभैः इष्टैरन्वितं हीनं लग्नं चेद्देदवर्गोन्नितमिति सगुणस्यैवांगीकारात् । किं व्यर्थविस्तरेणेतिभावः । अंशशुद्धिमाह—शस्तोंऽश इति । घटभीरुयुग्मधनुषां अंशः शस्तः स्यात् । घटस्तुला भीरुः कन्या युग्मं मिथुनं धनुः प्रसिद्धं एषामंशो नवांशः शस्तः प्रशस्तः स्यात् । तत्रापि विशेषमाह—विज्ञास्तगांशाविति । विगतः ज्ञो बुधो येभ्यस्ते विज्ञाः ते च ते अस्ताश्च तेषां भांशौ राशिनवांशौ मृतिं वितनुतः अर्थादस्तमितस्यापि बुधस्य भांशौ दोषकरौ न भवतः । तथा चंद्राघयुतौ चंद्रेण पापग्रहेण वा युक्तौ मृतिं वितनुतः कुरुतः वधूवरयोरिति शेषः । हीनौजसो निर्बलस्य भांशौ दैन्यं दीनतां वितनुतः ॥ ३० ॥

टीकार्थ—आतां राशि व त्यांचा नवांश ह्यांची शुद्धि अपवाद सहित सांगतों—जन्मराशि पासून अथवा जन्मलग्नापासून जीं अष्टमस्थानें असतील तीं आणि त्या दोहोंचे अधिपति तसेच मृत्यु ह्मणजे अष्टमस्थानीं दुसरे ग्रह असतील. त्या सर्वांचा नवांश जर लग्नीं असेल आणि त्यांचा राशि जर लग्नीं असेल तर निश्चयानें मरण होणार ह्यांत संशय नाहीं, परंतु जर जन्मलग्नाचा स्वामी आणि मृत्यु भवनाचा स्वामी ह्या दोघांची मित्रता असेल किंवा दोहोंचा स्वामी एक असेल तर मात्र मरण होणार नाहीं असें अर्थ सिद्ध झालें, वसिष्ठ असें सांगत आहेत कीं, जसा त्रिलोचन ह्मणजे शिव ह्याच्या नेत्रांतील अग्नीनें काम दग्ध झाला, तसा ज्याच्या लग्नापासून आठव्यास्थानची राशि व तिचा अधिपति हे जर लग्नीं असतील तर त्याला मृत्यु प्राप्त होतो आणि जन्मराशीपासून आठव्या स्थानची राशि आणि तिचा अधिपति हे जर लग्नीं असतील तरीहि तो मृत्यु पावतो. दुसरें असें आहे कीं, जन्मराशि आणि जन्मलग्न पासून रंध्रेश ह्म० षष्ठस्थानाचे अधिपति आणि अष्टमस्थानचे अधिपति हे जर लग्नस्थानां असतील तर त्यांना व त्यांचे नवांशांना ही शुभकर्मांत सोडावेत. चूडामणि ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सर्व कर्मांमध्यें अष्टम लग्न वर्ज्य आहे, परंतु वृश्चिक आणि वृषभ खेरीज करून समजावें. त्या विषयीं ही कित्येकांचें मत आहे, ह्मणून तेंही दोषकारक नाहीं, जर जन्मलग्नाचा अधिपति आणि षष्ठस्थानचा अधिपति हे परस्पर मित्र असतील तर अष्टम लग्नाचा दोष नाहीं, त्यावेळीं मंगल कार्य करावें असें मुनीचें मत आहे. चतुर्थ, द्वादश ह्या दोन भवनांचा दोष येथें सांगितला नाहीं कारण कीं, चतुर्थ लग्न जर गुणांनीं युक्त आहे तर तें मंगलकार्यास प्रशस्त आहे, असें पूर्वीच्या आचार्यांचें मत आहे, तें मत मनांत घेऊन सगुण असें चतुर्थभवन घेतलें आहे, असें पुढें सांगावयाचें आहे पुढच्याच श्लोकांत " तनुं पंचखेटोन्वितां" ह्या भागानें सगुणाचेंच ग्रहण केलें आहे. उगीच व्यर्थ विस्तार करून काय फल आहे ? आतां अंशांची शुद्धि सांगतों—१ घट ह्म० तुला, २ भीरु ह्म० कन्या, ३ युग्म ह्म० मिथुन, ४ धनु ह्म० धन, ह्या चार राशींचा नवांश प्रशस्त आहे. त्यामध्येंही असा विशेष आहे कीं, बुधाशिवाय दुसऱ्या अस्तंगत ग्रहांचे राशींचे नवांश हे मरण देतात, अर्थात् बुध जरीं अस्तंगत असला तरी त्याचे नवांश दोषकारक नाहींत. तसेच चंद्रानें आणि पापग्रहानें युक्त राशि, आणि नवांश हे वधू आणि वर ह्यांचें मरण करतात. निर्बल ग्रहाचे राशि आणि नवांश हे दीनपणा करितात ॥ ३० ॥

## लग्नांशशुद्धि, नवांशप्रवृत्ति व लग्नसाधन.

नो वर्गोत्तमतो विनांतिमलवं दद्याच्चरर्क्षे चरम् ।
चंद्रे तौलिमृगास्यगे न च तनुं पंचेष्टखेटोनिताम् ॥
मेषादिष्वजनक्रतौलिककुलीराद्या नवांशाः क्रमा- ।
दिष्टात्पूर्वनवांशका दशहताद्भयाप्ता लवाद्या तनुः ॥ ३१ ॥

श्लोकार्थ—वर्गोत्तमावाचून अंत्य नवांश देऊं नये. लग्न व नवांश एक असतो त्याला, वर्गोत्तम ह्मणतात, जसा मेषलग्नाचा मेष नवांश, वृषभाचा वृषभ नवांश हे वर्गोत्तम होत. चंद्र तूळ व मकर राशीला असतां चरलग्नाचा चरनवांश देऊं नये. पांचांहून कमी इष्टग्रह असणारें लग्न देऊं नये. मेषादिलग्नांत मेष, मकर, तूळ, कर्क हे अनुक्रमानें प्रथमनवांश असतात. ( ह्मणजे मेषलग्नाचा प्रथमनवांश मेष, दुसरा वृषभ इ० वृषभाचा प्रथमनवांश मकर, द्वितीय कुंभ इत्यादि. तात्पर्य मेष, सिंह, धन यांची मेषापासून; वृषभ, कन्या, मकर यांची मकरापासून; मिथून, तूळ, कुंभ ह्यांची तुळापासून आणि कर्क, वृश्चिक, मीन ह्यांची निरंतर कर्कापासून प्रवृत्ति होते.) इष्टनवांशाच्या पूर्वनवांशाला १० नीं गुणून नीं भागावें. ह्मणजे अंशादि लग्न होतें. ( उदाहरणः—इष्टलग्न वृश्चिक त्याचा इष्ट अंश ५ वा त्याचे पूर्वनवांश ४ त्याला १० नीं गुणून ४० झाला ३ नीं भागून १३ अं० २० क० यांत गतराशि मिळवून ७।१३।२०।०इतकें लग्न झालें. ) ॥ ३१ ॥

**अथ विशेषांतरमाह–नो वर्गोत्तमेति । वर्गोत्तमतः वर्गोत्तमेन विनाऽतिमलवं चरमं नवांशं नो दद्यात् यल्लग्नं स एव नवांशो वर्गोत्तमः तथा चरर्क्षे चरलग्ने चरं नवांशं नो दद्यात् कस्मिन् सति चंद्रे तौलिमृगास्यगे तुलामकरगे सति एतच्चरत्रययोगं नो दद्यादित्यर्थः । अत्र चरचतुष्टयमध्ये चंद्रे तौलिमृगास्यगे इत्येवोक्तं तन्मेषकर्कटयोर्विवाहनक्षत्राभावात् तथा तनुं लग्नं पंचेष्टखेटोनितां नो दद्यात् यत्र लग्ने पंच इष्टग्रहाः न भवन्ति तल्लग्नं न देयमित्यर्थः । अथेष्टनवांशाल्लग्नसाधनमाह–तत्र तावन्मेषादिषु आद्यांशानाह–मेषादिष्विति । मेषादिषु अजनक्रतौलिककुलीराद्या नवांशाः क्रमेणोक्ताः । तद्यथा मेषेऽजाद्या मेषाद्या वृषे नक्राद्या मकराद्या मिथुने तौलकाद्याः तुलाद्याः कर्कटे कुलीराद्याः कर्कटाद्या एवं पुनः सिंहे मेषाद्याः कन्यायां मकराद्याः तुलायां तुलाद्याः वृश्चिके कर्काद्याः पुनर्धनुषि मेषाद्याः मकरे मकराद्याः कुंभे तुलाद्या मीने कर्काद्या नवांशा उक्ता इत्यर्थः । इष्टादंशात्पूर्वनवांशका गतांशा दशहता दशगुणिताः त्र्याप्ताः त्रिभिर्हृता लवाद्या भागाद्या तनुः लग्नं स्यात् । अत्रोदाहरणं । इष्टलग्नं मेषः तत्र मेषादिका अंशाः प्रवर्तंते इष्टांशाः कन्यांशाः आद्यात षष्ठांशः पूर्वनवांशकाः पंच ५ एते दशहताः ५० त्र्याप्ताः लवादिफलं लब्धं १६।४० इष्टलग्नसहितं राश्यादि १६।४० ॥ ३१ ॥**

**टीकार्थ**—आतां दुसरे विशेष सांगतों–वर्गोत्तमाशिवाय नुसता अंत्य नवांश देऊं नये. जें लग्न तोच नवांश त्यालाच वर्गोत्तम असें ह्मणतात. जसा मेष लग्नाचा मेष नवांश हा वर्गोत्तम जाणावा. वृषभ लग्नाचा वृषभ नवांश हा वर्गोत्तम जाणावा. तसेंच चंद्र हा तूळ आणि मकर ह्या राशीला असतां चरलग्नाचा चर नवांश देऊं नये. ह्यामध्यें चंद्र हा तुला आणि मकर ह्या राशींचा असूं नये असें ह्मटलें, कारण मेष व कर्क ह्यांचीं नक्षत्रें विवाहाचीं नाहींत. तसेंच ज्या लग्नीं पांच इष्ट ग्रह नसतील तसें लग्न देऊं नये, आतां इष्ट नवांशापासून लग्नाचें साधन सांगतों–तेथें मेष इत्यादिकांचे प्रथम नवांश सांगतों–जसें १ मेष लग्नांत प्रथम नवांश मेष, दुसरा नवांश वृषभ इत्यादि. २ वृषभलग्नाचा प्रथम नवांश मकर, दुसरा नवांश कुंभ इत्यादि. ३ मिथुनलग्नाचा प्रथम नवांश तूळ, द्वितीय नवांश वृश्चिक इत्यादि. ४ कर्क लग्नाचा प्रथम नवांश कर्क, द्वितीय नवांश सिंह इत्यादि. ५ सिंह लग्नाचा प्रथम नवांश मेष, द्वितीय नवांश वृषभ इत्यादि. ६ कन्यालग्नाचा प्रथम नवांश मकर, दुसरा नवांश कुंभ इत्यादि. ७ तुला लग्नाचा प्रथम नवांश तुला, दुसरा वृश्चिक इत्यादि. ८ वृश्चिक लग्नाचा प्रथम नवांश कर्क, दुसरा नवांश सिंह इत्यादि. ९ धनु लग्नाचा प्रथम नवांश मेष, दुसरा नवांश वृषभ इत्यादि. १० मकर लग्नाचा प्रथम नवांश मकर, द्वितीय नवांश कुंभ इत्यादि. ११ कुंभ लग्नाचा प्रथम नवांश तूळ, द्वितीय नवांश वृश्चिक इत्यादि. १२ मीन लग्नाचा प्रथम नवांश कर्क, द्वितीय नवांश सिंह वगैरेजाणावेत. तात्पर्य असें कीं, १ मेष, २ मकर ३ तूळ ४ कर्क हे चार आहेत आणि राशी बारा आहेत ह्मणून चार त्रीक बारा असा हिशेब केला असतां चार चार राशीच्या वेळेस एक एक ह्मणजे तीनवेळां आवृत्ति करावी लागते जसें पाहा कीं,

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ मेष | २ वृषभ | ३ मिथुन | ४ कर्क | } | मेष, | मकर, | तूळ, | कर्क, |
| ५ सिंह | ६ कन्या | ७ तूळ | ८ वृश्चिक | } | मेष, | मकर, | तूळ, | कर्क, |
| ९ धन | १० मकर | ११ कुंभ | १२ मीन | } | मेष, | मकर, | तूळ, | कर्क, |

इष्ट नवांशाच्या पूर्व नवांशाला १० नीं गुणून तीहींनीं भागलें असतां अंश इत्यादि लग्न येतें. येथें उदाहरण असें आहे कीं, जसें इष्ट लग्न मेष आहे तर त्याची मेषादि संज्ञा आहेत. इष्टांश कन्यांश आहे, तर पूर्व नवांश ५ ह्मणजे मेषापासून

सिंहापर्यंत ५ झाले ह्मणून, पूर्व नवांश ५ झाले, त्याला १० नीं गुणिलें असतां गुणाकार ५० झाला त्याला तीहीनीं भागिलें असतां १६-४० इष्ट लग्न सहित ही १६-४० च झाले, कारण मेष लग्न धरल्यामुळें गत राशि नाहींत, कारण मेष हीच पहिली राशि आहे ह्मणून तेंच १६-४० हें इष्ट लग्न सहित राश्यादि जाणावें ॥ ३१ ॥

### उदयास्तशुद्धि व होरासाधन.

**लग्नांशौ स्वपदृग्युतौ नृसुखदौ वाऽन्योन्यपाढ्येक्षितौ ।**
**ताभ्यां सप्तमकौ तथैव युवतेर्नो चेत्तयोर्मृत्युदौ ॥**
**द्विघ्नेऽर्कोनविलग्नके रविसितज्ञेंद्वार्किजीवासृजो ।**
**होरेशा द्युपतेः खलेऽह्नि खलजा नेष्टा शुभे मध्यमा ॥ ३२ ॥**

श्लोकार्थ—इष्टलग्न व नवांश आपापल्या अधिपतींनीं दृष्ट किंवा युक्त असतां अथवा लग्नपति अंशाला व अंशपति लग्नाला असतां, किंवा लग्नपतीची दृष्टि अंशावर व अंशपतीची दृष्टि लग्नावर असतां वराला सुखकर जाणावें. हिला उदयशुद्धि ह्मणतात. इष्टलग्नापासून सप्तमलग्न व नवांशापासून सप्तमनवांश हे आपापल्या अधिपतींनीं युक्त किंवा दृष्ट असतां अथवा त्यांची परस्परांवर दृष्टि असतां, किंवा ते परस्परांला युक्त असतां कन्येला सुखकर होतात, हिला अस्त-शुद्धि ह्मणतात, वरील प्रमाणें नसतील तर ते वधुवरांला मृत्युदायक होतात. लग्नांतून रवि वजा करून बाकी राहील तिची दुप्पट करून वराच्या राश्यंकावरून होरापति जाणावा, रवि, शुक्र, बुध, चंद्र, शनि, गुरु, मंगळ असे होरापति आहेत, ज्या वारीं होरा पहाणें असेल त्या ग्रहापासून होरेश मोजावे, पापवारीं पापाची होरा अनिष्ट, शुभवारीं पापहोरा मध्यम, अर्थात् शुभवारीं शुभाची होरा उत्तम होय. (उदाहरण:-गुरुवारीं लग्न ७।३।२७।४५ ह्यांतून रवि ५।१६।०।४ ही वजा करून बाकी १।१७।२७।४१ ह्यांची दुप्पट ३।४।५५।२२ हींतील राश्यंक ३ आणि गुरुवारीं होरा काढावयाची ह्मणून त्यापासून गुरु, मंगळ, रवि, हे तीन होरेश गत झाले. व पुढें शुक्राची होरा सुरु आहे ) ॥ ३२ ॥

**अथोदयास्तशुद्धिमाह–लग्नांशाविति । लग्नांशौ लग्ननवांशौ स्वपदृग्युतौ स्वस्वपतिना दृष्टौ युतौ वा संतौ नृसुखदौ वरस्य सुखदौ स्यातां वा इत्यथवा अन्योन्यपतिनाऽऽढ्यौ ईक्षितौ वा संतौ नृसुखदौ स्यातां । इत्युदयशुद्धिमुक्त्वाऽस्तशुद्धिमाह–ताभ्यां सप्तमकौ तथैवेति ताभ्यां लग्नांशाभ्यां सकाशात् सप्तमकौ सप्तमलग्नतदंशौ तथैवेति पूर्ववत्स्वपदृग्युतौ युवतेः कन्यायाः सुखदौ स्यातां वा इत्यथवा तौ सप्तमलग्नसप्तमांशकौ अन्योन्यपाढ्येक्षितौ युवतेः सुखदौ स्यातां नो चेत् एवं चेन्न स्यात्तदा तयोः मृत्युदौ स्यातां क्रमेण अथेष्टकाले होरासाधनमाह–द्विघ्न इति । अर्कोनविलग्नके द्विघ्ने कृते सति द्युपतेः सकाशात् होरेशा भवंति । तेषां गणनाक्रममाह–ते ते होरेशा रविसितज्ञेंद्वार्किजीवासृजः रविः प्रसिद्धः सितः शुक्रः ज्ञो बुध इंदुश्चंद्र आर्किः शनिः जीवो गुरुः असृङ् मंगलः खलेऽह्नि पापवारे खलजा होरा नेष्टा शुभे मध्यमा स्यात् अर्थाच्छुभहोरा शुभवारे शुभतरा पापवारे मध्यमा स्यात् । अत्रोदाहरणं गुरुवारे इष्टार्कः १।२५।८ इष्टलग्नं ४।१०।० इदं अर्कोनं २।१४।५२ इदं द्विघ्नं ४।२९।४४ ऊर्ध्वांकसमानागता होराश्चतस्रः वर्तमाना पंचमी होरा सा गणनाक्रमेण द्युपतेर्गुरोः सकाशाद्गणनीया जीवासृजादिगणनया बुधहोरा वर्तमाना ॥ ३२ ॥**

**टीकार्थ**—आतां उदय आणि अस्त ह्यांची शुद्धि सांगतो-लग्नांश आणि लग्नाचें नवांश हे आपापल्या स्वामींनीं युक्त किंवा दृष्ट असतील तर तसे ते लग्न वराला सुखकारक समजावेत. अथवा एकमेकांच्या पतींनीं युक्त किंवा दृष्ट असतील ह्मणजे लग्नाचा पति अंशावर आणि अंशाचा पति लग्नावर किंवा लग्नाच्या पतीची दृष्टि अंशावर आणि अंशाच्या पतीची दृष्टि लग्नावर असेल तर ते वराला सुखकारक होतात, हीच उदय शुद्धि समजावी ती सांगितली. आतां अस्ताची शुद्धि सांगतो-जसें लग्नपति, नवांश ह्यांचा प्रकार सांगितला तसाच प्रकार सप्तम लग्न व त्याचे नवांश ह्या विषयीं जाणावा. तो असा; सप्तम लग्न आणि सप्तम नवांश हे एकमेकांच्या पतींनीं युक्त आणि एकमेकांच्या पतींनीं दृष्ट असतील तर ते कन्येला सुखदायक होतात. असे दोनही प्रकार नसतील तर वधू आणि वर ह्या दोघांना अनुक्रमानें मरण देणारे होतात. हिलाच

अस्त शुद्धि असें ह्मणतात. वरील प्रमाणें लग्न शुद्धि आणि अस्त शुद्धि नसेल तर ते वधूवरांना मृत्युदायक होतात. आतां इष्ट कालीं होरा साधन सांगतो–जें लग्न असेल त्यांतून रवि वजा करावा आणि त्याची दुप्पट करावी रवीच्या राश्यंकावरून होरापति जाणावेत. रवि, शुक्र, बुध, चंद्र, शनि, गुरु, मंगळ हे होरापति जाणावेत. आतां पाप वारीं पापाची होरा इष्ट नाहीं, शुभवारीं पापाची होरा मध्यम आहे. अर्थात् शुभवारीं शुभ होरा फारच शुभ आहे, आणि पापवारीं मध्यम आहे. ज्या वारीं होरा पाहाणें असेल त्या ग्रहापासून होरेश मोजावे. पापवारीं पापाची होरा अनिष्ट. शुभवारीं पाप होरा मध्यम अर्थात् शुभवारीं शुभाचा होरा उत्तम होय. ह्यास उदाहरण असें कीं, गुरुवारीं लग्न इष्टार्क ११२५।८ इतका आहे, इष्ट लग्न ४।१०।० असें आहे, त्या लग्नांतून रवि वजा करितां बाकी २।१४।५२ राहिली, तिची दुप्पट केल्यावर ४।२९।४४ अशी झाली त्यांच्या वरच्या अंका इतक्या ह्मणजे ४ होरा झाल्या, अर्थात् पांचवी होरा ह्मणजे वर सांगितलेल्या क्रमानें ह्मणजे गुरूपासून गणनाकरतां जीव, मंगळ, रवि, शुक्र, बुध ह्या गणनेंत पांचवा बुध आला आहे, तेव्हां बुधाची होरा आहे असें जाणावें ॥ ३२ ॥

### जामित्र आणि त्याचे अपवाद.

लग्नेंद्वोः स्मरगे शुभाशुभखगे स्तश्चाधिमृत्यू ततो- ।
ऽब्जांगोनात्कृतमौर्विकात् खखयमैर्लब्धं यदाब्धीषवः ॥
सन्स्विष्टोच्चनिजांशभेस्तमखिलं पश्येदरित्र्यायगे ।
सूर्ये वा खजलाद्यकोणगशुभो वाऽब्जं प्रपश्येन्न तत् ॥ ३३ ॥

श्लोकार्थ—लग्न व चंद्र ह्यांपासून सप्तमस्थानीं शुभ व खलग्रह असतील तर त्यांचीं अनुक्रमानें चिंता व मृत्यु अशीं फळें आहेत; तीं जेव्हां लग्न व चंद्र सप्तम ग्रहांतून वजा करून, त्याच्या कला करून त्या कलांना २०० नीं भागून लब्ध ५४ येतें. तेव्हां वरील फळें येतात, असें समजावें. (उदाहरण;—सप्तमस्थ ग्रह १।४।२।० ह्यांतून लग्न७।३।२७।० हें वजा करून बाकी ६।०।३५।० हिच्या कळा १०८३५ त्याला २०० नीं भागून लब्ध ५४ येतें ह्मणून वरील वृश्चिक लग्नाला परमजामित्र दोष आहे, लग्न किंवा चंद्र आणि त्यांपासून सप्तमस्थ ग्रहें या दोहोंत बरोबर सहा राशि अंतर असतें, तेव्हां जामित्र दोष असतो, ) कोणताहि शुभग्रह, शुभ असून मित्र अशा ग्रहाचे नवांशीं किंवा राशीस अथवा आपल्या उच्चनवांशीं अगर उच्चराशीस अथवा स्वनवांशीं किंवा स्वराशीस असून सप्तमस्थानीं पूर्ण दृष्टीनें पहात असेल तर जामित्र दोष नाहीं. लग्नापासून ६।३।११ ह्या स्थानीं रवि असेल तर अथवा १०।४।१।९।५ ह्या स्थानीं शुभग्रह असून त्याची चंद्रावर पूर्ण दृष्टि असेल तर जामित्र दोष नाहीं. सर्व मिळून जामित्राला १४ अपवाद आहेत ॥ ३३ ॥

अथ लग्नेंद्वोः परजामित्रग्रहज्ञानार्थमुपायमाह–तावत्तस्य फलमाह–लग्नेंद्वोरिति । लग्नेंद्वोः स्मरगे सप्तमगे शुभाशुभखगे सति तदा आधिमृत्यू स्तः शुभे सति आधिर्मनस्तापोऽस्ति अशुभे सति मृत्यु-रस्ति तदा कदा यदा ततः स्मरगाद् ग्रहात् अब्जांगोनात् चंद्रलग्नोनात् चंद्रात् सप्तमस्थचंद्रोनः लग्नात्सप्तमस्थो लग्नोन इत्यर्थः । तस्मात् कृतमौर्विकात् कृतकलिकात् खखयमैर्द्विशत्या लब्धं अब्धी-षवः चतुष्पंचाशत्स्यात् तदैव आधिमृत्यू स्तः अन्यथा नेत्यर्थः । तत्रोदाहरणं पूर्वकल्पितमिदं लग्नं ४।१०।० तत्सप्तमगोऽयं कश्चिद्ग्रहः १०।११।७ अयं लग्नोनः ६।१।७ अयं कृतमौर्विकः १०८।१७ अस्मात् खखयमैः २०० लब्धं ५४ अथास्य भंगमाह–सन्निति । सन् सद्ग्रहः स्विष्टोच्चनिजांशभे वर्तमानः अस्तं सप्तमभवनं अखिलं पूर्णं यदि पश्येत्तदा तज्जामित्रं न स्यात् । शोभनश्चासौ इष्टश्च स्विष्टः शुभ-मित्रं स्विष्टश्च उच्चं च निजश्च स्विष्टोच्चनिजाः अंशश्च भं च अंशभं स्विष्टोच्चनिजानां अंशभं स्विष्टोच्च-निजांशभं तस्मिन् स्विष्टोच्चनिजांशभे स्विष्टस्य शुभमित्रस्य अंशे नवांशे भे राशौ वा वर्तमानः । अथवा उच्चस्यांशे भे वा वर्तमानः । अथवा निजस्य स्वस्य अंशे भे वा वर्तमानः अस्तमखिलं पश्येत्तदा तन्नेति षड्भंगाः । वा इत्यथवा अर्के रवौ अरित्र्यायगे सति षष्ठतृतीयैकादशगे सति तन्नेति त्रयो भंगाः । वा इत्यथवा खजलाद्यकोणगः शुभः अब्जं चंद्रमसं पूर्णं यथा स्यात्तथा ईक्षेत तदा तन्न खं दशमं जलं चतुर्थं आद्यं लग्नं कोणे नवपंचमे एषामन्यतमं गतोऽन्यतमः शुभग्रहश्चंद्रमसं निखिलदृष्ट्या यदि पश्येत्तदा जामित्रं न स्यादित्यर्थः । एते पंच भंगाः सर्वे मिलिताश्चतुर्दश भंगाः संपद्यंते ॥ ३३ ॥

**टीकार्थ**—लग्न आणि चंद्र ह्यांपासून जें सप्तमस्थान आहे, तेथें असलेल्या शुभ किंवा पापग्रहांचें ज्ञान होण्याकरितां उपाय सांगतों-अगोदर त्याचें फल सांगतो-लग्न आणि चंद्र ह्यांपासून सप्तमस्थानीं शुभ आणि अशुभ ग्रह असतील तर अनुक्रमानें चिंता आणि मृत्यु होतात ह्मणजे शुभ ग्रह असेल तर मनास चिंता होते आणि अशुभ असेल तर मृत्यु होतो. असें केव्हां होतें तें सांगतों-चंद्र आणि लग्न हीं सप्तम स्थानच्या ग्रहांतून वजा करावीं आणि मग त्या आलेल्या शेषाच्या कला कराव्यात. त्या कलांनां दोनशेंनीं भागावें जर भागाकार ५४ येईल तेव्हां वरची चिंता आणि मृत्यु हीं फळें जाणावींत आणि तसा ५४ भागाकार न येईल तर चिंता आणि मृत्यु हीं फळें नाहींत असें समजावें. त्याविषयीं उदाहरण असें कीं, लग्न ४-१०-० त्यापासून सातवा कोणी एक ग्रह १०-११-७ असा घेतला तो सप्तमस्थ. ग्रहांतून लग्न वजा केलें तेव्हां ६-१-७ असें आलें, त्याच्या कळा केल्या त्या १०८१७ इतक्या कळा झाल्या त्याला २०० नीं भागलें तेव्हां ५४ भागाकार येतो ह्मणून लग्नापासून सप्तमस्थानचा ग्रह चिंताकारक आहे. ह्याचा भंग सांगतों-कोणताही शुभ ग्रह शुभ असून इष्ट ह्मणजे मित्ररूपी अशा ग्रहाचे १ नवांशाला, किंवा त्याच्या २ राशीला, किंवा आपल्या ३ उच्च नवांशाला, अगर आपल्या ४ उच्चराशीला, अथवा ५ स्वनवांशाला किंवा ६ राशीला पूर्ण पहात असेल तर हे सहा प्रकारचे त्याचे भंग आहेत. अथवा लग्नापासून ६-३-११ ह्या ठिकाणीं असेल ह्मणजे हे तीन भंग व पहिले सहा मिळून नऊ भंग झाले किंवा १०-४-१-९-५ ह्या पांच स्थानीं शुभ ग्रह असून त्याची चंद्रावर पूर्ण दृष्टि असेल तर जामित्राचा ह्मणजे सप्तमस्थानचा दोष नाहीं. पहिले ९ आणि हे पांच मिळून एकंदर १४ अपवाद आहेत ॥ ३३ ॥

### ग्रहदृष्टि व षड्वर्ग.

**त्र्यभ्रं कोणमबायुरैनिगुरुभूपुत्राः क्रमात्पूर्णया ।**
**दृष्ट्याऽन्ये चरणोत्तरं च सकलाः पश्यंति पूर्णं द्युनम् ॥**
**भं होरा त्रिलवो नवांशक इनांशस्त्रिंशदंशः क्रमात् ।**
**वर्गः सन् शुभजः परैस्तु सुहृदो नाब्ध्यूनवर्गा तनुः ॥ ३४ ॥**

**श्लोकार्थ**—ग्रह ज्या राशीला असतो त्या राशीपासून पुढें सांगितलेल्या स्थानांवर त्याची दृष्टि असते. ३।१० ह्यांवर शनीची; ९।५ ह्यांवर गुरूची; ४।८ ह्यांवर मंगळाची पूर्ण दृष्टि असते. ह्याच दोन दोन स्थानीं इतर ग्रह चरण वृद्धीनें पाहतात. ( ह्मणजे ३।१० स्थानीं एकपाद, ९।५ स्थानीं द्विपाद, ४।८ स्थानीं त्रिपाद दृष्टीनें पाहतात. ) सर्व ग्रह सप्तमस्थानावर पूर्ण दृष्टीनें पाहतात. ग्रह, होरा, द्रेष्काण, नवांश, द्वादशांश, त्रिंशांश अशा क्रमानें हे ६ वर्ग आहेत, शुभग्रहाचा वर्ग उत्तम ह्मणून तो ग्राह्य होय. कित्येकांच्या मतानें मित्राचा वर्ग शुभ असें आहे. चारांहून कमी शुभवर्ग येणारें लग्न मंगलकार्याला घेऊं नये ॥ ३४ ॥

**अथ दृष्टिलक्षणमाह-त्र्यभ्रं तृतीयदशमं कोणं नवपंचमं अबायुश्चतुर्थाष्टमं एतद्युग्मत्रयं क्रमेण ऐनिगुरुभूपुत्राः शनिगुरुभौमाः पूर्णया दृष्ट्या पश्यंति शनिः त्र्यभ्रं ३।१० गुरुः कोणं ९।५ भूपुत्रः अबायुः ४।८ एते पूर्णया दृष्ट्या पश्यंति तथा चैतद्युग्मत्रयं अन्ये ग्रहाश्चरणोत्तरं यथा स्यात्तथा पश्यंति तद्यथा त्र्यभ्रं ३।१० एकपाददृष्ट्या पश्यंति कोणं ९।५ द्विपाददृष्ट्या अबायुः ४।८ त्रिपाददृष्ट्या पश्यंति सकला ग्रहाः द्युनं सप्तमं पूर्णं पश्यंति । अथ षड्वर्गसाधनं विवक्षुस्तावन्नामान्याह-भं होरेति । भं गृहं होरा राश्यर्धं त्रिलवो दृकाणः नवांशकः प्रसिद्धः इनांशो द्वादशांशः त्रिंशदंशः प्रसिद्धः क्रमादेते वर्गाः प्रोक्ताः । शुभजः शुभग्रहजो वर्गः सन् शुभः प्रोक्तः परैराचार्यैः सुहृदो मित्रस्य वर्गः सन् प्रोक्तः अब्ध्यूनवर्गा तनुः चतुर्वर्गोनं लग्नं न सती प्रोक्तेत्यर्थः ॥ ३४ ॥**

**टीकार्थ**—आतां दृष्टि लक्षण सांगतों-तीन आणि दहा, कोण ह्मणजे नऊ आणि पांच, अप् ह्म० ४ आयु ह्म० ८ ह्या तीन युग्मांवर अनुक्रमानें ऐनि ह्म० शनि, गुरु, भूपुत्र ह्म० मंगळ हे पूर्ण दृष्टीनें पहातात. ह्मणजे शनि हा तृतीय आणि दशम ह्या स्थानावर पूर्ण दृष्टीनें पहातो. गुरु हा नवम आणि पंचम ह्या स्थानावर पूर्ण दृष्टीनें पाहतो. मंगळ हा चतुर्थ आणि अष्टम स्थानावर पूर्ण दृष्टीनें पाहतो आणि शनि, गुरु व मंगळ ह्यांशिवाय बाकीचे उरलेले ग्रह ह्यांवर सांगितल्या तीन युग्मांवर अनुक्रमानें एकपाद, द्विपाद आणि त्रिपाद ह्या दृष्टीनें पाहतात. जसें ३-१० स्थानीं एकपाद दृष्टि, ९-५ ह्या

स्थानीं द्विपाददृष्टि, ४–८ ह्या स्थानीं त्रिपाद दृष्टिनें पाहातात आणि आपल्यापासून सप्तमस्थानीं सर्वच ग्रह पूर्ण दृष्टीनें पहातात. आतां षड्वर्गसाधन सांगण्याच्या इच्छेनें अगोदर नामें सांगतों–१ भ ह्म० ग्रह, २ होरा ह्म० राशींचे अर्ध, ३ त्रिलव ह्म० दृक्काण, ४ नवांश, ५ इनांश ह्म० द्वादशांश, ६ त्रिंशदंश, हे सहा वर्ग सांगितले आहेत. शुभ ग्रहाचा वर्ग उत्तम असतो ह्मणून तो ग्राह्य आहे. कित्येक आचार्यांच्या मतानें मित्रांचा वर्गही शुभ आहे. चारां पेक्षां कमी शुभ वर्ग येणारें लग्न शुभकारक नाहीं ह्मणून तें मंगल कार्याला घेऊं नये ॥ ३४ ॥

### षड्वर्ग साधन.

**प्रोक्तं प्राग्गृहमोजभेऽर्कशशिनोर्होरे समेऽब्जार्कयो- ।**
**दृक्केट् प्राक्सुतधर्मपो नवलवः प्रोक्तः स्वतोऽर्कांशकः ॥**
**शुक्रज्ञेज्ययमासृजांशरमुनीभार्थेषवो युग्मभे ।**
**त्रिंशांशा विषमे त एव गदिता व्यस्ताश्च षड्वर्गकाः ॥ ३५ ॥**

श्लोकार्थ—पूर्वीं ग्रहाचे ह्मणजे राशीचे स्वामी ( वि० प्र० श्लोक ४ यांत ) सांगितले. होरा ह्म० लग्नाचें अर्ध. लग्नाचे अंश ३० त्याच्या निम्मे १५ अंश होरेचे होतात. विषम लग्नांत पहिली होरा रवीची व दुसरी चंद्राची; आणि सम लग्नांत पहिली चंद्राची व दुसरी रवीची जाणावी. लग्नाचे दहा दहा अंशांचे तीन भाग करून प्रत्येक भागाला द्रेष्काण ह्मणावें. लग्नाचा जो स्वामी तोच पहिल्या पहिल्या द्रेष्काणाचा स्वामी. लग्नापासून पंचम स्थानाचा जो स्वामी तो द्वितीय द्रेष्काणाचा आणि जो नवमस्थानाचा तो तृतीय द्रेष्काणाचा स्वामी जाणावा. लग्नाच्या ३० अंशांचे नऊ भाग केले म्हणजे तो प्रत्येक भाग ३ अंश २० कळांचा होतो. ह्या नवांशाचे स्वामी ( वि. प्र. श्लो० ३१ यांत ) सांगितले आहेत. लग्नाचा बारावा भाग २ अंश ३० कळांचा होतो. लग्नस्वामीपासून द्वादशांशाचे स्वामी जाणावे. मेषाचा प्रथमद्वादशांश मंगळाचा, दुसरा शुक्राचा इ० वृषभाचा प्रथम शुक्राचा, द्वितीय बुधाचा इ० समलग्नांत ५।७।८।५।५ हे अंश अनुक्रमानें शुक्र, बुध, गुरु, शनि, मंगळ ह्या पांच ग्रहांचे त्रिंशांश असतात. हे सांगितलेले अंश व ग्रह उलट करून क्रमानें त्या त्या ग्रहांचे विषम लग्नांतील त्रिंशांश समजावे. अर्थात् विषम लग्नांत ५।५।८।७।५ अंश मंगळ, शनि, गुरु, बुध, शुक्र ह्यांचे त्रिंशांश होत. शुभग्रहाचा वर्ग घ्यावा. खलाचा घेऊं नये. अशा रीतीनें षड्वर्ग पहावे ॥ ३५ ॥

**अथैषां साधनमाह–प्रोक्तमिति । यस्य ग्रहस्य यत् गृहं तत् प्राक् प्रोक्तं भेशामंशुबुचमित्यादि । अथ होरासाधनमाह–ओजभे विषमराशौ अर्कशशिनोर्होरे क्रमेण भवतः प्रथमपंचदशभागेषु अर्कस्य होरा अपरपंचदशभागेषु शशिनश्चंद्रस्य होरा स्यात् । अथ समराशावब्जार्कयोर्होरे क्रमेण भवतः । प्रथमपंचदशभागेषु चंद्रस्य होरा अपरपंचदशभागेषु अर्कस्य होरा स्यात् । अथ दृक्काणसाधनमाह–दृक्केडिति । दृक्को दृक्काणः त्रिविधो दशदशभागात्मकः तस्य ईट् ईशः प्राक्सुतधर्मपो ज्ञेयः प्राग्लग्नं सुतः पंचमं धर्मो नवमं तान्पातीति प्राक्सुतधर्मपः । एतदुक्तं भवति । प्रथमदृक्काणस्वामी लग्नपतिः द्वितीयदृक्काणस्वामी पंचमपतिः तृतीयदृक्काणस्वामी नवमपतिः स्यादिति । नवलवः प्रोक्तः प्रागेव शस्तोऽश इत्यादि । अथ द्वादशांशसाधनं–स्वतोऽर्कांशकः स्वस्मात् इति स्वतः लग्नत इत्यर्थः । अर्कांशको द्वादशांशो ज्ञेयः तद्यथा राशिभागास्त्रिंशत् ३० एते द्वादशभिर्भाजिताः लब्धं सार्धभागद्वयं २।३० इदं द्वादशांशमानं तदेव गणनीयं । सार्धभागद्वयं लग्नस्य द्वादशांशः तावदेव तत्पुरस्थस्येति लग्नस्योत्पन्नभागावसानपर्यंतं गणयेत् यस्मिन् राशौ विश्रामः तत्स्वामी द्वादशांशनाथः स्यात् । अथ त्रिंशांशसाधनं–शुक्रेति । शुक्रः प्रसिद्धः ज्ञो बुध इज्यो गुरुर्यमः शनिरसृक् मंगल एषां पंचानां क्रमेण शरमुनीभार्थेषवः स्युः । शराः पंच मुनयः सप्त इभा अष्टावर्थाः पंच इषवः पंच भागाः शुक्रादीनां स्युः । एतद्युग्मभे समराशौ ज्ञेयं । एतदपि लग्नोत्पन्नभागावसानपर्यंतं गणयेत् । यत्र विश्रांतिः सत्रिंशांशनाथः विषमे राशौ त एव गदिता ग्रहाः भागाश्च व्यस्ता विलोमा ज्ञेया इति षड्वर्गो निरूपितः ॥ ३५ ॥**

टीकार्थ—आतां ह्या सहा वर्गांचें साधन सांगतों—ज्या ग्रहाचें जें स्थान आहे तें पूर्वी विवाह प्रकरणाच्या ४ थ्या श्लोकांत सांगितलें आहे. आतां होरा करावयाचें सांगतो—होरा ह्मणजे लग्नाचा अर्धा भाग जाणावा. लग्नाचे अंश ३० आहेत पैकीं विषम लग्नांत पहिली होरा सूर्याची ह्मणजे पहिले पंधरा अंश सूर्याचे आहेत आणि दुसरी होरा ह्म० दुसरे पंधरा अंश चंद्राचे आहेत आणि सम लग्नामध्यें पहिली होरा चंद्राची ह्म० पहिले पंधरा अंश चंद्राचे आणि दुसरी होरा सूर्याची ह्म० दुसरे पंधरा अंश सूर्याचे आहेत. आतां द्रक्काण साधन सांगतों—लग्नाचे ३० अंश आहेत पैकीं दहा दहा भागाचे असे तीन भाग पडतात त्या प्रत्येक दहा भागाला द्रक्काण ह्मणतात ह्मणजे लग्नांत ३ द्रक्काण आहेत आतां प्राक् ह्म० १ ला, सुत ह्म० ५ वा, धर्म ह्म० ९ वा, ह्यांचे जे अधिपति ह्मणजे लग्नाचा १ अधिपति, लग्नापासून पंचम स्थानचा २ अधिपति, लग्नापासून नवमस्थानचा ३ अधिपति, असे हे तीन अधिपति अनुक्रमानें ३ द्रक्काणाचे समजावेत. जसें लग्नाचा जो अधिपति आहे तोच. १ द्रक्काणाचा अधिपति आहे. पंचमस्थानाचा जो अधिपति तो दुसऱ्या द्रक्काणाचा अधिपति आहे. नवम स्थानाचा जो अधिपति तो तिसऱ्या द्रक्काणाचा अधिपति आहे. लग्नाचे तीस अंश आहेत, त्यांचे ९ भाग केले ह्मणजे प्रत्येक भाग ३ अंश आणि २० कळांचा होतो तो प्रशस्त आहे, असें पूर्वीच सांगितलें आहे. आतां द्वादशांश साधन सांगतो—लग्नाचा जो अर्कांश ह्मणजे बारावा अंश त्याला द्वादशांश ह्मणतात. जसें लग्नाचे ३० भाग आहेत ह्यांला बारांनीं भागिलें असतां २ राशि ६ अंश होतात. ह्मणजे लग्नाचे अर्धासहित दोन भाग ह्मणजे २॥ भागाला द्वादशांश ह्मणावें. ह्याचप्रमाणें पुढला २॥ भाग, नंतर पुढला २॥ भाग ह्या प्रमाणें १२ भाग पडतात. जसे लग्नाचे स्वामी आहेत त्या प्रमाणेंच ह्या बारांचे स्वामी जाणावे. जसें मेषाचा स्वामी मंगळ आहे तर मेषाचे प्रथम द्वादशांशाचा स्वामीही मंगळ आहे. वृषभ राशीचा स्वामी शुक्र आहे ह्मणून दुसऱ्या द्वादशांशाचा स्वामी शुक्र आहे. मेषाचा प्रथम द्वादशांश मंगळाचा, कारण मेषाचा स्वामी मंगळ. मेषाचा दुसरा द्वादशांश शुक्राचा,कारण वृषाचा स्वामी शुक्र.मेषाचा तिसरा द्वादशांश बुधाचा, कारण मिथुनेचा स्वामी बुध.मेषाचा चवथा द्वादशांश चंद्राचा,कारण कर्केचा स्वामी चंद्र. मेषाचा पांचवा द्वादशांश सूर्याचा, कारण सिंहेचा स्वामी सूर्य. मेषाचा साहवा द्वादशांश बुधाचा, कारण कन्येचा स्वामी बुध. ह्याप्रमाणें ज्या राशीपासून आरंभ करावयाचा त्या राशीचा जो स्वामी असेल तोच स्वामी त्या राशीचे द्वादशांशावा समजावा. जसें वृषाचा स्वामी शुक्र आहे तर वृषाचे प्रथम द्वादशांशाचा स्वामी शुक्र आहे वृषा पुढील राशि मिथुन आहे तेव्हां त्या राशीचा स्वामी बुध आहे ह्मणून वृषाचे दुसऱ्या द्वादशांशाचा स्वामी बुध आहे; ह्याचप्रमाणें पुढें जाणावें.आतां त्रिंशांश साधन सांगतो—शुक्र,बुध, गुरु, शनि, मंगळ ह्या पांच ग्रहांचे अनुक्रमानें शर ह्म०५ मुनि ह्म०७ इभ ह्म०८ अर्थ ह्म०५ इषु ह्म०५ असेल तर त्रिंशांश आहेत ह्मणजे शुक्राचा त्रिंशांश ५ बुधाचा ७ गुरुचा ८ शनीचा ५ मंगळाचा ५ असे आहेत. हे त्रिंशांश सम लग्नाचे जाणावेत, आतां विषम लग्नाचे हेच सांगितलेले अंश उलटे व ग्रहही उलटे केले ह्मणजे येतात. जसें शुक्र, बुध, गुरु, शनि मंगळ ५–७–८–५–५ ह्याचे उलट ह्मणजे मंगळ, शनि, गुरु, बुध, शुक्र, आणि ५–५–८–७–५ हे अशही उलट केले ह्मणजे हे त्रिंशांश होतात. जसे मंगळाचा ५ शनीचा ५ गुरुचे ८ बुधाचे ७ शुक्राचे ५ असे त्रिंशांश समजावे. अशा रीतीनें षड्वर्गाचें निरूपण केलें ॥ ३५ ॥

### रविसाधन व लग्नाचा इष्टकाळ.

> संक्रांत्यंतरहोहताद्दिनगणादाप्तं भपूर्वो रवि- ।
> मेषाद्यातभयुग्युतोऽयनलवै रात्रौ सषड्भः स च ॥
> तद्भोग्यांशनिजोदयाहतिखरामाप्तं तथा लग्नतो ।
> भुक्तांशार्कलितेन युग्विवरगैः कालः स्फुटो भोदयैः ॥ ३६ ॥

श्लोकार्थ—ज्या वेळचा रवि करावयाचा असेल, त्याच्या पूर्वी झालेल्या संक्रांतीपासून पुढें होणाऱ्या संक्रांतीपर्यंत मोजून जितके दिवस, घटी, पळें होतील त्यांनीं, पूर्वील संक्रांतीपासून इष्टकाळा पर्यंत मोजून दिवस, घटी, पळें होतील त्याला भागून भागाकार राशि, अंश, कळा, विकळा काढावा. जें राश्यादिक येईल त्यांत मेषादि गत राशि मिळवाव्या, ह्मणजे तो स्पष्ट रवि होतो. नंतर त्या रवींत अयनांश मिळवावे. इष्टकाळ रा-त्रीचा असतां सायन रवींत ६ राशि मिळवाव्या, मग वरचा राश्यंक सोडून खालचे अंशादि ३ तून वजा क-

रावे, म्हणजे बाकी राहील ते भोग्यांश होतील, नंतर ज्या राशीला रवि असेल त्या राशीच्या पळांनीं भोग्यांशाला गुणावें आणि ३० नीं भागावें. तसेंच लग्नाच्या भुक्तांशाला त्याच्या पळांनीं गुणून ३० नीं भागावें. नंतर भोग्यांशांच्या पळांत, भुक्तांशांचीं पळें आणि लग्न व रवि यांच्या मधल्या राशींचीं पळें मिळवून त्याला ६० नीं भागून घटिका, पळें येतील तो इष्टकाल समजावा. वर्तमान शकांत ४४४ वजा करून ६० नीं भागून येतील ते अयनांश होत. ( या श्लोकांतील गणिताचें उदाहरण दिलें नाहीं. कारण ज्यानें ग्रहलाघवाचें गणित केलें असेल त्याला हा श्लोक सहज समजेल, व ज्याणें केलें नसेल त्याला समजण्यास बराच कठीण जाईल. ह्यांतील गणित स्थूल मानाचें आहे आणि उदाहरणही बरचें लांब होईल ) ॥ ३६ ॥

अथेष्टकालसाधनं विवक्षुस्तावत्सूर्यसाधनमाह-संक्रांत्यंतरिति। अंतः अंतरालं तत्र अहानि दिनानि संक्रांत्योः अंतरहानि संक्रांत्यंतरहानि तैर्हृतो भागितः एवं विधो दिनगणः संक्रांतेः सकाशात् इष्टदिनसमूहः। तस्माद्यदाप्तं लब्धं स भपूर्वो राशिभागकलादिको रविः स्यात्। किंभूतो रविः मेषात्सकाशात् यातभयुक् गतराशियुक् सूर्यभुक्तराशियुगित्यर्थः । स तात्कालिको रविः स्यादित्यर्थः। अत्रोदाहरणं तुलावृश्चिकसंक्रांत्योरंतर्दिनानि २९।५४।० तथा तुलासंक्रांतेरिष्टदिनगणः ५।६।० अस्मादिनगणात् संक्रांत्यंतरहोभिर्लब्धं राश्यादि०।५।७।१ इदं सूर्यभुक्तराशियुक्तं ६।५।७।१ अयं तात्कालिकः सूर्यः अयनलवैर्युतः कार्यः।अयनांशा ग्रंथांतरे प्रसिद्धाः। कृताब्ध्यब्ध्यूनिते शाके षष्ट्याप्ता अयनांशका इतीसः अयनलवयुतो रविः रात्रौ रात्रीष्टकालसाधनविषये सषड्भः कार्यः षड्राशियुक्तः कार्यः तद्भोग्यांशनिजोदयाहतिखरामाप्तं कालः स्यात् तस्य सायनांशस्य रवेः भोग्यांशाश्च निजोदयाश्च तेषामाहतिर्गुणनं तस्याः सकाशात् खरामाप्तं त्रिंशता भक्तं लब्धं सूर्यस्य भोग्यकालः स्यात् निजोदयाः स्वदेशीयराश्युदयाः ते ब्रह्मतुल्यादिभ्योऽवगंतव्याः। कथंभूतः कालः तथैवागतो भुक्तांशाकलितेन युक् तथैव सूर्यस्य भोग्यकालसाधनरीत्याऽगतो लग्नात् भुक्तांशाकलितेन भुक्तांशैर्भुक्तभागैः आकलितेन कालेन युक् युक्तः। एतदुक्तं भवति इष्टलग्नमयनलवयुतं कृत्वा तद्भुक्तांशैर्निजोदया गुणनीयाः त्रिंशता भाज्या लब्धं लग्नं भुक्तकालः तेन कालेन स रविभुक्तः कालो युक्तः कार्य इत्यर्थः। पुनः कथंभूतः विवरगैर्भोदयैर्युक् विवरसूर्यलग्नांतरालं तत्र गतैर्भोदयैः राश्युदयैः युक् युक्तः स पलमयः कालः स्फुटः स्पष्ट इष्टकालः स्यात्। षष्टिभक्तो घटिकात्मकः स्यादित्यवगंतव्यम् ॥ ३६ ॥

**टीकार्थ**—आतां इष्ट काल साधन करण्याकारितां अगोदर सूर्याचें साधन कारितों ज्या काळाचा रवि करावयाचा असेल त्याच्या पूर्वी झालेल्या संक्रांतीपासून पुढें होणाऱ्या संक्रांतीपर्यंतचे जितके दिवस, घटी, पळें होतील तीं मोजून त्यांनीं, पूर्वीच्या संक्रांतीपासून जो इष्टकाळ धरला असेल त्या काळापर्यंतचीं जीं दिवस, घटी,पळें होतील त्याला भागावें आणि जो भागाकार येईल तो राशि, भाग, कलादिक रवि होतो. त्या राश्यादिकांमध्यें मेषादिगत राशि मिळवाव्या, नंतर जे बेरीज करून राशि भागादिक येतील तो तात्कालिक रवि होतो. ह्याचें उदाहरण असें कीं, तूळ आणि वृश्चिक ह्या दोन संक्रांतीचे मध्यें असलेले दिवस २९–५४–० तसाच तूळ संक्रांतीपासून इष्ट कालपर्यंतचा इष्टदिनगण ५–६–० असा आहे. वरच्या २९–५४–० ह्या रकमेनें ५–६–० ह्याला भागिलें असतां भागाकार राश्यादि ह्म० ०–५–७–१ असा रवि झाला ह्या मध्यें तूळ राशीच्या पूर्वीच्या ६ राशि म्हणजे मेषापासून कन्ये पर्यंतच्या मिळविल्या तेव्हां ६–५–७–१ असा तात्कालिक सूर्य झाला, ह्यामध्यें अयनांश मिळवावेत, अयनांश दुसऱ्या ग्रंथांत सांगितले आहेत. ते असे करावयाचे कीं, चालल्या शकांतून कृत ह्म० ४ अब्धि ह्म० ४ अब्धि ह्म० ४ बरोबर ४४४ वजा करावेत आणि जी बाकी राहील तिला साठांनीं भागून जो भागाकर येईल ते अयनांश समजावेत. तो पूर्वी सांगितलेला रवि ६–५–७–१ असा आहे, ह्यांत अयनांश मिळवावेत आणि रात्रीस इष्ट कालसाधन असेल तर त्यांत सहा राशी मिळवावेत. नंतर वरच्या राशीचा अंक ह्म० ६ सोडून खालचे अंशादितून वजा करावे. म्हणजे जी बाकी राहील ते भोग्यांश होतील. नंतर रवि हा ज्या राशीवर असेल त्या राशीच्या पळांनीं त्या भोग्यांशाला गुणावें आणि ३० नीं भागावें. नंतर वर सांगितलेल्या भोग्यांशांच्या पळांत भुक्तांशांचीं पळें आणि रवि व लग्न ह्यांच्या मध्यें असलेल्या राशींचीं पळें मिळवून त्याला ६० नीं भागावें जे घटिका, पळें वगैरे येईल तो इष्ट काळ समजावा. पुढें दिलेल्या कोष्टकांत लंकेंतील उदयाचीं व मुंबईतील उदयाचीं सर्व राशींचीं पळें दिलीं आहेत ॥ ३६ ॥

## कोष्टक.

| राशी. | मे. मी. | वृ. कुं. | मि. म. | क. ध. | सिं. वृ | क. तू |
|---|---|---|---|---|---|---|
| लंकेचे उदय | २७८ | २९९ | ३२३ | ३२३ | २९९ | २७८ |
| मुंबईचेउदय | २३८ | २६७ | ३१० | ३३६ | ३३१ | ३१८ |

### इष्टकाल साधन आणि घटिका स्थापन.

**लग्नार्कौ यदि चैकभेऽशविवरात्स्वीयोदयघ्नाद्वियः ।**
**त्र्याप्तिः काल इनात्तनुर्यदि तनुः सूर्योदयात्प्रागसौ ॥**
**कुंडेंऽभः परिपूरिते सुघटिकामधर्दोदयास्ते न्यसेत् ।**
**स्तुत्वाऽग्नित्रयवायुगा न शुभदा पूर्णाऽग्निपंचस्वथ ॥ ३७ ॥**

श्लोकार्थ—जर लग्न व सूर्य एका राशीला असेल तर त्या दोहोंत ज्याचे अंशादि अधिक असेल त्यांतून ज्याचे कमी असेल तें वजा करून बाकी राहील तिला त्याच राशीच्या पळांनीं गुणून ३० नीं भागून जें येईल तो इष्टकाल होतो. जर सूर्यांतून लग्न वजा होत असलें तर तें लग्न सूर्योदयापूर्वी आहे असें समजावें. पाण्यानें भरलेल्या ( पातेलें, घंघाळ इत्यादि ) पात्रांत सूर्याच्या अर्धोदयाच्या किंवा अर्धास्ताच्या वेळीं, पूजा करून बरोबर ६० पळांनीं भरणारी अशी उत्तम घटिका पाण्यावर तरंगत ठेवावी, ठेवितांच आग्नेयी, दक्षिण, नैर्ऋत्य, वायव्य ह्या चार दिशेंकडे जाईल तर शुभ नव्हे, अन्य दिशेला शुभ होय. आग्नेयी, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य ह्या पांच दिशांकडे भरली तरही शुभ नाहीं, अन्य दिशेस बुडाली तर शुभ होय ॥ ३७ ॥

अथेष्टकालसाधने विशेषमाह—लग्नार्काविति । लग्नार्कौ लग्नसूर्यौ यदि एकभे स्तस्तदांऽशविवरात लग्नार्कयोर्भागांतरात् स्वीयोदयघ्नात् । निजराश्युदयगुणितात् । या वियत्त्र्याप्तिस्त्रिंशता लब्धिः स कालः स्यात् इष्टकालः स्यात् । तत्रापि विशेषमाह—इनात्तनुरिति । इनात्सूर्यात्तनुर्लग्नं यदि तनुर्लघुः स्यात्तदाऽसाविष्टकालः सूर्योदयात्प्राक् पूर्वं स्यात् सोऽपि षष्ट्या भक्तो घटिकात्मकः स्यादित्यवगंतव्यम् । अथ ज्ञातं कालं यंत्रैर्विना साधितुं न शक्यतेऽतो यंत्राणां मध्ये मुख्यस्य घटीयंत्रस्य स्थापनकालमाह—कुंड इति । अंभः परिपूरिते उदकपूर्णे कुंडे पात्रे घटिकामज्जनक्षमे कुंडग्रहणमुत्तानपात्रव्युदासार्थं तस्मात् कुंडरूपपात्रे उदकपूरिते सुघटिकां षष्टिपलशुद्धां न्यसेत् निक्षिपेत् कस्मिन्सति अर्धोदयास्ते जाते सति सूर्यस्यार्धोदयेऽर्धास्ते च जाते सति किं कृत्वा स्तुत्वा प्रार्थयित्वा । प्रार्थना ग्रंथांतरे उक्ता । यंत्राणां मुख्यरूपाऽसि ब्रह्मणा निर्मिते घटि । दंपत्योः शुभकालातिहेतवे भव शोभने इति ॥ प्रतिष्ठितायां घटिकायां तद्गमनफलमाह—सा प्रतिष्ठिता घटी अग्नित्रयवायुगा न शुभदा स्यात् अग्नित्रयं आग्नेय्यादिप्रदक्षिणक्रमेण दिशात्रयं वायुर्वायव्यदिशा इति दिक्चतुष्टयं प्रति गता न शुभदाऽर्थादन्यदिग्गता तत्रैव स्थिता वा शुभदा स्यात् । तथा चोक्तं ग्रंथांतरे । संस्तुतैवं घटी तोये यां दिशं प्रति गच्छति । पूर्वाशादिफलं कुर्यात्स्थिता मध्ये धनप्रदा ॥ सौभाग्यं निर्धनं नार्या अपमृत्युरुजान्विता । भर्तृप्रिया च वेश्या च मान्या वित्तसुतान्वितेति ॥ एवं गमनफलमुक्त्वा पूर्णताफलमाह—पूर्णाऽग्निपंचस्वथेति । अग्निपंचसु आग्नेय्यादिपंचसु दिक्षु पूर्णा घटी न शुभदा । अर्थादन्यदिक्षु पूर्णा शुभा स्यात् । उक्तं च । उत्तरेशानपूर्वासु घटी पूर्णा शुभप्रदा । दिक्षु शेषासु कन्यायामग्नावैधव्यदायिनी ॥ ३७ ॥

टीकार्थ—आतां इष्ट काल साधना विषयीं विशेष सांगतों—जर सूर्य आणि लग्न ह्या दोघांची राशि एक असेल तर त्या दोघांपैकीं ज्याचे राश्यादिक अधिक असतील त्यांतून ज्याचे राश्यादि कमी असतील ते वजा करावे. आणि त्या बाकीला आपल्या राशींच्या उदयानें गुणावें व त्याला तीसानें भागून जो काळ येईल तो इष्टकाल जाणावा. त्या मध्येंही

विशेष सांगतो कीं,जर सूर्यापेक्षां इष्ट लग्नाची संख्या कमी असेल तर हा इष्ट काल सूर्योदयाचे पूर्वी आहे असें जाणावें. तो ही इष्ट काळ ६० नीं भागला असतां घटिका इत्यादि काळ होतो असें जाणावें, आतां झालेला इष्ट काळ यंत्राशिवाय जाणणें अशक्य आहे ह्मणून सर्व यंत्रांमध्यें घटिका यंत्र हें फार मुख्य आहे. ह्मणून तें स्थापन करण्याचा काळ सांगतों—उदकांनीं भरलेलें एक घंघाळ घ्यावें त्यामध्यें ६० पळांनीं बरोबर भरेल अशी एक घटिका, सूर्याचा अर्धा उदय झाल्या बरोबर अथवा सूर्याच्या अर्ध्या अस्ताबरोबर श्रीसूर्याची प्रार्थना करून ती घटिका पाण्यांत टाकावी. घटिकेची प्रार्थना अशी कीं, "हे घटिके तुला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे, तूं सर्व यंत्रांमध्यें श्रेष्ठ आहेस, ह्मणून ह्या दंपतीचा ह्मणजे स्त्रीपुरुषांचा शुभ काळ साधण्याविषयीं कारण हो." अशी प्रार्थना करून घटिका स्थापन केल्यावर तिचें गमन ह्मणजे पाण्यांत सोडल्या-वर ज्या दिशेकडे जाईल त्या जाण्याचें फल सांगतो—ती घटिका अग्नित्रय ह्मणजे आग्नेयी पासून आरंभ करून, प्रदक्षिणक्रमानें आग्नेयी, दक्षिण, नैर्ऋत्य ह्या तीन दिशा आणि वायुची दिशा ह्म० वायव्य ह्या चार दिशेकडे जाईल तर ती शुभ-कारक नाहीं. अर्थात् ह्या दिशां शिवाय दुसऱ्या दिशेकडे ती घटिका गेली असतां शुभकारक आहे. अथवा तशीच स्वस्थ राहिली तर शुभकारक आहे असें जाणावें. तेंच दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, घटिकेची प्रार्थना केल्यावर ती घटिका ज्या दिशेस जाईल (ह्मणजे पूर्व इत्यादि दिशेकडे) त्या दिशेचें फळ सांगतों—मध्यें जर तशीच राहील तर धनाचा लाभ देणारी समजावी, आतां पूर्वादि दिशेच्या क्रमानें फळें सांगण्याकरितां बोलतों—तीं अशीं कीं, १ सौभाग्य, २ निर्धन, ३ स्त्रीचा अपमृत्यु, ४ रोग, ५ भर्तृप्रियत्व, ६ वेश्या होणें, ७ मान्य होणें, ८ वित्त आणि पुत्र ह्यानीं युक्त असणें अशीं हीं पूर्वेपासून क्रमानें आठ दिशेचीं फळें सांगितलीं आहेत. आतां घटिका भरून बुडतांना जें फळ आहे ते सांगतों—भरून बुडतांना अग्नि पंचसु ह्म० आग्नेयीपासून प्रदक्षिणा क्रमानें पांच दिशेकडे ह्म० आग्नेयी, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य ह्या दिशेकडे बुडाली असतां ती घटिका शुभ फल देणारी होत नाहीं, अर्थात् ह्या पांच दिशां शिवाय दुसऱ्या दिशेकडे बुडाली असतां शुभ फल देणारी आहे. हेंच दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, उत्तर, ईशान्य, पूर्व इतक्या दिशेकडे बुडाली असतां शुभकारक आहे, ह्या शिवाय बाकीच्या ह्म० आग्नेयी, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य ह्या दिशेकडे बुडाली असतां शुभ नाहीं ॥ ३७ ॥

## गोधूल लग्न.

गोधूलं पदजातिके शुभकरं पंचांगशुद्धौ रवेः ।
अर्धास्तात्परपूर्वतोऽर्धघटिकं तत्रेंदुमष्टारिगम् ॥
सोग्रांगं कुजमष्टमं गुरुयमाहः पातमर्कक्रमम् ।
जह्यादिभमुखेऽतिसंकट इदं सद्यौवनाढ्ये क्वचित् ॥ ३८ ॥

श्लोकार्थ—सायंकाळचें गोधूल लग्न शूद्रादि हीन जातीला विवाहोक्त पंचांगशुद्धि असतां शुभ होय. सू-र्याच्या अर्धास्ता पुढें १५ पळें व पूर्वी १५ पळें मिळून अर्ध घटिका गोधूल मुहूर्त असतो. ह्याला अष्टम व षष्ठ चंद्र, खलग्रहानें युक्त लग्न, अष्टम मंगळ, गुरुवार व शनिवार, महापात, सूर्य संक्रांती हीं सोडावींत. कन्या फार मोठी वाढली असून अन्य मुहूर्त नाहीं अशा महासंकटीं ब्राह्मणादिकांला गोधूल लग्न विवाहास शुभ होय ॥ ३८ ॥

अथ गोधूललग्नमाह—गोधूलमिति । गोधूलं लग्नं सायंकाललग्नं पदजादिके हीनजातौ शुभकरं प्रोक्तं न पूर्ववर्णानां क्व पंचांगशुद्धौ विवाहोक्तपंचांगे । अत्र पंचांगशुद्धिर्मुख्या तत्र कालप्रमाणं विशेषणद्वारेणाऽऽह—कथंभूतं गोधूलं रवेरर्धास्तात्सकाशात् । प्राक्परतोऽर्धघटिकं अर्धा घटिका यस्मिन्नित्यर्धघटिकं प्राक् पंचदशपलानि परतः पंचदशपलानि एवमर्धघटिकमित्यर्थः। अत्र त्याज्य-माह—इहास्मिन् गोधूललग्ने षष्ठाष्टगमिंदुं चंद्रं जह्यात् त्यजेत् । पुनः किं किं जह्यादित्याह—सो-ग्रांगं उग्रग्रहसहितं लग्नं कुजं भौममष्टमं गुरुयमाहः गुरुशनिदिनं पातं महापातं सिद्धांतगम्यं अर्क-क्रमं सूर्यसंक्रांतिं जह्यात् अन्ये दोषा न त्याज्या इत्यर्थः । अत्र गुरुयमाहस्त्यक्तं तद्दोषोपलंभात् गुरुदिने सूर्यास्तात्प्राक् यामार्धे परतो यमघंटः शनिदिनेऽस्तमयात्प्राक्परतश्च कुलिकौ मार्तंडो-दयतः स्मृता दिनपतेर्यामार्धनाथा ग्रहा मार्तंडात्मजभोग उत्तरलवस्तज्ज्ञैः शुभे कर्माणि । त्या-ज्योऽसौ कुलिकोऽथ सूर्यदिवसो दानैश्च शकार्कदिग्वस्वंगाब्धियमैः स्मृतः कुरहितै रात्रौ तु तिथ्यं-शकैरिति ॥ त्याज्योऽसौ कुलिक इत्यनेन शनावस्तात् प्राक्कुलिको भवति इनादौ कुलिकं दिवेत्यादि व्येकं तन्निशीति न्यायेनास्तात्परतोऽपि कुलिको भवतीति हेतोर्गुरुशनिवारौ निंदितौ । अथ वि-

प्रादीनामपि कचित्कार्यविशेषेण गोरजः प्रवृत्तिमाह–विप्रमुखेति। संकट इदं सद्यौवनाढ्ये कचिदिति । यौवनाढ्ये अतिसंकटे प्राप्ते सति कचिल्लग्नशुद्ध्यभावे इदं गोधूलं विप्रमुखे विप्रप्रभृतिवर्णत्रये सत् शुभं स्यादन्यथा नेत्यर्थसिद्धं । तदुक्तं ज्योतिर्निबंधे । घटीलग्नं यदा नास्ति तदा गोधूलिकं स्मृतं । शूद्रादीनां बुधाः प्राहुर्न द्विजानां कदाचन ॥ लग्नशुद्धिर्यदा न स्याद्यौवने समुपस्थिते । तदा वै सर्ववर्णानां लग्नं गोधूलिकं शुभमिति ॥ ३८ ॥

**टीकार्थ**—आतां गोधूल लग्न सांगतों–सायंकाळच्या वेळचें जें लग्न असतें त्याला गोधूल, लग्न असें ह्मणतात. हें पदज ह्मणजे शूद्र इत्यादिक हीन जाती करितां सांगितलें आहे,परंतु ब्राह्मणादि श्रेष्ठ वर्णांना सांगितलें नाहीं, हें गोधूल लग्न घेतानांही विवाहाला सांगितलेल्या पांचही अंगांची शुद्धि असली पाहिजे, ह्या गोधूल लग्नाविषयीं पंचांगाची शुद्धिही मुख्य आहे, त्या गोधूल लग्नाचा काळ सांगतों–सूर्याचा अर्ध अस्त होण्याचे वेळेपासून पूर्वी पाव घटिका आणि नंतर पाव घटिका मिळून अस्ताचे पूर्वीं १५ पळें आणि अस्तानंतर १५ पळें मिळून अर्धी घटिका पर्यंतच हें गोधूल लग्न आहे, ह्या गोधूल लग्नास काय सोडावयाचें आहे. तें सांगतों–उग्र ह्मणजे क्रूर ग्रह असलेलें लग्न सोडावें आणि आठवा मंगळ सोडावा, व गुरुवार आणि शनिवार सोडावेत, महापात सोडावा, तो सिद्धांतानें समजावया जोगा आहे. सूर्याचें संक्रमण सोडावें, ह्यां शिवाय बाकीचे दोष सोडण्याचें कारण नाहीं, येथें गुरु आणि शनि हे वार सोडावयाचें कारण असें कीं, गुरुवारीं सूर्यास्ताचे पूर्वीं यामार्ध हा दोष असतो व तो त्याज्य ह्मणून सांगितला आहे आणि त्याच दिवशीं सूर्यास्तानंतर यमघंट दोष सांगितला आहे, ह्मणून गुरुवार वर्ज्य आहे, आणि शनिवारीं सूर्यास्ताचे पूर्वीं आणि नंतर कुलिक नांवाचे दोष असतात, विवाह प्रकरणाचे २० व्या श्लोकांत सांगितलेल्या कुलिकाचा विचार पहावा. हा कुलिक दोष शनिवारीं अस्ताचे पूर्वीं असतो, रविवारीं कुलिक दिवसासच असतो जेवढे कुलिक दिवसास आहेत त्यांतील एक कमी करून रात्रीस कुलिक समजावेत. ह्या कारणास्तव गुरुवार आणि शनिवार हे दोन वार वर्ज्य केले आहेत. आतां ब्राह्मणादिकांना कांहीं कार्य प्रसंगवशात् गोधूल लग्नावर लग्न करण्याची प्रवृत्ति सांगतों–संकटकाळीं हें गोधूल लग्न घ्यावें, संकट ह्मणजे कन्येचा काळ होऊन गेला असून ती आतां तारुण्यांत आली असेल तर, आणि दुसरें शुद्ध लग्न मिळत नसेल तर, ब्राह्मणादि तीन वर्णांनींही गोधूल लग्न घेतल्यास तें शुभकारक आहे, परंतु संकट नसेल तर घेणें प्रशस्त नाहीं. तेंच ज्योतिर्निबंध-ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ज्यावेळेस घटी यंत्र नसेल त्या वेळेस गोधूल सांगितलें आहे, पण तें शूद्रादिक हीन जातींना सांगितलें आहे, ब्राह्मणादि तीन वर्णांना तें गोधूल लग्न शुभ नाहीं, परंतु कन्येला तारुण्य अवस्था आली असेल आणि दुसरें शुद्ध लग्न मिळत नसेल अशी अडचण असेल तर मग ब्राह्मणादि सर्व वर्णांनां ही गोधूल लग्न शुभकारक आहे ॥ ३८ ॥

## विवाहवेदी आणि अंगकर्मांचे मुहूर्त.

वेदी प्राक्प्रवणा चतुर्वरकरा हस्तोच्छ्रिताऽग्र्यस्यदो- ।
र्जादेर्द्वित्रियुगांगुलैरपचिता सोक्ता बहिर्वामतः ॥
यस्यांगं यदद्दोंऽगिनो गदितभे कुर्यादिहेंदोर्बलम् ।
नाऽऽलोक्यं तु विवाहतश्चर्यरिनवाह्नि प्राङ्न कुर्यादिदम् ॥ ३९ ॥

श्लोकार्थ—पूर्वेकडे थोडथोडी सखल होत जाणारी आणि वराच्या हातानें ४ हात लांब ४ हात रुंद व १ हात उंच अशी वेदी ब्राह्मणाला असावी. ही पेक्षां क्षत्रियाला २ अंगुलें, वैश्याला ३ अंगुलें आणि शूद्राला ४ अंगुलें कमी असावी. घराबाहेर वामभागीं वेदी करावी. ज्या मुख्य कर्माचें जें अंगकर्म करावयाचें, तें त्या मुख्य कर्माला सांगितलेल्या नक्षत्रावर करावें त्याला चंद्रबळ पाहूं नये. विवाहापूर्वीं ३ ऱ्या, ६ व्या, ९ व्या दिवशीं त्याचें अंग कर्म करूं नये ॥ ३९ ॥

अथोद्वाहवेदिकालक्षणमाह–वेदीति । प्राक्प्रवणा पूर्वनिम्ना चतुर्वरकरा चतुर्भिर्वरकरैः प्रमिता वरो वैवाह्यः हस्तोच्छ्रिता हस्तप्रमाणेनोन्नता इयमग्र्यस्य ब्राह्मणस्य प्रोक्ता सा वेदी दोर्जादेः क्षत्रियादेः क्रमेण द्वित्रियुगांगुलैः अपचिता हीना क्षत्रियस्य द्व्यंगुलन्यूना वैश्यस्य त्र्यंगुलोना शूद्रस्यचतुरंगुलोना च। सा क कार्येत्याह–बहिर्वामत इति । गृहाद्बहिर्वामभागे अंगुलप्रमाणं मार्कंडेयपुराणे उक्तं ।

परमाणुः परं सूक्ष्मं त्रसरेणुर्महीरजः।वालाग्रं चैव लिक्षा च यूका चाथ यवोदरं॥क्रमादष्टगुणानाहुर्यवानामष्टतोऽगुलं। षडंगुलं पदं तच्च वितस्तिर्द्विपदं स्मृता ॥ द्विवितस्ती तथा हस्तो मार्कंडेयमुनीरितः ॥ आगमांतरेऽपि । कर्तुर्दक्षिणहस्तस्य मध्यमांगुलिपर्वणः। मध्यमा दैर्घ्यमानेन मात्रांगुलमितीरितमिति ॥ अन्यत्रोक्तं। यत्किंचित्पौरुषायामं विभज्य दशधा पुनः । एकं द्वादशभागं तु कृत्वा तेष्वेकमंगुलं॥ देहलब्धांगुलं नाम जानीयात्तस्य तत्पुनः। महामानांगुलिरिति मात्रांगुलिरिहोदिता ॥ प्रासादादीनि तेनैव कुर्यान्मानांतरेण वा। वेदिकादीनि शिबिकारथादीनां विधिः पुनरित्यादि॥ अत्र वरकरग्रहणं तस्य होमकर्तृत्वात्। ननु कन्याया अपि लाजाहुतौ कर्तृत्वमस्ति तत्करप्रमाणं किं नोक्तं। सत्यं अल्पावकाशस्थले कन्याकरप्रमाणमप्यंगीक्रियते। तथा चोक्तं देवयजनदीपिकायां। स्वल्पावकाशनिलये हीनमानं समाश्रयेदिति ॥ अथ नानाविधकर्मणां अंगं कस्मिन्नक्षत्रे कर्तव्यमित्याह-यस्यांगमिति। यस्य कर्मणः यत् अंगं अद् इदं अंगं अंगिनो मुख्यस्य गदितभे उक्तनक्षत्रे कुर्यात्। इहास्मिन्नंगभूते कर्मणि इंदोर्बलं नाऽऽलोक्यं न विचारणीयं । तत्र विशेषमाह-विवाहतः विवाहदिनात्प्राक् त्र्यरिनवाह्नि तृतीयषष्ठनवमेऽह्नि इदं अंगं विवाहांगं न कुर्यात्। विवाहांगानि यथा। दलनं कंडनं चैव व्यंजनं मोदकादि च। यवारमंडपोवेदीकुंकुमं वर्णकं तथेति॥ ३९॥

**टीकार्थ**—आतां लग्नाची जी वेदिका असते तिचें लक्षण सांगतों—पूर्वेच्या बाजूकडे थोडी थोडी सखल होत गेलेली असावी. आणि ज्या वराचा विवाह करावयाचा आहे त्याच्या हातानें चार हात लांब व चार हात रुंद असून एक हात ऊंच असावी, अशी ही वेदिका अग्रवर्ण ह्मणजे ब्राह्मण ह्यांस सांगितली आहे,तीच वेदिका क्षत्रियांनां दोन अंगुळें कमी आणि वैश्यानां तीन अंगुळें कमी असावी. आणि शूद्रांला चार अंगुळें कमी असावी. ती वेदिका कोठें करावी हें सांगतों—घराच्या बाहेर डाव्या बाजूस करावी, अंगुळाचें परिमाण मार्कंडेय पुराणांत सांगितलें आहे कीं, परमाणु हा फारच सूक्ष्म आहे, त्रसरेणु हा पृथ्वीचें रज आहे, केंशाचे अग्रभाग, लिखा, यव, हीं अनुक्रमानें एकापेक्षां एक आठपट आहेत. ह्मणजे परमाणु फारच सूक्ष्म ते आठ झाले ह्मणजे एक त्रसरेणु होतो, ८ त्रसरेणु झाले ह्मणजे एक केशाग्र होतो. ८ केशाग्र झाले ह्मणजे १ लिखा होते. ८ लिखा झाल्या ह्मणजे १ ऊ होते. ८ ऊ झाल्या ह्मणजे १ यव होतो ८ यव झाले ह्मणजे १ अंगुळ होतें. ६ अंगुळें झालीं ह्मणजे १ पद होतें. २ पदें झालीं ह्मणजे १ वीत होते. २ वीती झाल्या ह्मणजे १ हात होतो. असें मार्कंडेय मुनीनीं सांगितलें आहे. दुसऱ्या आगमांतही असें सांगितलें आहे कीं, कर्त्याच्या उजव्या हाताचें मधल्या बोटाचें जें कांड असतें त्याच्या मापा इतकें मात्रांगुळ समजावें. दुसरे ठिकाणीं सांगितलें आहे कीं, पुरुषाचा जो आयाम ह्मणजे उंचपणा असतो त्याचे दहा भाग करून त्या दहाव्या भागाचे बारा भाग करावेत, त्या एका भागाला अंगुळ असें नांव आहे, ह्या अंगुळाला देह लब्ध अंगुळ असें जाणावें. त्याला महामानांगुलि अथवा मात्रांगुलि असेंही नांव सांगितलें आहे. ह्याच मानांनीं मोठे मोठे वाडे इत्यादि करतात अथवा दुसऱ्या मानानेंही वेदिका, शिबिका, रथ इत्यादि करितात. आतां येथें वराच्या हाताचे मानानें वेदिका करावयाचें कारण, तो वर हा होम करणारा आहे. आतां अशी शंका येईल कीं, लाजा होम करतांना कन्याही होम करणारी आहे, तर तिचे हाताच्या मापानें कां वेदिका करूं नये? हें ह्मणणें खरें आहे, परंतु जागेचा संकोच असेल तर कन्येच्या हाताचें माप घेण्याची रीती आहे. तेंच देवयजनदीपिका ग्रंथांत सांगितलें आहे कीं, जागेचा संकोच असेल अशा ठिकाणीं लहान माप घ्यावें. आतां अशी शंका येते कीं नानाप्रकारचीं कर्में आहेत व त्यांचीं अंगेंही असतात. तर त्या अंगांचा आरंभ कोणत्या नक्षत्रावर करावा हें सांगतों—ज्या मुख्य कर्मास जें नक्षत्र सांगितलें आहे त्याच नक्षत्रावर तें कर्मांगही करावें. आतां कर्मांगांविषयीं चंद्राचें बळ पाहावयाचें कारण नाहीं, त्याविषयीं विशेष सांगतों कीं, विवाहाचे दिवसाचे पूर्वीं ३–६–९ ह्या दिवशीं त्या अंग कर्मांचा आरंभ करावा. विवाहाचीं अंग कर्में अशीं कीं, दळणें, कांडणें, लाडू करणें, पापड पापड्या वगैरे करणें, हळद दळणें, मंडप घालणें, वेदिका तयार करणें, उडदांला तेल लावणें, कुंकुम तयार करणें इत्यादि समजावींत ॥ ३९ ॥

### वधूप्रवेश.

लग्नादष्टि १६ दिनांततः सममुनी ७ ष्वं ९ क ९ द्युपूर्वं त्वयु- ।
ग्घस्रे मास्यपि हायने शरमिताद्वर्षात्परं स्वेच्छया ॥
वैफामार्गसिते जगुः श्रुतियुगोद्वाहर्क्षचित्राश्विनी- ।
ज्यर्क्षेश्रानवमंदिरे निशि वधूसंवेशमंगे स्थिरे ॥ ४० ॥

श्लोकार्थ—विवाहापासून सोळा दिवसांच्या आंत सर्व समदिवशीं व ७।५।९ ह्या विषमदिवशीं वधूप्रवेश करावा. सोळा दिवसां नंतर महिन्याचे आंत विषम दिवशीं करावा. महिन्या नंतर वर्षपर्यंत विषममासांत करावा. वर्षा पुढें पांच वर्षांच्या आंत विषमवर्षीं करावा. त्या नंतर इच्छा होईल तेव्हां करावा. वैशाख, फाल्गुन व मार्गशीर्ष ह्यांच्या शुक्लपक्षांत, श्रवण, धनिष्ठा, विवाह नक्षत्रें, चित्रा, अश्विनी, पुष्य ह्या नक्षत्रांवर जुन्या घरांत, रात्रौ, स्थिरलग्नीं वधूप्रवेश करावा ॥ ४० ॥

अथ क्रमप्राप्तं वधूप्रवेशमाह—लग्नादिति । लग्नाद्विवाहतः सकाशात् अष्टदिनांततः षोडशदिन-मध्ये समसुनीष्वंकेषु द्युषु घस्रेषु समाः समसंख्याका मुनिः सप्तम इषुः पंचमः अंको नवमः एषु द्युषु दिवसेषु अत ऊर्ध्वं षोडशदिनादूर्ध्वं अयुग्घस्रे विषमदिने मास्यपि विषमे हायने वर्षे वधूसंप्रवेशं जगुरूचुः । एतदुक्तं भवति । षोडशदिनमध्ये समादिषु दिनेषु कर्तव्यः । षोडशदिनातिक्रमे मासप-र्यंतं विषमदिने वधूप्रवेशः कार्यः । प्रथममासातिक्रमे वर्षपर्यंतं विषमे मासि कर्तव्यः तदा विषम-दिननियमो नास्ति । एवं प्रथमे वर्षेऽतिक्रांते पंचमवर्षपर्यंतं विषमे वर्षे कर्तव्यः तदा विषममास-नियमो नास्ति । अथ विलंबितं वधूप्रवेशं कस्मिन्मासपक्षे कर्तव्य इत्याह—वैफामार्गसिते वै वै-शाखः फा फाल्गुनः मार्गो मार्गशीर्षः एषां सितः शुक्लपक्षः तस्मिन् कैः श्रुतियुगोद्वाहर्क्षचित्राश्वि-नीज्यर्क्षैः श्रुतियुगं श्रवणधनिष्ठे उद्वाहर्क्षाणि विवाहनक्षत्राणि पूर्वोक्तानि चित्राश्विनी प्रसिद्धे इज्य-र्क्षं पुष्यः तैः अनवमंदिरे जीर्णगृहे । नवीनमंदिरे कन्यां नवोढां न प्रवेशयेदिति निषेधादनवमंदिर इत्युक्तं । उक्तं च । प्रभूप्रवेशनं कार्यं पंचमे सप्तमे दिने । नवमे च शुभे वारे सुलग्ने शशिनो बल इति ॥ नारदः । आरभ्योद्वाहदिवसात् षष्ठे वाऽप्यष्टमे दिने । वधूप्रवेशः संपत्त्यै दशमेऽथ समे दिन इति ॥ संग्रहे । विवाहमारभ्य वधूप्रवेशोऽयुग्मे तथा षोडशवासरांतात् । तदूर्ध्वमब्देऽयुजि पंचमांतादतः-परस्तान्नियमो न चास्ति ॥ वृद्धनारदः । समे वर्षे समे मासि यदि नारी गृहं विशेत् । आयुष्यं हरते भर्तुः सा नारी मरणं व्रजेत् ॥ भास्करव्यवहारे । रात्रौ विवाहभे शस्तः सन्मुहूर्ते स्थिरोदये । वधूप्रवेशो नैवात्र प्रतिशुक्राद्भयं विदुः ॥ ऋक्षैर्वैवाहिकैः शुद्धैर्दंपत्योश्च शुभप्रदं । वधूप्रवेशनं कार्यं पंचमे ह्यकृतं यदि । मार्गफाल्गुनवैशाखे शुक्लपक्षे शुभे दिने ॥ मूलपुष्यमृदुस्वातिस्थिराश्विश्रुति-वासवैः ॥ पितृभे च करे नारी प्रविष्टा पुत्रिणी भवेदिति ॥ ४० ॥

टीकार्थ—आतां क्रमानें प्राप्त झालेला वधूचा प्रवेश काल सांगतों—विवाह झाल्यावर आठ दिवसांचे आंत किंवा सोळा दिवसांचे आंत सम दिवशीं ह्म० २–४–६ वगैरे दिवशीं, अथवा मुनि ह्म० ७ अंक ९ इषु ५ अशा प्रकारच्या विषम दिवशीं वधूचा प्रवेश करावा. आतां सोळा दिवस होऊन गेल्यावर एक महिन्याचे आंत विषम दिवसावर ह्मणजे १७–१९–२१–२३ वगैरे विषम दिवसावर वधू प्रवेश करावा. महिना होऊन गेल्यावर मग एक वर्षाचे आंत विषम मासीं ह्मणजे ३–५–७–९–११ ह्या महिन्यांत वधू प्रवेश करावा. ह्याचें तात्पर्य असें कीं, सोळा दिवसांमध्यें, सम दिवशीं वगैरे वधू प्रवेश करावा. सोळा दिवस होऊन गेल्यावर एक महिनापर्यंत विषम दिवशीं वधू प्रवेश करावा. पहिला महिना होऊन गेल्यावर एक वर्षपर्यंत विषम मासीं वधू प्रवेश करावा. त्यावेळेस विषम दिवसाची आवश्यकता नाहीं. अशा रीतीनें पहिलें वर्ष संपल्यावर मग विषम वर्षीं वधू प्रवेश करावा. त्या वेळेस विषम मासाची आवश्यकता नाहीं. आतां वधू प्रवेशास विलंब झाला तर कोणत्या महिन्यांत कोणत्या पक्षांत करावा हें सांगतों—वै ह्म० वैशाख, फा ह्म० फाल्गुन, मार्ग ह्म० मार्गशीर्ष ह्या तीन महिन्यांपैकीं कोणत्याही महिन्यांतील शुक्लपक्षांत श्रुति युग ह्मणजे श्रवण, धनिष्ठा आणि विवाहाचीं जीं नक्षत्रें पूर्वी सांगितलीं आहेत, त्या नक्षत्रांवर, चित्रा, अश्विनी, इज्यर्क्ष ह्म० पुष्य इतक्या नक्षत्रांवर वधू प्रवेश करावा, परंतु तो जुन्या घरांत करावा कारण नवीनच बांधलेल्या मंदिरांत वधू प्रवेश करवूं नये. कारण त्यास निषेध आहे, ह्मणूनच घर नवीन नसावें असें सांगितलें आहे. तसेंच वधू प्रवेश, लग्न झाल्यापासून पांचव्या, सातव्या, नवव्या दिवशीं शुभ वारावर शुभ लग्नीं, चंद्राचें बल, असतां करावा. नारदानें सांगितलें आहे कीं, विवाह झाल्यापासून ६ व्या, ८ व्या आणि १० व्या दिवशीं वधू प्रवेश केला असतां संपत्तिकारक आहे अथवा दुसऱ्या कोणत्याहि सम दिवशीं करावा. संग्रहांत सांगितलें आहे कीं, विवाह झाल्यापासून सोळा दिवसांचे आंत वधू प्रवेश सम दिवशीं करावा. त्या नंतर एक वर्षपर्यंत विषम महिन्यांत, नंतर नियम नाहीं. वृद्ध नारद सांगतो कीं, सम वर्षांत ह्म० २–४–६–८ इत्यादि वर्षांत. तसेंच सम महिन्यांत जर वधूचा प्रवेश होईल तर ती वधू भर्तारांचें आयुष्य हरण करत्ये आणि ती वधू मरण पावत्ये. भास्कर व्यवहारांत सांगितलें आहे कीं, विवाह नक्षत्रांवर शुभ मुहूर्तावर स्थिरोदय असतां रात्रीस वधू प्रवेश

करावा. येथें प्रतिशुक्रापासून भय नाहीं असें विद्वान् लोक सांगतात, विवाहाचीं शुभ नक्षत्रें असतांना प्रवेश केला असतां, तो स्त्री पुरुषांनां मंगलकारक आहे. वधू प्रवेश जर पांचव्यांत झाला नाहीं तर मार्गशीर्ष, फाल्गुन, वैशाख ह्या महिन्यांचे शुक्लपक्षीं, शुभ दिवशीं मूल, पुष्य, स्वाति, स्थिरनक्षत्रें, अश्विनी, श्रवण, वासव ह्म० ज्येष्ठा, मघा इतक्या नक्षत्रांवर वधू प्रवेश केला असतां ती वधू पुत्रवती होते ॥ ४० ॥

### प्रथमवर्षीं कन्येनें राहण्याचे नियम.

उद्वाहात्प्रथमे शुचौ यदि वसेद्भर्तुर्गृहे कन्यका ।
हन्यात्तज्जननीं क्षये निजतनुं ज्येष्ठे पतिज्येष्ठकम् ॥
पौषे च श्वशुरं पतिं च मलिने चैत्रे स्वपित्रालये ।
तिष्ठंती पितरं निहंति न भयं तेषामभावे भवेत् ॥ ४१ ॥

श्लोकार्थ—विवाहापासून पहिल्या आषाढांत जर आपल्या पतीच्या घरीं ह्म० सासरीं कन्या राहिली तर सासूला वाईट, क्षयमासांत स्वत: कन्येच्या शरीराला वाईट, ज्येष्ठांत पतीच्या थोर भावाला ह्म० वडील दीराला वाईट, पौषांत श्वशुराला वाईट व अधिक मासांत पतीला वाईट होय. चैत्रांत आपल्या पित्याच्या घरीं राहणारी कन्या पित्याला अशुभ जाणावी. ज्याला वाईट ह्मणून सांगितलें, तीं मनुष्यें नसतां भय नाहीं. जिची सासु नाहीं ती कन्या आषाढांत सासरीं राहिली तरी हरकत नाहीं वगैरे जाणावें ॥ ४१ ॥

इदानीं प्रथमाषाढादौ भर्त्रादिगृहे वासनिषेधमाह—उद्वाहादिति । उद्वाहाद्विवाहादुपरि प्रथमे शुचावाषाढे कन्या यदि भर्तृगृहे वसेत्तदा तज्जननीं तस्य भर्तृजननीं हन्यादित्यादि सुगमम् ॥ ४१ ॥

टीकार्थ—आतां पहिला आषाढ इत्यादिकांमध्यें कन्येस राहण्याचा निषेध सांगतों—विवाह झाल्यानंतर पहिल्या आषाढ महिन्यांत कन्या जर पतीच्या घरीं राहील तर ती पतिच्या मातेचा ह्म०सासूचा नाश करत्ये इत्यादि स्पष्ट आहे॥४१॥

### पुनर्विवाह मुहूर्त.

शूद्रांत्येषु पुनर्भुवा परिणयः प्रोक्तो विवाहोक्तभैः ।
र्नाऽऽलोक्यं तिथिमासवेधभृगुजेज्यास्तादि तत्रार्कभात् ॥
त्रित्र्यृक्षेषु मृतिर्धनं मृतिमृती पुत्रा मृतिर्दुर्भगम् ।
श्रीरौन्नत्यमथो धृती१८श११कृत४तत्त्व२५र्क्षेऽत्ययः साभिजित् ॥ ४२ ॥

श्लोकार्थ—शूद्र, रजक, अंत्यजादि जातींत पुनर्विवाह करितात. तो विवाहनक्षत्रांवर करावा. त्याला तिथि मास, वेध, शुक्राचें व गुरूचें अस्त इत्यादि पाहूं नये. सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्र मोजून तीन तीन नक्षत्रांचीं पुढचीं फळें पहावीं. ३ मृति, ६ धन, ९ मृति, १२ मृति, १५ पुत्र, १८ मृति, २१ दुर्भग, २४ श्री, २७ औन्नत्य ह्याला ब्रह्मपट्ट ह्मणतात. सूर्यनक्षत्रापासून अभिजितासह मोजून १८।११।४।२५ हीं नक्षत्रें मृत्युकर आहेत, ह्याला रुद्रपट्ट ह्मणतात. ह्या दोहोंतून शुद्ध असें नक्षत्र पुनर्विवाहाला घ्यावें ॥ ४२ ॥

अथ पुनर्भूविवाहमाह—शूद्रांत्येष्विति । शूद्राः प्रसिद्धाः अंत्या रजकादयः तेषु पुनर्भुवा परिणयः प्रोक्तः कैः विवाहोक्तभैः । स्पष्टं । तत्र पुनर्भुवा परिणये तिथिमासवेधगुरुशुक्रास्तादि न आलोक्यं । स्पष्टं । तथा चोक्तं ज्योतिर्निबंधे । न शुक्रास्तादिकं चिंत्यं शुद्धिवेधादिकं तथा । पुनर्भुवा संवरणे न मासतिथिशोधनमिति ॥ अथ ब्रह्मपट्टनक्षत्रशुद्धिमाह—अर्कभात् सूर्यनक्षत्रात् त्रित्र्यृक्षेषु त्रिषु नक्षत्रेषु क्रमेण मृतिर्मरणं प्रथमे त्रिके द्वितीये त्रिके धनं तृतीये मृतिः चतुर्थे मृतिः पंचमे पुत्राः षष्ठे त्रिके मृतिः सप्तमे दुर्भगं अष्टमे लक्ष्मीः नवमे त्रिके औन्नत्यं प्रोक्तं ।अथ रुद्रपट्टशुद्धिमाह—अर्कभादित्यनुवर्तते । धृतीशकृततत्त्वर्क्षे धृतिरष्टादशं ईश एकादशं कृतश्चतुर्थं तत्त्वं पंचविंशं एत-

न्मिते नक्षत्रेऽर्कभादेतन्मित इत्यर्थः । अत्र चतुष्टये साभिजिद्गणितेऽत्ययो मृत्युः स्यात् अर्थादन्येषु शुभं प्रोक्तमिति ॥ ४२ ॥

**टीकार्थ**—आतां पुनर्विवाह सांगतों–शूद्र हे प्रसिद्धच आहेत. अंत्य ह्मणजे धोबी वगैरे ह्यांना पुनर्विवाह करावा ह्मणून सांगितलें आहे, तो पुनर्विवाह विवाहास सांगितलेल्या नक्षत्रांवर करावा. पुनर्विवाह करण्याचे वेळेस तिथि, मास, वेध, गुरु शुक्रांचा अस्त वगैरे कांहीं एक पाहावयाचें कारण नाहीं. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, शुक्रास्त वगैरे कांहींएक विचारावयाचें कारण नाहीं. वेध इत्यादि, शुद्धि वगैरे आणि मास, तिथि ह्या कोणत्याच गोष्टीचा विचार करावयाचें कारण नाहीं. आतां ब्रह्मपट्ट नक्षत्रांची शुद्धि सांगतों–सूर्यनक्षत्रापासून तीन तीन नक्षत्रांचा एकएक गण असा ९ गण झाले. जसे ३–६–९–१२–१५–१८–२१–२४–२७ असे नऊ गण आहेत, ह्यांचें अनुक्रमानें फळ असें आहे कीं, पहिल्या त्रिकास मरण, दुसऱ्या त्रिकास धन, तिसऱ्या त्रिकास मरण, चवथ्या त्रिकास मरण, पांचव्या त्रिकास पुत्र, सहाव्या त्रिकास मरण, सातव्या त्रिकास दुर्भगत्व, आठव्या त्रिकास लक्ष्मी, नवव्या त्रिकास श्रेष्ठपणा प्राप्त होतो. आतां रुद्रपट्ट शुद्धि सांगतों–सूर्यनक्षत्रापासून धृति ह्म० १८ ईश ह्म० ११ कृत ह्म० ४ तत्व ह्म० २५ हीं नक्षत्रें मृत्युकारक आहेत, ह्यास रुद्रगणपट्ट असें ह्मणतात. ह्या दोहोंतून जें शुभकारक असेल तें नक्षत्र विवाहाला घ्यावें. ह्या पुनर्विवाहाला हल्लींचे लोक " पाट लावणें " असें ह्मणतात तो शूद्रादिक नीच वर्णांमध्यें आहे ॥ ४२ ॥

### अनेक शास्त्रार्थ.

भुक्तायैव सुतामुपोषितनरो दद्याच्च सावित्रिका-।
मारब्धोत्सवके यदा जनिमृती स्यातां स्वगोत्रे क्वचित् ॥
सांगं तं विदधीत वाजमपरेऽस्मादारभेत्पूर्वतो ।
यज्ञोद्वाहनचौलमौंजिकमहस्सु स्वर्गदिक्त्रित्रिषु ॥ ४३ ॥

**श्लोकार्थ**—विवाह किंवा उपनयन करणाऱ्या यजमानानें आपण उपोषित राहून, भोजन केलेल्या वरास कन्यादान करावें व भोजन केलेल्या वटूस गायत्रीचा उपदेश करावा. विवाहादि उत्सवाला आरंभ केल्यानंतर जेव्हां स्वगोत्रांत जनन किंवा मरण होऊन तत्संबंधीं सूतक प्राप्त होतें, तेव्हां तें आरंभिलेलें कर्म सांग करावें. अन्नमात्र परगोत्र्यांनीं करावें. यज्ञ, विवाह, चौल, उपनयन हीं ज्या दिवशीं करणें असतील त्या पूर्वी यज्ञाचा २१ दिवस, विवाहाचा १० दिवस, चौलाचा ३ दिवस व उपनयनाचा ३ दिवस आरंभ करावा ॥ ४३ ॥

अथ नानाविधशास्त्रार्थानाह–भुक्तायेत्यादिना । भुक्ताय कृतभोजनायैव सुतां दद्यात् परं उपोषितनरः भुक्तायैव बटवे सावित्रिकां गायत्रीं दद्यात् । तदुक्तं ज्योतिर्निबंधे । भुक्त्वा समुद्वहेत्कन्यां सावित्रीग्रहणं तथा । उपोषितः सुतां दद्यादागताय वराय चेति ॥ आरब्धोत्सवके यदा जनिमृती स्यातां स्वगोत्रे क्वचित् सांगं तं विदधीत वाजमपर इति वाजं अन्नं अपरेऽसगोत्रिणो विदधीरन् । वाजमन्नं गरुद्वाजो वाजं पीयूषमुच्यत इत्यनेकार्थध्वनिमंजर्यां । शेषं सुगमं । उक्तं च विवाहोत्सवयज्ञादावारब्धे सूतकं यदि । सांगं तत्कर्म कुर्वीत अन्नदानादिकं परैरिति ॥ अस्मादारभेत्पूर्वतो यज्ञोद्वाहनचौलमौंजिकमहस्सु स्वर्गदिक्त्रित्रिषु अस्मान्निश्चितदिनात्पूर्वतः प्रथमतः यज्ञोद्वाहनचौलमौंजिकेत्येतत्कर्मचतुष्टयं क्रमात्स्वर्ग २१ दिक् १० त्रि ३ त्रिषु ३ अहस्सु आरभेत् यज्ञं एकविंशतिदिनेषु उद्वाहं विवाहः दिक्षु दशदिनेषु चौलं त्रिषु दिनेषु मौंजिकं त्रिषु दिनेष्विति उक्तं च । एकविंशत्यहर्यज्ञे विवाहे दश वासराः । त्र्यहे चूडोपनयने नांदिश्राद्धं विधीयते ॥ आरंभलक्षणं । आरंभो वरणं यज्ञे संकल्पो व्रतसत्रयोः । नांदिश्राद्धं विवाहादौ श्राद्धे पाकपरिक्रिया इति ॥ ४३ ॥

**टीकार्थ**—आतां नाना प्रकारचे शास्त्रार्थ सांगतों–कन्या दान करणाऱ्या यजमानानें अथवा यज्ञोपवीत देणाऱ्या यजमानानें आपण स्वतः उपोषण करून भोजन केलेल्या वराला कन्यादान करावें आणि भोजन केलेल्या वटूलाच गायत्रीचा उपदेश करावा. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, भोजन करून कन्येचें पाणिग्रहण करावें आणि तसेंच सावित्रीग्रहणही करावें. आलेल्या वराला उपवास करून कन्या दान करावें. उत्सवाला आरंभ केल्यावर जर मध्यंतरीं आपल्या स-

गोत्रांत कोणी मृत झाला अथवा कोणी जन्मला तर तें मृताशौच आणि जननाशौच असलें तरी तें कर्म सांग ह्मणजे परिपूर्ण करावें. मात्र अन्न शिजविणें तें दुसऱ्या कडून शिजवावें. ह्यांत अन्नाचा वाचक वाज हा शब्द घेतला आहे तो अनेकार्थ ध्वनि मंजरी नांवाचे ग्रंथांत वाज ह्म०अन्न, पंख आणि अमृत असें झटलें आहे. असें सांगितलें आहे कीं, विवाह,उत्सव,यज्ञ इत्यादि कार्यांचा आरंभ केल्यावर जर सूतक येईल तर तें आरंभलेलें कार्य पुरें करावें. परंतु अन्नदान करणें तें मात्र दुसऱ्याकडून करवावें.ज्या दिवशीं यज्ञादिकाचा निश्चय केला असेल त्याचे पूर्वी ह्मणजे १ यज्ञ, २ विवाह, ३ चौल, ४ मौंजीबंधन ह्या चार कर्मांला क-मानें २१-१०-३-३ असे दिवस सांगितले आहेत. ह्मणजे यज्ञाचे आरंभाला अगोदर २१ दिवस, विवाहाचे कामाला १० दिवस, चौलाला ३ दिवस, मौंजीबंधनाला ३ दिवस असे सांगितले आहेत. ह्या दिवसांत जर सूतक आलें तर तें कर्म पुरें करावें. असें सांगितलें आहे कीं, यज्ञाकरितां २१ दिवस, विवाहाकरितां १० दिवस, चौल कार्यास ३ दिवस. मौंजीबंध-नाला ३ दिवस अशा वेळीं नांदी श्राद्ध करितात. ह्या सांगितलेल्या चार कृत्यांला आरंभ केला हें केव्हां समजावें तें सांगतों-यज्ञाचे कृत्याला आणि एखाद्या व्रताला ब्राह्मणांना वरण दिलें ह्मणजे आरंभ केला असें समजावें. विवाहादिकांमध्यें नांदी श्राद्ध केलें ह्मणजे आरंभ केला असें समजावें आणि श्राद्धाचा आरंभ स्वयंपाक केला ह्मणजे समजावें ॥ ४३ ॥

### मंगलकार्यांतले नियम व मंडपोत्थापन.

नो श्राद्धं क्षयदर्शनैत्यकमधीतिं शीतलाप्स्वाप्लुतिम् ।
सीमासिंध्वतिपातमेककुलजाः सव्यातिपातं क्वचित् ॥
उत्थापावधि मंडपस्य सशरागाह्नोर्विषष्ठे समे- ।
ऽन्ह्युद्वास्यो न गृहोद्वहौ सहजयोस्तुल्या क्रियाऽब्दांततः ॥ ४४ ॥

श्लोकार्थ—सांवत्सरिकश्राद्ध, दर्शश्राद्ध, नित्यश्राद्ध, वेदपठन, शीतोदकस्नान, सीमोल्लंघन, महानदीचें उल्लंघन व अपसव्य हीं एका कुळांत झालेल्या पुरुषांनीं देवक बसल्यापासून मंडपोत्थापन होईपर्यंत कधींही करूं नयेत. पंचम व सप्तम या विषम दिवशीं आणि षष्ठ राहित सम दिवशीं मंडपोत्थान करावें. नवें घर, आणि विवाह एका वर्षांत करूं नये. सख्ख्या भावंडाचे समान संस्कार ( चौल चौल, मुंज मुंज इ० ) एकावर्षांत करूं नयेत ॥ ४४ ॥

क्षयदर्शनैत्यकं श्राद्धं अधीतिं पठनं शीतलाप्सु शीतलोदकेषु आप्लुतिं स्नानं सीमासिंध्वातिपातं सीमा प्रसिद्धा सिंधुर्महानदी । सिंधुर्नदिसमुद्रयोरित्यभिधानात् । तयोरतिपातः उल्लंघनं सव्यातिपातं अपसव्यमित्येतत् एककुलजाः सगोत्रिणः क्वचिन्नो कुर्युः किमवधि मंडपस्य उत्थापावधि यावन्मंडपोत्थापनं स्यात् तावन्न कुर्यादित्यर्थः । उक्तं च । दर्शश्राद्धं क्षयश्राद्धं शीताद्भिः स्नानमेव च । प्राचीनावीतिकरणं नदीसीमातिपातनं । अन्यच्च । नित्यश्राद्धमधीतिं च स्नानं च शिशिरैर्जलैः । सपिंडा नैव कुर्वीरन्मंडपोत्थापनावधि । अथ स मंडपोत्थापः कदा कार्य इत्याह-सशरागाह्नोरिति । शराः पंच अगाः सप्त तन्मिताह्नोर्दिनयोः पंचमे सप्तमे विषष्ठे समे षष्ठरहिते समेऽह्नि समदिने उत्थाप्यः । उक्तं च । मंडपोत्थापनं कार्यं समे तु दिवसे बुधैः । षष्ठं च विषमं नेष्टं मुक्त्वा पंचमसप्तमौ इति । अब्दांतर्वर्षमध्ये । गृहोद्वाहौ न कर्तव्यौ सहजयोः एकमातृजयोः पुरुषयोः पुरुषस्त्रियोश्च समानक्रिया समानं कर्म न भवति न कुर्यादित्यर्थः। भिन्नमातृजयोर्न दोष इत्यर्थात्सिद्धं।अर्थाद्भिन्नमातृजयोस्तदा सहोद्वाहादिकरणमागतं तद्भिन्नकर्तृत्वे भिन्नगृहे सति वेदितव्यं । कर्तृत्वमत्र श्राद्धादिकारिणः पित्रोरेव न तु विवाहहोमं कर्तुर्वरस्य । तथा चोक्तं । एकमातृजयोरेकवत्सरे पुरुषस्त्रियोः । न समानक्रियां कुर्यान्मातृभेदे विधीयत इति ॥ पुरुषौ पुरुषस्त्रियौ पृथक्द्वित्वविवक्षया बहुत्वासंभवान्नबहुत्वं यद्वा पुरुषश्च स्त्री च तथा तयोर्द्वयोः पुरुषयोः स्त्रियोर्वा पुरुषस्त्रियोर्वा । कन्यापुरुषयोर्विवाह विशेषश्चोक्तः । सोदर्ययोः कन्यकयोः सुतयोरेकवत्सरे । विवाहो न स्मृतस्तज्ज्ञैः कन्यकासुतयोः स्मृत इति ॥ अत्र संवत्सरमानं मनुजमानेन चैत्रादिफाल्गुनांतं वेद्यं । समानक्रियेति । द्वयोश्चौले द्वयोर्व्रतबंधौ द्वयोर्विवाहौ वा सहजयोरित्यनेनैव एकमातृत्वं संभवति । उक्तं च । नैकस्मिन्वत्सरे कार्यौ गृहोद्वाहौ कदाचन ॥ ४४ ॥

**टीकार्थ**—सांवत्सरिक श्राद्ध, दर्श श्राद्ध, नित्य श्राद्ध, वेदपठन, थंड पाण्यामध्यें उडी मारून स्नान करणें, सीमेचें उल्लंघन, महानदीचें उल्लंघन, सव्याचा अतिपात ह्म०अपसव्य करणें हीं सर्व कार्यें,देवक बसविल्यापासून मंडपोत्थान होईपर्यंत एक गोत्रांतल्या पुरुषांनी करूं नयेत. असें सांगितलें आहे कीं, नित्य श्राद्ध, अध्ययन, थंड पाण्यानें स्नान, हीं कार्यें सपिंडांतल्या पुरुषांनीं मंडपोत्थापन होईपर्यंत करूं नयेत. आतां मंडपोत्थापन केव्हां करावें तें सांगतों—पांचव्या, सातव्या दिवशीं मंडपोत्थापन करावें अथवा सहावा दिवस सोडून दुसऱ्या कोणत्याही सम दिवशीं मंडपोत्थापन करावें. असें सांगितलें आहे कीं, विद्वानांनीं मंडपोत्थान सम दिवसावर करावें मात्र त्यामध्यें सहावा दिवस वर्ज्य करावा, शिवाय पांचवा आणि सातवा दिवसही मंडपोत्थान करण्यास योग्य आहे अर्थात् पांचव्या, सातव्या दिवशीं मंडपोत्थापन करावें. एका वर्षांत नवीन घर करणें आणि विवाह करणें हीं दोन कार्यें करूं नयेत. एका मातेपासून झालेल्या पुत्राच्या आणि कन्येच्या समानक्रिया ह्मणजे पुत्राचें चौल चौल, मुंज मुंज आणि कन्येचे विवाह विवाह करूं नयेत; अर्थात् पुत्रा पुत्रांच्या आणि कन्या कन्यांच्या माता निरनिराळ्या असतील तर समान क्रिया ह्म० विवाह, विवाह आणि चौल चौल, मुंज मुंज करण्यास हरकत नाहीं. परंतु तसें करणें झाल्यास निराळें घर असून कर्तेही निराळे असावेत, असें जाणावें. ज्याला नांदीश्राद्ध करण्याचा अधिकार आहे तो कर्ता येथें घेतला आहे, परंतु होम करणारा वर हा येथें कर्ता घ्यावयाचा नाहीं. तेंच सांगितलें आहे कीं, एका मातेपासून झालेल्या स्त्री आणि पुरुष ह्यांच्या एकाच प्रकारच्या क्रिया एकाच वर्षांत दोन करूं नयेत. माता भिन्न असतील तर करण्यास हरकत नाहीं. येथें पुरुष आणि स्त्री असें सांगितलेलें आहे आणि त्यांत दोन ह्मटल्यामुळें पुरुष जातीचे दोघां पुत्रांच्या आणि स्त्री जातीच्या दोन कन्यांच्याही समान क्रिया ह्म० लग्न लग्न, चौल चौल करूं नयेत. परंतु स्त्री आणि पुरुष ह्या दोघांच्याही समान क्रिया ह्म० लग्न करण्यास हरकत नाहीं, असें सांगितलें आहे. दोन सख्ख्या बहिणींचा आणि दोन सख्ख्या भावांचा विवाह एका वर्षांत करूं नये असें आहे, परंतु कन्या व पुत्र ह्यांचा विवाह करण्यास हरकत नाहीं. आतां वर्षाचें मान कोणतें घ्यावयाचें ह्याचा विचार असा कीं, मनुज मानानें चैत्रापासून तों फाल्गुनपर्यंतचें वर्ष धरावें, समान क्रिया ह्मणजे एक क्रिया जसें दोघां भावांच्या मुंजी लावणें व दोन कन्यांचीं लग्नें करणें, सहज ह्या शब्दानें एका मातेपासून झालेल्या विषयींच हा वरचा निषेध आहे, आणखी असें सांगितलें आहे कीं, एका वर्षांत नवीन घर बांधणें आणि लग्न हीं दोन कार्यें करूं नयेत ॥ ४४ ॥

श्राद्धनियम व सप्तपदीचा शास्त्रार्थ.

उद्वाहव्रतचूडकेऽब्ददलतत्खंडं तिलैस्तर्पणं ।
श्राद्धं पिंडयुतं महालयगयापित्र्यं विना नाऽऽचरेत् ॥
पूर्वं सप्तपदीविधेरधिगते दोषे वरे वा मृते ।
देयाऽन्यत्र विवाहिताऽपि च बलाद्या विद्धयोनिर्न चेत् ॥ ४५ ॥

श्लोकार्थ—विवाहानंतर एकवर्षपर्यंत, व्रतबंधानंतर ६ महिनेपर्यंत व चौलानंतर ३ महिनेपर्यंत तिळांनीं तर्पण करणें व पिंडयुक्त श्राद्ध करणें हीं दोन कर्में करूं नयेत. महालय, गया व मातापितरांचें श्राद्ध हीं मात्र अवश्य करावीं. विवाहांतील सप्तपदी नांवाचा विधि होण्यापूर्वीं वराला दोष आहे असें समजलें असतां, किंवा वर मरण पावला असतां; अथवा जुलुमानें विवाह केला असतां, जर त्या वरानें कन्या भोगिली नसेल तर ती दुसऱ्या वराला द्यावी ॥ ४५ ॥

वर्ज्यांतराण्याह—उद्वाहेति। उद्वाहव्रतचूडके क्रमेण अब्ददलतत्खंडं उद्वाहे विवाहे कृते सति अब्दं वर्षपर्यंतं व्रते व्रतबंधे सति दलमर्धाब्दं षण्मासपर्यंतमित्यर्थः। चूडके चौलकर्मणि कृते सति तत्खंडं तस्य दलस्यापि खंडं त्रिमासपर्यंतमित्यर्थः । तिलैस्तर्पणं पिंडयुतं श्राद्धं च नाऽऽचरेत् किंविना महालयगयापित्र्यं विना महालयो भाद्रपदापरपक्षः गया प्रसिद्धा पित्र्यं मातापितृक्षयदिनं तत्र यच्छ्राद्धं क्रियते तन्महालयगयापित्र्यं तद्विना । उक्तं च। विवाहव्रतचूडासु वर्षमर्धं तदर्धकं । अतिलं तर्पणं कुर्याच्छ्राद्धं कुर्यादपिंडकं । महालये गयाश्राद्धे मातापित्रोः क्षयेऽहनि । कृतोद्वाहोऽपि कुर्वीत पिंडदानं यथाविधीति ॥ पूर्वमिति सप्तपदीविधेः पूर्वं प्रथमतः दोषेऽश्मूकत्वादिकेऽधिगते ज्ञाते सति वा इत्यथवा वरे मृते सति कन्याऽन्यत्र देया । अपि च या कन्या बलाद्विवाहिता साऽप्यन्यत्र देया चेद्यदि विद्धयोनिर्न स्यात् विद्धा योनिर्यस्याः सा तथा चेत् पुरुषाभुक्तेत्यर्थः । उक्तं च

याज्ञवल्क्येन । महादोषे सुविज्ञाते पूर्वं सप्तपदीविधेः । मरणादौ समुत्पन्ने देयाऽन्यस्मै न दोषभाक् ॥ बलादुद्वाहिता कन्या दातव्याऽन्यवराय चेति ॥ अन्यच्च । बलादुद्वाहिता कन्या मंत्रैर्यदि न संस्कृता । अन्यस्मै विधिवद्देया यथा कन्या तथैव सेति ॥ महादोषाः कारिकानिबंधे उक्ताः । अंधो मूकः क्रियाहीनश्चापस्मारी नपुंसकः । दूरस्थः पतितः कुष्ठी दीर्घरोगी वरो न सत् ॥ अन्येऽपि दोषा उक्ताः । मूर्खनिर्धनदूरस्थशूरमोक्षाभिलाषिणां । त्रिगुणाधिकवर्षाणां न देया जातु कन्यकेति ॥ पुरुषनपुंसकलक्षणं । यस्याप्सु प्लवते बीजं ऱ्हादि मूत्रं च फेनिलं । पुमान् स्याल्लक्षणैरेतैर्विपरीतैस्तु षंढकः ॥ अपरीक्ष्य दाने दोषः । अपरीक्ष्य वरं कन्यां निर्गुणाय प्रयच्छति । कुलं तस्यैव तच्छोकसंतप्तो विनिकृंततीति ॥ ४५ ॥

टीकार्थ—दुसरीं काय काय वर्ज्य आहेत तें सांगतों—उद्वाह, ह्म० विवाह, व्रतबंध ह्म० मौंजीबंधन, आणि चूडा ह्म० चौलकर्म हीं कार्यें केल्यावर क्रमानें एक वर्ष, सहा महिने, तीन महिनेपर्यंत तिलांनीं तर्पण आणि श्राद्ध करूं नये. परंतु महालय, गया श्राद्ध आणि मातापितरांचें श्राद्ध हीं मात्र करावींत. महालय ह्मणजे भाद्रपद वद्य पक्षीं करावयाचें श्राद्ध, गया ह्मणजे गया तीर्थीं करावयाचें श्राद्ध आणि प्रत्येक वर्षी करावयाचें आईचें श्राद्ध आणि बापाचें श्राद्ध इतकीं आवश्यक कर्में करण्यास हरकत नाहीं. ह्यांशिवाय दुसरीं श्राद्धें व तिलांनीं तर्पण हीं लग्न झाल्यावर एक वर्ष, उपनयना नंतर सहा महिने, चौला नंतर तीन महिने पर्यंत करूं नयेत. असें सांगितलें आहे कीं, विवाह, व्रतबंध आणि चौल कर्म ह्या तीन कर्मांनंतर क्रमानें एक वर्ष, सहा महिने, तीन महिने पर्यंत तिलांवाचून तर्पण करावें आणि श्राद्ध करावयाचें तें पिंडांवाचून करावें. परंतु महालय श्राद्ध गया तीर्थावरचें श्राद्ध, मातापितरांचे मरण दिवशींचें हीं श्राद्धें लग्न केल्यावरही पिंडासहित यथाविधीनें करावींत. आतां असा विचार करावयाचा आहे कीं, सप्तपदी संस्कार होण्याच्या पूर्वी वराचे दोष समजले ह्मणजे तो आंधळा, मुका, पांगळा इत्यादि दोष दिसले किंवा तो वर मरणच पावला तर ती कन्या दुसऱ्या वराल द्यावी. अथवा ज्या कन्येचा विवाह बलात्कारानें केला असेल त्या कन्येचा विवाह दुसऱ्या वराबरोबर करावा. परंतु ती कन्या त्या पतीनें भोगलेली नसावी. असेंच याज्ञवल्क्य ऋषींनीं सांगितलें आहे कीं, सप्तपदी संस्कार होण्याचे पूर्वी वराचा दोष समजला तर ती कन्या अथवा वरावर मरण इत्यादि आपत्ति आली असतां ती कन्या किंवा जिचें लग्न बलात्कारानें केलें असेल तीही कन्या तो वर सोडून दुसऱ्या वराला द्यावी. आणखी असें सांगितलें आहे कीं, ज्या कन्येचा विवाह बळजोरीनें केला आहे परंतु सप्तपदीचा संस्कार झाला नसेल तर ती कन्या दुसऱ्या वराला यथाविधीनें द्यावी. वराचे महादोष कोणते आहेत ते कारिकानिबंधांत सांगितले आहेत. आंधळा, मुका, क्रियाहीन ह्मणजे कोणतेंही काम करण्यास असमर्थ, अपस्मार रोग असलेला, नपुंसक, फार दूर रहाणारा. पतित ह्म० कुकर्म केल्यामुळें ज्ञातीनीं बाहेर टाकिलेला, कोड असलेला, फारच दिवसांपासून रोगग्रस्त असलेला, असा जो वर असेल तो योग्य नाहीं. ह्या शिवाय दुसरेही दोष सांगितले आहेत ते असे कीं, मूर्ख, निर्धन, दूर देशीं रहाणारा, शूर, मोक्षाची इच्छा करणारा, कन्येपेक्षां तिप्पटीहून अधिक वयाचा, असा जो वर असेल त्याला कधींही कन्या देऊं नये. वर नपुंसक आहे हें ओळखावयाचा असा प्रकार आहे कीं, ज्याचें वीर्य पाण्यांत टाकलें असतां वर तरंगत राहतें आणि कमी कमी होत जातें, त्याला तार येते आणि फेस उत्पन्न होतो ह्या लक्षणावरून तो वर पुरुष आहे असें जाणावें आणि अशीं लक्षणें नसतील तर तो नपुंसक जाणावा. वराची परीक्षा न करतांना जर कन्या दान केलें तर दोष आहे, तो सांगतों—जो कोणी वराची परीक्षा केल्या शिवाय निर्गुण अशा वराला कन्या देतो. तर त्या देणाऱ्याचें कुल त्याबद्दलचे शोकानें फारच दुःखी होऊन नष्ट होतें ॥ ४५ ॥

### स्त्रीरहित असलेल्यांचा विधि व विषयोग.

अस्त्रीकैः कुशहेमरौप्यरचिता ताम्री च विप्रादिभिः ।<br>
भार्या वा निखिलैः सुवर्णरचिता धर्माय धार्या बुधैः ॥<br>
मंदारार्कदिनेंबुपाग्निफणिभं भद्रातिथिश्चेदिहो- ।<br>
द्भूतासाविषकन्यकाऽपि तनुगौ सौम्यौ रिपुक्षेत्रगौ ॥ ४६ ॥

श्लोकार्थ—ब्राह्मणादि चार वर्णांतील स्त्रीरहित पुरुषांनीं क्रमानें दर्भ, सुवर्ण, रौप्य व ताम्र ह्यांची अथवा सर्व वर्णांनीं सुवर्णाची स्त्री गृहधर्मासाठीं करावी. शनि, मंगळ, रवि ह्या वारीं, जर शततारका, कृत्तिका, आश्लेषा, ह्यांतलें कोणतेंही एक नक्षत्र व द्वितीया, सप्तमी, द्वादशी ह्यांतून एक तिथि येईल, तर त्या वार, नक्षत्र, तिथीं-

च्या योगांवर जन्मलेली विषकन्या होय. दोन शुभग्रह आपल्या शत्रुगृहीं असून ते कन्येच्या जन्मलग्नीं असतील तर तोही विषयोग जाणावा ॥ ४६ ॥

**अथ स्त्रीरहितानां विधिमाह–अस्त्रीकैरिति । अस्त्रीकैः स्त्रीरहितैर्विप्रादिभिः विप्रक्षत्रियविट्शूद्रैः क्रमेण कुशहेमरौप्यरचिता ताम्री च भार्या धर्माय धार्या । अयमर्थः । विप्रेण कुशरचिता भार्या धर्माय धार्या क्षत्रियेण हेमरचिता वैश्येन रौप्यरचिता शूद्रेण ताम्री ताम्ररचिता भार्या धार्या । कथंभूतैर्विप्रादिभिर्बुधैः स्वस्वधर्मनिरतैः वा इत्यथवा निखिलैः सर्वैर्विप्रादिभिः सुवर्णरचिता भार्या धार्या यतस्तया विना गृहस्थधर्मसाधनं न स्यात् । तथा चोक्तं । अपत्नीकैस्तु धर्मार्थं कौशी हैमी च राजती । ताम्री विप्रादिभिर्भार्या धार्या हैमी तथाऽखिलैरिति । अथ विषकन्यालक्षणमाह–मंदेति । मंदारार्कदिने शन्यर्कभौमानामन्यतमस्य वारेऽबुपाग्निफणिभं शततारकाकृत्तिकाश्लेषाणामन्यतमं नक्षत्रं । भद्रातिथिर्द्वितीया सप्तमी द्वादशी । आसामन्यतमा चेत्स्यात्तदा विषयोगः स्यात् । इहोद्भूताश्च योगे या कन्या जाता सा विषकन्यका । अथ योगांतरमाह–रिपुक्षेत्रगौ सौम्यौ तनुगौ लग्नगतौ चेत्स्याताम् ॥ ४६ ॥**

**टीकार्थ**—आतां स्त्री नसणाऱ्या पुरुषांनां विधि सांगतों–स्त्रीशिवाय असणाऱ्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चारही वर्गांतल्या पुरुषांनीं अनुक्रमानें दर्भ, सुवर्ण, रुपें आणि तांबें ह्यांची स्त्री तयार करून तिच्या योगानें स्वधर्माचरण करावें. ह्याचा अर्थ असा कीं, ब्राह्मणानें दर्भाची स्त्री करून ती धारण करावी आणि तिच्या योगानें जीं कामें खरोखरची स्त्री असतांनां करावयाचीं तीं सर्व धर्म कार्यें करावींत. तसेंच क्षत्रियानें सोन्याची स्त्री तयार करून सत्कर्में करावींत. वैश्यानें रुप्याची स्त्री तयार करून सत्कर्में करावींत. शूद्रानें तांब्याची स्त्री तयार करून सत्कर्में करावींत. ह्मणजे आपापल्या वर्णाला जें कर्म करावें ह्मणून शास्त्रांत सांगितलें आहे तें कर्म करण्या करितां तशी तशी सांगितलेली स्त्री तयार करून गळ्यांत धारण करावी. अथवा सर्व वर्णांनां एकच प्रकारची ह्मणजे सोन्याची स्त्री करण्यास हरकत नाहीं. तशी स्त्री करावी, कारण स्त्री नसेल तर गृहस्थ धर्माचें आचरण बरोबर होणार नाहीं.तेंच सांगितलें आहे कीं,पत्नी नसणाऱ्या ब्राह्मणादि चार वर्णांनीं धर्माचें आचरण करण्या करितां अनुक्रमानें दर्भाची, सोन्याची, रुप्याची आणि तांब्याची स्त्री तयार करून धारण करावी अथवा चारही वर्णांनीं सोन्याची स्त्री तयार करून धारण करावी. आतां विष कन्येचें लक्षण सांगतों–शनिवार, रविवार, मंगळवार ह्यांपैकीं एका वारावर आणि शततारका, कृत्तिका, आश्लेषा ह्यांपैकीं एका नक्षत्रावर, व द्वितीया, सप्तमी, द्वादशी ह्यांपैकीं एका तिथीवर जी कन्या उत्पन्न होते तिला विष कन्या असें ह्मणतात. कारण वर सांगितलेला वार, नक्षत्र आणि तिथि असेल तर त्याला विषयोग असें ह्मणतात, ह्मणून त्यावर जन्मलेली विष कन्या समजावी. आतां दुसरा योग सांगतों–दोन शुभ ग्रह आपल्या शत्रूचे घरीं असून ते ग्रह जर कन्येच्या जन्म लग्नीं असतील तर तोही विष योग समजावा, त्यावर झालेली कन्याही विष कन्या समजावी ॥ ४६ ॥

### विषकन्या योग व मूलादि नक्षत्रांचीं फळें.

**एकः क्रूर इहोद्भवाऽप्यथ तनौ सौरी रविः पुत्रगो ।**
**धर्मस्थो धरणीसुतोऽयमपरो योगोऽपि तज्जा विषम् ॥**
**मूलाद्यत्रिपदोद्भवा श्वशुरमह्यंत्यपत्रये तत्स्त्रियम् ।**
**ज्येष्ठांत्ये पतिपूर्वजं द्विपचतुर्थे देवरं हंति च ॥ ४७ ॥**

श्लोकार्थ—आपल्या शत्रुगृहीं असणारा एक खलग्रह जन्मलग्नीं असतां विषयोग होतो. जन्मलग्नीं शनि, पंचमस्थानीं रवि, व नवमस्थानीं मंगळ, अशा योगांवर जन्मणारी विषकन्या होय. मूळ नक्षत्राच्या पहिल्या तीन चरणांवर जन्मणारी कन्या आपल्या श्वशुराचा नाश करिते. आश्लेषांच्या शेवटच्या तीन चरणांवरील कन्या सासूचा नाश करिते. ज्येष्ठांच्या चतुर्थ चरणावरील कन्या वडील दिराचा नाश करिते. विशाखांच्या चतुर्थ चरणावर जन्मणारी दिराचा नाश करिते ॥ ४७ ॥

**अथ योगांतरमाह–एकः क्रूर इति । एकः क्रूरो रिपुक्षेत्रगः तनुगश्चेत्स्यादिमौ द्वौ योगाविहोद्भवाऽपि विषकन्यका स्यात् । तनौ लग्ने सौरिः शनिः स्यात् रविः सूर्यः पुत्रगः पंचमगः स्यात् धरणी**

सुतो भौमो धर्मस्थो नवमस्थो यदा स्यात्तदाऽयमपरो योगः स्यात् तज्जाऽपि कन्या विषं स्यात् । विषमिति । यथा विषस्वीकारान्मृत्युर्भवतीति फलं सूचितं तस्मात्परित्याज्येति भावः । अथ मूलादीनां फलमाह–मूलेति । मूलस्याऽऽद्यत्रिपदोद्भवा प्रथमचरणत्रये जाता कन्या श्वशुरं हंति मारयति । अह्यंत्यत्रयेऽहिराश्लेषा तस्यांत्यत्रयेंऽत्यचरणत्रये जाता तत्स्त्रियं तस्य श्वशुरस्य स्त्रियं श्वश्रूं हंतीत्यर्थः । ज्येष्ठांत्ये ज्येष्ठायाश्चतुर्थचरणे जाता पतिपूर्वजं ज्येष्ठं हंति । द्विपचतुर्थे द्वौ पौ पती यस्य तद्विपं विशाखा तस्य चतुर्थचरणे जाता देवरं हंति । अर्थादन्यचरणजा शुभा ॥ ४७ ॥

**टीकार्थ**—आतां विषयोगाचा दुसरा प्रकार सांगतों--एक क्रूर ग्रह शत्रूच्या घरीं राहणारा असेल आणि एक क्रूर ग्रह लग्नीं असेल तर हे दोन विषयोग होतात. त्या तशा योगांवर झालेली कन्या विष कन्या समजावी. तसेंच लग्नीं शनि असेल आणि रवि हा पंचमस्थानीं असेल आणि धरणीपुत्र ह्म० मंगळ हा नवम स्थानीं असेल तर हा दुसरा एक विष योग होतो, त्या योगावर झालेली कन्या विष कन्या होय. जसें विष घेतल्यानें मरण येतें तसें ती कन्या घेणारास मरण येतें. आतां मूळ इत्यादि नक्षत्रांवर जन्म झाल्याचें फळ सांगतों–मूळ नक्षत्राच्या पहिल्या तीन चरणांवर उत्पन्न झालेली कन्या आपल्या श्वशुराला मारत्ये. अहि ह्म० आश्लेषा नक्षत्र त्याच्या शेवटल्या तीन चरणांवर ह्मणजे पहिला सोडून दुसरा, तिसरा व चवथा ह्या तीन चरणांवर झालेली कन्या असेल तर ती आपल्या सासवेला मारत्ये. ज्येष्ठा नक्षत्राचे चवथ्या चरणावर झालेली कन्या आपल्या वडील दिराला मारत्ये, ज्याचे दोन पती आहेत ह्म० विशाखा नक्षत्र त्याचे चवथ्या चरणावर झालेली कन्या आपल्या दिराला मारत्ये. अर्थात् दुसऱ्या चरणांवर उत्पन्न झालेली कन्या शुभकारक आहे ॥४७॥

### विषपुत्रयोग व सहामासांत निषिद्ध.

एवं ना युवतेरभाव इह नो दोषो नुरेतत्फलम् ।
मौंज्यूर्ध्वं न वदंति केचिदपि पैत्र्याद्ये फलं मूलवत् ॥
नोद्वाहौ सहजातयोस्त्र्यृतुषु नोद्वाहाद्व्रतं नोपुमु- ।
द्वाहात्स्त्र्युद्वहनं न मंगलविधेर्मुंडं त्रिशुभ्येषु न ॥ ४८ ॥

श्लोकार्थ—मागच्या श्लोकांत सांगितलेल्या मूळादि नक्षत्रांच्या चरणावर जन्मलेला पुत्र, स्त्रियेच्या श्वशुरादिकांचा नाश करितो. ज्यांचा नाश सांगितला तीं श्वशुरादि नसतां दोष नाहीं. हें विषयोगाचें फळ पुरुषाला व्रतबंधा नंतर नाहीं असें कित्येक ह्मणतात. मघांच्या प्रथम चरणावर मूळ नक्षत्रासारखें फळ आहे असें कोणी ह्मणतात. सख्ख्या भावंडांचे विवाह, विवाहानंतर व्रतबंध, पुत्राच्या विवाहानंतर कन्येचा विवाह, मंगल कार्यानंतर चौल व उपनयन आणि तीन शुभकार्यें सहा महिन्यांत करूं नयेत ॥ ४८ ॥

एवमुक्तनक्षत्रचरणजातो ना नरो युवतेः स्त्रियः श्वसुरादिन् हंति । तथा च गर्गः । मूलजाश्वशुरं हंति सार्पजा च तदंगनां । ज्येष्ठजा तु पतिज्येष्ठं देवरं तु द्विदैवत इति ॥ तथा च कश्यपपटले । मूलांत्यपादजौ श्रेष्ठौ तथाऽऽश्लेषाद्यपादजौ । द्वीशांत्यपादजौ दुष्टौ तथा ज्येष्ठांत्यपादजाविति ॥ अस्यापवादः । अभाव इह नो दोष इति । अभावे तेषां श्वशुरादीनामभावे सति इह मूलादिजोद्वहने नो दोषः । केचिदाचार्या नुर्नरस्य मौंज्यूर्ध्वं मौंजीबंधनानंतरं तत्फलं न वदंति । उक्तं च नारदेन मूलव्यालभवो दोषो विवाहे य उदाहृतः । स मौंजीबंधनादूर्ध्वं पुंसां नैवेति केचनेति ॥ पैत्र्याद्येऽपि मघाया आद्यचरणेऽपि मूलवत्फलं स्यादिति केचिद्वदंति । तथा चोक्तं नारदेन । पैत्र्यगंडोद्भवा कन्या श्वशुरघ्नी च केचनेति ॥ अथ ऋतुत्रयमध्ये किं किं न कर्तव्यमित्याह–नोद्वाहाविति । सहजातयोरेकोदरसमुत्पन्नयोः पुत्रयोः कन्ययोः कन्यापुत्रयोर्वा उद्वाहो विवाहौ त्र्यृतुषु त्रयश्च ते ऋतवश्च त्र्यृतवः तेषु न कार्यौ षण्मासाभ्यंतरे न कार्यावित्यर्थः । उक्तं च नारदेन । विवाहश्चैकजन्यानां षण्मासाभ्यंतरे यदि । असंशयं त्रिभिर्वर्षैस्तत्रैका विधवा भवेदिति ॥ नोद्वाहाद्व्रतमिति–उद्वाहात्त्र्यृतुषु व्रतं मौंजी न कार्या । तथा चोक्तं नारदेन । पुत्रोद्वाहात्परं पुत्रीविवाहो न ऋतुत्रये । न तयोर्व्रतमुद्वाहान्मंगले नान्यमंगलमिति ॥ नो पुमुद्वाहात्स्त्र्युद्वहनमिति । पुमुद्वाहात्पुरुषविवाहात् त्र्यृतुषु स्त्र्युद्वहनं कन्याविवाहो नो कार्यः । तथा च कात्यायनः । पुत्रोद्वाहात्परं पुत्रीविवाहो न ऋतुत्रय इति । न मंगलविधेर्मुंडमिति मंगलविधेर्विवाहात् त्र्यृतुषु मुंडनं चौलं व्रतं वा न कार्यं । अत्रकात्यायनः ।

कुले ऋतुत्रयादर्वाक् मंडनान्नतु मुंडनमिति ॥ त्रिशुभ्येषु नेति। एषु त्र्यृतुषु त्रिशुभी न कार्या । त्रयाणां शुभानां समाहारस्त्रिशुभी मंगलत्रयमिति यावत् । न कुर्यान्मंगलत्रयमिति वचनात् ॥ ४८ ॥

**टीकार्थ**—पूर्वी जे नक्षत्र चरण कन्येच्या जन्माला अशुभ सांगितले ते चरण पुरुषालाही अशुभ जाणावे. ह्मणजे पुरुष हा जर त्या त्या नक्षत्रावर झालेला पति असेल तर तोही आपल्या सासरा, सासू ह्यांना मारतो. तेंच गर्ग सांगत आहे कीं, मूल नक्षत्रावर जन्मलेली कन्या सासऱ्याला मारते. आश्लेषावर झालेली कन्या सासूला मारत्ये. ज्येष्ठा नक्षत्रावर झालेली कन्या वडील दीराला मारत्ये. विशाखा नक्षत्रावर झालेली कन्या दीराला मारत्ये, तेंच कश्यप पटलांत सांगितलें आहे कीं, मूळ नक्षत्राचे शेवटल्या चरणावर झालेले पुरुष व कन्या हे दोनही श्रेष्ठ आहेत. आणि आश्लेषाचे पहिल्या चरणावर झालेले पुरुष आणि कन्या हे दोनही श्रेष्ठ आहेत. विशाखा नक्षत्राचे शेवटल्या चरणावर झालेले आणि ज्येष्ठा नक्षत्राचे शेवटल्या चरणावर झालेले स्त्री व पुरुष हे फारच दुष्ट आहेत. ह्याचा अपवाद सांगतों—जर सासरा, सासू आणि वडील दीर व दीर हे नसतील तर मग वर सांगितलेल्या नक्षत्रांवर जन्म झाल्यास कांहीं हरकत नाहीं. कित्येक आचार्यांचें असें मत आहे कीं, पुरुषाचा उपनयन संस्कार झाल्यावर दुसरा जन्म होतो, ह्यास्तव नक्षत्रांचा दोष नाहीं असें आहे. विवाह केल्यानंतर तीन ऋतु ह्म० सहा महिनेपर्यंत उपनयन संस्कार करूं नये. तेंच नारदानें सांगितलें आहे कीं, पुत्राचा विवाह केल्यानंतर तीन ऋतु ह्म० सहा महिनेपर्यंत कन्येचा विवाह करूं नये. विवाहानंतर पुत्रांचे उपनयन करूं नये. मंगलामध्यें दुसरें मंगल करूं नये. पुरुषाचा विवाह केल्यावर तीन ऋतु ह्म० सहा महिनेपर्यंत कन्येचा विवाह करूं नये. तेंच कात्यायनानें सांगितलें आहे कीं, पुत्राचा विवाह केल्यावर सहा महिनेपर्यंत कन्येचा विवाह करूं नये. मंगल विधि केल्यावर तीन ऋतु ह्म० सहा महिनेपर्यंत मुंडन ह्म० चौल अथवा मुंज करूं नये. ह्याविषयीं कात्यायन सांगतो कीं, कुलामध्यें मंडन ह्मणजे विवाह केल्यावर सहा महिन्यांचे आंत मुंडन ह्म० चौल, व मुंज करूं नये. तीन ऋतूमध्यें तीन मंगलें करूं नयेत. ह्मणजे. १ विवाह केल्यावर मौंजी बंधन, २ पुत्राच्या विवाहानंतर कन्येचा विवाह, ३ मंगल कार्यानंतर चौल व मुंज हीं तीन शुभ कार्यें सहा महिन्यांत करूं नयेत ॥ ४८ ॥

## अनेक शास्त्रार्थ.

नो ज्येष्ठाल्लघुकालरुद्धत ऋते कात्यायनो मुंडनम् ।
चौलं प्राह न मेखलेत्युभयतः कार्या विवाहादियम् ॥
भेदेऽब्दस्य च संकटे वितनुयात्पूर्वोदितं मंगलम् ।
वेदाहांतरिते दिनव्यवहिते नद्या नगेनापि वा ॥ ४९ ॥

**श्लोकार्थ**—विवाहादि ज्येष्ठमंगला नंतर सहा महिन्यांच्या आंत लघु मंगल करूं नये. ( चौल, केशांत, सीमंतोन्नयन, विवाह, व्रतबंध हीं ५ ज्येष्ठमंगलें, व इतर सर्व लघु मंगलें होत. ) गर्भाधानादि लघुमंगलांचा काल नियमित आहे ह्मणून तीं करावीं. कात्यायनऋषि चौलास मात्र मुंडन ह्मणतात, व्रतबंधास मुंडन ह्मणत नाहींत. ह्मणून विवाहापूर्वी व नंतरही व्रतबंध करावा. संकटसमयीं संवत्सर बदलल्यानंतर किंवा चार दिवस मध्यें सोडून अथवा एक दिवस मध्यें सोडून अथवा एक दिवशींच पण नदी अगर पर्वत यांचें अंतर असतां मंगल कार्यें करावीं ॥ ४९ ॥

नो ज्येष्ठाल्लघ्विति । ज्येष्ठात् मंगलात् विवाहादेस्त्र्यृतुषु लघुमंगलं नो कुर्यात् । यद्बहिः शालायामुक्तं तज्ज्येष्ठमंगलमन्यल्लघुमंगलं । ज्येष्ठलघुलक्षणं सारसमुच्चये । चूडाकेशांतसीमंतविवाहोपनयान्बुधाः । गुरुमंगलमित्याहुस्तदन्यल्लघुमंगलमिति ॥ तन्न कार्यमित्यर्थः । कस्मादृते कालरुद्धतऋते कालेन रुद्धं गर्भाधानपुंसवनादि तस्मादृते तेन विनेत्यर्थः । तथा च कात्यायनः । मातृयज्ञक्रियापूर्वं ज्येष्ठं कृत्वा तु मंगलं । ऋतुत्रयं पुनर्यावन्न कुर्याल्लघुमंगलं ॥ लघु वा गुरु वा कार्यं कार्यं नैमित्तकं यदीति ॥ लघुगुरुमंगलयोर्भिन्नकर्तृत्वे न दोषः । कात्यायनो मुनिरिति प्राह-इतीति किं व्रतं मुंडनं न चौलमेव मुंडनं मौंजीविवाहादुभयतः कार्येति । तथा च तद्वाक्यं । मुंडनं चौल मित्युक्तं व्रताद्वाहौ तु मंगले । चौलं मुंडनमेवोक्तं वर्जयेद्वरणात्परं ॥ मौंजी चोभयतः कार्या यतो मौंजी न मुंडनमिति । अथ संकटे प्रवृत्तिमाह-भेदेऽब्दस्येति । संकटे देशकालभयादावब्दस्य संवत्सरस्य

भेदे पूर्वोदितं मंगलं वितनुयात् विस्तारयेत्कुर्यादित्यर्थः । तथा चोक्तं संहितासारावल्यां । फाल्गुने चैत्रमासे तु पुत्रोद्वाहोपनयने। भेदादब्दस्य कुर्वीत न ऋतुत्रयलंघनमिति ॥ अथवा वेदाहांतरिते चतुर्दिनांतरिते काले मंगलं वितनुयात् । तथा च स्मृतिसारावल्यां । पुत्रीपरिणयादूर्ध्वं यावद्दिनचतुष्टयं । पुत्र्यंतरस्य कुर्वीत नोद्वाहमिति सूरय इति ॥ अथवा दिनव्यवहिते एकदिनांतरिते काले मंगलं कुर्वीत तथा चोक्तं । एकोदरप्रसूतानामेकस्मिन्वासरे नरः । विवाहं नैव कुर्वीत मंडनोपरि मुंडनमिति ॥ अथवा एकाहेऽपि नद्या नगेन पर्वतेनांतरिते देशे मंगलं वितनुयात् । ज्योतिर्विवरणे । एकोदरयोर्वरयोरेकदिनोद्वाहतो भवेन्नाशः । नद्यंतर एकदिने केऽप्याहुः संकटे च शुभमिति ॥ शार्ङ्गधरोऽपि । नद्यंतरेऽपि शुभदं पृथक् शैलस्य रोधत इति ॥ ४९ ॥

**टीकार्थ**—विवाह इत्यादि ज्येष्ठ मंगलानंतर सहामहिने पर्यंत लघु ह्मणजे लहान मंगलकार्य करूं नये. जें शाळेचे बाहेर करावयास सांगितलें तें ज्येष्ठ मंगल आणि बाकीचें लघु मंगल समजावें. ज्येष्ठ आणि लघु ह्यांचें लक्षण सारसमुच्चय ग्रंथांत सांगितलें आहे तें असें कीं, चौल, केशांत संस्कार, सीमंतोन्नयन, विवाह, उपनयन, ह्म० मुंज ह्या पांच कार्यांला गुरु मंगल ह्म० ज्येष्ठ मंगल असें ह्मणतात.त्याहून दुसरें जें मंगल त्याला लघु मंगल असें ह्मणतात.तसेंच लघुमंगल ज्येष्ठमंगलानंतर सहामहिने पर्यंत करूं नये. मात्र जें कार्य अमुक काळीं करावें ह्मणून सांगितलें आहे, अर्थात ज्या कार्याला काळाचा प्रतिबंध आहे त्यां शिवाय बाकीचीं लघुमंगलें करूं नयेत. तेव्हां काळाचा प्रतिबंध असलेलीं ह्मणजे गर्भाधान, पुंसवन इत्यादि लघुमंगलें करावींत. तेंच कात्यायन सांगतो कीं, मातृयज्ञ क्रियापूर्वक जें ज्येष्ठ मंगल केलें असेल तसें केल्यावर मग तानि ऋतु ह्म० सहामहिने पर्यंत पुनः लघुमंगल करूं नये, आतां गुरु अथवा लघु कसेंही मंगल असो पण तें जर नैमित्तिक असेल तर करण्यास हरकत नाहीं. आतां लघु किंवा गुरु असें मंगल कार्य करणारे निरनिराळे असतील तर सहा महिन्याचे आंत करण्यास दोष नाहीं. कात्यायनमुनि असें सांगतो कीं, मुंडनशब्दानें मुंज न घ्यावी परंतु चौल मात्र घ्यावें ह्मणून विवाहाचे पूर्वीं आणि विवाहाचे नंतर मौंजी करण्यास हरकत नाहीं असें आहे. तसेंच वाक्य आहे कीं, मुंडनशब्दानें चौलच घ्यावें परंतु व्रत ह्मणजे मुंज आणि विवाह हीं दोन मंगलें आहेत. फक्त चौल कर्म हेंच मुंडन आहे, ह्मणून विवाहानंतर तेंच मात्र वर्ज्य करावें आणि मौंजी बंधनाचें कार्य, विवाहाचे पूर्वीं आणि विवाहानंतरही करावें. कारण मौंजीबंधन हें मुंडन नाहीं. आतां संकट प्रसंग आला असतां सांगतों कीं, देशाचे, काळाचे भयरूपी संकटामध्यें वर्षांचा भेद करून ह्मणजे वर्ष बदल्यावर पूर्वीं सांगितलेलीं मंगलें सहामहिन्यांमध्येंही करावींत. तेंच संहिता सारावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं, जर फाल्गुनमासीं पुत्राचा विवाह केला तर चैत्रमासीं उपनयन ह्म० मुंज करावी, कारण वर्षांचा भेद झाला ह्मणजे वर्ष बदललें आहे, परंतु वर्ष न बदललें तर सहामहिन्यांत करूं नये. तसेंच स्मृतिसारावलि ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कन्येचा विवाह झाल्यावर चार दिवस होईपर्यंत दुसरें मंगलकार्य करूं नये. असें विद्वान लोक बोलतात, अर्थात् चार दिवसांनीं करावें असें सिद्ध होतें किंवा एका दिवसाच्या अंतरानेंही मंगलकार्य करावें. तेंच सांगितलें आहे कीं, एका उदरापासून उत्पन्न झालेल्या बहुतांचा विवाह एकाच दिवशीं करूं नये. मंडन केल्यावर ह्मणजे लग्न केल्यावर मुंडन करूं नये, हें खरें आहे, परंतु एकाच दिवशीं नदी, पर्वत हीं मध्यें असतील तर विवाहादि मंगल करण्यास हरकत नाहीं. ज्योतिर्विवरण ग्रंथांत सांगितलें आहे कीं, एका उदरापासून उत्पन्न झालेल्या वरांचा जर एकाच दिवशीं विवाह केला तर त्यापासून नाश होतो. नदीचें अंतर असेल तर एका दिवशींही संकटकाळीं दोघां भावंडाचें विवाह करण्यामध्यें शुभ आहे. शार्ङ्गधरही असें सांगतो कीं, नदीचें अंतर असतां अथवा पर्वताचें अंतर असतां एकाच दिवशीं दोघां भावांचीं मंगलकार्यें करणें प्रशस्त आहे ॥ ४९ ॥

एकाहेऽपि जनाश्रयांतर इहेदं तारतम्याद्बुधैः ।
योज्यं नो यमयोर्निषिद्धमनयोरेकत्र कार्यं जगुः ॥
नैकस्मै दुहितृद्वयं सहजयोर्नैकोद्भवे कन्यके ।
दद्यादुद्वहनं मिथो न तनुयात्कुर्यादसंपद्वदः ॥ ५० ॥

**श्लोकार्थ**—एका दिवशींही निरनिराळ्या मंडपांत अनेक कार्यें करावीं. येथपर्यंत जे वेगवेगळे प्रकार सांगितले ते चतुरांनीं प्रसंग व संकट पाहून अनुक्रमानें योजावे. मागील निषेध जुवळ्यांच्या कार्याला नाहीं. त्यांचीं कार्यें एकदमच करावीं, एका वराला सख्या बहिणी अशा दोन कन्या देऊं नयेत. सख्या भावांला सख्या बहिणी देऊं नयेत.बदलाचे विवाह करूं नयेत.अन्य वधू व वर मिळत नाहीं अशा संकटीं वरील तीनही करावीं॥५०॥

एकाहेपीति । अथवा एकाहेऽपि जनाश्रयांतरे मंडपांतरे मंगलं वितनुयात् । मंडपोऽस्त्री जनाश्रय इत्यमरः । उक्तं च ज्योतिर्विवरणे । न प्रतिषिद्धं लग्नं संप्राप्ते संकटे महति । एकोदरसंभवयोरेकाहे भिन्नमंडपे काल इति ॥ अथैषां पक्षाणां निर्णयमाह—इहेदमिति । इहास्मिन् विवाहादिविषये इदं भेदेऽब्दस्येत्याद्युक्तं बुधैस्तारतम्याद्योज्यं संकटानुरूपं योज्यमित्यर्थः । अथ यमलयोर्विशेषमाह—नो यमयोरिति । यमयोर्यमलयोरिदं नो निषिद्धं । अनयोर्यमलयोर्मंगलमेकत्रैकवत्सर एकवार एकमंडपे कार्यमिति मुनयो जगुः । उक्तं च । एकस्मिन् वत्सरे चैव वासरे मंडपे तथा । कर्तव्यं मंगलं स्वस्रोर्भ्रात्रोर्यमलजातयोरिति ॥ स्त्र्यादीनां स्त्रीणां पुरुषाणां वा यमलजातानामप्येवं तुल्यन्यायत्वात् । यमलयोर्मध्ये एकस्याः स्त्रियामेकस्मिन् पुरुषे सति स्त्रीविवाहं समाप्य पुरुषविवाहं कुर्यात् । स्त्रीपुरुषयोः सहविवाहकरणस्याघटमानत्वात् । अथ प्रत्युद्वाहनिषेधमाह—नैकस्मै इति । एकस्मै वराय दुहितृद्वयमेकोद्भवकन्यकाद्वयं न दद्यात् । सहजयोरेकोदरसंभवयोर्भ्रात्रोरेकोद्भवे कन्यके न दद्यात् । तथा मिथः परस्परमुद्वहनं न तनुयात् । अत्रापि संकटे प्रवृत्तिमाह—कुर्यादिति । अदो नैकस्मै इत्याद्युक्तमकर्तव्यमसंपदि अन्यवधूवरालाभे सति कुर्यात् । तथा च नारदः । प्रत्युद्वाहो नैव कार्यो नैकस्मै दुहितृद्वयं । न चैकजन्ययोः पुंसोरेकजन्ये तु कन्यके इत्यादि ॥ ५० ॥

**टीकार्थ**—अथवा एकादिवशींही पण मंडप मात्र निराळा असावा ह्मणजे दोन सख्या भावांचाही विवाह करावा. हेंच ज्योतिर्विवरण ग्रंथांत सांगितलें आहे कीं, मोठें संकट प्राप्त झालें असतां; तशा वेळेस निषिद्ध लग्न पाहूं नये. तर दोघां सख्या भावांचाही विवाह एकाच दिवशीं पण निराळ्या मंडपांत करावा. आतां ह्या पक्षांचा निर्णय सांगतों. ह्या विवाहामध्ये वर्षे भेद झाल्यावर दोन दोन, तीन तीन मंगलें करावींत इत्यादि जो प्रकार सांगितला आहे तो विद्वानांनीं तारतम्य पाहून योजावा. ह्मणजे संकट कसें काय आहे तें पाहून तो वरचा प्रकार योजीत जावा, आतां यमलांविषयीं ह्मणजे जुळयाविषयीं विशेष प्रकार सांगतों—४९ व्या ह्या श्लोकांतील प्रकार आवळ्या जावळ्या पुत्र कन्येविषयीं नाहीं ह्या दोघां आवळ्या जावळ्यांचें मंगलकार्य एकाच ठिकाणीं, एकाच वर्षांत, एकाच वारावर, एकाच मंडपांत करावें असें मुनी सांगतात. असें सांगितलें आहे कीं, एकावर्षी एका दिवशीं एका मंडपांत आवळे जावळे झालेल्या दोन कन्यांचे आणि दोन भावांचें मंगल कार्य करावें यमलामध्यें झालेल्या कन्या असोत अथवा पुत्र असोत त्यांना हाच न्याय लागू आहे. आतां आवळ्या जावळ्या मध्यें एक स्त्री आणि एक पुरुष असें असेल तर एका स्त्रीचा विवाह पुरा केल्या नंतर पुरुषाचा विवाह करावा. कारण स्त्री आणि पुरुष ह्यांचा बरोबर विवाह करणें अशक्य आहे. आतां अदलाबदलीनें विवाह करण्याचा निषेध सांगतों—एका वराला एकापासून झालेल्या दोन कन्या देऊं नयेत. सख्या दोन भावांना सख्या दोन बहिणी देऊं नयेत. तसेंच परस्पर लग्नें करूं नयेत.ह्मणजे आपली कन्या देऊन सून करून घेणें हेंही करूं नये. परंतु अति संकट असेल तर ह्या विषयीं ही प्रवृत्ति सांगतों—वर करूं नये ह्मणून जो प्रकार सांगितला तो सर्व प्रकार संकटकाळीं ह्मणजे दुसरी कन्या व वर मिळत नसेल तर करावा. तेंच नारद सांगत आहे कीं, कन्या देऊन कन्या करून घेणें हा प्रकार करूं नये, तसेंच एका वराला दोन कन्या देऊं नयेत. दोन सख्या भावांला दोन सख्या बहिणी देऊं नयेत ॥ ५० ॥

## प्रतिकूलनिर्णय.

नोद्वाहं सति निश्चयेऽपि जगदुः पित्रोः सपित्रोः स्त्रियाः ।
सूनोर्भ्रातुरनूढितस्वसुरसूत्क्रांतौ पितृव्यस्य च ॥
अन्ये स्वान्वयजात्ययेऽपि जनकांबास्त्रीसुतान्यात्ययेऽ- ।
ब्दार्धार्धार्धदलांतरे विदधते हेरंबशांत्या क्वचित् ॥ ५१ ॥

श्लोकार्थ—विवाहाचा निश्चय केल्यानंतरही पिता, माता, पितामह, पितामही, मातामह, मातामही, स्वस्त्री, स्वपुत्र, भ्राता, अविवाहितभगिनी व पितृव्य ह्यांपैकीं कोणी मरण पावेल तर तो विवाह करूं नये. निश्चयानंतर स्वकुळांतील कोणतेंही मनुष्य मरण पावलें असतां तो विवाह करूं नये. असें कित्येक पंडित ह्मणतात. वधूचा किंवा वराचा पिता मृत झाल्यास १ वर्षानंतर, माता मृत झाल्यास ६ महिन्यांनंतर, स्वस्त्री मृत

झाल्यास ३ महिन्यानंतर, पुत्र मृत झाल्यास दीड महिन्यांनंतर, आणि स्वकुळांतील अन्य कोणी मृत झाल्यास २३ दिवसांनंतर गणेशशांति करून कित्येक पंडित विवाह करितात ॥ ५१ ॥

**अथ प्रतिकूलनिर्णयमाह–नोद्वाहमिति । निश्चयेऽपि सति बुधा उद्वाहं न जगदुः कस्यां सत्यां पित्रोरसूत्क्रांतौ सत्यां माता च पिता च पितरौ तयोरसूनां प्राणानामुत्क्रांतिरुत्क्रमणं तस्यां सत्यामित्यर्थः । कथंभूतयोः पित्रोः पितरौ च पितरौ च पितरः मातुः पितरौ पितुः पितरावित्यर्थः।तैः सहवर्तमानौ सपितरौ तयोः सपित्रोः । पुनः कस्यां सत्यां स्त्रिया असूत्क्रांतौ सत्यां इदं द्वितीयविवाहादौ ज्ञेयं । एवं सूनोः पुत्रस्य भ्रातुः सहजस्य अनूढितस्वसुरपरिणीतभगिन्याः पितृव्यस्य पितृभ्रातुः असूत्क्रांतौ सत्यां । एतदुक्तं भवति पित्रादीनामुक्तानां मध्येऽन्यतमे मृते सति विवाहं न कुर्यादित्यर्थः । तथा वृद्धशौनकः वरवध्वोः पिता माता पितृव्यश्च सहोदरः । एतेषां प्रतिकूलं चेन्महाविघ्नप्रदं भवेत् ॥ अन्यच्च । पिता पितामहश्चैव माता चैव पितामही ॥ पितृव्यः स्त्री सुतो भ्राता भगिनी चाविवाहिता ॥ एभिरेव विपन्नैश्च प्रतिकूलं बुधैः स्मृतं । अन्यैरपि विपन्नैश्च केचिदूचुर्न तद्भवेदिति ॥ अथान्येषां मतमाह–अन्य इति । अन्ये बुधाः स्वान्वयजात्ययेऽपि स्वकुलजातमर्त्यनाशेपि उद्वहनं न विदधुः । तथा च भृगुः । वाग्दानानंतरं यत्र कुलयोः कस्यचिन्मृतिः। तदोद्वाहो नैव कार्यः स्वपक्षक्षयदोषत इति ॥ अथ संकटे प्रवृत्तिमाह–जनकांबास्त्रीति । जनकश्च अंबा च स्त्री च सुतश्च अन्यश्च । अन्यः कुलजः । प्रतिकूलाधिकारी एषामत्ययो नाशः मरणमिति यावत्। तस्मिन्सति अब्दार्धार्धार्धदलांतरे हेरंबशांत्या गणेशशांत्या क्वचित्संकटे विदधते बुधा इत्यध्याहारः । एतदुक्तं भवति । वरस्य वध्वा वा पितृनाशेऽब्दांतरे वर्षांतरे मातृनाशेऽर्धांतरे षण्मासांतरे स्त्रीनाशेऽर्धांतरे त्रिमासांतरे । एतद्द्वितीयादिविवाहे ज्ञेयं । तथा पुत्रनाशेऽर्धांतरे सार्धमासांतरेऽन्यनाशे पितृमातृस्त्रीत्यादिभ्योऽन्यस्य कुलजस्य नाशे दलांतरे सार्धमासस्यार्धांतरे त्रयोविंशतिदिनांतरे विदधत इत्यर्थः ॥ ५१ ॥**

**टीकार्थ**—आतां प्रतिकूलाचा निर्णय सांगतों–विवाहाचा निश्चय केल्यावरही जर कदाचित् माता आणि पिता ह्यांचें प्राणोत्क्रमण झालें ह्मणजे माता व पिता मरण पावले. नुसते आई व बाप नाहीं तर त्यांचेही आईबाप ह्मणजे दोहों कडूनही आजा, आजी ह्मणजे बापाचा बाप व बापाची आई. आईचा बाप व आईची आई इतके मरण पावतील तर विवाह करूं नये. स्त्री मरण पावेल तर; हें ह्मणणें दुसऱ्या लग्नाचे वेळेस संभवतें ह्मणून तसें समजावें. अशाच रीतीनें पुत्राचें मरण झालें असतां, भावाचें मरण झालें असतां, लग्न न झालेल्या बहिणीचें मरण झालें असतां, काकाचें मरण झालें असतां विवाह करूं नये. ह्यांचा तात्पर्यार्थ असा कीं, बापापासून जेवढे सांगितले आहेत, त्यांपैकीं कोणी एखादा जरी मरण पावेल तर विवाह करूं नये. हेंच वृद्धशौनक सांगतात कीं, वर आणि वधू ह्यांचा बाप, आई, काका, भाऊ आणि बहीण ह्यांपैकीं कोणी जर मरण पावेल तर तें प्रतिकूल झालें असें समजावें. तें प्रतिकूल महाविघ्नकारक समजावें. दुसरें असें कीं, बाप, बापाचा बाप, आई, बापाची आई, काका, स्त्री, पुत्र, भाऊ, लग्न न झालेली बहीण. इतके मरण पावले असतां प्रतिकूल होतें असें विद्वानांनीं सांगितलें आहे. ह्या शिवाय दुसरे मरण पावले असतां प्रतिकूल होत नाहीं, असें कित्येकांचें मत आहे. आतां दुसऱ्यांचें मत सांगतों. दुसरे विद्वान् लोक असें ह्मणतात कीं, आपल्या कुळांत झालेला कोणी जरी मरण पावेल तरी विवाह करूं नये. तेंच भृगु सांगतो कीं, वाग्दान केल्यावर जर दोन्ही कुळांत ह्मणजे वर आणि वधू ह्या दोन कुळांत कोणी एकादा मरण पावेल तर विवाह करूं नये. कारण कीं जर केला तर आपल्या कुळाचा क्षय होण्याचा दोष त्यामध्यें आहे. आतां संकटकाळीं विवाह करावा अशा विषयीं प्रवृत्ति सांगतों–बाप, आई, स्त्री, पुत्र, दुसरा कोणी कुळांतील ह्यां पैकीं एखादा मरण पावेल तर अनुक्रमानें वर्ष, सहामहिने, तीन महिने, दीडमहिना, २३ दिवस इतके झाल्यावर लग्न करावें ह्मणजे बाप मेल्यास एकवर्ष गेल्यावर, आई मेल्यास सहा महिन्यानें, स्त्री मेल्यास तीन महिन्यांनीं पुत्र मेल्यास दीड महिन्यांनीं, दुसरा कोणी कुळांतील मेला तर २३ दिवसांनीं विवाह करावा. परंतु विवाह करण्याचे वेळीं गणेश शांति करून कदाचित् फार संकट असेल तर विवाह करण्याविषयीं विद्वानांची संमति आहे. हा सर्व प्रकार वर आणि वधू ह्या दोहोंपैकीं कोणाचाही बाप, आई, स्त्री ह्मणजे दुसरा विवाह करावयाचा असेल तर समजावें, बाकीचें सर्व स्पष्टच आहे ॥ ५१ ॥

**भ्रातुश्चाऽऽत्मजवद्द्वयेऽतिसमये पित्रोर्मृतेः संशये ।**
**नान्येषां प्रतिकूलमामयिविरक्ताराद्गतानामपि ॥**

**आ तुर्यान्मृतनृक्रियानभिभवे नांदीमुखं नाऽऽचरेत् ।**
**नो कुर्याज्ज्वरितस्य मंगलमतिव्याध्युद्भवे निश्चयम् ॥ ५२ ॥**

श्लोकार्थ—निश्चयानंतर भ्राता मृत झाल्यास पुत्रा प्रमाणेंच ह्मणजे दीड महिन्यानंतर विवाह करावा. दुर्भिक्ष, राजक्रांति इत्यादि भय असतां, अथवा विवाहाला अतिकाळ झाला असतां, अथवा माता किंवा पिता मरण पावण्याचा संशय असतां, अन्य कोणी मृत होईल तर त्याचें प्रतिकूल होत नाहीं. तसेंच दीर्घरोगी, गृह पुत्रादिकां-विषयीं विरक्त व फार दूर देशीं गेलेला ह्यांचेंही प्रतिकूल होत नाहीं. स्वगोत्रांत चतुर्थपुरुषापर्यंत कोणी मृत झालेल्या मनुष्याची क्रिया झाली नसेल तर नांदीश्राद्ध करूं नये. ज्वरिताचें ह्मणजे रोगी मनुष्याचें मंगल कार्य करूं नये. स्वगोत्रांत कोणालाही अति व्याधि उत्पन्न झाला असतां विवाहाचा निश्चय करूं नये ॥ ५२ ॥

**अन्यमध्ये भ्रातुर्विशेषमाह–भ्रातुश्चाऽऽत्मजवदिति । भ्रातुर्नाशे पुत्रवत् पुत्रनाशोक्तवज्ज्ञेयं सार्द्ध-मासांतरे कर्तव्यमित्यर्थः । तथा च स्मृतिसारावल्यां । पितुरब्दमिहाशौचं तदर्धं मातुरेव च । मास-त्रयं तु भार्यायास्तदर्धं भ्रातृपुत्रयोः ॥ अन्येषां च सपिंडानामाशौचं माससंमितं ॥ तदा तु शांतिकं कृत्वा ततो लग्नं विधीयत इति ॥ स्मृत्यंतरेऽप्युक्तं । संकटे समनुप्राप्ते याज्ञवल्क्येन योगिना । शां-तिरुक्ता गणेशस्य कृत्वा तां शुभमाचरेत् ॥ अकृत्वा शांतिकं यस्तु निषेधे सति दारुणे । प्रकरोति शुभं गर्वात् विघ्नस्तस्य पदे पद इति ॥ ज्योतिःप्रकाशे । प्रतिकूलेऽपि कर्तव्यो विवाहो मासमंतरात् । शांतिं विधाय गां दत्त्वा वाग्दानादि चरेत्पुनः ॥ इत्येतत्प्रौढायां कन्यायां पित्रोर्मरणेऽपि ज्ञेयं । प्रतिकूलेऽपि प्रतिकूलाभावमाह–भय इत्यादि । भये दुर्भिक्षराजभयेऽतिसमयेऽतिकाले पित्रो-र्मातापित्रोर्मृतेः संशये सति अन्येषां मातापितृभ्यामन्येषां मृतानां प्रतिकूलं नास्ति । तथा चोक्तं ज्योतिःसागरे । दुर्भिक्षे राष्ट्रभंगे च पित्रोर्वा प्राणसंशये । प्रौढायामपि कन्यायां नानुकूलं प्रती-क्षत इति ॥ विशेषांतरमाह–आमयिविरक्ताराद्गतानामपि प्रतिकूलं नास्ति । आमयी रोगी दी-र्घरोगीति यावत् । विरक्तो गृहादिषूदासीनः । आराद्गतो दूरगतो देशांतरगत इति यावत् । आ-राद्दूरसमीपयोरित्यमरः । एषामपि मृतानां प्रतिकूलं नास्ति । तथा चोक्तं स्मृत्यंतरे । दीर्घरो-गाभिभूतस्य दूरदेशे स्थितस्य च । उदासवर्तिनश्चैव प्रतिकूलं न विद्यत इति ॥ अथान्यानपि शास्त्रार्थानाह–आ तुर्यादिति । तुर्यः चतुर्थः पुरुषः मूलपुरुषाच्चतुर्थइत्यर्थः । तं मर्यादीकृत्य मृतस्य नुः नरस्य क्रियाया अनभिभवेऽभावे सति कचित्कारणांतरात् क्रियायामकृतायां नांदीमुखं नाऽऽ-चरेत् । एतत्स्वगोत्रविषयं । तथा च मेधातिथिः । प्रेतकर्माण्यनिर्वर्त्य चरेन्नाभ्युदयक्रियां । आ चतुर्थं ततः पुंसि पंचमे तु शुभं भवेदिति ॥ नो कुर्यादिति । ज्वरितस्य मंगलं नो कुर्यात् । तथा च गर्गः । ज्वरस्योत्पादनं यस्य शुभं तस्य न कारयेत् । दोषनिर्गमनात्पश्चात्स्वस्थो धर्मं समाचरेदिति । अतीति । अतिव्याध्युद्भवे कस्यचित्कुलजस्य । शरीरेऽतिदारुणज्वरोत्पत्तौ निश्चयं नो कुर्यात् प्रतिकूलभित्या । रोगः पाप्मा ज्वरो व्याधिर्विकारो दुःखमामय इत्यादि ॥ वाग्भटे ज्वरपर्यायनामानि तथा च गर्गः । केचिद्दूत्वुर्गृहस्थस्य कस्यचिद्दारुणो ज्वरः । तावन्मंगलकार्यं च न कार्यं निश्चितं बुधैरिति ॥ ५२ ॥**

**टीकार्थ**—दुसऱ्यामध्यें भावा विषयीं विशेष सांगतों–तो असा कीं, भाऊ मरण पावला असतां पुत्रा प्रमाणें ह्मणजे पुत्र मेला असतांनां जसा दीड महिना सोडावयाचा तसाच भाऊ मेला असतां दीड महिना झाल्यावर विवाह करावा. तसेंच स्मृतिसारावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं, बाप मेला असतां एक वर्ष पर्यंत आशौच आहे. आईला त्याचें अर्ध ह्मणजे सहा महिने आशौच आहे. स्त्रीचें तीन महिने पर्यंत आशौच आहे. भाऊ व पुत्र ह्यांचें दीड महिना पर्यंत आशौच आहे. दुसरे जे सपिंड असतील त्याचें एक महिना पर्यंत आशौच आहे. तथापि संकट काळ असेल तर गणेश इत्यादिक शांति करून विवाह करावा. दुसऱ्या स्मृतींतही असें सांगितलें आहे कीं, फार संकटकाळ आला असतां ह्मणजे कन्येच्या लग्नाचा अतिकाळ वगैरे संकट असेल तर याज्ञवल्क्य मुनींनीं सांगि-तलेली गणेश शांति करून शुभ ह्मणजे विवाह करावा. परंतु जो गर्वानें गणेश शांति वगैरे न करतां मंगल कार्य करितो, त्याला पावलो पावलीं विघ्न येतें. ज्योतिःप्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, प्रतिकूल झालें अ-

सतां ही एक महिना झाल्यावर शांति करून गोदान करून पुनः वाग्दान करावें. हा सर्व प्रकार पिता इत्यादि जरी मरण पावले असतील आणि कन्या प्रौढ झाली असेल तर समजावा. ह्मणजे शांति करून विवाह करावा. आतां प्रतिकूल असूनही प्रतिकूल नाहीं असें सांगतों— दुष्काळ पडला असतां, राजाचें भय आलें असतां, लग्नाचा काळ उल्लंघून गेला असतां, मातापित्यांचे मरणाचा संशय असतां, मातापिता शिवाय दुसरें कोणी मेलें असतां त्यांच्या मरणापासून प्रतिकूल नाहीं तर खुशाल विवाह करावा. तेंच ज्योतिःसागर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, दुष्काळ पडला असतां, राज्यक्रांतीचा समय असतां, मातापित्याचे मरणाचा संशय असतां, कन्या प्रौढ झाली असेल तर अनुकूलाची वाट पाहावयाचें कारण नाहीं. अर्थात् प्रतिकूल असतांही विवाह करावा. तसेंच फार दिवसां पासून रोगी असलेला मरण पावला असतां, गृहादिकांविषयीं फारच विरक्त असलेला मरण पावला असतां, फारच दूर देशीं गेला असून मरण पावला असतां, असे हे मरण पावले असतां प्रतिकूल नाहीं, तर अनुकूलच समजून विवाह करावा. तेंच दुसऱ्या स्मृतींत सांगितलें आहे कीं, जुनाट रोगानें ग्रस्त झालेला, फार लांब दूर देशीं गेलेला, प्रपंचा विषयीं उदासीन असलेला जर मरण पावला तर त्याचें प्रतिकूल समजूं नये. आतां दुसरेही शास्त्रार्थ सांगतों—आपल्या मूळ पुरुषापासून चवथा पुरुष मेला असेल आणि त्याच्या क्रियाकर्मांतरें कांहीं कारणामुळें झालीं नसतील तर मग नांदीमुख श्राद्ध करूं नये. अर्थात् विवाह करूं नये. कारण कीं, विवाहाचे पूर्वीं नांदीश्राद्ध असतें हें सर्व आपल्या गोत्राविषयीं समजावें. तेंच मेधातिथी ग्रंथकार सांगत आहे कीं, प्रेतकर्मांचे संस्कार पुरे केल्या शिवाय मंगलकार्य करूं नये. मात्र तो प्रेत संस्काराचा नियम मूळ पुरुषापासून चवथ्या पिढी पर्यंतच आहे पांचवा पुरुष मृत झाला असून त्याचें क्रिया कर्मांतरें झालीं नसतील तरीही मंगल कार्य ह्मणजे विवाह करण्यास हरकत नाहीं, ज्याला ज्वर आला असेल त्याचें मंगल ह्मणजे विवाह करूं नये. तेंच गर्ग सांगतो कीं, ज्याला ज्वर आला असेल त्याचें मंगल करूं नये. ह्मणजे त्याचा विवाह करूं नये. ज्वराचा दोष गेल्यावर मग शरीर स्वस्थ झाल्यावर नंतर मंगल कार्य करावें. आपल्या कुळांतील कोण्या एकास अतिमोठा भयंकर असाध्य ज्वरादिक व्याधि झाला असेल तर विवाहाचा निश्चय करूं नये. कारण तो मध्येंच मेला तर प्रतिकूल होण्याची भीति आहे. रोग हा शब्द, पाप, ज्वर, विकार, दुःख आणि आमय इतक्या अर्थांचा वाचक आहे, हे सर्व शब्द रोगाचे पर्याय आहेत. तेंच गर्ग सांगतो कीं, कोणी असें ह्मणतात कीं, जर गृहस्थाचें अंगांत भयंकर दारुण ज्वर आला असेल तर तो ज्वर शांतपडे पर्यंत मंगल कार्याचा निश्चय विद्वानांनीं करूं नये ॥ ५२ ॥

### सूतकनिर्णय व सिंहस्थनिर्णय.

चेत्स्यात्सूतकमुक्तपूर्वसमयेऽनारब्धकार्ये बुधः ।
कूष्मांडीघृतहोमतोऽपि जननाशौचे क्वचित्कारयेत् ॥
सिंहेज्ये न शुभं हितं हरिलवोर्ध्वं गौतमीदक्षिणे ।
जाह्नव्युत्तरतः क्वचिद्धितमजेऽर्केतोऽस्रभीत्यादिषु॥ ५३ ॥

श्लोकार्थ—जर यज्ञ, विवाह, चौल, उपनयन यांना मागें सांगितलेल्या काळीं आरंभ करण्यापूर्वीं जननाशौच (सुवेर) येईल, तर महासंकटीं कूष्मांडी मंत्रांनीं घृत होम करून जननाशौचांत मंगलकार्यें करावीं. सिंहराशीला गुरु असतां शुभ कार्यें करूं नयेत. संकटसमयीं सिंहनवांशा पुढें गुरु गेल्यावर गोदानदीच्या दक्षिणेकडील देशांत आणि भागिरथीच्या उत्तरेकडील देशांत शुभकार्यें करावीं. महासंकट असेल व कन्येला ऋतु प्राप्त होण्याचें भय असेल तर गोदा व भागीरथी ह्यांच्या मधील देशांत सिंहनवांशा पुढें गुरु असून मेषराशीला रवि असतां शुभ कार्यें करावीं ॥ ५३ ॥

**अथ महत्संकटे सति वृद्धिसूतके कर्मार्हतामाह–चेत्स्यादिति । उक्तपूर्वसमये यज्ञोद्वाहनचौलमौंजिकमित्यत्रोक्ते पूर्वकालेऽनारब्धकार्ये सति कर्मण्यनारब्धे सति संकटे च प्राप्ते सति कूष्मांडीघृतहोमतः कूष्मांडीभिर्यद्देवादेवहेडनमित्यादितिसृभिर्ऋग्भिर्घृतहोमः कूष्मांडीघृतहोमः तेन जननाशौचे दशाहतः जन्मदशाहमध्ये कर्म आचरेत् । कूष्मांडीघृतहोमं शास्त्रोक्तं सदक्षिणं कृत्वा कर्म कर्तव्यमित्यर्थः । तदुक्तं स्मृत्यंतरे । संकटे समनुप्राप्ते सूतके समुपागते । कूष्मांडीभिर्घृतं हुत्वा गां दत्वा च पयस्विनीं ॥ चूडोपनयनोद्वाहौ प्रतिष्ठादिकमाचरेदिति ॥ स्मृत्यंतरे । अनार-**

घविशुद्ध्यर्थं कूष्मांडैर्जुहुयाद्घृतं । गां दद्यात्पंचगव्याशी ततः शुद्ध्यति सूतकीति ॥ अथ सिंहे गुरौ सति मंगलनिषेधमाह-सिंहेज्य इति । सिंहे सिंहराशौ इज्यः सिंहेज्यः तस्मिन्सति शुभं नित्यव्यतिरिक्तं न हितं स्यात् । इदं तु पूर्वमेव प्रपंचितं । तथा च कालनिर्णये । शांतिकं पौष्टिकं यात्रा प्रतिष्ठोद्वाहपूर्वकं । न कुर्यात्सर्वमांगल्यं सिंहस्थे च बृहस्पतौ ॥ तथा च मांडव्यः । इष्टापूर्ते च चौलादिसंस्कारान् वास्तुकर्म च । अन्यानि शुभकर्माणि न कुर्यात्सिंहगे गुराविति ॥ अथ संकटे प्रवृत्तिमाह-हरिलवोर्ध्वमिति । क्वचित्संकटे देशकालभयादौ सिंहेज्येऽपि हरिलवादूर्ध्वं सिंहांशादूर्ध्वं गौतम्या दक्षिणतो जाह्नव्या उत्तरतः शुभं कर्म हितं स्यात् । तथा च ज्योतिर्निबंधे । सिंहे गुरौ सिंहनवांशकोर्ध्वं गोदावरीदक्षिणकूलजातैः । उद्वाहकालात्ययदोषभीतैः कार्यो विवाहश्च्यवनो ब्रवीतीति ॥ तथा च गर्गः । भागीरथ्युत्तरे तीरे गोदावर्याश्च दक्षिणे । व्रतोद्वाहादिकं कर्म सिंहसंस्थे न दुष्यतीति । अर्थाद्गोदावर्या उत्तरे भागीरथ्या दक्षिणे एवं द्वयोर्गोदाजाह्नव्योर्मध्ये संकटेऽपि शुभं नाऽचरेदिति सिद्धं । तथा च वसिष्ठः । गोदावर्युत्तरे तीरे भागीरथ्याश्च दक्षिणे । विवाहादि न कुर्वीत सिंहसंस्थे च वाक्पताविति ॥ अत्राप्यतिसंकटे प्रवृत्तिमाह-अजेति । अस्त्रभीत्यादिषु रजोभयादिषु सत्सु अंतः गोदाजाह्नव्योर्मध्ये हरिलवादूर्ध्वं सिंहेज्ये सति अजे मेषे इने सूर्ये सति शुभमाचरेत् । अजे इने इत्येतद्विवाहविषयं । अस्त्रभीत्यादिष्वित्यनेन पदेन लक्ष्यते । तथा च शौनकः । मेषस्थे दिवसकरे सिंहस्थे वज्रपाणिसचिवे च । यस्याः परिणयनमसौ साध्वीसुखसंपदोपेतेति ॥ व्रतबंधस्तु मीनगे सूर्ये सति चैत्रे कर्तव्य इति ग्रंथकृता प्रागेवोक्तमनिमिषरविमध्यौ कार्यमिति । तथा च मौंजीपटले । जन्मभादष्टगे सिंहे नीचे वा शत्रुगे गुरौ । मौंजीबंधः शुभः प्रोक्तश्चैत्रे मीनगते रवौ । अथवा इने इज्ये एतत्पदं सर्वशुभसाधारणविषयं । तथा च शौनकः । सिंहस्थे देवगुरौ मेषस्थो यदि भवेत्सहस्रांशुः । मंगलकार्यं कुर्यादिति नारदपराशरौ वदत इति ॥ अस्त्रभीत्यादिष्वित्यत्रादिशब्देन वृद्धिपितृमरणशंकायां कन्यांतराभावाद्यतिसंकटे इति ज्ञेयम् ॥ ५३ ॥

**टीकार्थ**—मोठ्या संकटकाळीं वृद्धि आणि सूतक असतांही शुभ कर्म करण्याची योग्यता आहे हें सांगतों-पूर्वी सांगितल्या प्रमाणें यज्ञ, विवाह, चौल आणि मुंज ह्या कार्याला सांगितलेल्या नियमांप्रमाणें ह्मणजे त्या त्या कार्यांचा आरंभ करण्याचे पूर्वीही जर मोठें संकट प्राप्त झालें तर कूष्मांडादिकांनीं "यद्देवादेवहेलनम्" इत्यादि तीन ऋचांनीं तुपाचा होम करावा. तसा होम करून जननाशौचाच्या दहा दिवसांमध्यें सुद्धां मंगल कार्य करावें. तेंच दुसऱ्या स्मृतींत सांगितलें आहे कीं, मोठें संकट आलें असतां आणि त्यांत सूतक आलें असतां कूष्मांडांनीं होम करून दुभती गाय दान करून चूडा, उपनयन, विवाह इत्यादि कार्यांमध्यें देवप्रतिष्ठा वगैरे करावी. दुसऱ्या स्मृतींत सांगितलें आहे कीं, सूतक येण्याचे पूर्वीं कार्यालां आरंभ केला नाहीं ह्या बद्दलचे दोषाची विशुद्धि होण्याकारितां कूष्मांडांसहित तुपाचा होम करावा. गोदान करावें आणि पंचगव्याचें प्राशन करावें, इतकें केल्यावर सुतकी शुद्ध होतो. आतां सिंहस्थ गुरु असतां मंगल कार्यांचा निषेध सांगतों-गुरु सिंह राशीवर असतां शुभ कार्य ह्मणजे नित्य करावयाच्या कार्यांशिवाय दुसरें कार्य करूं नये. हेंच पूर्वीं विस्तार पूर्वक सांगितलें आहे. तेंच काल निर्णयग्रंथांत सांगितलें आहे कीं, गुरु सिंह राशीवर आला असतां शांतिक कार्य, पौष्टिक कार्य, यात्रा, प्रतिष्ठा, विवाह इत्यादिक मंगलकार्यें करूं नयेत. तेंच मांडव्य स्मृतिकार सांगतो कीं, यज्ञ, पूर्त, चौलादिसंस्कार, वास्तुकर्म, हीं आणि ह्यां शिवाय दुसरीं जीं शुभकर्में असतील तीं सिंहस्थ गुरु असतां करूं नयेत. आतां संकटकाळीं प्रवृत्ति सांगतों-देश आणि काळ ह्यां पासून फार मोठें संकट आलें असेल तर तशा वेळेस गुरु सिंहस्थ असला तरी सिंहस्थ गुरु सिंहाच्या नवांश नंतर गोदावरीच्या दक्षिणेस आणि जान्हवीच्या उत्तरेस विवाहादिक शुभ करावें. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सिंहेला गुरु असूनही सिंहाचे नवांश होऊन गेल्यावर गोदावरीच्या दक्षिणेस आणि जान्हवीचे उत्तरेस राहणाऱ्या लोकांनीं कालाच्या अडचणीस्तव ह्मणजे कन्येचा विवाह काल होऊन जात असेल तर विवाह करावा. असें च्यवन ऋषीचें मत आहे. तसेंच गर्ग सांगतो कीं, भागीरथीचे उत्तरेस राहणाऱ्यांनीं गोदावरीच्या दक्षिणेस राहणाऱ्यांनीं सिंहस्थ गुरु असतांहीं विवाह, व्रत इत्यादि शुभ कार्यें करावींत. तसें केलें असतां दोष नाहीं. ह्यांत असा अर्थ निघतो कीं, गोदावरीचे दक्षिणेस आणि भागीरथीचे उत्तरेस असें ह्मटलें आहे ह्मणून गोदावरी आणि भागीरथी ह्या दोहोंच्यामध्यें राहाणाऱ्यांनीं शुभ कर्म करूं नये असें सिद्ध झालें. तेंच वसिष्ठ सांगतो कीं, गोदावरीचे उत्तरेस आणि भागीरथीच्या दक्षिणेस राहाणाऱ्यांनीं सिंहस्थ गुरु असतां शुभकार्यें करूं नयेत. ह्मणजे लग्न वगैरे करूं नये. ह्या ठिकाणींही अतिशय संकट असेल तर करण्याविषयीं प्रवृत्ति सांगतों-कन्येला ऋतु प्राप्त होण्याचें भय वगैरे असेल तर गोदा आणि जान्हवी ह्यांचें मध्येंही राहणाऱ्यांनीं सिंहस्थ गुरु असतांनाही

सिंहाचा नवांश झाल्यावर मेषावर सूर्य असतां विवाह रूपच शुभकर्म करावें. ऋतु प्राप्त होण्याचे भयामुळें विवाह करण्याविषयींच मात्र आज्ञा आहे, असें सिद्ध होतें. तसेंच शौनक सांगतो कीं, वज्रपाणि ह्म० इंद्र त्याचा सचिव ह्म० प्रधान जो गुरु तो सिंह राशीवर असतां आणि दिवसकर ह्म० सूर्य हा मेषराशीवर असतां कन्येला पातिव्रत्य राहावें ह्या करितां तिचा विवाह करावा. अर्थात कन्येच्या विवाहाचा काळ निघून जात असेल आणि तिचें लग्न न केलें तर तिचें सदाचरण बिघडण्याचा संभव आहे, ह्मणून तिचा विवाह करण्यापुरती आज्ञा आहे. आणि उपनयन संस्कार करावयाचा तो सूर्य मीन राशीवर असतां चैत्रमासीं करावा हें पूर्वीच सांगितलें आहे. तसेंच मौंजीपटल ग्रंथांत सांगितलें आहे कीं, जन्मराशीपासून अष्टमस्थानीं गुरु असतां, व सिंह राशीस गुरु असतां, नीचेचा गुरु असतां, शत्रूच्या घरीं गुरु असतां, मीन राशीवर सूर्य असतां चैत्रमहिन्यांत मौंजीबंधन करावें. अथवा सूर्य आणि गुरु हें पद सर्व शुभकरण्याविषयीं साधारण आहे. तेंच शौनक सांगतो कीं, देवगुरु हा सिंह राशीवर असतां, अथवा सहस्रांशु ह्म० सूर्य हा मेषराशीवर असतां मंगल कार्य करावें असें नारदादि सांगतात. कन्येला ऋतु प्राप्त होणें ह्या ठिकाणीं आदिशब्दानें वृद्धिचें आशौच आणि पितृमरणाचें आशौच येण्याची शंका असेल अशा अतिशय संकटाचे वेळीं, दुसरा कोणी विवाह करणारा, अशाच अडचणीच्या वेळेस विवाह करावा असें जाणावें ॥ ५३ ॥

### नामराशीचा व जन्मराशीचा निर्णय.

**देशग्रामगृहज्वरव्यवहृतिद्यूतेषु दाने मनौ ।**
**सेवाकाकिणिवर्गसंगरपुनर्भूमेलके नामभम् ॥**
**जन्मर्क्षं परतो वधूपुरुषयोर्जन्मर्क्षमेकस्य चेत् ।**
**ज्ञातं शुद्धिमितो विलोक्य च तयोर्नामर्क्षयोर्मेलकः ॥ ५४ ॥**

श्लोकार्थ—देश, ग्राम, गृह यांतील प्रवेशादि कार्यांत ज्वर, व्यवहार, द्यूत, दान ह्यांविषयीं चंद्रबल पहाण्यास, मंत्राचें घटित व चंद्रबल पहाण्यास, राजादिकांच्या सेवेला घटित पाहण्यास, काकिणी पाहण्यास, वर्गशुद्धीस, युद्धांत, चंद्रबलास आणि पुनर्विवाहांत घटित पाहण्यास नाम राशि घ्यावी. ह्यांशिवाय इतर विवाहादि सर्व मंगलकार्यांस जन्मराशि घ्यावी. वधूवरांपैकीं एकाचें जन्मनक्षत्र ज्ञात असून एकाचें अज्ञात असेल तर ज्ञात असेल त्यावरून गुरुबळ, चंद्रबळ इत्यादि पहावें. आणि त्या दोघांच्याही नामराशीवरून घटित पहावें. दोघांचेंही जन्म नक्षत्र अज्ञात असतां सर्वच नामराशी वरून पहावें ॥ ५४ ॥

**अथ नामराशिजन्मराश्योर्निर्णयमाह–देश इति । देशः प्रसिद्धः ग्रामः प्रसिद्धः गृहं प्रसिद्धं ज्वरः प्रसिद्धः इत्यादिषु नामराशिः प्रधानं स्यात् । एतदुक्तं भवति । देशग्रामगृहेषु प्रवेशाद्यर्थं ज्वरे चंद्राद्यवलोकनार्थं व्यवहृतिर्व्यवहारः द्यूतं प्रसिद्धं दानं तुलापुरुषादिष्वपु चंद्रबलाद्यर्थं मनौ मंत्रे मेलनार्थं चंद्रबलाद्यर्थं च सेवा राजादिसेवा तत्र मेलनाद्यर्थं काकिण्यां काकिण्यवलोकनार्थं वर्गशुद्ध्यर्थं संगरे संग्रामे चंद्रबलाद्यर्थं पुनर्भूमेलके पुनर्भूमेलनाय नामराशिरवलोकनीयेत्यर्थः । परत एभ्योऽन्यत्र विवाहयात्रादौ जन्मर्क्षं जन्मराशिः प्रधानं स्यात् । तथा च ज्योतिर्निबंधे । देशे ग्रामे गृहे युद्धे सेवायां व्यवहारके । नामराशेः प्रधानत्वे जन्मराशिं न चिंतयेदिति ॥ काकिण्यां वर्गशुद्धौ च दाने द्यूते ज्वरोदये । मंत्रे पुनर्भूवरणे नामराशेः प्रधानतेति ॥ विवाहे सर्वमांगल्ये यात्रादौ ग्रहगोचरे । जन्मराशेः प्रधानत्वं नामराशिं न चिंतयेदिति । अथ वधूवरयोर्मध्ये एकस्य जन्मर्क्षं ज्ञातमेकस्य न ज्ञातं तदा शुद्धिमेलनादिकं कथमवलोकनीयमित्याह–वधूपुरुषयोरिति । वधूपुरुषयोर्मध्ये चेद्यदि एकस्य जन्मर्क्षं ज्ञातं एकस्य न ज्ञातं तदा इतः ज्ञातात् जन्मर्क्षादेकस्य शुद्धिं गुर्वादिशुद्धिं विलोक्य तयोर्वधूवरयोर्नामर्क्षयोर्मेलको वर्णवश्यादिकः पूर्वोक्तो विलोक्यः । अर्थाद्द्वयो राश्यादिज्ञानं नामर्क्षादेव सर्वं विलोक्यं । तथा च शार्ङ्गधरः । विवाहघटनं चैव लग्नजं ग्रहजं बलं । नामभाच्चिंतयेत्सर्वं जन्म न ज्ञायते यदा ॥ ५४ ॥**

टीकार्थ--नांवावरून निघालेल्या राशीचा आणि जन्म नक्षत्रावरून निघालेल्या राशीचा निर्णय सांगतों--देश, गांव, घर ह्यामध्यें प्रवेश करितांना नामराशी ही मुख्य आहे, ह्याचा अर्थ असा कीं, देश, गांव, घर ह्यामध्यें प्रवेश करण्याकरितां, ज्वर आला असतां, कितवा चंद्र आहे हें पहाण्याकरितां, व्यवहार जाणण्याकरितां, द्यूत करण्याकरितां, तुला पुरुष दान इत्यादि कामाकरितां जें चंद्रबल पाहावयाचें असतें तो चंद्र पाहावयाचा असल्यास नाम राशीवरून पाहावें. एकादी मसलत करण्याविषयीं, दोघांचें मेलन करण्याविषयीं, चंद्राचें बल वगैरे पाहावयाचें असल्यास, राजसेवा वगैरे करावयाचे पाहाण्याकरितां ह्मणजे त्यांचा आपला मेळ जुळेल किंवा नाहीं हें पाहाण्याकरितां, काकिणी पहाण्याकरितां, वर्गशुद्धी पहावयाची असल्यास, युद्धाचे वेळीं चंद्र बळ पाहाण्याकरितां, पुनर्भूचें मेलन ह्मणजे पाट लावण्याचे वेळेस नामराशीवरूनच चंद्रबल वगैरे पाहावें. ह्या कार्यांशिवाय बाकीचे विवाह, यात्रा इत्यादि कार्यामध्यें जन्मराशि वरून चंद्र बल वगैरे पाहात जावें, त्यामध्यें जन्मराशि ही मुख्य आहे, तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, देश, गांव, घर, युद्ध, राजसेवा, व्यवहार, ह्या कार्यांमध्यें नाम राशिही प्रधान आहे, त्यामध्यें जन्मराशीचा विचार करूं नये. त्याप्रमाणेंच काकिणीमध्यें, वर्गशुद्धीमध्यें, दान करण्यामध्यें द्यूत खेळण्यामध्यें, ज्वरादिकांचा उदय झाला असतां, मसलत करावयाची असतां, पुनर्विवाह करावयाचा असतां, नामराशीचें प्राधान्य आहे, त्यावेळेस जन्म राशीचा विचार करावयास नको. विवाहामध्यें, सर्व प्रकारच्या मंगल कार्यामध्यें, यात्रादिक कार्यामध्यें, ग्रहगोचर पहावयाचें असल्यास, जन्म राशीचें प्राधान्य आहे. तेथें नामराशीचा विचार करावयाचें कारण नाहीं. आतां वधू आणि वर ह्यांपैकीं एकाचे जन्म नक्षत्राचें ज्ञान आहे, दुसऱ्याचें ज्ञान नसेल, तर शुद्धि मेलन इत्यादिक कसें पाहावें हें सांगतो--वधु आणि वर ह्यांपैकीं एकाचे जन्म नक्षत्राचें ज्ञान आहे, एकाचें ज्ञान नाहीं, तर ज्याचे जन्म नक्षत्राचें ज्ञान आहे, त्यापासूनच गुरु इत्यादिकांची शुद्धि पाहून त्यावरून त्या वधु आणि वराचें योनि इत्यादिक मेलन पाहून घटित पूर्वीं सांगितल्याप्रमाणें पाहावें. आणि त्या दोघांच्याही नामराशीवरूनच सर्व पाहावें. तेंच शार्ङ्गधर सांगतो कीं, जर जन्म नक्षत्र माहीत नसेल तर नामराशीवरून सर्व विवाहाचें घटित, लग्नाचें बल, ग्रहांचें बल पाहावें ॥ ५४ ॥

### नामनक्षत्राचें ज्ञान.

भं नामादिमवर्णतोऽवकहडाद्युज्यादिवर्णाद्ववौ ।
तुल्यावत्र शसौ खषौ यदभिधा बह्व्योऽस्य नामांतिमम् ॥
आर्या उद्वहने जनुर्भममलं पट्टस्य बंधे जगु- ।
र्गेहग्रामनृपाभिषेककृषिमौंज्यन्नाशने भूषणे ॥ ५५ ॥

॥ इति विवाहप्रकरणं समाप्तम् ॥

श्लोकार्थ—नामाचें आद्य अक्षर असेल तें अवकहड चक्रांत पाहून त्यावरून नक्षत्र व चरण जाणावे. नांवांतलें पहिलें जोडाक्षर असतां त्यांतला प्रथमवर्ण घ्यावा. ( श्रीधर यांतील श्री, क्षेत्रज्ञ यांतील के, प्रद्युम्न यांतील प इत्यादि ) ब आणि व, श आणि स, ख आणि ष, ह्या दोन दोन अक्षरांत भेद मानूं नये ह्मणजे अवकहड चक्रांत व अक्षर नाहीं त्या ठिकाणीं व समजून त्यावरून नक्षत्र पहावें. ज्यांचीं नांवें पुष्कळ असतील त्याचें शेवटचें नांव घ्यावें. पुरुषाचा विवाह, पट्टबंध, गृहकरण व गृहप्रवेश, ग्रामप्रवेश, राज्याभिषेक, कृषिकर्म, मौंजीबंधन, नवान्नप्राशन, अलंकारधारण ह्या कर्मांला जन्मनक्षत्र निर्दोष ह्मणून शुभ असें श्रेष्ठलोक ह्मणतात ॥ ५५ ॥

अथ मेलकार्यं नाम्नो नक्षत्रज्ञानमाह—भं नामेति । नामादिमवर्णो नामाद्यक्षरं तस्मात् अवकहडं शतपदं चक्रं यस्माच्चक्रात् । चूचेचोलापदेष्वाद्ये इत्यादयः श्लोका निबद्धाः तस्माच्चक्रात् भं नक्षत्रं ज्ञेयं । तद्यथा चूडामणीति नाम्न आद्याक्षरात् चकारात् चूचेचोला इत्यादिना अश्विनीनक्षत्रं तत्र प्रथमचरण इतिवज्ज्ञेयमित्यर्थः । तथा च दीपिकायां । जन्म न ज्ञायते येषां तेषां नाम गवेष्यते । चक्रेऽवकहडे भांशौ तन्नाडी केश्चिदग्निभादिति ॥ तन्नाडीत्यस्यार्थः यदा नाम्नो नक्षत्रं गवेष्यते तदाऽग्निभात् कृत्तिकानक्षत्रात् नाडी विलोक्येति केश्चिदुक्तं केश्चिदिति तन्मतमग्राह्यं तस्मादश्विन्यादित्रिकं व्यस्तमितिन्यायेन नाड्यवलोकनं बहुसंमतमिति भावः । अथ नामादौ

संयोगाक्षरे सति किं कर्तव्यमित्यपेक्षायामाह–युज्यादिवर्णादिति। युजि युक्तेऽक्षरे संयुक्ताक्षरे प्रद्युम्ने-त्यादिके नामादौ युक्ताक्षरे सति आदिवर्णात् प्रथमवर्णात् भं ज्ञेयं प्र पा प्रद्युम्ने नाम्नि प्रथमवर्णः प्रः तत्राप्याद्यः पकारस्तस्माद्भं ज्ञेयमित्यर्थः । प्रियवचनेत्यादौ पिकार एव द्रुपदेत्यादौ दुकार एव ग्राह्य इत्यादि स्वरशास्त्रे संयोगाक्षरजे नाम्नि ज्ञेयं तत्रादिमाक्षरमिति । अथावकहडचक्रे नामाद्यक्षाराभावे सति किं कर्तव्यमित्यपेक्षायामाह–बवौ तुल्यावत्र शसौ खषाविति । अत्रावकहडचक्रे बवौ इति इमा वर्णौ तुल्यौ तथा च शसौ शिव इति नाम्नि सति अवकहडचक्रे शकारस्याभावात् शकारस्थाने सकारांगीकाराद्भं ज्ञेयमितिभावः । एवमेव खषौ परस्परसवर्णौ ज्ञात्वा भं ज्ञेयं । तथा च स्वरशास्त्रे। खषौ शसौ बवौ चैव ज्ञेयाविति परस्परमिति । अन्यच्च । न प्रोक्ता ङञणा वर्णा नामादौ संति ते न हि। चेद्भवंति तथा ज्ञेया गजडास्ते यथाक्रममिति । चक्रं शतपदं वक्ष्ये ऋक्षांशाक्षरसंभवमिति ॥ स्वरशास्त्रोक्तमवकहडचक्रं प्रसिद्धं । अथ यस्य बहूनि नामानि संति तस्य कस्मान्नाम्नो भं ज्ञेयमित्याकांक्षायामाह–यदभिदा बह्वयोऽस्य नामांतिममिति । यस्य अभिधा नामानि बह्वयो भवंति तस्यांतिमं पश्चाद्भवं नाम ग्राह्यं । तथा च स्वरशास्त्रे । बहूनि यस्य नामानि नरस्य स्युः कथंचन। तस्य पश्चाद्भवं नाम ग्राह्यं स्वरविशारदैरिति ॥ अथ जन्मनक्षत्रं येषु शस्तं तान्याह–आर्या इति । उद्वहने पुरुषविवाहे जनुर्भं जन्मनक्षत्रं अमलं निर्दूषणं जगुः । तथा पट्टस्य बंधे पट्टबंधने गेहं गृहकरणप्रवेशनं तथा ग्रामो ग्रामप्रवेशनं नृपाभिषेको राजाभिषेकः कृषिः प्रसिद्धा मौंजी प्रसिद्धा अन्नाशनं नवान्नप्राशनं भूषणं भूषणधारणं एषां समाहारस्तस्मिन् जन्मभं शुभदं जगुः। तथा च ज्योतिःप्रकाशे । जन्मभं कृषिनृपाभिषेचने भूषणे नगरगेहकर्मणि । आधिपत्यभुवि मौंजिबंधने पुंविवाह उदितं शुभं बुधैरिति ॥ राजमार्तंडे । वसंतसमये दद्यादब्दे गर्भाष्टमेऽष्टमे । मेखलां जन्ममासेऽपि जन्मभे च तिथावपीति ॥ नारदः । पट्टबंधनचौलान्नप्राशने चोपनायने। शुभदं जन्मनक्षत्रमशुभं त्वन्यकर्मणीति ॥ ५५ ॥ इति स्वकृतमुहूर्तमार्तंडटीकायां मार्तंडवल्लभायां विवाहप्रकरणं समाप्तम् ॥

टीकार्थ—मेलनाचें कार्य करण्याकारितां नावाचें आद्याक्षर ज्ञान होण्याचें अवकहड चक्र सांगतो–"चू चे चो-ला अश्विनी" असे श्लोक आहेत, त्या शंभर पदांचें एक चक्र आहे, याचें पहिल्या अक्षरा वरून तें जाणावें. जसें कीं, कोणा-चें नांव चूडामणी असेल, तर त्याचें पहिलें अक्षर चू असें आहे, ह्मणून त्याचें नक्षत्र अश्विनी असें आहे व त्या नक्षत्राचा प्रथम चरण आहे असें जाणावें. तेंच दीपिका ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ज्याचें जन्म नक्षत्र माहीत नसेल त्याचें नाम पाहावयाचें असल्यास अवकहड नावाचें चक्र पाहावें. त्यांतील पहिलें अक्षर, ज्याच्या नावाचें पहिलें अक्षर असेल तर त्या नक्षत्राचा पहिला चरण, दुसरें अक्षर असेल तर दुसरा चरण, तिसरें अक्षर असेल तर तिसरा चरण, चवथें अक्षर असेल तर चवथा चरण असें जाणावें. कित्येकांचें मत असें आहे कीं, नाडी ज्ञान करून घ्यावयाचें असल्यास कृत्तिका नक्षत्रा पासून पाहावें. परंतु हें त्यांचें मत ग्रहण करण्यास योग्य नाहीं ह्मणून अश्विनी, भरणी, कृत्तिका हें प्रत्येक त्रिक उलटें केलें असतां नाडी पहावी असें बहु संमत आहे. आतां नामाचें आरंभीचें पहिलें अक्षर जोडाक्षर असेल तर काय करावें, अशी शंका-आली असतां; तिचें निवारण सांगतो–जर नावाचे आरंभीं जोडाक्षर असेल तर त्यांतील जें पहिलें अक्षर असेल तें घ्यावें. जसें कीं, प्रद्युम्न ह्याचें पहिलें अक्षर पकार हें घ्यावें आणि त्यापासून नक्षत्र जाणावें, प्रियवचन नावांत पिकार घ्यावा, द्रुपद नावांत दुकारच घ्यावा, अशा रीतीनें स्वरशास्त्रांत आणि जोडाक्षर पहिलें अक्षर असेल तर तेथें पहिलें अक्षरच जाणावें. आतां अवकहड चक्रांत जर नावाचें पहिलें अक्षर नसेल तर काय करावें तें सांगतो–ब आणि व हे एकच समजा-वेत. श आणि स हे एक समजावेत, ख आणि ष हे एकच समजावेत. जसें कीं, शिव असें नाव असेल तर शकार हा अवकहड चक्रांत नाहीं ह्मणून शकाराचे बद्दल सकार घ्यावा आणि त्या पासून नक्षत्र जाणावें. अशाच रीतीनें ख आणि ष हे एकच समजावेत आणि हे वर्ण परस्पर सवर्ण जाणावेत. तेंच स्वरशास्त्रात सांगितलें आहे कीं, ख आणि ष, श आणि स, ब आणि व हे परस्पर सवर्ण समजावेत. दुसरें असें आहे कीं, ङ, ञ, ण, हे वर्ण नावाचे आरंभीं नाहींत ह्मणून ते वर्ण अवकहड चक्रांत सांगितले नाहींत, जर तशीं नांवें असतील तर ङचे बद्दल ग आणि ञचे बद्दल ज आणि णचे बद्दल ड असे अनुक्रमानें जाणावेत. हें अवकहड चक्र शंभर पदाचें आहे, हें नक्षत्राचे अंशाच्या अक्षरा पासून झालेलें आहे, हें स्वर शास्त्रात सांगितलें असून प्रसिद्ध आहे. आतां ज्या एकाला पुष्कळ नांवें असतात त्याला कोणत्या नांवावरून नक्षत्र जाणावें अशी आशंका आली असतां सांगतो कीं, ज्याचीं पुष्कळ नांवें आहेत त्याचें शेवटलें जें नांव असेल तें घ्यावें, आणि त्यावरून नक्षत्र जाणून बाकीचें राश्यादिक जाणावें. तेंच स्वर शास्त्रांत सांगितलें आहे कीं, ज्याचीं नांवें पुष्कळ

असतील त्यांची व्यवस्था कशी करावी, तर त्याचें शेवटलें नांव घेऊन त्याप्रमाणें नक्षत्रादिक जाणावें, असें स्वरशास्त्र जाणणारे सांगतात. आतां जन्म नक्षत्र हें कशाविषयीं प्रशस्त आहे तें सांगतो–पुरुषांच्या विवाहाविषयीं जन्म नक्षत्र निर्दोष आहे असें विद्वान् लोक सांगतात. तसेंच पट्टबंधनाविषयीं, गृह करणें आणि गृहप्रवेश, गावांत प्रवेश करणें, राज्याभिषेक, कृषिकर्म, मौंजीबंधन, नवान्नप्राशन, अलंकारधारण, इतक्या कार्याविषयीं जन्म नक्षत्र हें शुभकारक आहे, तसें ज्योतिः-प्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कृषि कर्मामध्यें, राज्याभिषेक करण्यामध्यें, अलंकारधारण करण्यामध्यें, नगर प्रवेशांत, गृह प्रवेशांत, घर करणें, मौंजीबंधन करणें, पुरुषाचा विवाह करणें इतक्या कार्यामध्यें जन्म नक्षत्र शुभकारक आहे असें सांगितलें आहे. राजमार्तंड ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, वसंतऋतूंमध्यें गर्भापासून आठव्या वर्षी, अथवा जन्मापासून आठव्या वर्षी, जन्ममासीं, जन्मनक्षत्रीं आणि जन्मतिथीवरही मौंजी बंधन करावें. नारद सांगतो कीं, पट्टबंधनाविषयीं, चौल संस्काराविषयीं, अन्नप्राशनाविषयीं, मौंजी बंधनाविषयीं जन्मनक्षत्र शुभकारक आहे. या शिवाय दुसऱ्या कार्याविषयीं जन्म नक्षत्र शुभकारक नाहीं ॥ ५९ ॥ अशा रीतीनें आपणच केलेल्या मुहूर्तमार्तंडाच्या मार्तंडवल्लभा टीकेचें विवाह प्रकरण समाप्त झालें.

अवकहड चक्र.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| चू, चे, चो, ला; | अश्विनी. | हु, हे, हो, डा; | पुष्य. | रू, रे, रो, ता; | स्वाती. | जू, जे, जो, खा; | अभि० |
| ली, लू, ले, लो; | भरणी. | डी, डू, डे, डो; | आश्लेषा. | ती, तू, ते, तो; | विशाखा | खी, खू, खे, खो; | श्रवण. |
| आ, ई, ऊ, ए; | कृत्तिका. | मा, मी, मू, मे; | मघा. | ना, नी, नू, ने; | अनुराधा. | गा, गी, गू, गे; | धनिष्ठा० |
| ओ, वा, वी, वू; | रोहिणी. | मो. टा, टी, टू; | पूर्वा. | नो, या, यी, यू; | ज्येष्ठा. | गो, सा, सी, सू; | शतता |
| वे, वो, का, की; | मृगशी. | टे, टो, पा, पी; | उत्तरा. | ये, यो, भा, भी; | मूळ. | से, सो, दा, दी; | पूर्वा |
| कु, घ, ङ. छ; | आर्द्रा. | पू, षा, णा, ठा; | हस्त. | भु, धा, फा, ढा; | पूर्वाषा. | दू, झा, ञा, थ; | उ. भा. |
| के, को, हा, ही; | पुनर्वसू. | पे, पो, रा, री; | चित्रा. | भे, भो, जा, जी; | उत्तरा. | दे, दो, चा, ची; | रेवती. |

॥ विवाह प्रकरण समाप्त ॥

## ॥ अग्न्याधान प्रकरणम् ॥ ५ ॥

अग्न्याधानमवादि दारसमये दायाद्यकाले परै- ।
र्द्वीशाग्निध्रुवशाक्रपुष्यमृगपौष्णैर्व्यब्जलग्नांशयोः ॥
जीवेंद्वर्ककुजैः सुत५र्द्धि३।६।११।१०नव९केंद्रस्थै१।४।७।१०रनस्तंगतैः ।
स्वोच्चेष्टर्क्षगतैः परैरुपचयैर्वित्ताद्यशुद्धौ बुधैः ॥ १ ॥

॥ इत्यग्न्याधानम् ॥

श्लोकार्थ—विवाहकाळीं अग्न्याधान करावें. दायविभागाच्या आरंभीं करावें, असें कित्येक आचार्यांनीं सांगितलें आहे. विशाखा, कृत्तिका, ध्रुवसंज्ञक, ज्येष्ठा, पुष्य, मृग, रेवती ह्या नक्षत्रांवर, मकराचें उत्तरार्ध, कुंभ, मीन, कर्क हीं जलचर लग्नें व नवांश सोडून चंद्र रहित अन्य लग्नीं व नवांशीं, अस्त न झालेले गुरु, चंद्र, रवि, मंगळ हे स्वगृहीं, उच्चस्थानीं, मित्रगृहीं असून ५।३।६।११।१०।९।१।४।७।१० ह्या स्थानीं असतां आणि इतर ग्रह ३।६।११।१० या स्थानीं असतां व द्वितीय स्थान आणि लग्न पापग्रह रहित असतां अग्न्याधान करावें असें पंडितांनीं सांगितलें आहे॥ १ ॥

अथाग्न्याधानं वृत्तेनैकेनाऽऽह–अग्न्याधानमिति । अग्नेराधानं बहुभिर्बुधैर्दारकालेऽवादि कथितं । चतुर्थीकर्मानंतरं दारकालः । परैराचार्यैर्दायाद्यकाले धनविभागकालेऽवादि । तथा च वृत्तशते । अग्न्याधानं दारकाले विधेयं कैश्चित्प्रोक्तं तच्च दायाद्यकाले इति । तथा च कात्यायनगृह्ये । आवसथ्याधानं दारकाले दायाद्यकाल एकेषामिति । एतद्भाष्यकारैरेवं व्यवस्थापितमभ्रातृमतो दारकाले भ्रातृमतो दायाद्यकाले प्रोक्तमिति । स्मृतिषु कृतदारस्याग्निना विना बहु-

दोषो दृश्यते । तथा हि । कृतदारो नैव तिष्ठेत्क्षणमत्यग्निना विना । तिष्ठन् स चेद्द्विजो व्रात्यस्तथा च पतितो भवेत् ॥ पितृपाकोपजीवो स्याद्भ्रातृपाकोपजीवकः । ज्ञानाध्ययननिष्ठो वा न दुष्येताग्निना विना ॥ यो नाग्निमुपसेवेत दारान्कामाहृतावपि ॥ पारदारी स विज्ञेयः स्वस्त्रीस्वीकरणादपि ॥ यथा स्नानं यथा संध्या वेदस्याध्ययनं यथा । तथैवोपासनं दृष्टं न स्थितिस्तद्वियोगत इत्यादि ॥ तस्मात्सूत्रकारैः कात्यायनादिभिः दारकाल एव बाहुल्येनोक्तं । अग्न्याधाननक्षत्राण्याह— कैः द्वीशाग्निध्रुवशाक्रपुष्यमृगपौष्णैः द्वीशं विशाखा अग्निः कृत्तिका ध्रुवाणि ऽयुत्तरारोहिण्यः शाक्रं ज्येष्ठा पुष्यमृगौ प्रसिद्धौ पौष्णं रेवती तैः । कयोः व्यब्जलग्नांशयोः विगताः अब्जा याभ्यां तौ व्यब्जौ तौ च तौ लग्नांशौ च तयोः अब्जा जलचरराशयः मकरस्य पश्चिमार्धं कुंभो मीनः कर्कटश्चैते जलचरा राशयः । चंद्रोऽपि जलज एते राहितयोर्लग्ननवांशयोरित्यर्थः । तथा च वृत्तशते । कर्किनक्रघटमीनविलग्ने वांऽशके तनुगतेऽथ तदीये । लग्नपे कुमुदिनीदयिते वा नाशमेति जनितोऽपि हुताश इति ॥ कैर्जीवेंद्वर्ककुजैः सुतर्द्धिनवकेंद्रस्थैः जीवो गुरुः इंदुश्चंद्रः अर्कः सूर्यः कुजो भौमः तैः सुतः पंचमं ऋद्धय उपचयभवनानि नव नवमं । केंद्राणि प्रथमचतुर्थसप्तमदशमानि ५।३।६।११।१०।९।१।४।७।१०। एतत्स्थानगतैः । कथंभूतैः अनस्तंगतैः सूर्यकिरणैरलुप्तैः । पुनः कथंभूतैः स्वोच्चेष्टर्क्षगतैः स्वश्च उच्चानि च इष्टाश्च एषां ऋक्षाणि राशयस्तद्गतैः स्वराश्युच्चराशिमित्रराशिगतैरित्यर्थः । परैरुक्तेभ्योऽन्यग्रहैः उपचयैः त्रिषडेकादशदशमगैः कस्यां सत्यां वित्ताद्यशुद्धौ सत्यां वित्तं द्वितीयमाद्यं लग्नं तयोः शुद्धिः क्रूरराहित्यं तस्यां सत्यां । शेषं पूर्ववत् प्रायश्चंद्रमित्युक्तमवलोक्यं । तथा च वृत्तशते । केंद्रक्षौपचयत्रिकोणभगताः सूर्यारजीवेंदवः शेषाश्चोपचयास्थिता यदि तदाऽग्न्याधानमुक्तं शुभं । चंद्रे नैधनगे म्रियेत युवतिर्भौमे पुमानष्टमे शेषैर्मृत्युगतै रुजा च सहितोऽग्न्याधानकर्ता भवेत् ॥ नोकुर्याद्धुतभुक्परिग्रहमिह क्ष्मापुत्रजीवेंदुभिर्नीचस्थैर्विजितै रिपोर्भवनगैरस्तंगतैर्वा द्विजैरिति । तथा च संहितासारे । अग्न्याधानं न कुर्वीत कर्किनक्रत्रये विधौ । लग्नगे धनगे पापे तथा रंध्रग्रहान्वित इति ॥ १ ॥ इति मु॰मा॰टी॰ मार्तंडवल्लभायामग्न्याधानप्रकरणम् ॥

**टीकार्थ**—अग्न्याधान एका वृत्तानें सांगतो—पुष्कळ पंडितांनीं अग्नीचें आधान विवाहाचे वेळेस करावें असें सांगितलें आहे. चतुर्थी कर्मानंतर दारकाळ सांगितला आहे. दुसऱ्या कित्येक आचार्यांचें असें मत आहे कीं, धनाचा विभाग होतो त्या वेळेस अग्नीचें आधान करावें. तेंच वृत्तशत ग्रंथांत सांगितलें आहे कीं, विवाहाचे वेळीं अग्न्याधान करावें अथवा धनाचा विभाग करावयाचे वेळेस अग्न्याधान करावें. तेंच कात्यायन गृह्यांत सांगितलें आहे कीं, विवाहकाळीं अग्न्याधान करावें अथवा कित्येकांच्या मतानें धनविभागाचे काळीं अग्न्याधान करावें असें आहे. ह्या दोहोंची व्यवस्था भाष्यकारांनीं अशी केली आहे कीं, ज्याला बंधु नाहींत, त्यानें विवाहाचे वेळीं अग्न्याधान करावें आणि ज्याला बंधु आहेत, त्यानें धनाची वाटणी करण्याचे वेळेस अग्न्याधान करावें. स्मृति ग्रंथामध्यें लग्न करून जर अग्नीचें आधान केलें नसेल तर त्याला फारच दोष सांगितला आहे. तेंच सांगतो कीं, विवाह केलेल्या द्विजानें एक क्षणभर सुद्धां अग्न्याधानाशिवाय राहूं नये, जर तो द्विज अग्न्याधानाशिवाय राहील तर तो व्रात्य ह्मणजे संस्कार बाह्य होतो आणि तो पतित ह्म॰ ज्ञातीचे बाहेर होतो. अथवा बापाचे घरीं बापाच्याच स्वयंपाकानें भोजन करणारा अर्थात् बाप आणि आपण एकत्र जेवणारा हा एक, आणि भावांच्या घरीं राहून त्यांच्या पाकानेंच जेवणारा अर्थात् दोघे एकत्र राहाणारे असे हा दुसरा, आणि ज्ञानाकरितां अध्ययन करण्यांत तत्पर राहणारा असा हा तिसरा, असे हे तिघे जण अग्न्याधान नसेल तर दूषित होत नाहींत. जो अग्नीची उपासना करीत नाहीं, तशीच ऋतु कालींही स्त्रीसंग करीत नाहीं, तो स्त्री असून परदारांबरोबर गमन करण्यापासून होणाऱ्या पापाचा भागी आहे असें समजावें. जसें स्नान, जशी संध्या, जसें वेदाध्ययन, तसेंच अग्न्याधान ह्म॰ अग्नीचें उपासन सांगितलें आहे. तें न केल्यास स्थिति बरोबर होत नाहीं. ह्मणून सूत्रकार कात्यायनादिकांनीं विवाहाचे वेळेसच अग्न्याधान सांगितलें आहे. आतां अग्न्याधानाचीं नक्षत्रें सांगतो—द्वीश ह्म॰ विशाखा, अग्नि ह्म॰ कृत्तिका, ध्रुव ह्म॰ तीन उत्तरा ह्म॰ उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, उत्तराफाल्गुनी, आणि रोहिणी हीं चार नक्षत्रें, शाक्र, ह्म॰ ज्येष्ठा, पुष्य, मृग, पौष्ण ह्म॰ रेवती ह्या नक्षत्रांवर अग्न्याधान करावें, तसेंच जलचरराशी ज्या लग्नावर व त्यांच्या नवांशावर नसतील असें लग्न व नवांश घ्यावेत. आतां जलचर राशी कोणत्या तें सांगतों—मकराचा पश्चिमार्ध, कुंभ, मीन, कर्क हे जलचर आहेत, तसाच चंद्र हाही जलचर आहे. जलचरांनीं रहित अशा लग्नावर व लग्न नवांशावर अग्न्याधान करावें. तेंच वृत्तशतग्रंथांत सांगितलें आहे कीं, कर्क, मकर, कुंभ, मीन हे लग्नीं असतां अथवा लग्नाचे नवांशावर असतां अथवा कुमुदिनीनायक ह्म॰ चंद्र हा लग्नीं असतां जर अग्न्याधान केलें तर तो उत्पन्न झालेलाही अग्नि नाश पावतो. त्याप्रमाणें गुरु, चंद्र,

सूर्य, मंगळ इतके ग्रह सुत ह्म० पंचमस्थान ६ ऋद्धि ह्म० उपचयस्थान ह्म० ३-६-११-१० आणि ९ स्थान व केंद्र ह्म० १-४-७-१० इतक्या स्थानीं असून ते अस्तंगत नसावेत ह्मणजे सूर्याच्या किरणांनीं त्यांचा अस्त नसावा. आणि हे ग्रह आपल्या स्वगृहीं, आपल्या उच्चस्थानीं, आपल्या मित्रगृहीं असतां अग्न्याधान करावें, वर सांगितलेल्या ग्रहांशिवाय जे दुसरे ग्रह आहेत ते उपचय स्थानीं ह्म० ३-६-११-१० इतक्या स्थानीं असतां आणि लग्न व वित्त ह्मणजे द्वितीयस्थान ह्या दोहोंची शुद्धि असतां ह्मणजे या दोन स्थानावर क्रूर ग्रह नसेल तर तशा वेळीं अग्न्याधान करावें, पूर्वी सांगितलेले आठवा चंद्र इत्यादि त्याज्य भाग टाकावा.तेंच वृत्तशत ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सूर्य, मंगळ, गुरु, चंद्र इतके ग्रह१-४-७-१०-३-६-११-९ इतक्या स्थानीं असावेत आणि बाकीचे ग्रह जर ३-६-११-१० ह्या स्थानीं असतील तर अग्न्याधान करणें शुभकारक आहे. चंद्र हा अष्टमस्थानीं असेल तर स्त्री मरण पावेल, मंगळ अष्टमस्थानीं असेल तर पुरुष मरण पावेल. बाकीचे ग्रह जर अष्टमस्थानीं असतील तर अग्न्याधान करणाऱ्यास रोगाची पीडा होईल. मंगळ, गुरु, चंद्र हे नीच स्थानीं असतां, अथवा शत्रूचें घरीं असतां, किंवा अस्तंगत असतां अग्न्याधान करूं नये. तेंच संहितासार ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कर्क नक्र, कुंभ, मीन, हे लग्नीं असतां, चंद्र लग्नीं असतां. पापग्रह लग्नीं असतां, द्वितीय स्थानीं पापग्रह असतां, अग्न्याधान करूं नये ॥ १ ॥

॥ इति अग्न्याधान प्रकरण समाप्त ॥

---

# ॥ वास्तुप्रकरणम् ॥ ६ ॥

## ग्रामविचार.

**नामर्क्षाद्द्विसुतांकदिग्भवगतोग्रामः शुभोऽन्योऽन्यथा ।**
**तत्कोणेंऽत्यभुवां शुभं निवसतां दोषाः परेषामलम् ॥**
**कन्याकर्किधनुस्तुलाक्रियघटाः कौर्प्याडजो याम्यतो ।**
**मध्येऽन्येन वसंत्यथैंद्रककुभो वर्गाः स्युरोजस्विनः ॥ १ ॥**

श्लोकार्थ—घर बांधणाराच्या नांवाची व ज्या गांवांत घर बांधावयाचें त्याच्या नांवाची राशि कोणती हें अवकहडा चक्रावरून काढावें, गृहकर्त्याच्या नामराशि पासून २।५।९।१०।११ इतकी गांवाची नामराशि असल्यास तो गांव शुभ होय. अन्यथा अशुभ जाणावा. रजक, चर्मक, बुरुड इत्यादिकांला ग्रामकोणीं रहाणें शुभ, इतरांला अशुभ होय. दक्षिण दिशेपासून आठ दिशांला क्रमानें कन्या, कर्क, धन, तूळ, मेष, कुंभ, वृश्चिक, मीन ह्या ज्यांच्या राशि असतील त्यांनीं राहूं नये. वृषभ, मिथुन, सिंह, मकर ह्या ज्यांच्या राशि असतील त्यांनीं गांवाच्या मध्यें राहूं नये. अ. क. च. ट. त. प. य. श हे आठ वर्ग पूर्वे पासून आठ दिशेला बलवान होत ॥ १ ॥

**अथ गृहप्रकरणं विवक्षुस्तावद्ग्रामविचारमाह—नामर्क्षेति । नामर्क्षाद्ग्रामराशेः सकाशात् द्वि२सुतां५क९दिग्१०भव११गतो ग्रामः शुभः स्यात् । अन्य उक्तविपरीतो ग्रामोऽन्यथा स्यादशुभः स्यादित्यर्थः । तदुक्तं ज्योतिःसागरे । एकभे सप्तमे ग्रामे वैरं हानिस्त्रिषष्ठगे । तुर्याष्टद्वादशे रोगः शेषस्थाने सुखं भवेदिति ॥ एवं ग्रामं शुभाशुभमभिधायेदानीं ग्रामदिङ्नियममाह—तत्कोण इति । तत्कोणे तस्य ग्रामस्य कोणेंऽत्यभुवां रजकचर्मकारादीनां निवसतां वसतिं कुर्वतां शुभं स्यात् । रजकश्चर्मकश्चैव नटो बुरुड एव च । कैवर्तमेदभिल्लाश्च सप्तैते अंत्यजाः स्मृताः ॥ इत्यादीनां ग्रामकोणे शुभं स्यादित्यर्थः । तत्कोणे निवसतां परेषां वर्णानामलमत्यर्थं दोषाः स्युरशुभानि स्युरित्यर्थः । तथा च ज्योतिर्निबंधे । भवनपुरग्रामाणां ये कोणास्तेषु निवसतां दोषः । श्वपचादयोऽत्यजाद्यास्तेष्वेव विवृद्धिमायांति ॥ एवं जातीनां शुभाशुभदिग्विभागमुक्त्वा राशिपरत्वेन दिक्षु वसतिमाह—कन्येति । यमाशादितः दक्षिणस्याः सकाशात् क्रमेणाष्टासु दिक्षु कन्याकर्किधनुस्तुलादयो राशयो न वसंति अन्ये उर्वरिता मध्ये न वसंति । एतदुक्तं भवंति । अभीष्टं ग्रामं नवभागं परिकल्प्य मध्यभागदक्षिणभागे कन्या न वसति कन्याराशिना दक्षिणभागे गृहं न कार्य-**

मित्यर्थः । तथैव नैर्ऋते कर्कटः पश्चिमे धनुर्वायव्ये तुला उत्तरेऽजो मेष ईशान्यां घटः कुंभः पूर्वे कौर्पी वृश्चिक आग्नेयेऽडजो मीनः न वसंति अन्ये वृषमिथुनसिंहमकरा मध्यभागे न वसंति । एवं राशिपरत्वेन दिङ्नियममुक्त्वेदानीं वर्गपरत्वेन दिङ्नियममाह–अथेति । इंद्रककुभः सकाशादष्टसु दिक्षु अप्रमुखा अष्टौ वर्गा अकचटतपयशा इत्येते प्रसिद्धा ओजस्विनो बलवंतः स्युरित्युक्तश्लोकेनान्वयः ॥ १ ॥

टीकार्थ—आतां गृह प्रकरण सांगण्याच्या इच्छेनें अगोदर गांवाचा विचार सांगतो–नामावरून जी राशि आली असेल, त्या राशीपासून गांवाच्या नांवाची जी राशी असेल ती २–५–९–१०–११ ही राशी येईल, तर तो गांव घर बांधण्यास शुभकारक आहे. ह्या सांगितलेल्या राशी वांचून दुसऱ्या प्रकारचा गाव असेल तर तो अशुभ समजावा. तेंच ज्योतिःसागर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, गांवाची आणि घर बांधणाराची जर एक राशी येईल. अथवा बांधणाराच्या राशीपासून गावाची राशी सातवी येईल तर घर बांधण्यापासून वैर होईल, गांवाची राशी तिसरी आणि सहावी येईल तर ह्यानि होईल. गावाची राशी चवथी, आठवी, आणि बारावी येईल तर रोग होईल.अर्थात् बाकीच्या राशी सुखकारक आहेत. ह्मणजे २–५–९–१०–११ ह्या राशी शुभकारक आहेत. अशा रीतीनें गांवाचें शुभ आणि अशुभ सांगून आतां गांवाच्या दिशेचा नियम सांगतो–त्या गावाचे कोणामध्यें अंत्यजाची ह्मणजे धोबी, चांभार इत्यादिकांची वसति केली असतां त्यापासून शुभ होतें. धोबी, चांभार, नट, बुरूड, कैवर्त, मेद, आणि भिल्ल इतके हे सात अंत्यज ह्मणजे चांडाळ आहेत. असें समजावें. ह्या सात प्रकारच्या अंत्यजांशिवाय इतर वर्णांनीं जर कोणामध्यें वसति केली तर त्या वर्णांना अशुभकारक आहे. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, नगराचे कोणांत जर श्रेष्ठ वर्ण राहातील तर त्यांनां फारच अशुभ होतें. परंतु त्या कोणामध्यें चांभार, चांडाळ इत्यादि राहातील तर त्यांनांच तो कोण शुभकारक होतो. ह्मणजे त्या कोणांत तेच चांडालादिक वृद्धि पावतात. अशा रीतीनें जातीचे शुभ आणि अशुभ असे दिशेचे विभाग सांगून राशीवरून दिशेचे विभाग सांगतों–कन्या, कर्क, धन, तूळ, मेष, कुंभ, वृश्चिक, मीन ह्या ज्यांच्या राशी असतील त्यानीं दक्षिणादि आठ दिशेपर्यंत क्रमानें राहूं नये. ह्मणजे कन्या राशी असणाऱ्यानें दक्षिणेस राहूं नये. कर्क राशीच्यानें नैर्ऋत्येस राहूं नये. धन राशीच्यानें पश्चिमेस राहूं नये. तुला राशीच्यानें वायव्य दिशेस राहूं नये. मेष राशीच्यानें उत्तरेस राहूं नये. कुंभ राशीच्यानें ईशान्य दिशेस राहूं नये. वृश्चिक राशीच्यानें पूर्वेस राहूं नये. मीन राशीच्यानें आग्नेय दिशेस राहूं नये. ह्या शिवाय बाकीचे वृष, मिथुन, सिंह, मकर, इतक्या राशीच्यांनीं मध्यभागीं राहूं नये. अशा रीतीनें राशीवरून दिशेचा नियम सांगून आतां वर्गावरून दिशेचा नियम सांगतो–पूर्व, आग्नेयी, दक्षिण, नैर्ऋत्य, पश्चिम, वायव्य, उत्तर, ईशान्य ह्या आठ दिशांना क्रमानें अ, क, च, ट, त, प, य, श, हे आठ वर्ग बलवान आहेत असें समजावें ॥ १ ॥

### काकिणी व भूमीचे वर्ण, रस आणि गंध

**अष्टावप्रमुखाः स्वपंचमपराद्विषः स्ववर्गोऽन्ययुक् ।**
**तष्टः काकिणिका गजैर्मिथ इमा यस्याधिकाः सोऽर्थदः ॥**
**श्वेतारक्तकपीतकृष्णवसुधाः स्वादुः कटुस्तिक्तकाः ।**
**काषाया घृतशोणितान्नमदिरागंधाः शुभा विप्रतः ॥ २ ॥**

श्लोकार्थ—अ. क. च. ट. त.प. य. श ह्या आठ वर्गांत प्रत्येका पासून पांचवा तो त्याचा शत्रु असतो. जसा अवर्गाचा तवर्ग शत्रु; कवर्गाचा पवर्ग शत्रु इ० आपल्या वर्गाच्या दिशेला किंवा तिच्या जवळच्या दिशेला घर बांधावें. शत्रुवर्गाच्या दिशेला अगर तिच्या जवळच्या दिशेला घर बांधूं नये. गृहकर्त्याच्या वर्गाचा ग्रामवर्ग शत्रु नसावा. गृहकर्त्याच्या वर्गाची दुप्पट करून तींत ग्रामवर्ग मिळवून ८ नीं भागावें, बाकी राहील त्या गृहकर्त्याच्या काकिणी होतात. ग्रामवर्गाची दुप्पट करून तींत गृहकर्त्याचा वर्ग मिळवून ८ नीं भागावें बाकी त्या ग्रामाच्या काकिणी होतात. ज्याच्या अधिक तो कमी असणाराला द्रव्य देतो. अर्थात् गृहकर्त्याच्या काकिणी कमी असाव्या. ब्राह्मणाला शुभ्रवर्णाची, मधुर रसाची, व घृतासारख्या सुगंधाची; क्षत्रियाला आरक्तवर्णाची, कटु ह्म० तिखट रुचीची व रक्ताप्रमाणें सुवासाची; वैश्याला पीतवर्णाची, तिक्त ह्म०कडू रुचीची व अन्नाप्रमाणें सुगंधाची; शूद्राला काळ्यारंगाची, काषाय ह्मणजे काढ्या सारख्या मिश्र रुचीची व मद्या प्रमाणें वासाची जमीन घर बांधण्याला शुभ जाणावी. मिश्र जातीला मिश्र रंगाची, मिश्ररुचीची व मिश्र सुवासाची जमीन शुभ होय ॥ २ ॥

अष्टाविति । एतदुक्तं भवति अआइईउऊइत्यादिकः षोडशाक्षरो वर्गः पूर्वस्यां बली कादिकः पंचाक्षर आग्नेय्यां चादिको दक्षिणस्यां टादिको नैर्ऋत्यां तादिकः पश्चिमायां पादिको वायव्यां यादिक उत्तरस्यां शादिक ईशान्यां बली । अयमर्थः । स्वनामादिमाक्षराद्वर्गं ज्ञात्वा स्वस्थाने गृहं कार्यमिति भावः । यतः स्वस्वस्थाने प्राणिनो बलवंत इति लोके प्रसिद्धं किंलक्षणा वर्गाः स्वपंचमपराः स्वेभ्यः पंचमाः परा वैरिणो येषां ते तथा । यथाऽवर्गस्य पंचमस्तवर्गः सोऽस्य वैरी कवर्गस्य पंचमः पवर्गः सोऽस्य वैरी एवं सर्वेषां वर्गाणां वैरिणो ज्ञातव्या वैरित्वं हि स्वामिवशेन । तदुक्तं भूपालवल्लभे । वर्गेशास्तार्क्ष्यमार्जारसिंहश्वसर्पमूषकाः । इभैणौ पूर्वतस्तेषां स्ववर्गात्पंचमो रिपुरिति ॥ तस्मात्स्ववैरिवर्गस्य दिशि गृहं न कार्यमिति भावः । अर्थादन्यत्र मध्यमं तत्रापि स्वदिग्वर्गासन्नं शुभं वैरिदिगासन्नमशुभमिति बुद्ध्या ज्ञेयमेवं स्ववर्गग्रामं वर्गयोर्मित्रारित्वमवलोक्य वासः कर्तव्य इति । सिद्धं तत्र राशिघटितवर्गघटितयोर्मध्ये राशिघटितं बलवत् । तदुक्तं ज्योतिःसागरे । केऽप्याहुरथ वर्गाणां स्वस्थाने शुभदं गृहमिति । अथवर्गघटिते काकिणिका आह—द्विघ्न इति । स्ववर्गो ग्रामवर्गः वसति कर्तुर्वर्गश्च द्विघ्नः द्विगुणितः कार्यः मिथोऽन्ययुगन्यवर्ग युक्कार्यः गजैरष्टभिस्तष्टः शेषितः सन् काकिणिकाः स्युः इमाः काकिणिका यस्याधिकाः सोऽर्थदो धनदाता स्यात् । एवं ग्रामदिङ्निग्रममुक्त्वेदानीं निर्माणे पत्तनग्रामक्षेत्रादीनां समंततः क्षेत्रमादौ परीक्षेत गंधवर्णरसप्लवैरित्युक्तत्वात् । तावद्वर्णपरत्वेन भूमेर्वर्णरसगंधान् वृत्तार्धेनाऽऽह—श्वेतेति । श्वेतारक्तकपीतकृष्णवसुधा विमतो ब्राह्मणात्सकाशात् वर्णानां शुभाः शोभनाः स्युः श्वेतवसुधा पृथ्वी ब्राह्मणस्याऽऽरक्तवसुधा क्षत्रियस्य पीतवसुधा वैश्यस्य कृष्णवसुधा शूद्रस्य शोभनेति । अर्थात् मिश्रजातीनां मिश्रा शोभना । तथा च वसिष्ठः । श्वेता शस्ता द्विजेंद्राणां रक्ता भूमिर्महीभुजां । विशां पीता च शूद्राणां कृष्णाऽन्येषां च मिश्रितेति । एवं वर्णमुक्त्वेदानीं रसमाह—स्वादुरिति । स्वादुर्मधुरा वसुधा ब्राह्मणस्य शोभना कटुर्मरीचरसा क्षत्रियस्य तिक्तका निंबरसा वैश्यस्य काषाया हरीतकी रसा शूद्रस्य शोभनेति । अर्थान्मिश्राणां मिश्रा शोभना । तथा च नारदः । मधुरं कटुकं तिक्तं कषायश्च रसाः क्रमात् ॥ एवं रसानुक्त्वा गंधानाह—घृतेति । घृतगंधा ब्राह्मणस्य शोणितगंधा रक्तगंधा क्षत्रियस्यान्नगंधा वैश्यस्य मदिरागंधा मद्यगंधा शूद्रस्य मिश्राणां मिश्रगंधा शुभेत्यर्थः । तथा चोक्तं कारिकायां । घृतासृगन्नमदिरागंधा च क्रमशो भवेदिति ॥ नानाग्रंथेषु रसगंधानां नानात्वं तद्विकल्पतो ग्राह्यं । तथा च नारदः । मधुपेरान्नविशितगंधवर्णानुपूर्वकं । मधुरं कटुकं तिक्तं कषायश्च रसाः क्रमात् ॥ पेरगंधा कषायगंधा । अन्यत्सुगमं । तथा च कारिकायां । घृतासृगन्नमद्यानां गंधा च क्रमशो भवेत् मधुरा स्यात्कषायाम्लकटुका चानुपूर्वशः इति ॥ २ ॥

टीकार्थ—अ आ इ ई उ ऊ इत्यादि सोळा अक्षरांचा जो वर्ग आहे, तो पूर्व दिशेस बलवान् आहे, कपासून पांच अक्षरांचा जो वर्ग आहे. तो आग्नेयी दिशेस बलवान् आहे. चपासून पांच अक्षरांचा जो वर्ग आहे तो दक्षिण दिशेस बलवान् आहे, ट पासून पांच अक्षरांचा जो वर्ग आहे तो नैर्ऋत्य दिशेस बलवान् आहे. त पासून पांच अक्षरांचा जो वर्ग आहे तो पश्चिम दिशेस बलवान् आहे. प पासून पांच अक्षरांचा जो वर्ग आहे तोच वायव्य दिशेस बलवान् आहे. य पासून जो वर्ग आहे तो उत्तर दिशेस बलवान् आहे. श पासून जो वर्ग आहे तो ईशान्येस बलवान् आहे ह्याचा अर्थ असा कीं,आपल्या नावाच्या पहिल्या अक्षरापासून कोणता वर्ग आहे तें जाणून आपल्या स्थानीं घर करावें, कारण आपआपल्या स्थानीं प्राणी मात्र बलवान् असतात. ते वर्ग असे आहेत कीं, आपल्यापासून पांचवा वर्ग हा वैरी असतो. जसें अ-क-च-ट-त-प-य-श ह्या आठ वर्गांमध्यें अ वर्गाचा वैरी तवर्ग आहे. तसाच क वर्गाचा वैरी पवर्ग आहे अशा रीतीनें आपल्यापासून पांचवा वर्ग वैरी समजावा. वैरीपणा हा त्या वर्गाच्या स्वामीपणावरून ओळखावा. तेंच भूपाल वल्लभ ग्रंथांत सांगितलें आहे कीं, वर्गाचे स्वामी अनुक्रमानें गरुड, मांजर, सिंह, कुत्रा, सर्प, उंदीर, हत्ती, हरिण असे स्वामी आहेत ह्मणून आपल्या वैऱ्याचा जो वर्ग असेल त्याच्या दिशेस घर करूं नये. अर्थात् दुसरे ठिकाणीं घर करणें मध्यम आहे. त्यामध्येंही आपल्या दिशेच्या वर्गाजवळचें फारच शुभ आहे. वैऱ्याच्या दिशेजवळचें फारच अशुभ आहे. अशा रीतीनें बुद्धीनें जाणून घ्यावें. अशाच रीतीनें आपल्या वर्गाचा व गांवच्या वर्गाचा जो मित्र आणि वैरी कोण आहे, तें पाहून वास करावा; असें सिद्ध झालें. त्यापैकीं राशीचें घटित आणि वर्ग घटित ह्या दोहोंमध्यें राशीचें घटित फारच बलवान् आहे. तेंच ज्योतिःसागर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कितीएक असें सांगतात कीं, वर्गाचा आपल्या स्थानीं घर करणें हें शुभकारक आहे. आतां वर्गामध्यें सांगितलेल्या काकिणीका सांगतो—घर करणाऱ्याच्या वर्गाची दुप्पट

करून तींत ग्रामवर्ग मिळवावा आणि त्याला आठानीं भागावें, बाकी राहील त्या घर करणाऱ्याच्या काकिणी होतात. ग्राम वर्गाची दुप्पट करून तींत गृह करणाऱ्याचा वर्ग मिळवून त्याला आठानीं भागावें, बाकी राहील त्या ग्रामाच्या काकिणी समजाव्यात. ह्या काकिणी ज्याच्या अधिक होतील तो कमी असणाराला द्रव्य देतो अर्थात् घर करणाऱ्याच्या काकिणी कमी असाव्यात. अशा रीतीनें गावाच्या दिशेचा नियम सांगितला, आतां निर्माण करण्याविषयीं शहर, गांव, क्षेत्र इत्यादिकांच्या आसपास क्षेत्र कसें आहे त्याची परीक्षा, गंध, वर्ण, रस, आणि ह्लव ह्यांनीं करावी, असें सांगितलें आहे. अगोदर ब्राह्मणादिक चार वर्णांच्या क्रमानें पृथ्वीचा वर्ण, रस, गंध हे अर्ध्या वृत्तानें सांगतो—ब्राह्मणाला पांढरी पृथ्वी उत्तम समजावी. क्षत्रियाला लाल वर्णाची पृथ्वी उत्तम जाणावी; वैश्याला पीतवर्णाची पृथ्वी उत्तम असें जाणावें. शूद्राला काळ्या रंगाची पृथ्वी असावी अर्थात् चार वर्णांशिवाय बाकीच्या मिश्र जातीच्या लोकांनां सफेत असावी. तेंच वसिष्ठ सांगतो कीं, ब्राह्मणांनां श्वेत वर्णाची प्रशस्त, क्षत्रियांनां लाल वर्णाची प्रशस्त, वैश्यांनां पिंवळ्या वर्णाची प्रशस्त, शूद्रानां काळ्या वर्णाची प्रशस्त, ह्या शिवाय इतरांना मिश्र वर्णाची पृथ्वी प्रशस्त आहे. अशा रीतीनें वर्ण सांगून आतां रस सांगतो—ब्राह्मणाला मधुर रसाची पृथ्वी प्रशस्त आहे, क्षत्रियाला तिखट रसाची पृथ्वी प्रशस्त आहे. वैश्याला निंबरसाची पृथ्वी प्रशस्त आहे. शूद्रांनां तुरट रसाची पृथ्वी प्रशस्त आहे. अर्थात् मिश्र जातीच्यांनां मिश्र रसाची पृथ्वी प्रशस्त आहे. तेंच नारद सांगतो कीं, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार वर्णांनां क्रमानें मधुर, कटुक, तिक्त, कषाय असे रस प्रशस्त आहेत. अशा रीतीनें रस सांगितले. आतां गंध सांगतो—ब्राह्मणाला तूपा सारख्या वासाची पृथ्वी श्रेष्ठ आहे. क्षत्रियाला रक्ता सारख्या गंधाची पृथ्वी श्रेष्ठ आहे. वैश्याला अन्नाच्या सारखा गंध असलेली पृथ्वी श्रेष्ठ आहे. शूद्राला मद्या सारखा गंध असलेली पृथ्वी श्रेष्ठ आहे. इतर संकर जातींनां मिश्र गंधाची पृथ्वी श्रेष्ठ आहे. तेंच कारिकेंत सांगितलें आहे कीं, ब्राह्मणादि चार वर्णांनां क्रमानें तूप, रक्त, अन्न आणि मद्य ह्यांच्या सारख्या पृथ्वी श्रेष्ठ आहेत. नाना प्रकारच्या ग्रंथामध्यें रस आणि गंध हे नाना प्रकारचे आहेत ह्मणून त्याप्रमाणें विकल्प समजावा. तेंच नारद सांगतो कीं, मधु, कषाय, अन्न, पिशित ह्यांच्या गंधा सारखी पृथ्वी क्रमानें चार वर्णांनां श्रेष्ठ आहे. मधुर, कडु, तिखट, कषाय, हे रसही चार वर्णांनां क्रमानें श्रेष्ठ जाणावेत. तेंच कारिकेंत सांगितलें आहे कीं, तूप, रक्त, अन्न, मद्य ह्यांचा गंध असलेली पृथ्वी क्रमानें ब्राह्मणादिकांनां श्रेष्ठ असें जाणावें. मधुर, कषाय, आंबट, कडु ह्याप्रमाणे वर्णांच्या क्रमानें जाणावें ॥ २ ॥

### भूमिनियम व शल्यज्ञान.

**सौम्यादिप्लवभूतले विरचयेद्विप्रादिकोऽग्र्योऽखिले ।**
**नान्येषां नियमोऽत्र यत्र निखिलाः कुर्युर्गृहं हृत्स्थिरम् ॥**
**सद्मप्रश्नकृतो मुखात्प्रथमतो वर्गादिवर्णोद्गम- ।**
**श्चेत्तद्दिग्गतमादिशेत्तु हपयैः शल्यं सुधीर्मध्यतः ॥ ३ ॥**

श्लोकार्थ—ब्राह्मणानें उत्तरेकडे उतरत्या, क्षत्रियानें पूर्वेकडे उतरत्या, वैश्यानें दक्षिणेकडे उतरत्या आणि शूद्रानें पश्चिमेकडे उतरत्या जमिनीवर घर बांधावें. ब्राह्मणानें सर्व दिशेस उतरत्या जमिनीवर घर बांधावें असेंही आहे. इतरांला नियम नाहीं; तर ज्या ठिकाणीं मन रममाण होईल तेथें सर्वांनीं घर करावें. गृहाविषयीं प्रश्न विचारणाराच्या मुखांतून प्रथम जो वर्ण येईल तो अकटच इत्यादिकांत ज्या वर्गांत असेल त्या वर्गाच्या दिशेस घराच्या जमिनींत शल्य ( हाडें, कोंडा, कोळसे इ० ) आहे असें सांगावें. ह. प. य. हे वर्ण प्रथम आले असतां मध्यभागीं शल्य सांगावें ॥ ३ ॥

**एवं पृथ्वीवर्णादिकमभिधायेदानीं वर्णपरत्वेन भूप्लवत्वमाह—सौम्यादिषूत्तरादिषु दिक्षु प्लवो निम्नत्वं तस्य तद्व तद्भूतलं च तस्मिन्विप्रादिको ब्राह्मणादिको गृहं विरचयेत् एवं वर्णपरत्वेन-भूप्लवत्वमुक्त्वा ब्राह्मणस्य विशेषमाहाग्र्योऽखिल इति । अग्र्यो ब्राह्मणः अखिले सर्वप्लवे गृहं विरचयेत् । तथा च भृगुः । उदगादिप्लवमिष्टं विप्रादीनां प्रदक्षिणेनैव । विप्रः सर्वत्र वसेदनुवर्णमथेष्टमन्येषामिति । अथ पक्षांतरमाह—यत्रेति । निखिलाः सर्ववर्णास्तत्र गृहं कुर्युः तत्र कुत्र यत्र भुवि हृत् अंतःकरणं स्थिरं स्यात् अयमर्थः । यस्यां भूमौ अंतःकरणप्राशस्त्यं स्यात् तत्रैव गृहं कर्तव्यमित्यर्थः । तथा च वास्तुशास्त्रे । मनसश्चक्षुषो यत्र संतोषो जायते भुवि । तस्यां कार्यं गृहं सर्वैरिति गर्गादिसंमतमिति । अथ शल्यज्ञानं वृत्तार्धेनाऽऽह—सद्मप्रश्नेति । सद्मप्रश्नकृतः अत्र गृहं कर्तव्यमित्यादि गृह-**

प्रश्नकर्तुर्मुखाद्येद्यादि प्रथमतः वर्गादिवर्णोद्गमः स्यात् वर्गाणां प्रथमाक्षरोदयः स्यात् अकचटतपयशानामन्यतमाक्षरोद्गमः स्यात्तदा शल्यं तद्दिग्गतं तस्य वर्णस्य दिग्गतं सुधीः आदिशेत् शल्यमत्रास्तीति कथयेदित्यर्थः । एतदुक्तं भवति । गृहसंमितां भूमिं दक्षिणोत्तररेखाभिः समतया नवधा कृत्वा वर्गाद्यक्षरैः अकचटतपयशैरष्टभिः क्रमेणाष्टासु पूर्वादिदिक्षु शल्यमादिशेत् । अकारे प्रश्नाद्यक्षरे सति पूर्वस्यां दिशि शल्यमादिशेत् ककारे आग्नेय्यां चकारे दक्षिणस्यां इत्याद्यष्टसु दिक्षु अष्टभिरक्षरैरादिशेदित्यर्थः । तु पुनः हपयैस्त्रिभिरक्षरैर्मध्यतो मध्यकोष्ठे शल्यमादिशेत् हपयानां त्रयाणामक्षराणामन्यतमे प्रश्नाद्यक्षरे सति मध्ये शल्यमादिशेदित्यर्थः । तथा चोक्तं ज्योतिर्निबंधे । स्मृत्वेष्टदेवतां प्रष्टुर्वचनस्याद्यमक्षरं । गृहीत्वा तु ततः शल्या शल्यं सम्यग्विचार्यते ॥ अकचटतपयशा हपया वर्णाः पूर्वादिमध्यांताः । शल्यकरा इह नान्ये शल्यगृहे निवसतां नाश इति ॥ एतदेव स्पष्टं तत्रैवोक्तं । पृच्छायां यदि अः प्राच्यां नरशल्यं तदा भवेत् । सार्धहस्तप्रमाणेन तच्च मानुषमृत्युकृत् ॥ आग्नेय्यां दिशि कः प्रश्ने खरशल्यं करद्वये । राजदंडो भवेत्तत्र भयं नैव निवर्तते ॥ याम्यायां दिशि चः प्रश्ने कुर्यादाकटिसंस्थितं । नरशल्यं गृहेशस्य मरणं चिररोगतः ॥ नैर्ऋत्यां दिशि टः प्रश्ने सार्धहस्तादधःस्थले । शुनोऽस्थि जायते तत्र बालानां जनयेन्मृतिं ॥ तः प्रश्ने पश्चिमायां तु शिशोः शल्यं प्रजायते । सार्धहस्ते गृहस्वामी न तिष्ठति सदा गृहे ॥ वायव्यां दिशि पः प्रश्ने तुषांगाराश्चतुःकरे । कुर्वंति मित्रनाशं च दुःखप्रदर्शनं तदा ॥उदीच्यां दिशि यः प्रश्ने विप्रशल्यं कटेरधः । तच्छीघ्रं निर्धनत्वाय कुबेरसदृशस्य हि ॥ ईशान्यां दिशि शः प्रश्ने गोशल्यं सार्धहस्ततः । तद्गोधनस्य नाशाय जायते गृहमेधिनः ॥ हपया मध्यमे कोष्ठे वक्षोगात्रे भवेदधः । नृकपालमथो भस्म लोहं तत्कुलनाशकृदिति ॥ ३ ॥

**टीकार्थ**--अशा रीतीनें पृथ्वीचा वर्ण इत्यादिक सांगितलें. आतां वर्णाच्या क्रमानें पृथ्वीचा प्लव सांगतों--सौम्य ह्मणजे उत्तर इत्यादि दिशेकडे उतरत्या असलेल्या पृथ्वीतलावर ब्राह्मणादिकांनीं घर बांधावें जसें कीं, ब्राह्मणानें उत्तरेकडे उतरत्या पृथ्वीवर, क्षत्रियानें पूर्वेकडे उतरत्या पृथ्वीवर, वैश्यानें दक्षिणेकडे उतरत्या पृथ्वीवर आणि शूद्रानें पश्चिमेकडे उतरत्या पृथ्वीवर घर बांधावें. अशा रीतीनें ब्राह्मणादिकांना पृथ्वीचा उतरता कोणकोणत्या दिशेचा भाग घ्यावा असें सांगितलें. आतां ब्राह्मणाला विशेष सांगतों--ब्राह्मणानें कोणीकडेही उतरत्या अशा पृथ्वीतलावर घर बांधावें. तेंच भृगु सांगतो कीं, ब्राह्मणादिक वर्णांना उत्तरेपासून दक्षिण क्रमानें उतरती असलेली पृथ्वी घर बांधण्यास योग्य आहे. आणि ब्राह्मणाला पाहिजे तिकडे घर बांधण्यास हरकत नाहीं. आतां दुसरा पक्ष सांगतों--जेथें आपल्या मनाची प्रसन्नता असेल, तेथें सर्व वर्णांनीं घर बांधावें. ह्याचा अर्थ असा कीं, ज्या पृथ्वीवर आपलें मन प्रसन्न होईल तेथेंच घर बांधावें, तेंच वास्तु शास्त्रांत सांगितलें आहे कीं, ज्या भूमीवर मनाचा आणि नेत्राचा संतोष होतो त्याच भूमीवर सर्व वर्णांनीं घर बांधावें, असें गर्गादिकांचें मत आहे. आतां शल्यज्ञान अर्ध्या वृत्तानें सांगतों--येथें घर करावयाचें आहे, असा घराचा प्रश्न करणाऱ्याच्या तोंडांतून अगोदर निघालेलें अक्षर अ-क-च-ट-त इत्यादि आठ वर्गांपैकीं ज्या वर्गाचें असेल त्या वर्गाची जी दिशा असेल त्या दिशेस शल्य आहे असें बुद्धिवानानें सांगावें. ह्याचा अर्थ असा कीं, घराला जेवढी जमीन पाहिजे असेल तेवढी जमीन दक्षिण आणि उत्तर बाजूस रेखा काढून सारखेपणानें नव भाग करावेत. अ-क-च अशा ह्या आठ वर्गांच्या पहिल्या अक्षरानें क्रमानें पूर्वादि आठ दिशेस शल्य आहे असें जाणावें. जसें कीं, प्रश्नाचें पहिलें अक्षर अ असेल तर पूर्वेस शल्य सांगावें. ककार पहिलें अक्षर असेल तर आग्नेयी दिशेस शल्य आहे असें सांगावें. चकार पहिलें अक्षर असेल तर दक्षिण दिशेस शल्य आहे असें सांगावें. अशा रीतीनें आठ अक्षरांवरून आठ दिशेस शल्य आहे असें जाणावें, पुनः ह-प आणि य अशीं अक्षरें पहिलीं असतील तर मध्य कोष्ठामध्यें शल्य आहे असें जाणावें. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, आपल्या इष्ट देवतेचें स्मरण करून प्रश्न विचारणाऱ्याचे प्रश्नाचें आद्य अक्षर घेऊन त्यावरून शल्य आणि अशल्य ह्याचा उत्तम विचार करावा. अ-क-च-ट-त-प-य-श हे आठ वर्ग पूर्वादि आठ दिशांच्या क्रमानें समजावेत. ह-प-य हे तीन मध्यभागीं शल्य आहे असें सांगणारे आहेत. इतक्यां शिवाय दुसऱ्या दिशेस घर करणाऱ्यांचा नाश होतो. हेंच स्पष्ट रीतीनें तेथें सांगितलें आहे कीं, प्रश्न करतांनां जर प्रश्नाचें आद्य अक्षर अ हें असेल तर पूर्वेस नर शल्य आहे व तें दीड हात प्रमाणावर आहे तें मनुष्याचा नाश करणारें आहे, असें जाणावें. प्रश्नाचें आद्य अक्षर क असें असेल तर आग्नेयी दिशेस खर शल्य आहे आणि तें दोन हातांवर आहे तेथें राजदंड होईल व त्यापासून भय नाहींसें होणार नाहीं. अर्थात् निरंतर भय असतें. च असें आद्य अक्षर असेल तर दक्षिणेस नर शल्य आहे आणि तें कंबरेपर्यंत खोल आहे असें जाणावें, तेथें घराच्या मालकाचें मरण आहे असें जाणावें व तें मरण पुष्कळ दिवस रोग भोगून येईल. ट असें पहिलें अक्षर असेल

तर नैर्ऋत्य दिशेस कुत्र्याचें शल्य आहे व तें दीड हातावर आहे असें जाणावें त्यापासून बालकांना मरण प्राप्त होईल. त असें पहिलें अक्षर असेल तर पश्चिम दिशेस बालकाचें शल्य आहे आणि तें दीड हातावर आहे असें जाणावें. तेथें गृहाचा स्वामी नेहमीं राहाणार नाहीं. प असें आद्य अक्षर असेल तर चार हातांवर कोंडा आणि कोळसे आहेत असें जाणावें त्यापासून मित्रांचा नाश आणि दुष्ट स्वप्न पडणें हें होतें. य असें आद्य अक्षर असेल तर उत्तर दिशेस विप्र शल्य आहे आणि तें कंबरे पेक्षां खालीं खोल आहे; त्यापासून लवकर निर्धनत्व प्राप्त होतें. जरी मालक कुबेरासारखा श्रीमान् असेल तरी तो दरिद्री होतो. श असें आद्य अक्षर असेल तर ईशान्य दिशेस गो शल्य आहे असें जाणावें. तें दीड हातावर आहे असें जाणावें त्यापासून गोधनाचा नाश होतो. ह-प-य अशीं आद्य अक्षरें असतील तर मध्यभागीं छाती इतकें खोल नृकपाल आहे असें जाणावें व भस्म आहे असें जाणावें. त्यापासून त्याच्या कुलाचा नाश होतो ॥ ३ ॥

## भूमिपरीक्षा.

श्वभ्रं हस्तमितं खनेदिह जलं पूर्णं निशास्ये न्यसेत् ।
प्रातर्दृष्टजलं स्थलं सदजलं मध्यं त्वसत्स्फाटितम् ॥
ज्ञात्वैवं निखनेद्गृहाधिकभुवं नत्वा जलांतं स्तरो ।
यावद्वा पुरुषस्ततः कपिशिरस्तुल्याश्मभिः पूरयेत् ॥ ४ ॥

श्लोकार्थ—एक हात लांब, एक हात रुंद व एक हात खोल असा खळगा खणावा. त्यांत रात्रीच्या आरंभीं ह्मणजे सूर्यास्ताच्या वेळीं भरेपर्यंत पाणी घालावें, रात्र गेल्यावर प्रातःकाळीं त्या खळग्यांत कांहीं पाणी शिल्लक राहिलें तर तें स्थळ घराला शुभ समजावें. सर्व पाणी जिरलें असतां तें स्थळ मध्यम होय. खळग्यांतील जमीन फुटून भेगा पडल्यास तें स्थळ घराला अशुभ जाणावें. याप्रमाणें परीक्षा केल्यावर पूजा व नमस्कार करून, घर बांधावयाचें असेल त्यापेक्षां कांहीं अधिक जमीन पाणी लागेपर्यंत किंवा एक थर संपून दुसरा लागेपर्यंत अथवा एक पुरुष खोल खणावी. नंतर तो खळगा वानराच्या मस्तकाएवढ्या दगडांनीं भरावा ॥ ४ ॥

एवं शल्यमभिधायेदानीं स्थलस्य शुभाशुभज्ञानस्योपायमाह-श्वभ्रमिति । श्वभ्रं गर्तं हस्तमितं खनेदिहास्मिन् श्वभ्रे निशास्ये रात्रिमुखेऽर्थे सूर्यास्ते जलं पूर्णं न्यसेत् तच्चेद्यदि प्रातः सजलं स्यात् तदा तत्स्थलं सच्छुभं स्यात् वृद्धिकरं स्यात् । यदि अजलं गतजलं स्यात्तदा मध्यमं यदा स्फाटितं स्फुटितं स्यात्तदाऽसत् नानाविधहानिकरं स्यादित्यर्थः । तथा च नारदः । तथा निशादौ तत्कृत्वा पानीयेन प्रपूरयेत् । प्रातर्दृष्टजले वृद्धिः समं पंके व्रणे क्षय इति ॥ एवं शुभाशुभस्थललक्षणमभिधायेदानीं भूमिशोधनमाह-ज्ञात्वेति । एवमुक्तप्रकारैः स्थानं ज्ञात्वा गृहाधिकभुवं जलांतं यथा भवति तथा खनेत् गृहादधिका गृहाधिका सा चासौ भूश्च तथा तां कल्पितगृहात् किंचिदधिकां भूमिं जलपर्यंतं खनेदित्यर्थः । अधिकखननं शुद्धभूभागे भित्तिरचनार्थं वा इत्यथवा स्तरो यावत्तावत् खनेत् पृथ्वीगर्भे मृद्भेदानां स्तराः संति तत्रान्यस्तरपर्यंतं खनेदित्यर्थः । अथवा यावत्पुरुषस्तन्मितं वा पुरुषमात्रं खनेत् इदं शक्त्यपेक्षया ज्ञातव्यं पुरुषप्रमाणं पंचारत्नयः । तथा च शुल्बं । पंचारत्निर्दशावितस्तिर्विंशतिशतांगुलः पुरुष इति पंचारत्न्यादयः पुरुषपर्यायाः । किं कृत्वा नत्वा नमस्कृत्य खनेदित्यर्थः । ततस्तदनंतरं तत्खातं कपिशिरस्तुल्याश्मभिः वानरशिरःप्रमाणैः ग्रावाणैः पूरयेत् पूर्णं कुर्यात् । तथा च मांडव्यः । जलांतं प्रस्तरांतं वा पुरुषांतमथापि वा । क्षेत्रं संशोध्य चोद्धृत्य शल्यं सदनमारभेदिति ॥ तथा च मत्स्यपुराणे । कपिशीर्षप्रमाणैश्च ग्रावाणैः पूरयेद्दृढं । खातं तत्र समं कृत्वा ततः प्राचीं प्रसाधयेदिति ॥ खन्यमाने क्षेत्रे यदाप्यते तस्य फलं कारिकायामुक्तं । खन्यमाने यदा क्षेत्रे पाषाणः प्राप्यते यदा । धनायुश्चिरताऽस्य स्यादिष्टकासु धनागमः । कपालांगारकेशादौ व्याधिना पीडितो भवेदिति ॥ ४ ॥

टीकार्थ—अशा रीतीनें शल्य सांगून आतां स्थल शुभ आहे किंवा अशुभ आहे, हें समजण्याचा उपाय सांगतो— एक हात खोल असा खाडा खणावा त्यामध्यें रात्रीचे आरंभीं ह्मणजे सूर्यास्ताचे सुमारास पाणी भरावें. तें पाणी प्रातःकाळ पर्यंत राहिलें तर तें स्थल उत्तम शुभकारक समजावें. त्यांतील पाणी जर जिरून गेलें तर तें स्थल मध्यम आहे असें

समजावें. जर त्या स्थळीं फुटून भेगा पडल्या तर तें नाना प्रकारच्या हानि करणारें आहे असें समजावें. तेंच नारद सांगतो कीं, त्याप्रमाणें ह्मणजे एक हात खोल असा एक खाडा खांदावा. तो रात्रीच्या आरंभीं ह्मणजे सूर्यास्ताचे समयीं पाण्यानें भरावा. आणि प्रातःकाळीं जर त्यांत पाणी दृष्टीस पडलें. तर वृद्धिकारक समजावें. पाणी जिरून चिखल दृष्टीस पडला तर मध्यम फळ समजावें. भेगा भेगा पडलेल्या दिसल्या तर नाशकारक समजावें. अशा रीतीनें शुभ आणि अशुभ ह्याचें लक्षण सांगून आतां भूमीचें शोधन सांगतों–अशा रीतीनें स्थान जाणल्यावर घरापेक्षां अधिक खोल अशी जमीन पाणी लागेपर्यंत खणावी. कारण अधिक खणल्यापासून शुद्ध भूमि भाग मिळतो आणि त्यावर रचलेली भिंत फार मजबूत होते, ह्मणून पुष्कळ खोल खणावें. कारण खालीं पृथ्वीचे स्तर असतात तेथपर्यंत खणावें. कारण कीं, पृथ्वीच्या गर्भांत मृत्तिकेचे नाना प्रकारचे थर असतात ह्मणून थर लागेपर्यंत खणावें. किंवा एक पुरुषपर्यंत खोल खणावें. अथवा आपल्या शक्त्यनुसार खणावें. पांच अरत्नि हें पुरुषाचें प्रमाण आहे. तेंच शुल्ब ह्मणजे पांच अरत्नि ह्मणजे दहा वीती अथवा एकशें वीस अंगुळें इतक्या मानाचा पुरुष समजावा. पंचारत्नि ह्मणजे पुरुष हे परस्पर पर्याय आहेत. आपल्या इष्टदेवतेला नमस्कार करून जमीन खणण्यास आरंभ केला. नंतर तो खणलेला खाडा वानराच्या डोक्या एवढ्या दगडांनीं पुरून टाकावा, तेंच मांडव्य ऋषि सांगतो कीं, पाणी लागेपर्यंत, स्तर लागेपर्यंत अथवा एक पुरुषपर्यंत जमीन खणावी, त्याची शुद्धि करून शल्य पाहून घर बांधण्यास आरंभ करावा. तेंच मत्स्यपुराणांत सांगितलें आहे कीं, तो केलेला खाडा वानराच्या डोक्या एवढ्या दगडांनीं भरावा. तो खाडा बरोबर रीतीनें सारखा करून नंतर प्राची दिशा साधण्याचा यत्न करावा. जमीन खणल्यावर जें सांपडतें त्याचें फळ कारिकेंत असें सांगितलें आहे कीं, जमीन खणतांना जर दगड लागले तर धन आणि आयुष्य हीं परिपूर्ण समजावीं. विटा लागल्या तर धनाची प्राप्ति होते. कोळसे, हाडकें, कवड्या, केंश इत्यादि सांपडतील तर रोगाची पीडा होते ॥ ४ ॥

गृहाचें दिशासाधन व मासादि.

प्राक् साध्योज्जयिनीस्थलाद्यमदिशि त्वाष्ट्रानिलाभ्यंतरात् ।
सौम्ये साग्न्युदयादुदग्ध्रुवमुखाद्दिङ्मूढके स्यान्मृतिः ॥
गेहं माधवपौषफाल्गुननभोमार्गेषु मृद्वानिलैः ।
पाश्यर्केज्यवसुध्रुवैः स्थिरतनौ कुर्यात्सुकेंद्राष्टमे ॥ ५ ॥

श्लोकार्थ—उज्जनी नगराच्या दक्षिणेकडील देशांत चित्रा व स्वाती ह्या दोन नक्षत्रांच्या मध्यें पूर्व दिशा समजावी; आणि उत्तरेकडील देशांत जेथें कृत्तिकानक्षत्र उगवतें ती पूर्व समजावी. सर्व देशांत ध्रुव उगवतो ती उत्तर दिशा होय. दिशासाधनावांचून बांधिलेलें घर मृत्युकारक जाणावें. वैशाख, पोष, फाल्गुन, श्रावण, मार्गशीर्ष ह्या ५ महिन्यांत; मृदुसंज्ञक, स्वाती, शततारका, हस्त, पुष्य, धनिष्ठा व ध्रुवसंज्ञक ह्या नक्षत्रांवर; स्थिर लग्नांवर आणि १।४।७।१०।८ ह्या स्थानीं पापग्रह नसतां घर बांधण्यास आरंभ करावा ॥ ५ ॥

एवं स्थलशुद्धिमभिधायाधुना दिक्साधनमाह–उज्जयिनीस्थलात् यमदिशि दक्षिणस्यां दिशि त्वाष्ट्रानिलाभ्यंतरात्प्राक् साध्या नैररित्यध्याहारः । त्वाष्ट्रं चित्राऽनिलं स्वाती अनयोरंतरं मध्यं तस्मात्प्राची साध्येत्यर्थः । एतदुक्तं भवति संभवे सति रात्रौ प्राङ्मुख उपविश्य युगमात्रोदितां चित्रां नलिकया विलोकयन् नलिकाग्राल्लंबं भूमिपर्यंतं मुक्त्वा भूमौ चिह्नं कृत्वा तथैवाचलस्तेनैव नेत्रेण स्वातिमवलोकयन् तथैव नलिकाग्रात्सकाशात् लंबं भूमिपर्यंतं मुक्त्वा लंबपाते चिन्हं कृत्वा नेत्रालंबं मुक्त्वा तथैव चिह्नं कुर्यात् एवं चिह्नद्वयं चित्रास्वातीचिह्नयोरज्जुं तन्मितां धृत्वा रज्जुप्रांतावेकीकृत्य मध्ये चिह्नं कुर्यात् पुनस्तत्र तथैव प्रसार्य मध्यचिह्ने शंकुं निखाय तस्मात्पश्चिमचिह्नपर्यंतं रज्जुं प्रसारयेत् तत्प्राचीसूत्रं । एवमुज्जयिन्या दक्षिणतः प्राचीसाधनमुक्त्वाऽथानंतरमुत्तरतः प्राचीसाधनमाह–सौम्य इति । अत उज्जयिन्याः सौम्ये उत्तरभागेऽग्न्युदयात्कृत्तिकोदया। त्प्राची साध्या । एतदुक्तं भवति पूर्ववन्नलिकया युगमात्रोदितां कृत्तिकामालोक्य नलिकामूलाग्राभ्यां लंबौ मुक्त्वा भूमौ चिह्नद्वयं कृत्वा तयोरुपरि प्राचीसूत्रं । अथोत्तरसाधनमाह–उदगिति । ध्रुवमुखादुदगुत्तरा दिक् साध्या । इदं सर्वेषां साधारणं। अथ दिङ्मूढत्वे दोषमाह–दिङ्मूढके स्यान्मृतिरिति । स्पष्टम् । तथा चोक्तं देवयजनदीपिकायां । चित्रास्वात्यंतरे श्रोणाद्दक्षिणापथवासिनां

प्राची तु कृत्तिका ज्ञेया उत्तरापथवासिनामिति ॥ श्रोणात् उज्जयिन्याः । तथा च शुल्बं । कृत्तिका श्रवणं पुष्यं चित्रास्वात्योर्यदंतरं । एतत्प्राच्या दिशो रूपं युगमात्रोदितं पुर इति ॥ युगप्रमाणं षढशीत्यंगुलानि तथा च शुल्बसूत्रं । अंगुलैरथ संमितायाः प्रमाणं तत्राष्टाशीतिशतमीषा चतुःशतमक्षः पक्षः षडशीतियुगं चत्वारोऽष्टकाः शम्येति । तथा च स्फुटप्रकरणे । ध्रुवलंबकरेखाया रेखांतः सौम्ययाम्यहरितौ स्तः । तन्मत्स्यपुच्छमुखतः पश्चिमपूर्वाभिधे विद्यादिति॥ वृद्धनारदः । प्रासादे सदने लिंगे द्वारे कुंडे विशेषतः । दिङ्मूढे कुलनाशः स्यात्तस्मात्संसाधयेद्दिशमिति ॥ अथ केषु मासेषु गृहं कर्तव्यमित्याह-गेहमिति । माधवादिषु मासेषु मृद्वादिभिर्नक्षत्रैर्गेहं कुर्यात् माधवो वैशाखः पौषफाल्गुनौ प्रसिद्धौ नभाः श्रावणः मार्गो मार्गशीर्षः तेष्वित्यर्थः । मृदूनि चित्रानुराधारेवतीमृगा आनिलं स्वाती पाशी वरुणः तद्भं शततारकाऽर्को हस्त इज्यः पुष्यो वसुर्धनिष्ठा ध्रुवाणि रोहिणी उत्तरात्रयं च तैः स्थिरतनौ स्थिरलग्ने किंलक्षणे सुकेंद्राष्टमे शोभनानि पापग्रहरहितानि केंद्राष्टमानि यस्य यत्तथा तस्मिन् । अचरभे इति वा पाठः । शेषं पूर्ववत् ॥ ५ ॥

**टीकार्थ**—अशा रीतीनें स्थल शुद्धि सांगितली आतां दिशांचें साधन सांगतों—उज्जयनी नगराच्या दक्षिणेस त्वाष्ट्र ह्म० चित्रा आणि अनिल ह्म० स्वाती ह्या दोन नक्षत्रांमध्यें पूर्वदिशा आहे असें जाणावें. ह्याचा अर्थ असा कीं, रात्रीस पूर्वेस तोंड करून बसावें आणि एक युगपर्यंत उदय पावलेलें चित्रा नक्षत्र पहाण्याकारितां नालिकेच्या अग्रापासून जमिनी पर्यंत अंश घेऊन त्या जमिनीवर चिन्ह करावें आणि तसेंच स्थिरपणानें त्याच डोळयानें स्वाती नक्षत्र पाहावें आणि त्याप्रमाणेंच नलिकेच्या अग्रापासून लंब घेऊन तो जमिनीपर्यंत सोडावा त्या लंबाचे पातावर चिन्ह करावें आणि तेथें नेत्राचा आलंब करावा. आणि तसेंच चिन्ह करावें अशा रीतीनें दोन केलेलीं चिन्हें आणि चित्रा व स्वाती ह्यांच्या चिन्हांची एक रज्जु तेवढी धरून त्या रज्जुचे पुढलीं अग्रें एकत्र करून त्याच्यामध्यें चिन्ह करावें. पुनः तेथें तसेंच पसरून चिन्हांचे मध्यभागीं एक शंकु रोपून त्यापासून पश्चिमेकडच्या चिन्हापर्यंत रज्जु पसरावी, तें प्राची सूत्र जाणावें. अशा रीतीनें उज्जनीच्या दक्षिणेस प्राची साधन सांगितलें. आतां उत्तरेकडेस प्राची साधन सांगतों—उज्जनीच्या उत्तर भागास कृत्तिकेच्या उदयापासून प्राची दिशा साधावी. ह्याचा अर्थ असा कीं, पूर्वी प्रमाणें नालिका यंत्रानें युगपर्यंत उदय पावलेलें कृत्तिका नक्षत्र पाहून नलिकेच्या मूल आणि अग्र ह्या दोहोंपासून लंब जमिनीपर्यंत सोडावेत आणि दोहोंचीं दोन चिन्हें करावींत, त्यावरून प्राची सूत्र जाणावें. आतां उत्तर दिशा साधन सांगतों—ध्रुवाच्या उदयावरून उत्तर दिशा जाणावी. हें सर्व साधारण सांगितलें आहे, आतां दिशा साधल्या शिवाय घर केल्यास दोष सांगतों—दिशांचें साधन केल्या शिवाय घर केल्यास मरण होतें हें स्पष्ट आहे. तेंच देवयजन दीपिकेंत सांगितलें आहे कीं, उज्जनीचे दक्षिणेस रहाणाऱ्यांनीं चित्रा आणि स्वाती ह्यांच्या मध्य भागावरून प्राची दिशा जाणावी. उत्तरेकडेस राहणाऱ्यांनीं कृत्तिका नक्षत्रावरून प्राची दिशा जाणावी. तेंच शुल्बांत सांगितलें आहे कीं, कृत्तिका. श्रवण, पुष्य, चित्रा, स्वातीचें अंतर, हें प्राची दिशेचें स्वरूप आहे, मात्र चित्रा आणि स्वाती युगपर्यंत उदय पावलेलीं असावीं. युगाचें प्रमाण असें आहे कीं, ८६ अंगुल परिमाण समजावें. तेंच शुल्ब सूत्रांत सांगितलें आहे कीं, अंगुलांनीं मोजलें असतां १८८ अंगुलें परिमाणाची ईषा असें नांव आहे, चारशें अंगुलें परिमाणाचें अक्ष नांवाचें आहे. ८६ अंगुलें परिमाणाचें युग हें नांव आहे. चार अष्टकास शम्या असें नांव आहे. तेंच स्फुट प्रकरणांत सांगितलें आहे कीं, ध्रुवाच्या लंब रेखेच्या दोन शेवटांस उत्तर आणि दक्षिण अशा दोन दिशा असतात. त्याच्या मत्स्याच्या पुच्छाच्या बाजूस पश्चिम आणि मुखाचे बाजूस पूर्व अशा दिशा असतात, असें जाणावें. वृद्ध नारद सागतों कीं, मंदिर, घर, लिंग, द्वार आणि विशेषें करून कुंड ह्यांच्या दिशा जर साधल्या नाहींत आणि तसेंच बांधलें तर कुलाचा नाश होतो, ह्मणून दिशा साधन करावें. आतां कोणत्या महिन्यांत घर करावें तें सांगतों—माधव ह्म० वैशाख, पौष, फाल्गुन, नभा ह्म० श्रावण, मार्ग ह्म० मार्गशीर्ष, इतक्या महिन्यांत मृदु नक्षत्रांवर ह्मणजे चित्रा, अनुराधा, रेवती, मृग, अनिल ह्म० स्वाती, पाशी ह्म० वरुण त्याचें नक्षत्र शततारका, अर्क ह्म० हस्त, इज्य ह्म० पुष्य, वसु ह्म० धनिष्ठा आणि ध्रुव नक्षत्रें ह्म० तीन उत्तरा, इतक्या नक्षत्रांवर स्थिर लग्न असावें आणि त्या लग्नांत केंद्र स्थानीं आणि अष्टम स्थानीं पाप ग्रह नसावा. अर्थात् १-४-७-१० ह्यास्थानीं व अष्टम स्थानीं पाप ग्रह ह्म० रवि, मंगळ, शनि, राहु आणि केतु हे नसावेत. बाकीचें पूर्वीप्रमाणें जाणावें ॥ ५ ॥

### नक्षत्रशुद्धि आणि वृषचक्र.

**नो पृष्ठाग्रविधौ न रिक्ततिथौ नार्कारवारांशयो- ।**
**रुक्तर्क्षेष्वपि कुंभमीनगविधौ स्तंभोच्छ्रितिं नाऽऽचरेत् ॥**

**तुर्यात्पंचदशात्त्रिदिक्परिमिताद्वेदाब्धिपंच क्रमात् ।**
**निंद्यान्यर्कयुतादि गेहकरणे भानि प्रवेशेऽपि च ॥ ६ ॥**

श्लोकार्थ—गृहाच्या मुख्यद्वाराच्या मागें व पुढें चंद्र असतां गृहारंभ करूं नये. सप्तशलाकाचक्रांत कृत्तिकादि ७ नक्षत्रें पूर्वेस, मघादि ७ दक्षिणेस, अनुराधादि ७ पश्चिमेस आणि धनिष्ठादि ७ उत्तरेस अशीं आहेत. गृहारंभाचें दिवसनक्षत्र ज्या दिशेला असेल तिकडेच गृहाचें मुख्य द्वार करावयाचें असतां, त्या घराला मागें व पुढें चंद्र होतो ह्मणून त्या दोन दिशा सोडून अन्य दिशेला गृहाचें मुख्य द्वार करावें. रिक्ता तिथींवर आणि रवि, मंगळ यांच्या वारीं व नवांशांवर गृहारंभ करूं नये. गृहांचीं उक्त नक्षत्रें असतांही कुंभ व मीन ह्या राशींला चंद्र असतां स्तंभोच्छ्राय (धारण उभा करणें) करूं नये. सूर्यनक्षत्रापासून पुढलीं चवथ्या पासून ४ पंधराव्यापासून ४ तेविसाव्यापासून ५ हीं दिवस नक्षत्रें गृहारंभाला अशुभ आणि गृहप्रवेशालाही अशुभ होत. तात्पर्य सूर्यनक्षत्रापासून ४।५।६।७।१५।१६।१७।१८।२३।२४।२५।२६।२७ हीं नक्षत्रें वृषचक्रांत अशुभ आहेत॥ ६ ॥

**अथोक्तेष्वपि नक्षत्रेषु विशेषमाह–नो पृष्ठाग्रेति । पृष्ठाग्रविधौ सति नो विरचयेत् । एतदुक्तं भवति कृत्तिकादीनि सप्त नक्षत्राणि पूर्वस्यां मघादि सप्त दक्षिणस्यामित्यादि सप्तशलाकाचक्रस्थितनक्षत्राणां मध्ये मृद्वानिलादीष्टचंद्रनक्षत्रं यस्मिन् दिग्भागे भवति तद्दिङ्मुखे गृहे संमुखश्चंद्रो ज्ञेयः तत्पृष्ठस्थे पृष्ठतो ज्ञेय एवमग्रगे पृष्ठगे वा चंद्रे सति गृहं न कर्तव्यमित्यर्थः । तथा च भृगुः । चक्रे सप्तशलाकाख्ये कृत्तिकादीनि विन्यसेत् । ऋक्षं चंद्रस्य वास्तोश्च पुरः पृष्ठे च नो शुभमिति ॥ तथा च ब्रह्मशंभुः । धनलाभः प्रवासः स्यादायुश्चौरभयं क्रमात् । दक्षाग्रवामपृष्ठस्थे गृहकर्तुर्निशाकर इति ॥ न रिक्तकथितौ स्पष्टं । नार्कारवारांशयोरर्कभौमयोर्वारनवांशयोर्न कुर्यात् उक्तर्क्षेष्वपि कुंभमीनगविधौ सति स्तंभोच्छ्रितिं नाऽऽचरेत् । अर्थादन्यत्सर्वमाचरेत् । तथा च मांडव्यः । पंचकेषु च धिष्ण्येषु न कुर्यात्स्तंभमुच्छ्रयं । क्षेत्रसूत्रशिलान्यासं प्राकारादि समाचरेदिति ॥ अथ वृषवास्तुमाह–तुर्यादिति । अर्कयुतादि सूर्यनक्षत्रादि तुर्यात् चतुर्थात् पंचदशात् त्रिदिक्परिमितात् त्रयोविंशात्सकाशात् क्रमेण वेदाब्धिपंच भानि नक्षत्राणि गृहस्य करणे रचनायां प्रवेशेऽपि निंद्यानि स्युः । तथा च व्यवहारसारे । त्रिवेदाब्धित्रिवेदाब्धिद्वित्रिभेष्वर्कतः शशी । कुर्याल्लक्ष्मीं समुद्वासं स्थैर्यं लक्ष्मीं दरिद्रतां ॥ धनं व्याधिं क्रमान्मृत्युं प्रवेशारंभयोर्वृष इति ॥ ६ ॥**

**टीकार्थ**—आतां पूर्वीं सांगितलेल्या नक्षत्राविषयीं विशेष सांगतों–घराचे पुढें व मागें चंद्र असतां गृहाचा आरंभ करूं नये. ह्याचा अर्थ असा कीं, सप्तशलाका चक्रामध्यें कृत्तिकापासून ७ नक्षत्रें पूर्वेस आहेत. मघादि सात नक्षत्रें दक्षिणेस आहेत. अनुराधादि सात नक्षत्रें पश्चिमेस आहेत. धनिष्ठादि सात नक्षत्रें उत्तरेस आहेत. या सप्तशलाका चक्रांत असलेल्या नक्षत्रांमध्यें मृदु आणि स्वाती ह्या नक्षत्रांपासून इष्ट चंद्राचें नक्षत्र ज्या दिशेच्या भागीं असेल, त्या दिशेच्या मुखाचे भागीं घराला संमुख चंद्र आहे असें जाणावें. त्या दिशेच्या पाठीमागें असलेला चंद्र पृष्ठभागीं आहे असें जाणावें. अशा रीतीनें चंद्र अग्रभागीं व पृष्ठभागीं असतां घर करूं नये. तेंच भृगु सांगतो कीं, सप्तशलाकाख्य नांवाच्या चक्रांत कृत्तिकादि नक्षत्रें ठेवावींत. तें नक्षत्र चंद्राचे पुढें व पाठीमागें असेल तर तें शुभकारक नाहीं असें समजावें. तेंच ब्रह्मशंभु सांगतो कीं, गृह करणाऱ्या मनुष्याचे घराचे दक्षिणेस अग्रभागीं, वामभागीं, आणि पृष्ठभागीं चंद्र असेल तर क्रमानें धनलाभ, प्रवास, आयुष्य, चोरभयं अशीं होतात, ह्मणजे दक्षिणेस चंद्र असेल तर धनलाभ होतो, अग्रभागीं चंद्र असेल तर प्रवास होतो, वाम भागीं चंद्र असेल तर आयुष्य वृद्धि होते. पृष्ठ भागीं चंद्र असेल तर चोराचें भय होतें. घर बांधावयाचें तें रिक्तातिथीवर करूं नये. अर्क ह्म० रविवार, आर ह्म० मंगळवार व त्यांच्या नवांशावर घर करूं नये. सांगितलेल्या नक्षत्रांवरही, चंद्र कुंभ, मीन ह्या राशीवर असतां स्तंभ उभारूं नये. अर्थात् बाकी सर्व प्रकारच्या ठिकाणीं घर बांधावें. तेंच मांडव्य सांगतो कीं, पंचक नक्षत्र असतां स्तंभाचें उभारणें करूं नये परंतु त्यांवर क्षेत्र, सूत्र, शिला ह्यांचा न्यास आणि प्राकार इत्यादि करावें. आतां वृष वास्तु सांगतों–सूर्य नक्षत्रापासून पुढलीं चवथ्यापासून ४ पंधराव्यापासून ४ तेवीसाव्यापासून ५ हीं दिवस नक्षत्रें घर करण्यास निंद्य आहेत. सूर्य नक्षत्रापासून ४–५–६–७–१५–१६–१७–१८–२३ २४–२५–२६–२७ हीं नक्षत्रें वृष चक्रांत अशुभ आहेत. तेंच व्यवहार सारांत सांगितलें आहे कीं, सूर्यापासून चंद्र ३–४–४–३–४–४–२–३ ह्या नक्षत्रांवर क्रमानें लक्ष्मी, समुद्वास, स्थैर्य, लक्ष्मी, दारिद्रता, धन, व्याधि, मृत्यु इतकीं होतात ॥ ६ ॥

गृहद्वारनियम व आयसाधन.

शेते भाद्रपदात्रिषु त्रिषु सुरः प्रागादिशीर्षोऽत्र हि ।
प्रोक्तं सद्मसुखं तु गोल्यजधटेष्वर्के यमोदङ्मुखम् ॥
हृद्रोगैणकुलीरलेयगरवौ पूर्वापरास्यं गृहं ।
नान्यस्थे भुजकोटिघात इभहृच्छेषं स्युरायाः क्रमात् ॥ ७ ॥
पूर्वादिध्वजधूमसिंहशुनकोक्षाणः खरेभोष्ट्रकाः ।
धार्याः स्वस्वपदे ध्वजोऽखिलमुखः प्राग्याम्यवक्त्रो गजः ॥
प्रागास्यो वृषभो विवारुणमुखः सिंहः प्रशस्ता इमे ।
धूमोऽग्नेः शुनकोऽन्त्यजस्य खगपस्योष्ट्रोऽट्टपत्न्याः खरः ॥ ८ ॥

श्लोकार्थ—भाद्रपद, आश्विन, कार्तिक ह्या ३ मासांत पूर्वेस; मार्गशीर्ष, पौष, माघ ह्या ३ त दक्षिणेस; फाल्गुन, चैत्र, वैशाख ह्या ३ त पश्चिमेस; ज्येष्ठ, आषाढ, श्रावण ह्या ३ मासांत उत्तरेस मस्तक करून वास्तुपुरुष निजतो. ज्या मासांत ज्या दिशेस वास्तुपुरुषाचें मस्तक असेल, त्या दिशेकडे गृहाचें द्वार करावें. वृषभ, वृश्चिक, मेष तूळ, ह्या राशींला सूर्य असतां दक्षिणेस किंवा उत्तरेस घराचें दार करावें. कुंभ, मकर, कर्क, सिंह, ह्याला सूर्य असेल तेव्हां पूर्वेस किंवा पश्चिमेस गृहद्वार करावें. अन्यराशींस ह्मणजे मिथुन, कन्या, धन, मीन ह्या राशींला सूर्य असतां घर बांधूं नये. घराची लांबी व रुंदी ह्यांचा गुणाकार करून त्याला ८ नीं भागावें. बाकी उरेल ते आय होतात. ( उदाहरण—घराची लांबी २७ हात, रुंदी १५ हात ह्या दोहोंचा गुणाकार ४०५ त्याला ८ नीं भागून बाकी ५ हा घराचा आय होय. ) बाकी १ असतां ध्वज, २ धूम, ३ सिंह, ४ श्वान, ५ वृषभ, ६ गर्दभ, ७ गज, ८ उष्ट्र आय. हे पूर्वादि आठ दिशेला क्रमानें बलवान् असतात. हे आय त्यांच्या नांवाच्या अर्थाप्रमाणें योजावे. ध्वज आय असतां सर्व दिशेकडे घराचें दार करावें. गज आय असतां पूर्वेस व दक्षिणेस गृहद्वार करावें. वृषभ आय असतां पूर्वेस द्वार करावें. सिंह आय असतां पश्चिमेवांचून सर्व दिशेस द्वार करावें. ध्वज, सिंह, वृषभ, गज हे ४ विषम आय सर्वांला शुभ होत. अग्नि गृहाला धूम आय शुभ, अंत्यजाच्य घराला श्वान आय शुभ, पक्ष्यांचें पालन करणाराच्या गृहाला उष्ट्र आय शुभ आणि वेश्येच्या गृहाला गर्दभ आय शुभ होय ॥ ७ ॥ ८ ॥

अथ चतुर्धाद्वारनिर्णयमाह—शेत इति । भाद्रपदात् त्रिषु त्रिषु मासेषु सुरो वास्तुपुरुषः प्रागादिशीर्षः शेत इति । एतदुक्तं भवति भाद्रपदादिमासत्रये पूर्वशीर्षः मार्गशीर्षादिमासत्रये दक्षिण शीर्षः फाल्गुनादिमासत्रये पश्चिमशीर्षः ज्येष्ठादिमासत्रये उत्तरशीर्षो वास्तुपुरुषः शेत इति । अत्र यस्यां शीर्षं तस्यां दिशायां सद्ममुखं गृहमुखं प्रोक्तं । अथ संक्रांतिपरत्वेन मुखनिर्णयमाह—गोल्यजेति । गोल्यजधटेष्वर्के सति यमोदङ्मुखं गृहं कार्यं गौः वृषः अलिर्वृश्चिकः अजो मेषः घटस्तुला एषु राशिषु अर्के सूर्ये सति यमोदङ्मुखं दक्षिणामुखं उत्तरामुखं वा गृहं कार्यमित्यर्थः । हृद्रोगैणकुलीरलेयगरवौ सति पूर्वापरास्यं हृद्रोगः कुंभः एणो मकरः कुलीरः कर्कटः लेयः सिंह एतान् गच्छति स तथा स चासौ रविश्च तस्मिन्सति पूर्वापरास्यं पूर्वमुखं पश्चिममुखं वा गृहं कार्यं अन्यस्थेऽन्यराशिस्थे रवौ सति गृहं न कार्यं । अथाऽऽयपरत्वेन गृहमुखनिर्णयं विवक्षुस्तावदायसाधनमाह—भुजेति । भुजकोटिघात इभहृच्छेषं आयाः स्युः भुजो गृहदैर्घ्यविस्तारयोरन्यतमस्य नाम तदन्या कोटिः । तथा च लीलावत्यां । इष्टो बाहुर्यस्यां तत्स्पर्धिन्यां दिशीतरो बाहुः । त्र्यस्रे चतुरस्रे वा सा कोटिः कीर्तिता तज्ज्ञैरिति ॥ तयोर्घातो गुणनं इभहृच्छेषं पूर्वादि यथास्यात्तथा ध्वजादय आयाः क्रमात्स्युः ॥ ७ ॥ पूर्वादिषु ध्वजादयो बलिष्ठा इति भावः एते ध्वजादयः स्वस्वपदे स्वस्वस्थाने । ध्वजः पूर्वे धूम आग्नेय्यामित्यादि धार्याः अयमर्थः । मुख्यगृहापेक्षया दिक्षु वक्ष्यमाणगृहेषु धार्या इत्यर्थः । अथवा स्वसदृशवस्तुषु धार्योऽथवा स्वसदृशासनगृहेषु धार्याः

थवा क्रूरकर्मसाधनवस्तुषु पराक्रमिणो धार्योऽथवा स्वसदृशवस्तुसत्त्वोपजीविनां गृहेषु धार्योऽथवा स्वानुरूपवस्तुसाध्यहितवस्तुगृहेषु यथायोग्यं धार्या इत्यर्थः । एतत्स्पष्टमुक्तं वास्तुप्रदीपे । खेटकर्पटकोटेषु वृषः सिंहो गजः शुभः । वापीकूपतडागादौ गजो देयो विचक्षणैः ॥ आसने योजयेत्सिंहं शयने चैव कुंजरं । वृषं भोजनपात्रे च दद्याच्छालादिषु ध्वजं ॥ महानसेऽग्निशालायां गृहे चाग्न्युपजीविनां । धूमं दद्यात्तथा श्वानं यवनांत्यजयोर्गृहे ॥ खरो वेश्यागृहे योज्यो ध्वांक्षः पक्षिपतेर्गृहे । वृषं सिंहं गजं दद्यात् प्रासादे पुरमंदिरे ॥ तथा च शिल्पशास्त्रे । वस्त्रजे धर्मशालायां कुंभे स्तंभे ध्वजे ध्वजः ॥ गोगजौ भूगृहे चैव साधारणगृहे शुभौ । यंत्रे शस्त्रे रथे सिंहो भांडागारे शुभो गजः ॥ धान्यांबुस्थानगोश्वेभः शालायां वृषभः शुभः । नाट्यभागोद्वाहवेद्यां गजसिंहवृषाः शुभा इत्यादि ॥ एवमायसाधनमुक्त्वेदानीं तेषां मुखान्याह–ध्वजोऽखिलमुखः सर्वदिग्द्वारः प्राग्यास्यवक्रो गजः सुगमं । प्रागास्यो वृषभः आस्यं मुखं प्राङ्मुखो वृषभः स्पष्टं । विवारुणमुखः सिंहः वरुणस्यायं वारुणो दिग्विभागः पश्चिमदिक् विगतः वारुणो येभ्यस्तत्र मुखं यस्य स तथा पश्चिमदिशं विना सर्वदिग्द्वार इत्यर्थः । यो यो यद्दिङ्मुख आयस्तत्संभूतगृहस्य तत्तद्दिशि मुखं कर्तव्यमित्यर्थः । एवं आयपरत्वेन गृहमुखमुक्त्वा प्रसंगेनाऽऽयानां शुभत्वमाह–प्रशस्ता इमे इति । इमे चत्वार आयाः प्रशस्ताः सर्वेषां शुभा अर्थादन्ये चत्वारः समा आया अप्रशस्ताः । तथा च गर्गः । कीर्तिः शोको जयो वैरं धनं निर्धनता सुखं । रोगश्चेति गृहारंभे ध्वजादीनां फलं क्रमादिति ॥ अथ दुष्टेऽपि समये विशेषमाह–धूमोऽग्नेरिति । अग्नेर्गृहे धूमो धूमायः प्रशस्तः । अंत्यजस्य शुनकः प्रशस्तः । खगपस्य पक्षिपालकस्य उष्ट्रः प्रशस्तः । अट्टपत्न्या वेश्याया गृहे खरः खरायः प्रशस्तः ॥ ८ ॥

**टीकार्थ**—आतां चार प्रकारानें द्वाराचा निर्णय सांगतों–भाद्रपद, आश्विन आणि कार्तिक ह्या तीन महिन्यांमध्यें वास्तु पुरुष पूर्वेस डोकें करून निजतो, मार्गशीर्ष, पौष आणि माघ ह्या तीन महिन्यांमध्यें दक्षिणेस डोकें करून निजतो. फाल्गुन, चैत्र आणि वैशाख ह्या तीन महिन्यांत पश्चिमेस डोकें करून निजतो. ज्येष्ठ, आषाढ आणि श्रावण ह्या तीन महिन्यांत उत्तरेस डोकें करून निजतो. आतां ज्या दिशेस वास्तु पुरुषाचें डोकें असतें त्या दिशेस घराचें तोंड करावें असें सांगितलें आहे. आतां संक्रांतीवरून मुखाचा निर्णय सांगतों--वृषभ, वृश्चिक, मेष, तूळ ह्या राशीला सूर्य असतां घराचें तोंड दक्षिणेस अथवा उत्तरेस करावें हृद्रोग ह्म० कुंभ, एण ह्म० मकर, कुलीर ह्म० कर्क, लेय ह्म० सिंह अर्थात् कुंभ, मकर, कर्क, सिंह ह्या राशीला सूर्य असेल तर घराचें तोंड पूर्वेस अथवा पश्चिमेस करावें. ह्या शिवाय अन्य राशीवर सूर्य असेल तर घर करूं नये. आतां आय घेऊन घराचें तोंड करण्याचा निर्णय करण्याच्या इच्छेनें अगोदर आयाचें साधन सांगतो–घराची लांबी व रुंदी ह्यांचा गुणाकार करून त्याला ८ नीं भागून जी बाकी राहील ते आय होतात. भुज हा घराची लांबी व रुंदी ह्या दोहोंपैकीं एकास लागणारा आहे. ह्याहून दुसरी ती कोटि समजावी. तेंच लीलावती ग्रंथांत सांगितलें आहे कीं, जीमध्यें इष्ट हा भुज आहे त्याचे दुसरीकडचा बाहु आहे, त्रिकोणी व चतुष्कोणी घरामध्यें ती कोटि समजावी. असें विद्वानांचें मत आहे.त्या कोटीचा आणि भुजाचा गुणाकार केल्यावर त्याला आठांनीं भागून ध्वज इत्यादि आय क्रमानें होतात ॥ ७ ॥ पूर्व इत्यादि दिशामध्यें ध्वज इत्यादि बालिष्ठ आहेत. ते ध्वजादिक आपापल्या स्थानीं बलवान् आहेत. जसे पूर्वेस ध्वज प्रबळ आहे. धूम आग्नेयी दिशेस प्रबळ आहे. असें समजावें. ह्याचा अर्थ असा कीं, मुख्य घरापेक्षां बाकीच्या सर्व दिशांमध्यें पुढें सांगावयाच्या घरांमध्यें धार्य आहेत, जसें पूर्वी सांगितल्याप्रमाणें आठांनीं भागून बाकी १–असतां ध्वज २ असतां धूम ३ असतां सिंह ४ असतां श्वान ५ असतां वृषभ ६ असतां गर्दभ ७ असतां गज ८ असतां उष्ट्र असे हे आय होत. हे पूर्वादि आठ दिशेस क्रमानें बलवान् आहेत. ते आपल्या सारख्या वस्तूविषयीं योजावेत. अथवा आपल्या सारख्या प्राण्यांच्या घरामध्यें योजावेत किंवा क्रूरकर्मांचे साधनभूत वस्तूविषयीं योजावेत. अथवा पराक्रमी पुरुषानें योजावेत; किंवा आपल्या सारख्या वस्तु असलेल्या सत्वावर उपजीविन करणाऱ्याच्या गृहामध्यें योजावेत. किंवा आपल्याला अनुसरून असलेल्या वस्तूनीं साध्य अशा हितकारक वस्तूच्या घरांमध्यें योजावेत. त्या आयांच्या नांवाप्रमाणें यथायोग्य रीतीनें त्या त्या घरांच्या ठिकाणीं त्याची योजना करावी. हेंच सर्व वास्तु प्रदीप ग्रंथांत स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे कीं, खेट. कर्पट आणि कोट ह्या ठिकाणीं वृष, सिंह आणि गज हे शुभकारक आहेत. वापी, कूप, तलाव इत्यादिकांविषयीं गज हा शुभकारक आहे असें विद्वानांचें मत आहे. आसनावर सिंहाची योजना करावी. बिछान्यावर हत्तीची योजना करावी, भोजन पात्रावर वृषाची योजना करावी. शालादिकांवर ध्वजाची योजना करावी. स्वयंपाक घर, अग्निशाळा, घरामध्यें अग्नीवर उपजीविन करणाऱ्यांनीं धूम आयाची योजना करावी. यवन आणि अंत्यज ह्यांच्या घरावर

श्वान नामक आयाची योजना करावी. वेश्यांच्या घरावर खराची योजना करावी. पक्षिपतीच्या घरांवर ध्वांक्षाची योजना करावी, प्रासाद, पुरमंदिर ह्या दोहोंविषयीं वृष, सिंह, गज ह्यांची योजना करावी, तेंच शिल्पशास्त्रांत सांगितलें आहे कीं, वस्त्रांची शाळा, धर्मशाळा, कुंभ, स्तंभ, ध्वज ह्या विषयीं ध्वज हा श्रेष्ठ आहे, भूगृह, आणि साधारण ग्रह ह्या विषयीं गो ह्म० वृष आणि गज हे शुभकारक आहेत, मंत्र, शस्त्र, रथ ह्या विषयीं सिंह हा श्रेष्ठ आहे. भांडागाराविषयीं हत्ती हा शुभ आहे. धान्य स्थान, उदक स्थान या दोहोंविषयीं वृष, हत्ती हे शुभकारक आहेत. शाळेविषयीं वृषभ हा शुभकारक आहे. नाट्यगृह आणि विवाहाची वेदी ह्या दोहोंविषयीं गज, सिंह, वृष हे शुभकारक आहेत. अशा रीतीनें आयाचें साधन सांगितलें, आतां त्यांचीं मुखें सांगतों—ध्वज आय असतां सर्व दिशेकडे घराचें तोंड करणें शुभ आहे. गज आय असतां पूर्वेस व दक्षिणेस तोंड करणें शुभ आहे. वृषभ आय असेल तर पूर्वेस तोंड करणें शुभ आहे. सिंह आय असतां वारुण ह्म० पश्चिम दिशा त्या शिवाय पाहिजे त्या दिशेस तोंड करणें शुभ आहे. ज्या ज्या आयाचें तोंड ज्या ज्या दिशेस असेल त्यावर उत्पन्न झालेल्या घराचें तोंड त्या दिशेस करावें. अशा रीतीनें आय घेऊन घराचें तोंड सांगितलें, आतां प्रसंगोपात आयांचें शुभत्व सांगतों—हे चार फारच प्रशस्त आहेत, अर्थात् बाकीचे चार आय अप्रशस्त असे जाणावे. ध्वज, सिंह, वृषभ, गज हे सर्व कर्माला शुभ आहेत. तेंच गर्ग सांगतो कीं, कीर्ति, शोक, जय, वैर, धन, निर्धनत्व, सुख, रोग हीं ध्वज इत्यादि आठ आयांचीं फळें आहेत. आतां दुष्ट समय असतांही विशेष सांगतों—अग्नि घराला धूम आय श्रेष्ठ आहे. अंत्यजाचे घराला श्वान आय प्रशस्त आहे. पक्ष्यांच्या पतीला उष्ट्र आय प्रशस्त आहे. वेश्येच्या घराला खर हा आय प्रशस्त आहे ॥ ८ ॥

### राशिपरत्वें द्वारदिशा, गृहनक्षत्र व व्यय.

प्राहुः प्राङ्मुखमंत्यवृश्चिककुलीराणां प्रचेतोमुखम् ।
जूकोपांत्यगवां यमास्यमबलायुग्मैणकानां हितम् ॥
सौम्यास्यं गृहमाद्यसिंहधनुषामत्रेष्टकाष्ठाननम् ।
कृत्वाऽऽशान्यककुब्गवाक्षवदनं तत्कार्यमास्यं न सत् ॥ ९ ॥
कोणाध्वभ्रमकूपकर्दमतरुद्वाःस्तंभदेवेक्षितम् ।
सद्मोच्यद्विगुणाधिकांतरभवे वेधे न दोषः किल ।
अष्टघ्ने गृहभूफले भविहृते शेषं गृहर्क्षं भवे- ।
द्दक्षे सर्पहृते व्ययो गृहमसत्स्वल्पायभूरिव्ययम् ॥ १० ॥

श्लोकार्थ—ज्यांच्या मीन, वृश्चिक, कर्क ह्या जन्मराशि असतील त्यांच्या घराचें दार पूर्वेस; तूळ, कुंभ, वृषभ ह्या असतील त्यांचें पश्चिमेस; कन्या, मिथुन, मकर ह्या असतील त्यांचें दक्षिणेस आणि मेष, सिंह, धन ह्या जन्मराशि असतील, त्यांच्या घराचें दार उत्तरेस करावें. याप्रमाणें राशिपरत्वें ज्या दिशेला दार करावयाचें तिकडे करण्याची कोणत्याही अडचणीमुळें सोय नसेल तर, पाहिजे त्या दिशेला मुख्यद्वार करून राशिपरत्वें आलेल्या दिशेकडे एक खिडकी लावावी. भिंतीचा कोन; मार्ग, फिरणारें यंत्र (घिरट, कुंभाराचें चाक वगैरे) विहीर, चिखल, कोणताही वृक्ष, दुसऱ्याचें दार, खांब, देव हीं दारासमोर असतां अशुभ होत. घराच्या उंचीच्या दुपटीपेक्षां अधिक अंतरावर असतां दोष नाहीं. लांबी रुंदीच्या गुणाकाराला क्षेत्रफळ ह्मणतात. घराच्या क्षेत्रफळाला ८ नीं गुणून २७ नीं भागावें बाकी राहील तें घराचें नक्षत्र जाणावें. नक्षत्राला ८ नीं भागून बाकी राहील तो व्यय समजावा. अल्प आय आणि अधिक व्यय असें घर अशुभ होय. ( उदाहरण—लांबी २७ रुंदी १५ ह्यांचा गुणाकार ४०५ हें क्षेत्रफळ त्याला ८ नीं गुणून गुणाकार ३२४० त्याला २७ नीं भागून बाकी शून्य ह्मणून घराचें रेवती नक्षत्र आहे. त्याला ( नक्षत्राला ) ८ नीं भागून बाकी ३ व्यय आला )॥ ९ ॥ १० ॥

**एवमायपरत्वेन गृहमुखमुक्त्वाऽधुना राशिपरत्वेनाऽऽह—अंत्यवृश्चिककुलीराणां प्राङ्मुखं गृहं हितं प्राहुः अंत्यो मीनः वृश्चिकः प्रसिद्धः कुलीरः कर्क एषामित्यर्थः । जूकोपांत्यगवां प्रचेतोमुखं पश्चिमाभिमुखं जूकस्तुला उपांत्यः कुंभः गौर्वृष एषामित्यर्थः।बलायुग्मैणकानां यमास्यं दक्षिणामुखं**

अबला कन्या युग्मं मिथुने एणो मकरः एषामित्यर्थः । आद्यसिंहधनुषां सौम्यास्यं आद्यो मेषः सिंहधनुषी प्रसिद्धे एषां सौम्यास्यं उत्तरामुखं गृहं हितं प्राहुराचार्याः । एवं चतुर्धा गृहमुख मभिधायेदानीं तन्निर्णयमाह-अत्रेष्टकाष्ठाननमिति । गृहमुखपक्षेषु शोभावकाशानुरूपं इष्टकाष्ठाननं इष्टदिङ्मुखं कृत्वा तद्गृहं आप्तान्यककुब्गवाक्षवदनं कार्यं । आप्ताश्च ता अन्यककुभश्च तासु गवाक्षा एव वदनानि यस्य तत्तथा उर्वरितपक्षत्रयप्राप्तदिक्षु गवाक्षाः कार्या इत्यर्थः । तथा च वास्तुशास्त्रे । द्वारं चतुर्विधं प्रोक्तं वास्तुसंक्रांतिभावजं । कृत्वा चान्यतमं मुख्यं गवाक्षाद्यैः पराणि चेति ॥ आस्यमिति । आस्यं गृहस्य मुखं कोणस्तंभादिभिर्विद्धं न सत्स्यात् ॥ ९ ॥ एवं गृहमुखनिर्णयमुक्त्वाऽधुना कोणादिविद्धमुखस्य दोषं तदपवादं चाऽऽह-कोणाध्वेति । कोणो भित्तिकोणः । अध्वा मार्गः । भ्रमो भ्रमयंत्रं घरट्टकुलालचक्रादि । कूपः प्रसिद्धः । कर्दमः स्नानादिजनितो निरंतरस्थायी । तरुर्वृक्षः द्वाः द्वारांतरं स्तंभः प्रसिद्धः देवः स्थावर एभिर्विद्धं मुखं सत्स्यादित्यर्थः । अथास्यापवादमाह-सद्मौच्येति । सद्मौच्यद्वि गुणाधिकांतरभवे वेधे न दोषः सद्मनो गृहस्य औच्यं तस्यापेक्षया द्विगुणाधिकांतरभवे द्विगुणाधिकांतरे जाते वेधे कोणादिवेधे न दोषोऽर्थान्न्यूने दोषः किलेत्यागमे निश्चये वा । तथा चाऽऽगमांतर उक्तं । मार्गतरुकोणकूपभ्रमविद्धमशुभदं द्वारं । सद्मोच्छ्रायात् द्विगुणां त्यक्त्वा भूमिं न दोषायेति ॥ कात्यायनगृह्यकारिकायामप्युक्तं । विद्धं कूपतरुस्तंभं पथपंकैः सदैवतैः । तद्वारमशुभं प्रोक्तमत्युच्चं नीचमेव चेति ॥ अथ गृहनक्षत्रानयनं व्ययानयनं चाऽऽह-अष्टघ्न इति । गृहभूफले गृहक्षेत्रफलेऽष्टघ्नेऽष्टगुणिते भविहृते सप्तविंशतिहृते सति शेषं गृहर्क्षं गृहनक्षत्रं भवेत् । ऋक्षे सर्पहृतेऽष्टहृते सति शेषं व्ययो भवेत् । एवमायव्ययावभिधायाधुना तत्फलं विशेषणद्वाराऽऽह-गृहमसदिति । स्वल्पायभूरिव्ययं गृहमसदशुभं स्यात्स्वल्पायश्च भूरिव्ययश्च तौ यस्मिंस्तत्तथाऽर्थाद्बह्वायाल्पव्ययं शुभम् ॥ १० ॥

**टीकार्थ**—अशा रीतीनें आय घेऊन गृहाचें मुख सांगितलें, आतां राशिवरूनही गृहाचें मुख कसें कसें आहे तें सांगतों—मीन, वृश्चिक, कर्क ह्या ज्यांच्या जन्म राशि असतील त्यांच्या घराचें तोंड पूर्वेस करणें हितकारक आहे. जूका ह्म० तूळ, उपांत्य ह्म० कुंभ, गो ह्म० वृष, तूळ, कुंभ आणि वृष ह्या ज्यांच्या जन्म राशी असतील त्यांच्या घराचें तोंड पश्चिमेस करणें हितकारक आहे. अबला ह्म० कन्या, युग्म ह्म० मिथुन, एण ह्म० मकर ह्या ज्यांच्या जन्म राशि आहेत, त्यांच्या घराचें तोंड दक्षिणेस करणें हितकारक आहे. आद्य ह्म० मेष, सिंह आणि धनु ह्या ज्यांच्या जन्मराशि आहेत, त्यांच्या घराचें तोंड उत्तरेस करणें हितकारक आहे. अशा रीतीनें चार प्रकारानें गृहाचें मुख सांगितलें. आतां त्याचा निर्णय सांगतों—ह्याप्रमाणें आपल्याला शोभा वगैरे मिळण्याच्या सोई प्रमाणें इष्ट दिशेस मुख करावयाचें कांहीं अडचणीमुळें न झाल्यास त्या घराची एखादी खिडकी सांगितलेल्या प्रमाणें दिशेस करून, बाकीच्या सर्व आपल्या सोईप्रमाणें खिडक्या कराव्यात. तेंच वास्तु शास्त्रांत सांगितलें आहे कीं, द्वार चार प्रकारचें आहे. वास्तू वरून, संक्रांतीवरून, राशीवरून आणि खिडकीवरून असें समजावें. घराचें तोंड, कोण, स्तंभ इत्यादिकांशीं विरुद्ध असेल तर तें हितकारक होत नाहीं ॥ ९ ॥ अशा रीतीनें घराचे तोंडाचा निर्णय सांगितला आतां कोणादिकांशीं विरुद्ध असें जर घराचें तोंड असेल तर त्याचा दोष आणि त्याचा अपवाद सांगतों—भिंतीचा कोण, रस्ता, फिरणारें यंत्र ह्म० घरट, कुंभाराचें चाक वगैरे, विहीर, चिखल ह्मणजे स्नान इत्यादि करून नेहेमीं होणारा चिखल, कोणताही वृक्ष, दुसऱ्याचें द्वार, खांब, देव हे इतके दारासमोर असतां तें दार शुभकारक नाहीं, ह्याचा अपवाद सांगतों—घराच्या उंचीच्या दुप्पट अंतरावर वर सांगितलेले कोणादिक असतील तर त्यापासून दोष नाहीं, अर्थात् उंचीच्या दुप्पट अंतरावर कोणादिक नसतील तर दोष आहे असें समजावें. तेंच दुसऱ्या आगमांत सांगितलें आहे कीं, रस्ता, वृक्ष, कोण, कूप, चाक ह्यांनीं विद्ध झालेलें द्वार हें दोषकारक आहे, परंतु घराच्या उंचीच्या दुप्पट अंतरावर कोणादि असतील तर दोष कारक नाहीं असें समजावें. कात्यायनगृह्य कारिकेंत सांगितलें आहे कीं, कूप, वृक्ष, खांब, रस्ता, चिखल, देव ह्यांनीं विद्ध झालेलें द्वार अशुभ समजावें. अतिशय उंच असलेलें व अतिशय सखल हेंहीं अशुभच समजावें. आतां गृहाचे नक्षत्राचें आणणें, आणि व्ययाचें आणणें सांगतों—घराची लांबी व रुंदी ह्याचा जो गुणाकार येईल त्याला क्षेत्रफळ ह्मणतात त्या क्षेत्रफळाला ८ नीं गुणून २७ नीं भागावें, बाकी राहील तें घराचें नक्षत्र जाणावें. त्या नक्षत्राला आठांनीं भागून जें शेष राहील त्याला व्यय अशी संज्ञा आहे. अशा रीतीनें आय आणि व्यय सांगितले. आतां त्यांचें फल सांगतों—ज्या घराचा आय अल्प आहे आणि व्यय पुष्कळ आहे तें घर अशुभ समजावें अर्थात् पुष्कळ आय आणि थोडा व्यय असेल तर घर शुभकारक आहे ॥१०॥

गृहनक्षत्रांच्या राशि व ध्रुवादि गृहनाम.

मेषेऽश्विन्त्रितयं हरौ त्रिपितृभं मूलत्रयं धन्विनि ।
द्वे द्वे भे परतो गृहेशघटितं प्राग्वत्तु नाड्यन्यथा ॥
एकादिद्विगुणोत्तरा गृहमुखादिक्ष्वंकका: स्युः क्रमा- ।
च्छालाशांकयुतिः कुयुग्ध्रुवमुखान्योकांसि संति स्फुटम् ॥ ११ ॥

श्लोकार्थ—मेषराशींत अश्विनी, भरणी, कृत्तिका हीं ३ नक्षत्रें. सिंहराशींत मघा, पूर्वा, उत्तरा हीं ३ नक्षत्रें. धनराशींत मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा हीं ३ नक्षत्रें, आणि बाकी सर्व राशींत दोन दोन नक्षत्रें जाणावीं. पूर्वीं विवाहप्रकरणांत सांगितलेल्या घटिताप्रमाणेंच गृह व त्याचा स्वामी यांचें घटित पहावें. नाडी मात्र अन्यथा ह्मणजे गृह व स्वामी यांची एकनाडी असावी. एकापासून पुढें दुपटीनें वाढणारे असे ह्म० १।२।४।८ हे अंक अनुक्रमानें घराच्या मुख्य द्वारापासून चार दिशांला असतात. घराला जितक्या दिशेला द्वारें असतील, तितक्या द्वार दिशांच्या अंकाची बेरीज करून तींत १ मिळवून जो अंक होईल, त्यावरून गृहाच्या ध्रुवादि नांवांतलें नांव घ्यावें. अंक १ असतां ध्रुव, २ असतां धन्य, ३ असतां जय याप्रमाणें घ्यावें ॥ ११ ॥

नक्षत्रे ज्ञाते राशिनिर्णयमाह—अश्विन्त्रितयं मेषे ज्ञेयं त्रिपितृभं मघात्रयं हरौ सिंहे ज्ञेयं मूलत्रयं धनुषि ज्ञेयमन्येषु राशिषु द्वे द्वे भे ज्ञेये । तथा च गर्गः । अश्विन्यादित्रयं मेषे सिंहे प्रोक्तं मघात्रयं । मूलादित्रितयं चापे शेषभेषु द्वयं द्वयमिति ॥ अथ गृहतत्स्वामिनोर्घटितमाह—गृहेशेति । गृहं प्रसिद्धं ईशः स्वामी तयोर्घटितं प्राग्वत् विवाहवद्योज्यं तत्र विशेषमाह—नाड्यन्यथेति । नाडी एकनाडी अन्यथा योज्या विवाहवन्न योज्येत्यर्थः । अत्रैकनाड्येव प्रशस्तेति भावः । तथा च वृद्धगर्गः । प्रभुः पण्यांगना मित्रं देशो ग्रामं पुरं गृहं । एकनाडीस्थितं भाव्यं विरुद्धं वेधवर्जितमिति । तथा च ज्योतिःसागरे । सेव्यसेवकयोश्चैव गृहतत्स्वामिनोरपि । परस्परं मित्रयोश्च एकनाडी प्रशस्यत इति ॥ अथांशसाधनार्थगृहाणि तन्नामाक्षरसंख्या चाऽऽह-एकादीति । गृहमुखात्सकाशात् क्रमात् प्रदक्षिणक्रमात् दिक्षु चतसृषु दिक्षु एकादिद्विगुणोत्तरा अंकाः स्युः। एतदुक्तं भवति द्वारदिशि एकः तस्माद्वितीयदिशि द्वौ तृतीयदिशि चत्वारः चतुर्थदिशि अष्टौ एवं भवंतीत्यर्थः। शालाशांकयुतिः शालादिगंकयोर्योगः कार्यः कुयुक् एका युक्तासति ध्रुवमुखानि ध्रुवादिकानि शास्त्रोदितानि गृहाणि स्फुटं संभवंतीति । तानि तथा । ध्रुवं धन्यं जयं नंदं खरं कांतं मनोरमं । सुमुखं दुर्मुखं क्रूरं सुपक्षं धनदं क्षयं ॥ आक्रंदं विपुलं चैव विजयं चेति षोडशमिति ॥ ११ ॥

टीकार्थ—नक्षत्र समजल्यानंतर राशीचा निर्णय सांगतों—मेष राशीला अश्विनी, भरणी आणि कृत्तिका हीं तीन नक्षत्रें आहेत. सिंह राशींत मघा, पूर्वा, उत्तरा हीं तीन नक्षत्रें आहेत. धन राशींत मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा हीं तीन नक्षत्रें; बाकी उरलेल्या नऊ राशींमध्यें प्रत्येक राशीस दोन दोन नक्षत्रें आहेत. तेंच गर्ग सांगतो कीं, अश्विनी इत्यादि तीन नक्षत्रें मेष राशीस, मघा इत्यादि तीन नक्षत्रें सिंह राशीस, मूळ इत्यादि तीन नक्षत्रें धन राशीस, बाकीच्या प्रत्येक राशीस दोन दोन नक्षत्रें आहेत. आतां घर आणि घराचा स्वामी ह्यांचें घटित सांगतों—विवाहाचें जें घटित सांगितलें तसेंच घटित घर आणि घराचा स्वामी ह्यांचें जाणावें. त्यांपैकीं विवाहाप्रमाणें एक नाडीचा दोष नाहीं, कारण येथें एक नाडीच अतिप्रशस्त आहे. तेंच वृद्ध गर्ग सांगतो कीं, प्रभु, वेश्या, मित्र, देश, ग्राम, नगर व घर ह्यांची व ह्यांच्या मालकांची एक नाडी असणें प्रशस्त आहे. विरुद्ध व वेध मात्र वर्ज्य करावा. तेंच ज्योतिःसागर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, चाकर व मालक ह्यांची, घर व त्यांचा स्वामी ह्यांची, मित्रांची परस्पर एक नाडी असणें अतिशय प्र..स्त आहे. आतां अंश साधनाचे अर्थ आणि गृहें व त्यांचीं नामांचीं अक्षरें सांगतों—घराचे तोंडापासून दक्षिण बाजूच्या क्रमान चार दिशेस १–२–४–८ असे दुप्पट अंक असतात. ह्याचा अर्थ असा कीं, द्वार दिशेस १ तीपासून दुसऱ्या दिशेस २ तिसऱ्या दिशेस ४ चवथ्या दिशेस ८ असे असतात. घराच्या जितक्या दिशेस द्वारें असतील तितक्या द्वार दिशेच्या अंकांची बेरीज करून तींत एक मिळवावा, जो अंक येईल त्यावरून ध्रुवादि नामें शास्त्रांत सांगितलेलीं घ्यावीत.

तीं नांवें अशीं कीं, १ ध्रुव, २ धन्य, ३ जय, ४ नंद, ५ खर, ६ कांत, ७ मनोरम, ८ सुमुख, ९ दुर्मुख, १० क्रूर, ११ सुपक्ष, १२ धनद, १३ क्षय, १४ आक्रंद, १५ विपुल, १६ विजय असे हे १६ ध्रुवादि आहेत, १ अंक असेल तर ध्रुव समजावा, २ अंक असेल तर धन्य समजावा. ह्याप्रमाणें पुढें समजावें ॥ ११ ॥

### ध्रुवादिकांचीं अक्षरें व अंशक शुद्धि.

आषष्ठाद्दशमं त्रयोदशमिमे द्व्यर्णाः परे त्र्यक्षराः ।
षष्ठान्त्यं चतुरक्षरं खलु गृहं स्युः षोडशैवं गृहाः ॥
गेहक्ष्माफलयुग्व्ययो गृहभवैर्नामाक्षरैः संयुत-।
स्तष्टो वह्निभिरंशका न शुभदं पस्त्यं द्वितीयांशकम् ॥ १२ ॥

श्लोकार्थ—ध्रुवादि नांवांत १ पासून ६ व्या पर्यंत, १० वें, १३ वें हीं ८ नांवें दोन अक्षरांचीं आहेत. इतर सर्व तीन अक्षरांचीं आहेत. ७ वें मात्र चार अक्षरांचें आहे. अशीं ध्रुवादि गृहनामें १६ आहेत. ( १ ध्रुव, २ धन्य, ३ जय, ४ नंद, ५ खर, ६ कांत, ७ मनोरम, ८ सुमुख, ९ दुर्मुख, १० उग्र, ११ सुपक्ष, १२ धनद, १३ क्षय, १४ आक्रंद, १५ विपुल, १६ विजय. ) घराच्या क्षेत्रफळांत व्यय मिळवावा आणि त्यांत मागच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें गृहाचें ध्रुवादिकांतलें जें नांव येईल त्याचीं अक्षरें मिळवून त्या संख्येला ३ नीं भागावें. बाकी राहील तो अंशक जाणावा. ज्याचे अंशक २ येतील तें घर शुभ नव्हे ॥ १२ ॥

**नामाक्षरसंख्यामाह—आषष्ठादिति । षष्ठं मर्यादीकृत्येत्याषष्ठं तस्मात् प्रथमद्वितीयतृतीयचतुर्थपंचमषष्ठानि दशमं त्रयोदशमिमेऽष्टगृहाद्व्यर्णा द्व्यक्षराः षष्ठांत्यं सप्तमं गृहं चतुरक्षरं चत्वारि अक्षराणि यस्मिंस्तत्तथा । अन्ये गृहा त्र्यक्षरा एवं षोडश गृहाः स्युः । गृहाः पुंसि च भूम्न्येव निकाय्यनिलयालया इत्यमरः ॥ यथांशकसाधनमाह–गेहक्ष्मेति । गेहक्ष्माफलभुग्व्ययः गृहक्षेत्रफलयुक्तः पूर्वानीतो व्ययो गृहभवैर्नामाक्षरैः संयुतः वह्निभिस्त्रिभिस्तष्टः शेषितः सन्नंशकाः स्युः । इंद्रो यमो राजेति तन्नामानि ग्रंथांतर उक्तानि । तत्र द्वितीयांशकं पस्त्यं गृहं न शुभदमर्थात्प्रथमतृतीयांशकं शुभदमित्यर्थः । निशांतपस्त्यसदनं भवनागारमंदिरमित्यमरः ॥ १२ ॥**

**टीकार्थ**—नामाच्या अक्षरांची संख्या सांगतों—ध्रुवादि जे सोळा सांगितले त्यांमध्यें पहिल्यापासून तो सहापर्यंत हीं सहा, १० वें आणि १३ वें हीं एकंदर आठ नांवें दोन दोन अक्षरांचीं आहेत, सातवें गृह चार अक्षरांचें आहे, बाकीचीं सात नांवें तीन तीन अक्षरांचीं आहेत, अशा रीतीनें सोळा ध्रुवादि आहेत.आतां अंशाचें साधन सांगतों—पूर्वी सांगितल्या प्रमाणें घराचें क्षेत्रफळ करून त्यांत व्यय मिळवावा आणि त्यांत मागल्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें गृहांचे ध्रुवादिकांतलें जें नांव येईल त्याचीं अक्षरें मिळवून त्या संख्येला ३ नीं भागावें, बाकी राहील तो अंशक जाणावा. ज्याचे अंशक दोन येतील तें घर शुभ नाहीं असें समजावें ॥ १२ ॥

### शुभगृहाविषयीं नियम.

यावद्धारिगुणं हृदि स्फुरति तत्तावद्विचार्यं करै-।
श्चेत्तैर्नो तनुयादिहांगुलमुखं क्षिप्त्वा विहायाथवा ॥
श्रीगोपीपतिमेंगझालुगिमुखैरायासविच्छित्तये ।
स्वेष्टायर्क्षफलं निबद्धमिह तज्ज्ञात्वा स्थलं साधयेत् ॥ १३ ॥

श्लोकार्थ—घराची लांबी रुंदी हातांनीं घेऊन जोंपर्यंत त्याचें नक्षत्र, आय वगैरे शुभ येऊन मनाला बरें वाटेल तोंपर्यंत हातांनींच विचार करावा. केवळ हातांच्या लांबी रुंदीनें शुभ होत नसल्यास तसें घर बांधूं नये. तर लांबी रुंदीच्या हातांत कांहीं अंगुळें वाढवून किंवा कमी करून घराचें नक्षत्र आय वगैरे शुभ आणून तसें घर बांधावें. गोपीपति, मेंग, झालुगि इत्यादि ज्योतिष्यांनीं खटपट कमी करण्याकरितां, आपणास इष्ट असेल तो आय व नक्षत्र ह्यांवरून घराची लांबी, रुंदी काढण्याचें गणित सांगितलें आहे, त्यावरून पाहिजे तसें स्थळ साधावें.

इष्टनक्षत्र व आय ह्यांवरून क्षेत्रफळ आणण्याविषयीं, ह्मालुगि दैवज्ञाचा श्लोक ' व्येके० ' हा टीकेंत सांगितला आहे त्यावरून भूमीचें साधन करावें ॥ १३ ॥

अथ गुणविचारणावधिमाह–यावदिति । यावत्पर्यंतं करैर्हस्तैः कृत्वा भूरिगुणं बहुगुणं गृहं हृदि अंतःकरणे स्फुरति तत्तावद्विचार्यं चेद्यदि तैः केवलैः करैर्हस्तैः कृत्वा बहुगुणं न स्फुरति तदांगुलमुखमंगुलादिकं करेषु क्षिप्त्वाऽथवा विहाय तनुयात् कुर्यात् । अथोपायांतरसूचनामाह–श्रीगोपिपतीति । गोपीपतिर्गोपीराजो मेंगो मेंगनाथदैवज्ञो ह्यालुगिर्ह्मालुगिदैवज्ञ एतन्मुखैर्ज्योतिर्विद्भिरायासविच्छित्तये यत्स्वेष्टायर्क्षे फलं निबद्धं तदिहास्मिन् गृहकरणविषये ज्ञात्वा स्थलं स्वाभीष्टस्थलं साधयेत् । तथा च गोपीराजः–विष्णुं व्येकायगोभू १९ हतिभयुजि फलं गोपिराजो भ २७ शेषात् सायं वेष्टाष्टिदघ्नया २१६ युतमहि ८ निहता दक् २ प्रकृत्याख्य २१ विश्वे १३ । बाणाः ५ सिद्धा २४ ष्टि १६ नागो ८ ड् २७ तिधृति १९ गिरिश ११ त्र्या ३ कृतीं २२ द्र १४ तु ६ तत्वा-२५ त्यष्ट्यं १७ क ९ क्ष्मा १ नखे २० ना १२ र्णव ४ विकृति २३ दिना १५ द्र्यु ७ त्कृति २६ धृत्य १८ थाऽऽशाः १० इति ॥ अस्यार्थः गोपीराजः विष्णुं विष्णुनामानं शिष्यं प्रत्याहेत्यन्वयः । किमाह–हे विष्णो व्येकायगोभू १९ हतिभयुजि भ २७ शेषात् अहि ८ हता दक्प्रकृत्यादयः फलं स्यात् । विगतः एको यस्मात्स व्येकः स चासौ आयश्च व्येकायः व्येकायश्च गोभूश्च अनयोर्हतिर्गुणनं व्येकायगोभूहतिश्च भं च व्येकायगोभूहतिभे तयोर्युक् योगः तस्या भशेषात् सप्तविंशतिहृच्छेषात् एकादिषु सप्तविंशतिपर्यंतेषु अहिर्निहता अष्टहता दक्प्रकृत्यादयः फलं क्षेत्रफलं स्यादित्यर्थः । कथंभूतं फलं सायं आयेन सहवर्तमानं सायं इष्टायसहितमित्यर्थः । एतत्स्वेष्टायनक्षत्रजं फलं भवति न्यासः वा इत्यथवा तत्सायं फलं इष्टाष्टिदग् २१६ घ्नायुतं सत् फलं स्यात् इष्टाश्चाष्टिदक् च इष्टाष्टिदक् तयोर्घ्नी हतिः तया युतमित्यर्थः । इदमपि स्वेष्टायनक्षत्रजं फलं भवतीति । अत्रांकन्यास एव व्याख्यानं । तथा च मेंगनाथदैवज्ञस्य सूत्रं । इष्टभात्यष्टिघाते य आयस्तेनोनितेष्टकः । त्रिहृल्लब्धहता गाश्वि १७ युते चेष्टाय भं भवेदिति । अस्यार्थः । इष्टभात्यष्टिघाते इष्टभं च अत्यष्टिश्च तयोर्घातो गुणनं तस्मिन् पृथक् स्थापितो य आयस्तेन ऊनितेष्टको यदि ऊनो न भवति तदाऽष्टौ प्रक्षिप्य स्फोटनीयः ऊनितेष्टायः त्रिहृल्लब्धहतागाश्वियुते लब्धेन आहताश्च ते अगाश्विनश्च तैः पृथक् स्थापिते इष्टभात्यष्टिघाते युते सति इष्टायभं क्षेत्रफलं भवेत् आयश्च भं च आयभे इष्टे आयभे यस्मिंस्तत्तथा। अत्र यदि त्रिभिर्निःशेषो भागो न गच्छति तदा तावदष्टौ क्षेप्या यावत्रिभिर्भागो गच्छति । तथा च ह्मालुगिदैवज्ञस्य सूत्रम् । व्येकेष्टर्क्षहता द्विबाणशशिनो १५२ त्यष्ट्या युता १७ स्तेऽपि च व्येकेष्टायहतैकनाग ८१ सहिताः षण्मूर्छनाभि २१६ र्हृताः । शेषं क्षेत्रफलं भवेदभिमतस्वेष्टाय नक्षत्रजं स्याद्दैर्घ्यं तदभीष्टविस्तृतिहृतं दैर्घ्योद्धृतिं विस्तृतिरिति ॥ स्पष्टार्थोऽयं श्लोकः इत्यादिविचारणया इष्टं क्षेत्रफलं अवकाशानुरूपं हृदि धृत्वा स्थलं साधयेदित्यर्थः ॥ १३ ॥

**टीकार्थ**—आतां गुणाचा विचार करण्याचा परमावधि सांगतों–जोंपर्यंत हातांनीं मोजून तें गृह जसें आपणास इष्ट पाहिजे तसे गुण त्यापासून येतील, तोंपर्यंत गुणांचा विचार करावा. जर हातांनीं मोजलें असतां त्यापासून जितके पाहिजेत तितके गुण मिळत नसतील तर मग त्या हातांत कांहीं अंगुलें मिळवून किंवा कांहीं कमी करून आपल्याला पाहिजेत ते गुण आणावेत आणि त्याप्रमाणें घर बांधून तयार करावें. आतां दुसऱ्या उपायाची सूचना सांगतों–गोपीराज, मेंगनाथ दैवज्ञ ह्मालुगि नांवांच्या ज्योतिर्विदांनीं उत्तम रीतीनें आयांचा निर्णय करतां यावा ह्मणून जें सांगितलें आहे. त्यापासून, आपल्याला इच्छित आय आणि नक्षत्र ह्यांचें फल सांगतों–तें सर्व जाणून घर करण्याविषयीं आपलें इच्छित स्थल साधावें. तेंच गोपीराज आपल्या विष्णु नामक शिष्याला सांगतो कीं, हे विष्णो आयांतून एक वजा करून जो बाकीचा आय उरेल त्याचा आणि गोभू ह्मणजे १९ ह्याचा गुणाकार करावा तो गुणाकार आणि नक्षत्र ह्यांची बेरीज करावी. त्याबेरजेला भ ह्म० २७ नीं भागावें. जो शेष राहील मग तो एकपासून सत्तावीस पर्यंत असेल त्या बाकीला अहि ह्म० आठांनीं गुणावें ह्मणजे तें दक् प्रकृति इत्यादि क्षेत्रफळ होतें. मात्र त्यामध्यें आय मिळवावा. हें आलेलें आपल्या आयापासून उत्पन्न झालेलें नक्षत्र समजावें. अथवा तें आलेलें आया सहित जें क्षेत्रफळ असेल, त्यांत इष्ट आय आणि २१६ ह्यांचा गुणाकार करून तो मिळविला असतां हेंही इष्ट आय आणि नक्षत्र ह्यापासून झालेलें फळ होतें. येथें अंक मांडणें हेंच व्याख्यान आहे. तेंच मेंगनाथ दैवज्ञांचें सूत्र असें आहे कीं, इष्ट नक्षत्र आणि अत्यष्टि ह्मणजे १६ ह्याचा

गुणाकार करून जो आय येतो तो दोन ठिकाणीं मांडावा. पैकीं एकांतून इष्टक कमी करावा. कमी होत नसेल तर त्यांत आठ मिळवावेत, तो कमी करून आलेला अथवा आठ मिळवून आलेला आय त्याला ३ नीं भागून जो भागावर येईल त्यांत दोन मिळवावेत आणि पूर्वीं निराळा मांडलेला जो आय आहे, त्यांत दोन मिळवून आलेली रकम मिळवावी ह्मणजे तेथें इष्टायभं ह्म० क्षेत्रफळ होतें. आतां ३ नीं भाग जात नसेल तर त्यांत आठ मिळवावेत ह्मणजे ३ नीं भाग घेतां येईल. तसेंच ह्मालुगी दैवज्ञाचे सूत्रांत सांगितलें आहे कीं, इष्टनक्षत्रांत १ कमी करून त्यानें १५२ ला गुणावें, आणि त्या गुणाकारांत १७ मिळवावे. नंतर त्यांत, इष्ट आयांत १ उणा करून त्यानें ८१ ला गुणून जो गुणाकार येईल तो मिळवून सर्व संख्येला २१६ नीं भागावें. बाकी राहील तें इष्टनक्षत्र आया वरून आलेलें घराचें क्षेत्रफळ होतें. रुंदीनें क्षेत्रफळाला भागिलें ह्मणजे लांबी येते; आणि लांबीनें भागिलें तर रुंदी येते. ( उदाहरण—घराचें रेवती नक्षत्र, व आय५ यांवरून क्षेत्रफळ आणणें आहे, नक्षत्र २७ त्यांत १ उणा करून २६ ह्यांनीं १५२ ला गुणून गुणाकार ३९५२ त्यांत १७ मिळवून ३९६९ झाले. इष्ट आय ५ त्यांत १ उणा करून बाकी ४ ह्यांनीं ८१ ला गुणून गुणाकार ३२४ हा पूर्वींच्या ३९६९ संख्येंत मिळवून सर्व ४२९३ ह्यांला २१६ नीं भागून बाकी १८९ हें क्षेत्रफळ आलें. ह्याला ९ हात रुंदीनें भागिलें तर २१ हात लांबी होईल. ) क्षेत्रफळांवरून लांबी किंवा रुंदी काढतांना बाकी राहूं लागेल तेव्हां अंगुळें काढावीं ॥ १३ ॥

## चतुरस्र साधन.

द्विघ्नायाममितं द्विपाशमजरत्सूत्रं विधायांकये- ।
ऽयायामांघ्रिमिते च विस्तृतिदलेंऽतात्कर्षकोणाभिधौ ॥
पाशौ क्षेत्रविरामशंकुनिहितौ कृत्वाऽद्यमाकर्षये- ।
त्कोणे शंकुरितीतरो विनिमयाद्रज्ज्वंतयोश्चापरौ ॥ १४ ॥

श्लोकार्थ—जितके हात लांब घर बांधावयाचें असेल, त्या लांबीच्या दुप्पट न तुटणारें नवें सूत्र घेऊन त्याच्या दोन टोंकांस पाश ( फांस ) करावे. नंतर एका शेवटापासून लांबीच्या चार भागांपैकीं एक सोडून तीन भागांवर एक चिन्ह करावें. हें कर्षचिन्ह होय. तसेंच रुंदीच्या अर्धा इतक्या अंतरावर दुसरें चिन्ह करावें. हें कोणचिन्ह होय. मग ज्याठिकाणीं घर बांधावयाचें तेथें मध्यभागीं लांबीच्या टोंकास दोन खुंट्या पुरून त्यांत सूत्राचे फांस घालावे, आणि कर्षचिन्ह धरून ओढावें, ह्मणजे ज्याठिकाणीं सूत्रांतलें कोणाचिन्ह येईल त्याजागीं एक खुंटी पुरावी. मग दुसऱ्या दिशेस जाऊन पूर्वींप्रमाणेंच कर्षचिन्ह ओढून जेथें कोणाचिन्ह येईल, त्याजागीं एक खुंटी पुरावी. नंतर खुंट्यांत घातलेले फांस बदलून घालून पूर्वींप्रमाणेंच कर्षचिन्ह ओढून कोणचिन्हें येतील त्याठिकाणीं दोन खुंट्या पुराव्या. मग चारही कोणाचिन्हांच्या खुंट्यांस दोरी बांधावी ह्मणजे तें क्षेत्र चतुरस्र होतें ॥ १४ ॥

अथ स्थलसाधनाय सूत्रमोटनलक्षणमाह—द्विघ्नायाममिति । अजरत्सूत्रं नूतनसूत्रं द्विघ्नायाममितं द्विपाशं च विधाय अंतात् एकस्मात्सूत्रांतात् अंकयेदित्यन्वयः । द्विघ्नश्चासौ आयामश्च द्विघ्नायामः आयामे दैर्घ्ये तेन मितं द्विगुणितदैर्घ्यसमानमित्यर्थः । द्विपाशं द्वौ पाशौ यस्मिन्तद्द्विपाशं एवंविधं सूत्रं विधाय कृत्वा अंतात्सकाशात् अंकयेत् चिह्नयेत् एतदुक्तं भवति । पूर्वकल्पितक्षेत्रस्य दैर्घ्यमितं सूत्रं द्विगुणं विधाय तदंतयोः पाशं कृत्वाऽंकयेत् । कुत्र कुत्रांकयेदित्याह—ऽयायामांघ्रिमिते च परं विस्तृतिदलेऽकंयेत् । त्रयश्च ते आयामांघ्रयश्च ते तथा तैर्मितं तस्मिन् एतदुक्तं भवति क्षेत्रदैर्घ्यं चतुर्भिर्भक्त्वा लब्धमंघ्रिप्रमाणं एकस्मादंतात् अंघ्रित्रयं हित्वा चिह्नयेत् विस्तृतिदले क्षेत्रस्य विस्तारार्धमिते अंकयेत् तौ अंकौ कर्षकोणाभिधौ स्तः । अंघ्रित्रये कृतः कर्षाख्यः विस्तृतिदले कृतोंऽकः कोणाख्यः । एवं सूत्रमोटनमुक्त्वा स्थलसाधनमाह—पाशाविति । पाशौ क्षेत्रविरामशंकुनिहितौ कृत्वाऽऽद्यमंकमाकर्षयेदित्यन्वयः । क्षेत्रस्य विरामावंतौ तयोः शंकू निहितौ निक्षिप्तौ कृत्वाऽऽद्यमंकं कर्षाख्यमाकर्षयेत् । एतदुक्तं भवति क्षेत्रस्य मध्यभागे साधितदिक्सूत्रोपरि इष्टदैर्घ्यमितसूत्रं प्रसार्य तदंतयोः शंकुनिखातयोः शंकोः मोटितसूत्रांतपाशौ निधाय कर्षाख्यं चिह्नं धृत्वा एकस्यां दिशि आकर्षयेत् यथोभयशंकुगता रज्जुः समाना आकृष्टा स्यात् तथा आकर्षयेदित्यर्थः । कोणे शंकुरिति । कोणे कोणचिह्ने यत्र कोणचिह्नमागतं तत्र भुवि शंकुं निखायेत्यध्याहारः । इत्यमुना प्रकारेण इतरः शंकुर्निखेयः । एतदुक्तं भवति तदेव कर्षचिह्नमन्यस्यां दिशि आकृष्य

कोणे शंकुर्निखेयः । एवं कोणद्वयसाधनमभिधायान्यकोणद्वयसाधनमाह- विनिमयादिति । रज्ज्वंतयोर्विनिमयात् विपरीतधारणादपरौ कोणशंकू निखेयौ एतदुक्तं भवति रज्ज्वंतौ विपरीतौ धृत्वा पूर्ववत्कर्षाकर्षणं कृत्वा कोणयोः शंकू निखेयौ ॥ १४ ॥

**टीकार्थ**—आतां स्थल साधन करण्याकरितां सूत्र कसें टाकावें तें सांगतों—घर जितके हात लांब बांधावयाचें असेल, त्या लांबीच्या दुप्पट एक नवें सूत घ्यावें त्याच्या प्रत्येक टोंकास एक एक पाश ह्मणजे दोन टोंकास दोन पाश करावेत. आणि त्याच्या योगानें चिन्हें करावींत. तीं चिन्हें कोठें कोठें करावींत तें सांगतों—लांबीचे बरोबर चार भाग करावेत आणि त्यांपैकीं एक भाग सोडून बाकीच्या तीन भागांवर तें चिन्ह करावें आणि तसेंच दुसरें एक चिन्ह रुंदीच्या अर्धावर करावें. त्या दोन चिन्हांनां क्रमानें पहिल्यास कर्ष, आणि दुसऱ्यास कोण असें नांव आहे. ह्मणजे लांबीचा चवथा भाग सोडून तीन भागांवर केलेल्या चिन्हास कर्ष, असें नांव आहे आणि रुंदीच्या अर्धावर केलेल्या चिन्हास कोण असें नाव आहे. अशा रीतीनें सूत कसें ठेवावें. तें सांगितलें. आतां स्थलाचें साधन सांगतों—आतां ज्या ठिकाणीं घर बांधावयाचें असेल आणि घराचा शेवट यावयाचा असेल तेथें दोन खुंट्या ठोकाव्यात. ह्मणजे घराच्या मध्यभागीं लांबीच्या टोंकांस दोन खुंटचा पुरून त्यांत त्या सूत्राचे फांस घालावे आणि कर्ष चिन्ह धरून ओढावें ह्मणजे ज्या ठिकाणीं सूत्रांतलें कोण चिन्ह येईल त्यास्थानीं एक खुंटी पुरावी. ह्याप्रमाणें एका दिशेचा प्रकार सांगितला. मग दुसऱ्या दिशेस जाऊन पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच कर्ष चिन्ह ओढून जेथें कोण चिन्ह येईल. त्यास्थानीं एक खुंटी पुरावी. नंतर पूर्वीच खुंट्यांत घातलेले फांस बदलून घालून पूर्वी प्रमाणेंच कर्ष नांवाचें चिन्ह ओढावें ह्मणजे कोण चिन्हें येतील. मग त्या चिन्हांवर दोन खुंट्या पुराव्यात, मग चारही कोण चिन्हांच्या झालेल्या खुंट्यांस दोरी बांधावी, ह्मणजे तें बरोबर चतुरस्र होतें. असें हें चतुरस्र क्षेत्र तयार झाल्यावर मग त्यावर घर बांधण्याचें काम सुरू करावें ॥ १४ ॥

### सूत्रन्यास व नाभिपूरण.

आग्नेयादि दृढं प्रदक्षिणगतं सूत्रं समासादये- ।
न्मध्ये वामकपार्श्वसुप्तपुरुषं ध्यात्वा तमुत्तानकम् ॥
अष्टाश्व्यं २८ शमगेंदु १७ संमितलवान्पुच्छाद्विहायाग्रगो ।
भागो नाभिरितः खनेल्लवमितं वामेऽश्मभिः पूरयेत् ॥ १५ ॥

**श्लोकार्थ**—गृहक्षेत्रासभोंवतें आग्नेयीदिशेपासून प्रदक्षिणेप्रमाणें सूत्र बांधावें. क्षेत्राच्या मध्यभागीं डाव्या कुशीवर निजलेल्या वास्तुपुरुषाचें उताणा आहे असें ध्यान करून, त्यांतील पुच्छा कडून १७ भाग सोडून पुढच्या अठराव्या भागांत वास्तुपुरुषाची नाभि असते, त्या नाभीच्या डाव्या बाजूला एका भागा इतकें खोल खणून तो खळगा दगडांनीं भरून काढावा ॥ १५ ॥

एवं क्षेत्रसाधनमुक्त्वा सूत्रन्यासमाह–आग्नेयादीति । आग्नेयादि दृढं प्रदक्षिणगतं सूत्रं आसादयेत् मध्ये क्षेत्रमध्ये वामकपार्श्वसुप्तं पुरुषं प्रागुक्तशिरस्कं ध्यात्वा तं ध्यातं पुरुषमुत्तानकं ध्यायेत्। कथंभूतं पार्श्वस्थं लघुमध्ये गुरोः परं स्याद्यथोपरि तथैव पूरयेत् पश्चिमं च गुरुभिः पुनः पुनः सर्वमेव लघुरित्ययं विधिरिति कथंभूतमष्टाश्व्यंशं अष्टाश्विनोंशा भागा यस्मिन् स तथा तं । अयमर्थः । क्षेत्रप्रमाणं कृकलासरूपं वास्तुपुरुषं प्रकल्प्य ततोऽष्टाविंशतिधा कुर्यात् । एवमष्टाश्व्यंशं प्रकल्प्य पुच्छात् सकाशादर्णेदुसंमितलवान् सप्तदशभागान् विहाय त्यक्त्वाऽग्रगस्तदग्रगो भागो नाभिः इतो नाभेः सकाशाद्वामे वामभागे लवसंमितं खनेदनंतरमश्मभिः पूरयेत् । तथा च ब्रह्मशंभुः । सूत्रभित्तिशिलान्यासं स्तंभस्याऽऽरोपणं तथा । पूर्वदक्षिणयोर्मध्ये कुर्यादित्याह काश्यप इति ॥ नारदः । नभस्यादिषु मासेषु त्रिषु त्रिषु यथाक्रमं । पूर्वादिदिक्शिरा वामपार्श्वशायी प्रदक्षिणमिति ॥ तथा च शिल्पशास्त्रे । वास्तोः शिरसि पुच्छे च याम्यकुक्षौ च पृष्ठतः । आयुष्कामः खनेन्नैव वामकुक्षौ खनिः शुभा ॥ वास्तुक्षेत्रप्रमाणं च कल्पयित्वाऽस्य वामके । कुक्षौ खातं विधायाऽऽदौ ग्रावाणैः पूरयेत्तत इति ॥ तथा च लल्लः । त्यजेदग्रे शिरोभागे ह्यग्रे सप्तदशांशकान् । मध्ये नाभिं विजानीयात्तत्र शंकुं प्रतिष्ठयेत् ॥ अस्थिरस्य शिरो यत्र वास्तोस्तद्गणयेत्करैः । दैर्घ्यं वा विस्तृतिं चैव कृत्वाऽष्टाश्विमितांशकानिति ॥ १५ ॥

**टीकार्थ**—अशा रीतीनें क्षेत्राचें साधन सांगितलें, आतां सूत्राचा न्यास सांगतों—आग्नेयी दिशेपासून दक्षिणेकडून एक सूत्र घराचे क्षेत्रासभोंवती बांधावें. क्षेत्राच्या मध्यभागीं डाव्या कुशीवर निजलेला वास्तु पुरुष आहे, त्याचें मस्तक कसें आहे तें पूर्वीं सांगितलें आहे. त्या वास्तु पुरुषाचें ध्यान करावें, तो पुरुष उताणा आहे असें ध्यान करावें. क्षेत्राचे प्रमाणा एवढा तो वास्तु पुरुष कृकलास रूपाचा ह्मणजे सरटाचे स्वरूपाच्या आकृती सारखा आहे, असें कल्पून त्याचे अठ्ठावीस भाग करावेत आणि त्या भागांपैकीं पुच्छाकडून १७ भाग सोडून त्याच्या पुढच्या ह्मणजे आठराव्या भागांत त्या सरटाकृतीसारख्या वास्तुपुरुषाची नाभि आहे असें जाणावें. त्या नाभीच्या डाव्या बाजूस एका भागा इतकें खणावें आणि तो खळगा दगडांनीं भरावा. तेंच ब्रह्म शंभु ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सूत्र, भित्ति, शिला ह्यांचा न्यास, तसेंच स्तंभाचें उभारणें, हें पूर्व आणि दक्षिण ह्या दोन दिशांचे मध्यें करावें. असें काश्यपाचें मत आहे. नारद असें सांगतो कीं, भाद्रपद, आश्विन, कार्तिक. मार्गशीर्ष, पौष, माघ. फाल्गुन, चैत्र, वैशाख. ज्येष्ठ, आषाढ, श्रावण. ह्या प्रत्येक तीन तीन महिन्यांत अनुक्रमानें पूर्वादि चार दिशेस डोकें करून वास्तु पुरुष डाव्या कुक्षीवर निजलेला आहे असें जाणावें, तेंच शिल्प शास्त्रांत सांगितलें आहे कीं, वास्तु पुरुषाचे मस्तकावर आणि पुच्छावर डाव्या कुक्षीवर आणि पृष्ठभागावर असे खणण्याचे प्रकार आहेत, पैकीं आयुष्याची वृद्धि इच्छा करणाऱ्यानें वाम कुक्षी शिवाय दुसऱ्या ठिकाणीं खणूं नये, मात्र वाम कुक्षीवर खणणें शुभकारक आहे. वास्तु क्षेत्राचें प्रमाण कल्पना करून त्याच्या डाव्या बाजूस खणणें फारच शुभकारक आहे. त्या कुक्षीमध्यें खणून मग तो खणलेला खळगा दगडांनीं भरावा. तेंच लल्ल सांगतो कीं, वास्तूचे अठ्ठावीस भाग कल्पना करावेत, पैकीं मस्तकाचे बाजुचे दहा भाग सोडावेत, पुच्छा कडचे सतरा भाग सोडावेत आणि मध्यें असलेला भाग नाभी समजावा, तेथें शंकु स्थापन करावा. कारण वास्तु हा फारच स्थिर असावा. वास्तूचे बरोबर अठ्ठावीस भाग हातांनीं मोजून करावेत ॥ १५ ॥

## शंकुन्यास, रेषाकरण व भित्तिरचना.

**ना कालेऽत्र निधेय उक्ततरुजोऽग्र्यात्सिद्धविंशाष्टयहः ।**
**कृत्संख्यांगुलकस्त्रिभागचतुरस्राष्टास्रकानस्रकः ॥**
**कं वक्षस्थलमूरुपादयुगलं संस्पृश्य विप्रादिको ।**
**रेखां सूत्रवदग्निजेन रचयेत्तद्वच्च भित्तेः शिलाः ॥ १६॥**

श्लोकार्थ—मागच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें नाभी जवळचा खळगा दगडांनीं भरून त्यावर शुभकाळीं शंकु उभा ठेवावा. खदिरादि वृक्षांचा शंकु असावा. तो ब्राह्मणाला २४ अंगुलें, क्षत्रियाला २० अंगुलें, वैश्याला १६ अंगुलें, शूद्राला १२ अंगुलें, उंच असा शंकु असावा, शंकूच्या उंचीचे ३ भाग करून त्यांतला खालचा भाग चतुरस्र ह्म० चौकोनी असावा, त्यावरचा दुसरा भाग अष्टकोणी असावा; आणि वरचा तिसरा भाग कोन रहित ह्मणजे वर्तुळ असावा. ब्राह्मणानें वास्तुपुरुषाच्या मस्तकाला, क्षत्रियानें हृदयाला, वैश्यानें ऊरूला ह्मणजे मांड्यांला आणि शूद्रानें पादाला स्पर्श करून सूत्राप्रमाणें आग्नेयी दिशेपासून भूमीवर सुवर्णानें रेषा काढावी. आणि तसेच आग्नेयीपासून प्रदक्षिण क्रमानें भिंतीचे दगड रचावे ॥ १६ ॥

**अथ शंकुन्यासमाह—ना काल इति । अत्र कुक्षिस्थले ना नरः शंकुः काले मुहूर्तसमये निधेयः स कियत्प्रमाण इत्यपेक्षायां नृमानमाह—अग्र्यात् विप्रात्सकाशाद्वर्णपरत्वेन सिद्धा २४ विंशा २० ष्टय-१६ हः कृत् १२ संख्यांगुलकः निधेयः प्रतिष्ठापनीयः एतदुक्तं भवति विप्रेण सिद्धसंख्यांगुलकः चतुर्विंशांगुलो निधेयः । क्षत्रियेण विंशांगुलः । वैश्येनाष्टयंगुलः षोडशांगुलः । शूद्रेणाहःकृत्संख्यांगुलो द्वादशांगुलो निधेय इत्यर्थः । किंलक्षणो ना उक्ततरुजः शास्त्रोक्तवृक्षोद्भवः । पुनः किंलक्षणः त्रिभागचतुरस्राष्टास्रकानस्रकः त्रिभागेषु चतुरस्राष्टास्रकानस्रकानि यस्मिन् स तथा । एतदुक्तं भवति यथाप्रमाणं शंकुं त्रिधा विभज्य आद्यांशं चतुरस्रं द्वितीयांशमष्टास्रं तृतीयांशं अनस्रं वर्तुलं कुर्यादितिभावः। तथा चोक्तं ग्रंथांतरे। स्याच्चतुर्विंशविंशाष्टिद्वादशांगुलकैः क्रमात् ।विप्रादीनां शंकुमानं स्वर्णवस्त्राद्यलंकृतं ॥ खदिरार्जुनशालोत्थं युगपत्रतरूद्भवं । रक्तचंदनपालाशरक्तशालकिलालजं ॥ निंबकारंजकुटजं वैणवं बिल्ववृक्षजं । शंकुं त्रिधा विभज्याऽऽद्यं चतुरस्रं ततः परं ॥ अष्टास्रं च**

तृतीयांशमनस्समृजुमवर्ण । एवं लक्षणसंयुक्तं परिकल्प्य शुभे दिन इति ॥ अथ रेखाकरणमाह–कमि॰ति । अग्निजेन सुवर्णेन ब्राह्मणादिकः कादि संस्पृश्य सूत्रवद्रेखां रचयेत् । सूत्रवदिति । आग्नेय्यादि गृहप्रदक्षिणं कुर्यादित्यर्थः । एतदुक्तं भवति । ब्राह्मणः कं शिरः स्पृष्ट्वा तर्जन्या वा कृत्वा आग्नेय्यादि प्रदक्षिणं सूत्रानुगतां रेखां कुर्यात् । तथैव क्षत्रियो वक्षस्थलं स्पृष्ट्वा रेखां कुर्यात् । वैश्यः ऊरुयुगलं स्पृष्ट्वा रेखां कुर्यात् । शूद्रः पादयुगलं स्पृष्ट्वा रेखां कुर्यात् । तथा च लल्लः । कृत्वा सूत्रनिपातं मध्यांगुल्याऽथवा प्रदेशिन्या । अंगुष्ठेन वामपाणिना कनकाक्षतरजतमुक्ताभिः ॥ रेखां कुर्यादित्यादि । तथा च भृगुः । विप्रः शीर्षे नृपो वक्षो वैश्यश्चोरू परः पदे । स्पृष्ट्वा रेखां गृहारंभे कुर्यादग्नेः प्रदक्षिणमिति ॥ अग्नेरित्याग्नेय्याः तथा च कारिकायाम् । अंगुष्ठकेन देशिन्या रेखां कुर्वीत सूत्रतः । स्वर्णेन मणिना रूप्यमुक्तादधिफलाक्षतैः ॥ कुसुमैर्वा न शस्त्रेण न लोहेन न भस्मना। काष्ठादिभिर्नापसव्यां न वक्रां दोषदर्शनात् ॥ शस्त्रेण शस्त्रमृत्युः स्यादित्यादि स्पष्टमीरितमिति ॥ तथा च बृहद्वास्तुपद्धतौ । शस्त्रेण शस्त्रमृत्युर्बंधो लोहन भस्मनाऽग्निभयं । तस्करभयं तृणेन च लिखिता काष्ठेन राजभयं ॥ वक्रा च पादलिखिता शत्रुभयक्लेशदा विरूपा च । चर्मांगारास्थिकृता दंतेन च कर्तुरशुभाय ॥ वैरमपसव्यालिखिता प्रदक्षिणा संपदो विनिर्देश्या इति ॥ अथ शिलान्यासमाह–भित्तेः शिला अपि सूत्रवदाचरेयुराग्नेय्यादि प्रदक्षिणं स्थापयेयुरित्यर्थः । तथा च वराहः । दक्षिणपूर्वकोणे कृत्वा पूजां शिलां न्यसेत्प्रथमां । शेषाः प्रदक्षिणेन स्तंभाश्चैवं प्रतिष्ठाप्या इति ॥ १६ ॥

**टीकार्थ**—शंकु करण्याचें सांगतों–ह्या वास्तु पुरुषाच्या कुक्षीचें स्थानीं उत्तम मुहूर्तावर शंकुस्थापन करावा. तो किती प्रमाणाचा असावा अशी आशंका आली असतां सांगतों–ब्राह्मणादि चार वर्णांना अनुक्रमानें २४–२०–१६–१२ इतक्या अंगुलीच्या प्रमाणाचा असावा. ह्याचा अर्थ असा कीं, ब्राह्मणानें चोवीस अंगुली इतक्या प्रमाणाचा शंकु स्थापावा. क्षत्रियानें वीस अंगुली इतक्या प्रमाणाचा आणि वैश्यानें सोळा अंगुली इतक्या प्रमाणाचा आणि शूद्रानें बारा अंगुली इतक्या प्रमाणाचा शंकु स्थापावा. शास्त्रांत सांगितलेल्या वृक्षांचा शंकु स्थापावा. तो शंकु असा असावा कीं, त्याच्या तीन भागावर क्रमानें पहिला भाग चार कोणी, दुसऱ्या भागाला आठ कोण, आणि तिसऱ्या भागाला कोण नसलेला अर्थात् वाटोळा असावा. तेंच दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ब्राह्मणादि चार वर्णांना अनुक्रमें २४ अंगुलीचा २० अंगुलीचा, १६ अंगुलीचा आणि १२ अंगुलीच्या प्रमाणाचा शंकु असावा. तो शंकु सुवर्ण आणि वस्त्र ह्यांनीं अलंकृत करावा. तो खैर, अर्जुन, शाल, युगपत्र, रक्तचंदन, पलाश, रक्तशालकी, लालज, निंब, करंज, कुटज, वेणु, बिल्व, इतक्या प्रकारच्या झाडाचा केलेला असावा. शंकूचे तीन भाग असे असावेत कीं, पहिला भाग चौकोनी, दुसरा भाग आठ कोणी, तिसर भाग बिन कोणी ह्मणजे वर्तुलाकार असावा. अशा प्रकारचा उत्तम शंकु सुदिन पाहून रोवावा. आतां रेखाकरण सांगतो–ब्राह्मणादिकांनीं सुवर्णानें कं ह्म॰ मस्तक इत्यादि अंगाला स्पर्श करून सूत्राप्रमाणें आग्नेयी दिशेपासून भूमीवर रेषा काढावी. ह्याचा अर्थ असा कीं, ब्राह्मणानें वास्तू पुरुषाचे मस्तकाला स्पर्श करून आग्नेयी दिशेच्या क्रमानें सूत्राप्रमाणें रेखा काढावी. त्याच प्रमाणें क्षत्रियानें वास्तु पुरुषाचे छातीला स्पर्श करून पूर्वीच्या क्रमानें रेषा काढावी. वैश्यानें वास्तु पुरुषाचे मांड्यांला स्पर्श करून रेखा काढावी. शूद्रानें वास्तु पुरुषाचे पायांला स्पर्श करून रेखा काढावी. तेंच लल्ल सांगतो कीं, सूत्राचा निपात करून मध्यमांगुलीनें, प्रदेशिनी अंगुलीनें किंवा आंगठ्यानें, डाव्या हातानें, सोन्याच्या एक सारख्या रेषेनें, अक्षतानें, रुप्यानें, मोत्यांनीं रेखा करावी. तेंच भृगु सांगतो कीं, ब्राह्मणानें वास्तूच्या मस्तकाला, राजानें छातीला, वैश्यानें मांड्याला, शूद्रानें पांयाला स्पर्श करून घराचे आरंभी व आग्नेयी दिशेच्या अनुक्रमानें रेखा काढावी. तेंच कारिकेंत सांगितलें आहे कीं, आंगठ्यानें अथवा प्रदेशिनीनें, सूत्रानें रेखा करावी. सोन्यानें, मण्यांनीं, मोत्यांनीं, दह्यानें, फलांनीं, अक्षतांनीं, अथवा फुलांनीं रेषा करावी. परंतु शस्त्रानें, लोखंडानें, भस्मानें, काष्ठादिकांनीं रेखा करूं नये व ती रेखा अपसव्य रीतीनें आणि वांकडी करूं नये. कारण तशी रेखा केल्यानें दोष आहे. कारण शस्त्रानें रेखा केल्यास मृत्यु होतो. असें स्पष्ट सांगितलें आहे. तेंच बृहद्वास्तु पद्धतींत सांगितलें आहे कीं, शस्त्रानें रेखा केल्यास शस्त्रानें मृत्यु होतो. लोखंडानें केल्यास बंधन होतें. भस्मानें केल्यास अग्नीचें भय होतें. तृणानें केल्यास चोराचें भय होतें. काष्ठानें केल्यास राजाचें भय होतें. वांकडी रेषा पायानें काढली असतां शत्रूपासून भय व क्लेश होतात. आणि वैरूप्य होतें, चर्मानें, कोळशानें आणि हाडकानें केल्यास करणाऱ्यास अशुभ प्राप्त होतें. अपसव्य रीतीनें रेखा केल्यास वैर प्राप्त होतें. प्रदक्षणा रीतीनें केल्यास सर्व संपत्ति प्राप्त होतात. आतां शिला कशी ठेवावी तें सांगतों–जसें आग्नेयी दिशेच्या क्रमानें सूत्र सांगितलें, तसेंच भित्तीकारितां आग्नेयी दिशेच्याच क्रमानें दगडही रचावेत. तेंच वराह सांगतो कीं, दक्षिणेच्या बाजूच्या कोणाची पूजा करून पहिला दगड ठेवावा आणि बाकीचे दगड प्रदक्षिण रीतीनें ठेवावेत आणि तसेंच खांबही ठेवावेत ॥ १६ ॥

द्वारस्थान, स्तंभस्थापन व उंची.

पूर्वादौ त्रिषडर्थपंचमलवे द्वाः सव्यतोऽकोद्धृते ।
दैर्घ्ये द्व्यंशसमुच्छ्रिताब्धिलवके सर्वासु दिक्षूदिता ॥
स्तंभोऽग्नेर्दिशि पूजितः सुसमये स्थाप्यः शिरश्छत्रभा- ।
ग्विस्ताराष्टिलवान्वितैः कृतकरैस्तुल्यं गृहोच्चं विदुः ॥ १७ ॥

श्लोकार्थ—घराच्या लांबीचे ९ भाग करून पूर्व दिशेस द्वार करावयाचें असतां डाव्या बाजूकडून तिसऱ्या भागांत, दक्षिणेस ६ व्या भागांत, आणि पश्चिमेस व उत्तरेस ५ व्या भागांत दार लावावें. सर्व दिशेस ४ थ्या भागांत दार लावावें. लांबीच्या ९ भागांपैकीं दोन भागां इतकी दाराची उंची असावी. शुभ मुहूर्तावर पूजा करून व मस्तकावर छत्र बांधून प्रथम आग्नेयी दिशेस स्तंभ उभा करावा. घराच्या रुंदीच्या हातांचे १६ भाग करून त्यांतला एक भाग ४ हातांत मिळवून जितके हात होतील तितकें उंच घर बांधावें ॥ १७ ॥

अथ भित्तिप्रसंगेन द्वारमाह–दैर्घ्ये गृहदैर्घ्येऽङ्कांशे नवभिर्भाजिते सति पूर्वादौ दिशि क्रमेण सव्यतो वामभागात्रिषडर्थपंचमलवे द्वाः द्वारमुक्तं मुनिभिरिति शेषः । त्रयश्च षट् चार्धाश्च पंच च त्रिषडर्थपंचमाः ते च ते लवाश्च तेषां समाहारस्तस्मिन् । एतदुक्तं भवति । गृहदैर्घ्यं नवभागं कृत्वा पूर्वाभिमुखे गृहे क्रियमाणे वामभागादंशद्वयं त्यक्त्वा तृतीयांशे द्वारं कर्तव्यं दक्षिणाभिमुखे गृहे तथैवांशपंचकं त्यक्त्वा षष्ठेऽशे कार्यं पश्चिमाभिमुखे तथैवांशचतुष्कं त्यक्त्वा पंचमांशे कार्यमुदङ्मुखे पंचमांशे एव द्वारं कर्तव्यं सर्वासु दिक्षु अब्धिलवके चतुर्थभागे दारुदिता । किंलक्षणा द्वाः द्व्यंशसमुच्छ्रिता द्विभागोच्चा । तथा च वराहः । दैर्घ्ये नवांशाः पदमत्र्यामाद्वारं शुभं प्राक् त्रिचतुर्थभागे । चतुर्थषष्ठे दिशि दक्षिणस्यां पश्चाच्चतुः पंचमके तथोदगिति ॥ तथा च च्यवनः । मानाधिकोनदिग्भागे द्वारे नीचे सुखक्षय इति॥ अथ निष्पन्नासु भित्तिषु स्तंभप्रतिष्ठामाह–स्तंभोऽग्नेर्दिशीति । अग्नेर्दिशि आग्नेय्यां सुसमये पूर्वोदिते स्तंभः स्थाप्यः । अत्राप्युक्तरुज इत्यनुवर्तते । किंलक्षणः स्तंभः पूजितः स्रक्चंदनार्चितः । पुनः किंलक्षणः शिरश्छत्रभाक् शिरसि छत्रं भजते इति तथा । छत्रं तु काकादिपक्ष्युपवेशनभयात् स्तंभोपरि क्रियते । तथा च वराहः । छत्रस्रग्बंधयुतः कृतधूपविलेपनः समुत्थाप्यः । स्तंभस्तथैव कार्यो द्वारोच्छ्रायः प्रयत्नेनेति ॥ तथा चोत्पलः । स्तंभोपरि यदोलूककाकगृध्रादिपक्षिणः । व्यालादयश्च तिष्ठंति तदा कर्तुर्न शोभनं ॥ तस्मात्स्तंभोपरि छत्रं शाखां फलवतीं तु वा । धारयेदथवा वस्त्रं बुधो रत्नादि निक्षिपेत् । गुर्जरदेशे क्वचित् कालसर्पमवलोक्य तच्छून्यदिशि प्रथमं स्तंभप्रतिष्ठां कुर्वंति तदसत् । यतस्तदवलोकनं विवाहवेद्यां कोणेषु शृंगारार्थं स्तंभान् रोपयंति तद्विषयं तदप्येकदेशीयं न बहुसंमतं । कालसर्पस्तु यथा । ईशानतः सर्पति कालसर्पो विहाय सृष्टिं गणयेद्विदिक्षु । पश्चाद्गतिस्तन्मुखमध्यपुच्छं त्रिकं त्रिकं वै वृषसंक्रमादेः ॥ अहेः फणायां मरणं वरस्य मध्ये कुमार्याः स्वजनस्य पुच्छे । विधेयमेकं किल शून्यदेशे विवाहवेद्यां निखनेच्च कीलमिति ॥ वृषादित्रिषु राशिषु रवावाग्नेय्यां स्तंभारोपणं कार्यं सिंहादिषु ईशान्यां वृश्चिकादित्रिषु वायव्यां घटादित्रिषु नैर्ऋत्यां कर्तव्यमिति एतद्विवाह एव । गृहे सिंहादवलोकनीयं वृषाद्वेद्यां । तथा च वृषाद्वेद्यां गृहे सिंहान्भीनात्रीणि सुरालये । मुखं मध्यं तथा पुच्छं हित्वा स्तंभं नियोजयेदिति ॥ अन्यच्च गृहस्तंभप्रतिष्ठापनं बहुभिर्ग्रंथकारैराग्नेय्यामेवाभिहितं । तथा च ब्रह्मशंभुः । सूत्रभित्तिशिलान्यासं स्तंभस्याऽऽरोपणं तथा । पूर्वदक्षिणयोर्मध्ये कुर्यादित्याह कश्यपः ॥ तथा च शार्ङ्गधरः । प्रासादेषु च हर्म्येषु गृहेष्वन्येषु सर्वदा । आग्नेय्यां प्रथमं स्तंभं स्थापयेत्तद्विधानतः । तथा च वराहमिहिराचार्यः । दक्षिणपूर्वे कोणे कृत्वा पूजां शिला न्यसेत्प्रथमा । शेषा प्रदक्षिणेन स्तंभाश्चैवं प्रतिष्ठाप्या इति ॥ कात्यायनगृह्यकारिकायामप्युक्तं । एकैकमुच्छ्रयेत्स्तंभं मंत्रैरेतैः शिलातले । श्रियोवसान इत्यंतैरिमामित्यादिभिर्गृही ॥ आग्नेय्यादिषु कोणेषु मंत्रैरेतैः शिला न्यसेत इति ॥ गृह्ये हरिहरभाष्ये शालापद्धतिष्वप्येवमेवोक्तं । इत्यलमतिप्रसंगेन । उक्तं तद्रुज इत्युक्त्वाच्छालांतरात्काष्ठान्यवगंत-

न्यानि । तथा च वास्तुशास्त्रे । श्रीपर्णी रोहिणी शाकसर्जाश्च सरलाः शुभाः । पतंगलोध्रशालाख्यास्तालार्जुनकशिंशपाः ॥ चंदनाशोकबदरीमधूकाश्च कदंबकाः । प्रशस्ताश्च शमीनिंबबिल्ववर्जं गृहांतिके ॥ गृहे काष्ठं समं श्रेष्ठमलिदे विषमं शुभमिति ॥ नारदः । प्लक्षोदुंबरचूताख्या निंबस्तु हि बिभीतकः । दुग्धाः कंटकिनो वृक्षा वटाश्वत्थकपित्थकाः ॥ अगस्तिशिग्रुतालाख्यास्तितिडीकाश्च निंदिताः । अन्ये च गृहनिर्माणे योजनीयाः सदा द्रुमा इति ॥ तथा च वराहः । पितृवनमार्गसुरालयवल्मीकोद्यानतापसा श्रमजाः । चैत्यसरित्संगमसंभवाश्च घटतोयसिक्ताश्च ॥ कुंजानुजातवल्लीनिपीडिता वज्रमारुतोपहताः । स्वपतितहस्तिनिपीडितशुष्काग्निप्लुष्टदुष्टमधुनिलयाः ॥ तरवो वर्जयितव्याः शुभदाः स्युः स्निग्धपत्रकुसुमफलाः । सुरदारुचंदनसमा मधुकरतरवः शुभा द्विजातीनां ॥ क्षत्रस्यारिष्टाश्वत्थखदिरबिल्वा वृद्धिकराः ॥ वैश्यानां जीवखादिरकसिंदूरकस्यंदनाश्च शुभफलदाः ॥ तिंदुककेसरसरलार्जुनोत्थसालाश्च शूद्राणां । सर्वेषां वा शस्ताः सर्वे वृक्षाश्च निंदिता नो चेदिति ॥ व्यासोऽपि । अन्यवेश्मस्थितं दारु नैवान्यस्मिन्प्रयोजयेत् । न तत्र वसते कर्ता वसेत्तत्र न जीवतीति ॥ समरंगणे । इष्टकालोष्टपाषाणमृत्तिकाजीर्णमायसं । तृणं पर्णं बुधैः प्रोक्तं दारु नूनं गृहाय वै इति ॥ शार्ङ्गधरेऽपि । नूतने नूतनं काष्ठं जीर्णे जीर्णं प्रशस्यते । जीर्णे च नूतनं श्रेष्ठं नो जीर्णं नूतने शुभमिति ॥ वृक्षच्छेदप्रार्थना ग्रंथांतरे उक्ता । यानीह भूतानि वसंति तानि बलिं गृहीत्वा विधिवत्प्रयुक्तं । अन्यत्र वासं परिकल्पयंतु क्षमंतु तान्यद्य नमोऽस्तु तेभ्य इति ॥ अथ स्तंभप्रसंगेन गृहोच्चतामाह—विस्तारेति ।विस्तारस्य गृहविस्तारस्याष्टिलवः षोडषांशस्तेनान्वितैर्युक्तैः कृतकरैश्चतुर्हस्तैस्तुल्यं समानं गृहोच्चं विदुर्मुनय इत्यध्याहारः। तथा च रत्नकोशे । विस्तारषोडशांशश्चतुर्हस्तो भवेद्गृहोच्छ्राय इति । तथा च लल्लः । नात्युच्छ्रितं नातिनीचं कुड्योत्सेधं यथारुचीति ॥ १७ ॥

टीकार्थ—आतां भिन्तीच्या प्रसंगानें द्वार सांगतों—घराची लांबी किती असेल ती मोजावी आणि तिचे बरोबर नऊ भाग करावेत आणि पूर्वादि दिशेकडून अनुक्रमानें डावे बाजूनें तिसरा, सहावा, पांचवा या भागांत दार लावावें म्हणजे घराच्या लांबीचे नऊ भाग करून पूर्व दिशेस घराचें दार करावयाचें असल्यास डाव्या बाजूकडून दोन भाग सोडून तिसऱ्या भागांत करावें, दक्षिण दिशेस घराचें दार करावयाचें असल्यास तसेंच पांच भाग सोडून सहाव्या भागांत द्वार करावें, पश्चिम दिशेस घराचें दार करावयाचें असल्यास चार भाग टाकून पांचव्या भागांत करावें, उत्तर दिशेस घराचें दार करावयाचें असल्यास पांचव्याच भागांत करावें. सर्व दिशेस घराचें दार करावयाचें असल्यास चवथ्या भागांत घराचें दार लावावें घराचे जे नव भाग केले असतील त्याच्या दोन भागा इतकी दाराची उंची असावी. तेंच वराह सांगतो—घराच्या लांबीचे नऊ भाग करावेत आणि क्रमानें पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर ह्या दिशेस तीन भाग, चार भाग, चार, साहा, पांच ह्या दिशेस तीन भाग टाकून पुढल्या भागीं करावें जसें कीं पूर्वेस दार करावयाचें असल्यास तिसऱ्या आणि चवथ्या भागीं करावें. दक्षिणेस दार करावयाचें असल्यास चवथ्या आणि सहाव्या भागीं करावें उत्तरेस दार करावयाचें असल्यास चवथ्या आणि पांचव्या भागीं करावें. तेंच च्यवन सांगतो कीं, मानापेक्षां अधिक किंवा कमी अशा दिशेच्या भागीं दार केलें असतां अथवा फारच खालपट केलें असतां सुखाचा क्षय होतो. आतां भित्ती तयार झाल्यावर स्तंभाची प्रतिष्ठा सांगतों—आग्नेयी दिशेस उत्तम समयावर स्तंभ स्थापन करावा. ह्या विषयींही पूर्वी सांगितलेला झाडाचा स्तंभ असावा तो स्तंभ असा असावा कीं,त्या स्तंभावर छत्र असून त्याची चंदन पुष्प इत्यादिकांनीं पूजा करावी.तें छत्र स्तंभाचे वर करावें, कारण त्यावर कावळे इत्यादि पक्ष्यांची पडण्याची वगैरे भीति असते. तेंच वराह सांगतो कीं, छत्री आणि माळा, चंदन इत्यादिक सामान बांधलेला असा स्तंभ उभा करावा. तो दाराचे उंचीपेक्षां अधिक मोठ्या प्रयत्नानें करावा. तेंच उत्पल सांगतो कीं, त्या स्तंभावर जर घूबड, कावळा, गिधाड इत्यादि पक्षी बसतील अथवा सर्प वगैरे रहातील तर त्यापासून कर्त्याचें शुभ होणार नाहीं. ह्मणून स्तंभावर छत्र, फळवती शाखा इत्यादि धारण होईल अशी व्यवस्था विद्वानानें करावी. किंवा विद्वानानें त्यावर रत्न इत्यादि घालावें. गुर्जर देशामध्यें कोठें कोठें काल सर्प पाहून तो ज्या दिशेस नसेल तशा दिशेवर अगोदर स्तंभ प्रतिष्ठा करितात, तें त्यांचें करणें अयोग्य आहे. कारण, कालसर्प आहे किंवा कसें हें पाहणें विवाहाविषयीं सांगितलें आहे, कारण विवाहाचे वेदीच्या कोंपऱ्यास शृंगाराकारितां ह्मणजे शोभेकरितां स्तंभाचें रोपण करितात. त्यावेळेस काळ सर्प पहावा असें आहे, पण तेंही एकदेशी मत आहे बहुसंमत नाहीं. काळसर्प असा असतो कीं कालसर्प हा ईशान्य दिशेपासून फिरत असतो तो सर्व सृष्टी सोडून आकाशांत विदिशामध्यें ह्मणजे आग्नेयी, नैर्ऋत्य, ईशान्य आणि वायव्य दिशेमध्यें फिरत असतो अशी त्याची गणना करावी,त्या कालसर्पाची गति उलट आहे. तोंड,मध्यभाग आणि

पुच्छ असे तीन भाग वृष संक्राती पासून प्रत्येक त्रिकाला समजावे. जसें वृष, मिथुन, कर्क इत्यादि त्रिकावर आग्नेयी, ईशान्य, वायव्य, नैर्ऋत्य या दिशेस स्तंभारोपण करावें. पुढें सिंह, कन्या, तूळ ह्यावर ईशान्य दिशेस. वृश्चिक, धन, मकर ह्यांवर वायव्य दिशेस. कुंभ, मीन, मेष ह्यांवर नैर्ऋत्य दिशेस असें समजावें. सर्पाचे फणावर स्तंभ केला असतां वराचें मरण होतें. मध्यभागीं केला असतां कुमारीचें मरण होतें. पुच्छावर केला असतां स्वजनाचें मरण होतें अशा रीतीनें तोंड, मध्य, पुच्छ ह्या शिवायचे भागावर विवाहाची वेदी करावी आणि तसाच खिळा ही ठोकावा. वृष, मिथुन आणि कर्क ह्या तीन राशीवर रवि असतां आग्नेयी दिशेस स्तंभाचें आरोपण करावें. असेंच सिंहादि तीन राशीवर ईशान्य दिशेस स्तंभारोपण करावें. वृश्चिकादी तीन राशींवर वायव्य दिशेस स्तंभारोपण करावें. कुंभादि तीन राशीवर नैर्ऋत्य दिशेस स्तंभारोपण करावें. हें सर्व विवाहाविषयींच सिंहापासून तीन राशीपर्यंत जाणावें. वेदीविषयीं वृषापासून तीन राशीपर्यंत जाणावें, आणि मंदिराविषयीं मीनापासून तीन राशीपर्यंत जाणावें, पूर्वी सांगितल्या प्रमाणें मुख, मध्य आणि पुच्छ ह्या तीन स्थानाला सोडून स्तंभाची योजना करावी, दुसरें असें कीं, पुष्कळ ग्रंथकारांनीं आग्नेयी दिशेसच घराच्या स्तंभाचें प्रतिष्ठापन करावें असें सांगितलें आहे. तेंच ब्रह्मशंभु ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सूत्राचा, भींतीचे दगडाचा, तसेंच स्तंभाचें आरोपण पूर्व आणि दक्षिण ह्या दोन दिशांचे मध्यभागीं ह्मणजे आग्नेयी दिशेस करावें. असें कश्यप ऋषीचें मत आहे. तेंच शार्ङ्गधर सांगतो कीं, प्रासाद ह्मणजे मंदिर आणि राजवाडा, मोठा वाडा. दुसरें साधारण घर, इतकें करावयाचें असतां प्रथम स्तंभाचें आरोपण आग्नेयी दिशेस यथाविधीनें करावें. तेंच वराहमिहिराचार्य सांगतो कीं, दक्षिण आणि पूर्व ह्या दोन दिशेचा जो कोण ह्मणजे आग्नेयी दिशेस पूजा करून पहिला दगड ठेवावा. बाकीचे दगडही प्रदक्षणक्रमानेंच स्थापन करावे. कात्यायन गृह्य कारिकेंतही सांगितलें आहे कीं, ह्या मंत्रांनीं एक एक स्तंभ उभारावा आणि ह्या मंत्रांनीं दगडावर दगड ठेवावा. आणि 'श्रियोवसान०' ह्या मंत्रांनीं गृहस्थानें दक्षिण कोणी ह्मणजे आग्नेयी दिशेस ह्या मंत्रांनीं दगड ठेवावेत. गृह्यकारिकेंत हरिहर भाष्यांत शाला पद्धतींतही असेंच सांगितलें आहे. आतां त्याचा फार विचार करणें पुरे आहे. अमूक लांकडाचा स्तंभ असावा असें सांगितलें आहे तो कोणत्या लांकडाचा स्तंभ असावा हें दुसऱ्या शास्त्रावरून घ्यावें. तेंच वास्तु शास्त्रांत असें सांगितलें आहे कीं, श्रीपर्णी नांवाचा, रोहिणी नांवाचा, शाक, सर्ज, सरल इतके वृक्ष शुभ कारक आहेत. दुसरे पतंग, लोध्र, शालाख्य, ताल, अर्जुन, शिंशप, चंदन, अशोक, बदरी, मधूक, कदंबक इतके वृक्ष प्रशस्त आहेत. मात्र शमी, निंब, बिल्व इतके वृक्ष घराजवळ नसावेत व त्यांचीं लांकडेंही नसावींत. घराविषयीं सम काष्ठ प्रशस्त आहे, उंबऱ्या करितां विषम काष्ठ शुभ आहे. नारद सांगतो कीं, प्लक्ष, उदुंबर, आंबा, निंबु, बिभीतक, जळका वृक्ष, बाभळीचा वृक्ष, वड, अश्वत्थ, कपित्थ, अगस्ति, शिंशु, ताल, तित्तिडीक इतके वृक्ष घर करण्यास निंद्य आहेत. ह्या शिवाय बाकीचे वृक्ष घर बांधण्यास योग्य आणि प्रशस्त आहेत. तेंच वराह सांगतो कीं, स्मशानाचे रस्त्यावरचे वृक्ष, मंदिरांतील वृक्ष, वारुळा जवळचे वृक्ष, बागेंतील वृक्ष, तापस वृक्ष, श्रमानें वाढविलेले वृक्ष, चैत्यांतील वृक्ष, नदींचे संगमावरचे वृक्ष, मातीच्या घड्यानें वाढविलेले वृक्ष, नाना प्रकारच्या लतांनीं वेढलेले वृक्ष, वीज आणि वारा ह्यांच्या योगानें पीडित झालेलें वृक्ष, आपोआप पडलेले वृक्ष, हत्तींनीं पाडलेले वृक्ष, सुकून गेलेले वृक्ष, अग्नीनें जळलेले वृक्ष, ज्याला दुष्ट असलेले वृक्ष, दारूचे वृक्ष, इतके वृक्ष वर्ज्य सांगितले आहेत. ह्यां शिवाय टवटवीत पानें, फुलें असलेले वृक्ष, देवदारु वृक्ष, चंदन वृक्ष, ज्यांवर भ्रमर बसतात असे वृक्ष, द्विजातींना शुभकारक आहेत. आणि क्षत्रियांना अरिष्ट, अश्वत्थ, खदिर, बिल्व इतके वृक्ष शुभ कारक आहेत. वाणी जातीनां जीव वृक्ष, खादिर वृक्ष, सिंदूर वृक्ष, स्यंदन वृक्ष हे शुभकारक आहेत. आणि शूद्र जातींनां तिंदुक, केसर, सरल, अर्जुन, साल इतके वृक्ष शुभकारक आहेत. अथवा निंदित वृक्षाशिवाय बाकीचे सर्व वृक्ष सर्वांना प्रशस्त आहेत. व्यासही असें सांगतो कीं, दुसऱ्याच्या घराच्या उपयोगास लावलेलें लांकूड दुसऱ्या कामाकरितां लावूं नये. तसें केलें असतां घर करणारा तेथें राहूं शकत नाहीं, कदाचित् राहिलाच तर फार दिवस जिवंत राहत नाहीं, समरंगण ग्रंथांत सांगितलें आहे कीं, वीटा, लोखंड, दगड, माती, जुनें लोखंडी सामान, तृण, पर्ण इतकें साधन घर करण्याकरितां आवश्यक आहे, शार्ङ्गधर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, नव्या घराला नवें लांकूड श्रेष्ठ आहे. जुन्याला जुनें लांकूड प्रशस्त आहे. जुन्या घराला नवें लाकूड फारच श्रेष्ठ आहे परंतु नव्या घराला जूनें लांकूड शुभकारक नाहीं. दुसऱ्या ग्रंथामध्यें वृक्ष तोडतानां त्याची प्रार्थना करावयाची सांगितली आहे ती अशी कीं, ह्या वृक्षावर जितके प्राणी मात्र राहिले असतील ते सर्व मी दिलेला बळी घेऊन दुसऱ्या ठिकाणीं वास करोत. आणि आमचा अपराध क्षमा करोत त्यांनां आमचा नमस्कार आहे, आतां स्तंभाच्या प्रसंगानें घराचा उंचपणा सांगतों—घराचे रुंदीचे सोळा भाग करावेत त्यांतला एक भाग चार हातांत मिळवून जितके हात होतील तितकें उंच घर बांधावें. असें मुनि लोकांचें मत आहे. तेंच रत्नकोश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, रुंदीचा सोळावा भाग आणि चार हात इतके हात घराची उंची असावी. तेंच लल्ल ग्रंथांत सांगितलें आहे कीं, घर फारच उंच नसावें फारच खालपट नसावें तर भिंती इतकें उंच आणि आपल्या रुची प्रमाणें असावें ॥ १७ ॥

### पदार्थ ठेवण्याचीं स्थानें.

स्नानाग्निस्वपिवस्त्रभोजनपशुद्रव्यामरौकः स्थितिं ।
पूर्वादौ जलमीशितुर्दिशि परं वायोरपाङ्मूत्रकम् ॥
आल्प्ये शक्तिभुवोर्यथारुचि परे गेहस्य दक्षे घर- ।
ट्टांबूलूखलचुल्लिकापितृपदप्रक्षालनान्यूचिरे ॥ १८ ॥

श्लोकार्थ—पूर्वेपासून आठ दिशेला अनुक्रमानें स्नान, अग्नि, शयन, वस्त्र, भोजन, पशु, द्रव्य, देव ह्यांचीं गृहामध्यें स्थानें करावीं. उदकाचें स्थान ईशान्यदिशेस करावें. इतर सर्व पदार्थांचीं स्थानें वायव्य दिशेस करावीं. मूत्रस्थान दक्षिणेस करावें. शक्ति अल्प असल्यामुळें किंवा जागा थोडी असल्यामुळें, वर सांगितल्या प्रमाणें पदार्थ निरनिराळे ठेवितां येण्यासारखें मोठें घर नसतां आपणाला आवडेल व सोय होईल, तसतशीं पदार्थांचीं स्थानें करावीं. घराच्या दक्षिणदिशेला घिरट, पाणी, उखळ, चूल व पितरांचे पाय धुणें ह्यांचीं स्थानें करावीं असें कित्येक ह्मणतात ॥ १८ ॥

अथ मुख्यगृहात्कस्य गृहं कस्यां दिशि कर्तव्यमित्याह–स्नानेति । स्नानं प्रसिद्धं । अग्निः प्रसिद्धः स्वपिः शयनं वस्त्राणि प्रसिद्धानि भोजनं प्रसिद्धं पशवो गवादयः द्रव्याणि सुवर्णादीनि अमरा देवा एषां ओकांसि गृहाणि तेषां स्थितिः स्थापनं पूर्वादौ दिशि क्रमेण कार्यमित्यध्याहारः। तथा च नारदः । स्नानागारं दिशि प्राच्यामाग्नेय्यामग्निमंदिरं। याम्यायां शयनागारं नैर्ऋत्यां वस्त्रमंदिरं ॥ प्रतीच्यां भोजनागारं वायव्यां पशुमंदिरं । भांडकोशं तूत्तरस्यामीशान्यां देवमंदिरमिति ॥ अथ जलस्थानमाह– ईशितुरीशानस्य दिशि जलं कार्यं नान्यत्र । तथा च लल्लः । प्राच्यादिदिक्स्थे सलिले सुतहानिः शिखिभयं रिपुभयं च स्त्रीकलहं स्त्रीदौष्ट्यं नैष्ट्यं वित्तात्मजविवृद्धिरिति । अथान्यदप्याह–परमिति । परमनुक्तं पदार्थजातं वायोर्दिशि कार्यं । अन्यानि मारुत्यामिति । लल्लोक्तत्वात् । अपाक् दक्षिणस्यां दिशि मूत्रकं कार्यम् । स्थलसंकोचे सति एतद्यत्प्रोक्तं तद्गृहमध्ये ग्राह्यतच्च स्वस्वस्थाने तारतम्येन योज्यं । अथ शक्तिभुवोः संकोचे सति कर्तव्यमाह–आल्प्य इति । शक्तिभुवोरल्पत्वे सति यथारुचि कार्यं गेहस्य दक्षे परे आचार्या घरट्टादिकमूचिरे घरट्टः पिष्टयंत्रं अंबु उदकं उलूखलादिकं प्रसिद्धं । तथा चोक्तं ग्रंथांतरे । उलूखलं पिष्टयंत्रमग्निस्थानजलाश्रयं । वेश्मनो दक्षिणे पार्श्वे पितॄणां पादशौचनमिति ॥ १८ ॥

टीकार्थ—आतां मुख्य घरापासून कोणचें घर कोणच्या दिशेस करावें तें सांगतों—पूर्व दिशेस आरंभ करून एकसारख्या अनुक्रमानें स्नान, अग्नि, शयन, वस्त्र, भोजन, पशु, द्रव्य, देव ह्यांचीं घरें बांधावींत, जसें कीं, पूर्वेस स्नानाचें घर, आग्नेयीस अग्निघर, दक्षिणेस शयन घर, नैर्ऋत्य दिशेस वस्त्र घर, पश्चिम दिशेस भोजनघर, वायव्य दिशेस पशु घर, उत्तरदिशेस द्रव्याचें घर, ईशान्य दिशेस देवघर अशीं क्रमानें घरें करावींत. तेंच नारद सांगतो कीं, पूर्वदिशेस स्नानाचें घर, आग्नेयीदिशेस अग्नि घर, दक्षिणदिशेस शयन घर, नैर्ऋत्यदिशेस वस्त्राचें घर, पश्चिमदिशेस भोजनाचें घर, वायव्य दिशेस पशुचें घर, उत्तरदिशेस भांडाराचें घर, ईशान्यदिशेस देवघर करावें. आतां जलाचें घर सांगतों. ईशानाच्या दिशेस ह्मणजे ईशान्यदिशेस जलाचें घर करावें. दुसरीकडे जलाचें घर करूं नये. तेंच लल्ल सांगतो कीं, पूर्व इत्यादि पासून उत्तर दिशेपर्यंतच्या सात दिशा आहेत तेथें जलाचें घर केलें असतां अनुक्रमानें पुत्रहानि, अग्निभय, शत्रुभय, स्त्रीकलह, स्त्रीचा दुष्टपणा, अनिष्टप्राप्ति, चिंतादिकांची वृद्धि अशीं होतात. जसें कीं, पूर्वेस पुत्रहानि, आग्नेयीस अग्निभय, दक्षिणेस शत्रुभय, नैर्ऋत्येस स्त्रीकलह, पश्चिमेस स्त्रीचा दुष्टपणा, वायव्येस अनिष्टांची प्राप्ति, उत्तरेस चिंतादिकाची प्राप्ति, अशा रीतीनें सात दिशेस सात प्रकारचीं अनिष्ट फळें आहेत. आतां दुसरेंही सांगतों– ह्या सांगितलेल्या पदार्थांशिवाय बाकीचे सर्व पदार्थ वायव्यदिशेस करावेत. कारण लल्लानें सांगितलें आहे कीं, दुसरे पदार्थ ठेवण्याचीं घरें वायव्यदिशेस करावींत दक्षिण दिशेस मूत्राचें घर ह्मणजे संडास मोरी करावी. स्थानाचा संकोच असेल तर हें पूर्वीं सांगितलेलें आपल्या घराच्या सोईप्रमाणें घरामध्यें पाहिजे तसें करावें. आतां शक्तीची अनुकूलता कमी आहे आणि स्थलाचा संकोच असल्यास काय करावें तें सांगतों– आपल्याला द्रव्याची अनुकूलता नसेल आणि स्थलाचाही संकोच असेल तर आपल्या मर्जीप्रमाणें सर्व पदार्थ ठेवण्याचीं घरें करावींत कित्येक आचार्यांचें असें मत आहे कीं, घराचे दक्षिणदिशेस घिरट, पाणी, उखळ, चूल

इत्यादि करावेत. असें प्रसिद्ध आहे, तेंच दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, उखळ, जातें, अग्निवर, जलस्थान हीं घराचे दक्षिणबाजूस करावींत आणि पितरांचे पायधुण्याचें स्थानही त्यादिशेसच करावें ॥ १८ ॥

आयादि विचार आणि गृहप्रवेश मास.

द्वात्रिंशाधिकहस्तमब्धिवदनं तार्णं त्वलिंदादिकम् ।
नैष्वायादिकमीरितं तृणगृहं सर्वेषु मासस्वूदितम् ॥
छन्नं वश्यकपाटमर्चिततमं वेश्मोक्तरीत्या विशे- ।
दारंभोदितमासु नारदमतान्माघोर्जेशुक्रेषु तु ॥ १९ ॥

श्लोकार्थ—बत्तीस हातांहून अधिक घर, चार दिशेला द्वारें आहेत असें घर, गवताचें घर आणि ओटा, राहुटी ह्यांविषयीं आय इत्यादि पाहूं सांगितलें नाहीं, गवताचें घर सर्व महिन्यांत बांधावें. भिंती घालून सर्व बाजूंनीं आच्छादिलेलें, उघडतां झाकतां येणारीं दारें लाविलेलें व तोरणें, पुष्पमाला, वेली, चित्रें इत्यादिकांनीं सुशोभित केलेलें अशा घरांत, शास्त्रांत सांगितलेल्या रीतीनें गृहारंभोक्तमासांत प्रवेश करावा. नारदाच्या मतानें माघ, कार्तिक, ज्येष्ठ ह्या मासांतही गृह प्रवेश करावा ॥ १९ ॥

अथ केषु केषु गृहेषु आयादिकं भाव्यं केषु न भाव्यमित्याह–द्वात्रिंशेति । द्वात्रिंशेभ्यः अधिकाः हस्ताः यस्मिन् गृहे प्रमाणं तद्वात्रिंशाधिकहस्तं अब्धिवदनं चतुर्मुखं तार्णं तृणग्रहं अलिंदादिकं अलिंदं पट्टिशालेति लोके प्रसिद्धं । आदिशब्देन निर्व्यूहादिगृहभूषणं गृह्यते। एषु आयादिकं न ईरितं नोक्तं । तथा च दैवज्ञवल्लभे अलिंदनिर्व्यूहविनिर्गमाद्याश्चतुर्दिशं ये गृहभूषणाय । आयादिकं तेषु न चिंतनीयं यतो न ते वास्तुपरिग्रहे स्युरिति ॥ तथा च चिंतामणौ । यत्र दैर्घ्यं गृहादीनां द्वात्रिंशद्धस्ततोऽधिकं । न तत्र चिंतयेद्धीमान् गणनाऽऽयव्ययादिकमिति ॥ तथा च राजमार्तंडे । आयव्ययौ मासशुद्धिं चिंतयेन्न तृणालय इति॥ तथा च वसिष्ठः। एकादशयवादूर्ध्वं याव द्वात्रिंशहस्तकं। तावदायादिकं चिंत्यं तदूर्ध्वं नैव चिंतयेदिति ॥ अथ तृणगृहे विशेषमाह–तृणगृहं सर्वेषु मासस्वूदितं सर्वमासेषु कर्तव्यमित्यर्थः।अथ निष्पन्ने गृहे प्रवेशमाह–छन्नमिति।आरंभोदितमासेषु शास्त्ररित्या वेश्मगृहं विशेत् आरंभायोदिताः प्रोक्तास्ते च ते मासाश्च तेषु शास्त्ररीत्या सूत्राद्युक्तविधिना गृहं प्रविशेत्स्वामीत्यर्थः कथंभूतं वेश्म छन्नं कुडयैराच्छादितं पुनः किंलक्षणं वश्यकपाटं वश्यधीनं कपाटं यस्य तत्तथा तद्वश्यमिति लापित उद्घाटिते वा तथैव स्थिरं भवति पुनः किंलक्षणं अर्चिततमं तोरणमालाद्यलंकृतं । तथा च नारदः । अकपाटमनाच्छन्नमदत्तबलिभोजनं । गृहं न प्रविशेदेव विपदामाकरं हि तदिति ॥ तथा च च्यवनः । स्वयमुद्घाटिते रोगः पिहिते च कुलक्षयः । मानाधिकोनदिग्भागे द्वारे नीचे सुखक्षय इति ॥ अथ प्रवेशे मासविशेषमाह–नारदमतात् माघोर्जेशुक्रेषु गृहं प्रविशेत् माघः प्रसिद्ध ऊर्जः कार्तिकः शुक्रो ज्येष्ठ एषु गृहं प्रविशेदित्यर्थः । आरंभोदितमास्वित्यनेन तृणगृहस्य सर्वमासेषु विहितत्वात् प्रवेशोऽपि सर्वमासेषु विहितः । तथा च नारदः । प्रवेशो मध्यमो ज्ञेयः सौम्यकार्तिकमासयोः । माघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासेषु शोभन इति ॥ तथा च ज्योतिःप्रकाशे । गृहारंभोदितैर्मासैर्धिष्ण्यैर्वारैर्विशेद्गृहमिति ॥ तथा च ग्रंथांतरे। विशेत्सौम्यायने हर्म्यं तृणागारं तु सर्वदेति ॥ तथा च व्यवहारसारतत्त्वे । सौम्यायने श्रावणमार्गपौषे जन्मर्क्षलग्नोपचयोदयांशे । वामं गतेऽर्के गृहवास्तुपूजां कृत्वा विशेद्वेश्म भकूटशुद्धमिति ॥ १९ ॥

टीकार्थ—आतां कोणत्या घराविषयीं आय इत्यादिक पाहावेत आणि कोणत्या घराविषयीं आय इत्यादिक पाहूं नयेत ह्याविषयीं सांगतों–बत्तीस हातांहून अधिक जें घर असेल तें, ज्याला चार दिशेनें चार द्वारें आहेत तें, गवताचें घर, ओटा, राहुटी इत्यादिकांविषयीं पूर्वी सांगितलेले आय इत्यादि पाहावयाचें कारण नाहीं. तेंच दैवज्ञवल्लभानें सांगितलें आहे कीं, राहुटी, ओटा, ज्या घराला चोहों दिशेस चार द्वारें आहेत तें. गवताचें घर इत्यादिकांविषयीं आय इत्यादि पहावयाचें कारण नाहीं. कारण कीं, त्यांची गणना वास्तु करण्यांत नाहीं ह्मणजे त्यांचा वास्तु करावा असें शास्त्रांत सांगितलें नाहीं. तेंच चिंतामणि ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ज्याचे घराचा दीर्घपणा बत्तीस हातां पेक्षां अधिक आहे त्याचा आय इत्यादिक विचार करावयाचें कारण नाहीं. तेंच राजमार्तंड ग्रंथांत सांगितलें आहे कीं, गवताच्या घराविषयीं, आय, व्यय,

महिन्याची शुद्धि इत्यादिकांचा विचार करण्याचें कारण नाहीं. तेंच वसिष्ठ सांगतो कीं, अकरा यवां पासून तों बत्तीस हात पर्यंत जें घर दीर्घ असतें. त्याचे आय व्यय इत्यादिक पाहावेत त्या पेक्षां ह्मणजे बत्तीस हातां पेक्षां अधिक लांब असलेल्या घराविषयीं आय वगैरे पाहावयाचें कारण नाहीं. आतां गवताच्या घराविषयीं विशेष सांगतों—गवताचें घर पाहिजे त्या महिन्यांत करावें. आतां घर तयार झाल्यावर प्रवेश करण्यास कसा काळ असावा तें सांगतो—आरंभीं सांगितलेल्या महिन्यांत शास्त्र रीतीप्रमाणें प्रवेश करावा. आरंभीं सांगितलेले महिने ह्म० माघ, कार्तिक, ज्येष्ठ ह्या महिन्यांत शास्त्रांत सांगितलेल्या विधीनें प्रवेश करावा. तें घर कसें असावें तर चोहोंकडून भिंतींनी आच्छादलेलें आणि ज्याचीं दारें उघडतां आणि झांकतां येणारीं अशीं असावींत. आणि ज्या घरांनां तोरण, माळा इत्यादिकांनीं उत्तम शोभा आणिली असेल अशीं घरें असावींत. तेंच नारद सांगतो कीं, ज्या घरांनां दारें नाहींत, जीं घरें भिंतीनी चोहोंकडून आच्छादलेलीं नाहींत. ज्या घरांमध्यें बलिदान आणि अन्न शांति झालेली नाहीं अशा घरांमध्यें प्रवेश करूं नये. कारण तसें घर विपत्तीचें स्थान आहे. तेंच च्यवन सांगतो कीं, ज्याचें दार आपोआप उघडतें अशा घरापासून रोग होतो. आपोआप झांकणारीं दारें असतील तर त्यापासून कुलाचा क्षय होतो. वर सांगितलेल्या पेक्षां अधिक उंच व अधिक ठेंगणें असें घराचें दार असेल तर सुखाचा नाश होतो. आतां प्रवेश करण्याकरितां महिना सांगतों—नारदाच्या मतानें माघ, कार्तिक आणि ज्येष्ठ ह्या महिन्यांत घरामध्यें जाण्याचा प्रवेश करावा. घराच्या आरंभीं सांगितलेल्या महिन्यामध्यें ह्याचा अर्थ असा कीं, गवताचे तयार केलेल्या घरामध्यें पाहिजे त्या महिन्यांत प्रवेश करावा असें सांगितलें आहे. तेंच नारदानें सांगितलें आहे कीं, सौम्य, कार्तिक ह्या महिन्यांतील प्रवेश मध्यम आहे आणि माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ ह्या महिन्यांतील प्रवेश उत्तम आहे. तेंच ज्योतिःप्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, घराचा आरंभ करण्याकरितां जे महिने सांगितले आहेत त्या महिन्यांवर त्या नक्षत्रांवर त्या वारांवर घरामध्यें प्रवेश करावा. तेंच दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, उत्तरायणांत घरामध्यें प्रवेश करावा. गवताच्या घरांत तर पाहिजे त्यावेळीं प्रवेश करावा. तेंच व्यवहारसार तत्व ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सौम्यायनांत, श्रावण, मार्गशीर्ष, पौष, ह्या महिन्यांत, जन्म राशीवर, लग्नाचा उपचय आणि उदय ह्या अंशांवर सूर्य वामभागीं असतां घराच्या वास्तूची पूजा करून घरांत प्रवेश करावा. त्या वेळीं नक्षत्राची शुद्धि वगैरे पाहावी ॥ १९ ॥

### गृहप्रवेश आणि कलशचक्र.

प्रारंभोदितभैः प्रवेश उदितोऽपूर्वः सपूर्वः स्थिरैः ।
मैत्रैश्चाच्युतमूलदस्रसहितैरारंभभैर्द्व्यात्मकः ॥
कृत्यं वेश्मभवं दिवैव विहितं रात्रौ प्रवेशः क्वचित् ।
सूर्यर्क्षादिभपंचकं मनुमितादष्ट प्रवेशे न सत् ॥ २० ॥

श्लोकार्थ—गृहारंभाच्या नक्षत्र, तिथी वार इत्यादिकांवर नवीन गृहांत प्रवेश करावा. यात्रा करून आल्या नंतर स्थिर व मैत्र संज्ञक नक्षत्रांवर गृह प्रवेश करावा. श्रवण, मूळ, अश्विनी व गृहारंभाचीं नक्षत्रें ह्यांवर अग्नि वीज इत्यादिकांनीं नाश पावल्यामुळें, किंवा जीर्ण झाल्यामुळें नवीन बांधलेल्या गृहांत प्रवेश करावा. गृहासंबंधी, कोणतेंही कर्म दिवसासच करावें. प्रवेश मात्र रात्रीसही करावा असें कोठें कोठें आहे. सूर्य नक्षत्रापासून पहिलीं पांच व चवदाव्यापासून आठ नक्षत्रें ह्म० १।२।३।४।५।१४।१५।१६।१७।१८।१९।२०।२१ इतकीं दिवसनक्षत्रें प्रवेशाला शुभ नाहींत. ह्याला कलशचक्र ह्मणतात ॥ २० ॥

इदानीमपूर्वादिप्रवेशानाह—प्रारंभोदितभैरिति । प्रारंभोदितभैः गृहारंभोदितनक्षत्रैरपूर्वः प्रवेश उदितो मुनींद्रैरित्यध्याहारः । अत्र प्रारंभोदितभैरित्युपलक्षणं तेन प्रारंभोदिततिथिभादिकं सर्वं ग्राह्यं अपूर्वो नाम नूतनगृहे प्रथमः प्रवेश उच्यते स्थिरैर्मैत्रैश्च नक्षत्रैः सपूर्वः प्रवेश उदितः सपूर्वो नाम यात्रावसाने यः क्रियते । अथाच्युतमूलदस्रसहितैरारंभभैर्द्व्यात्मकः प्रवेश उदितः द्व्यात्मको नामाग्न्यादिना नष्टगृहे पुनर्यः क्रियते । तथा च ज्योतिःप्रकाशे । अपूर्वः प्रवेशो गृहारंभधिष्ण्यैर्विधेयः करो मध्यमोऽत्रेति केचित् । सपूर्वः स्थिरैर्मिश्रभैरेव शुद्धेरतोऽन्योऽश्विमूलाच्युतारंभधिष्ण्यैः ॥ वासिष्ठः अपूर्वसंज्ञं प्रथमं प्रवेशं यात्रावसाने च सपूर्वसंज्ञं । द्व्याह्वयं चाग्निभयादि जातं गृहप्रवेशं त्रिविधं वदंति ॥ अथ गृहकृत्यविषये दिनरात्रिविशेषनिर्णयमाह—कृत्यं वेश्मभवमिति । वेश्मभवं गृहभवं यत्किंचित्कृत्यं तद्दिवैव विहितं न रात्रौ क्वचिद्दिवामुहूर्ताभावे सति रात्रौ प्रवेशो विहितो नान्यत् ।

तथा च वसिष्ठः । दिवा प्रवेशः शुभदः सपुत्रपौत्रादिवृद्ध्यै निशि भास्करेंद्वोः । बलेन मत्स्यध्वजवासरस्य रात्रिं विना सूर्यतिथेश्च रात्रिमिति ॥ अथ कलशवास्तुनक्षत्रशुद्धिमाह—सूर्यर्क्षादीति । सूर्यनक्षत्रादि भपंचकं नक्षत्रपंचकं तथा सूर्यर्क्षादि मनुमिताच्चतुर्दशमितान्नक्षत्रादष्ट नक्षत्राष्टकं प्रवेशे न सत् न शुभं स्यादन्यानि शुभानीत्यर्थात्सिद्धं । अत्र पूर्वोक्तानां नक्षत्राणां शुभाशुभत्वं ज्ञातव्यम् ॥ २० ॥

टीकार्थ—आतां नवीन प्रवेश सांगतों—घराचा आरंभ करण्याला जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत, त्या नक्षत्रांवर घरामध्यें प्रवेश करावा असें श्रेष्ठ मुनीनीं सांगितलें आहे. आरंभाला सांगितलेल्या नक्षत्रांवर असें सांगितलें आहे पण नुसतें नक्षत्रच घेऊं नये तर घराचे आरंभाला सांगितलेल्या तिथि, नक्षत्र इत्यादिक सर्व पहावें. अपूर्व ह्मणजे नवीन घरांत प्रवेश करणें हें होय. तो प्रवेश स्थिर आणि मैत्र संज्ञक नक्षत्रावर करावा. आतां सपूर्व प्रवेश ह्मणजे यात्रा वगैरे करून आल्यावर जो घरांत करावयाचा प्रवेश तो समजावा. आतां अच्युतनक्षत्र ह्म० श्रवणनक्षत्र, मूलनक्षत्र आणि अश्विनी नक्षत्र ह्या तीनांसहित बाकीच्या आरंभाच्या सर्व नक्षत्रांवर द्व्यात्मक ह्म० दुसऱ्या वेळचा प्रवेश करावा ह्म० अग्नि इत्यादिकांनीं घर नाहींसें झाल्यावर जो पुनः प्रवेश करावयाचा तो प्रवेश करावा. तेंच ज्योतिःप्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, घरामध्यें अपूर्व प्रवेश करावयाचा असेल तर घराचे आरंभाला सांगितलेल्या नक्षत्रावर करावा. तो प्रवेश मध्यम आहे असें कित्येकांचें मत आहे. सपूर्व प्रवेश स्थिर आणि मिश्र ह्या नक्षत्रावर करावा. ह्या शिवाय दुसरा प्रवेश अश्विनी, मूल आणि श्रवण ह्या नक्षत्रांवर करावा. वसिष्ठ असें सांगतो कीं, ज्यांत प्रथमच प्रवेश करावयाचा त्याला अपूर्व प्रवेश असें ह्मणतात. यात्रादि करून आल्यावर जो प्रवेश करावयाचा त्याला सपूर्व प्रवेश असें ह्मणतात. अग्नि इत्यादिकांपासून घराचा नाश झाल्यावर जो प्रवेश करावयाचा त्याला द्वंद्वाह्वय नांवाचा प्रवेश ह्मणतात. एकंदर तीन प्रकारचे प्रवेश सांगितले आहेत. आतां घराचे कार्यामध्यें दिवस रात्र ह्याचा विशेष निर्णय सांगतों—घरासंबंधानें जें कांहीं कोणतें कार्य असेल तें दिवसासच करावें रात्रीस करूं नये. दिवसास मुहूर्त नसेल तर फक्त रात्रीस गृहप्रवेशमात्र सांगितला आहे. तेंच वसिष्ठ सांगतो कीं, दिवसास प्रवेश केल्यापासून पुत्र, पौत्र, संपत्ति इत्यादिकांची वृद्धि होते. रात्रीस प्रवेश करावयाचा झाल्यास चंद्र आणि सूर्य ह्या दोघांचें बल पाहून मत्स्यध्वजाच्या ह्म. १३च्या रात्रीशिवाय सूर्याच्या तिथिच्या रात्रीस प्रवेश करावा. आतां कलश आणि वास्तु ह्यांना नक्षत्रशुद्धि सांगतों—सूर्यनक्षत्रापासून पांच नक्षत्रें चवदापासून पुढें आठ नक्षत्रें अशुभकारक आहेत १–२–३–४–५ आणि १४–१५–१६–१७–१८–१९–२०–२१ इतकीं दिवस नक्षत्रें अशुभकारक आहेत. अर्थात् ह्या शिवाय बाकीचीं नक्षत्रें शुभ समजावींत. ह्याकरितां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अर्क ह्मणजे सूर्य नक्षत्र कोणतें आहे तें पाहून त्यापासून ५ नक्षत्रें आणि चवदा पासून पुढें ८ नक्षत्रें अशुभ समजावींत ॥ २० ॥

## गृहप्रवेशाची लग्नशुद्धि.

लग्ने चोपचयास्थिरे रविमुखैः प्रारंभवत्संस्थितैः ।
सूर्ये वामगते स्वदिग्वदनभैर्वेश्मप्रवेशः शुभः ॥
रंध्रेषुद्विभवेभ्य आस्तुतगतः सूर्यो यदा स्यात्तदा ।
पूर्वाद्याननमालयं प्रविशतां स्याद्वामगोऽसौ क्रमात् ॥ २१ ॥

## ॥ इति वास्तुप्रकरणं समाप्तम् ॥

श्लोकार्थ—प्रवेश कर्त्याच्या जन्मराशी पासून व जन्मलग्नापासून उपचय ह्म० ३।६।१०।११ ह्यांतील स्थिर लग्नांवर, सूर्यादि ग्रह आरंभाला सांगितल्या प्रमाणें असतां, सूर्य वामभागीं असतां आणि ज्या दिशेस गृहाचें मुख्य द्वार असेल त्या दिशेच्या प्रवेशोक्त नक्षत्रांवर गृह प्रवेश शुभ जाणावा, ( सतशलाकाचक्रांत पूर्वादि दिशांचीं नक्षत्रें पहावीं. ) जेव्हां प्रवेश लग्नाच्या अष्टम, पंचम, द्वितीय व एकादश ह्या स्थानांपासून पांच राशींला सूर्य असतो, तेव्हां पूर्वादि चार दिशेला द्वार असणाऱ्या गृहांत प्रवेश करणाराला तो सूर्य अनुक्रमानें वामभागीं होतो. (तात्पर्य—अष्टमापासून पांच राशींचा सूर्य पूर्वद्वार गृहाला वामगत, पंचमापासून पांच राशींचा दक्षिणद्वार गृहाला वामगत, द्वितीयापासून पांच राशींचा पश्चिमद्वार गृहाला वामगत, आणि एकादशापासून पांच राशींच सूर्य उत्तरद्वार गृहांत प्रवेश करणाराला वामभागीं होतो) ॥ २१ ॥

अथ प्रवेशे लग्नशुद्धिमाह—लग्न इति। उपचयस्थिरे लग्ने जन्मर्क्षजन्मलग्नाभ्यामुपचयावहस्थिरे लग्ने वेश्मप्रवेशः शुभः स्यात् कैः रविमुखैः सूर्याद्यैः प्रारंभवत्संस्थितैः गृहारंभार्थमुक्तं तद्वत्संस्थितैरित्यर्थः। कस्मिन् सति सूर्ये वामगते सति पुनः कैः स्वदिग्वदनभैः यद्दिङ्मुखं गृहं तद्दिङ्मुखैः प्रवेशोदितैर्नक्षत्रैरित्यर्थः। अथ वामसूर्यलक्षणमाह—रंध्रे इति। रंध्रे ८ षु ५ द्वि २ भवे ११ भ्यो लग्नाद्यष्टपंचमद्वितीयैकादशेभ्यः सकाशात् आसुतगतः आपंचमगतः सूर्यो यदा स्यात्तदा पूर्वाद्याननमालयं पूर्वादिमुखं गृहं प्रविशतां मनुष्याणामसौ सूर्यः क्रमाद्वामगः स्यात्। एतदुक्तं भवति। अष्टमात् पंचसु वर्तमानोऽर्कः पूर्वामुखगृहे प्रविशतां वामो भवति पंचमात्पंचसु गतो दक्षिणामुखे गृहे प्रविशतां वामो भवति द्वितीयात्पंचसु गतः प्रत्यङ्मुखे गृहे प्रविशतां वामो भवति एकादशात्पंचसु गत उत्तरामुखे गृहे प्रविशतां वामो भवतीत्यर्थः॥ २१॥ ॥ इति स्वोक्तमुहूर्तमार्तंडटीकायां मार्तंडवल्लभायां वास्तुप्रकरणं समाप्तम्॥

**टीकार्थ—**आतां प्रवेशाच्या वेळीं लग्नशुद्धि सांगतों—जन्मराशि व जन्मलग्न ह्या दोहों पासून उपचय ह्मणजे ३–६ १०–११ ह्या राशीवर व स्थिरलग्नावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें ह्मणजे गृहाचे आरंभाला सांगितल्या प्रमाणें सूर्यादिक ग्रह असतां गृह प्रवेश करावा. तो सूर्य वामबाजूस असेल तर आणि ज्या दिशेस घराचें मुख्य द्वार असेल त्या दिशेच्या प्रवेशाला सांगितलेल्या नक्षत्रावर गृहाचा प्रवेश करणें शुभकारक आहे असें समजावें. वामसूर्याचें लक्षण सांगतों—प्रवेश कालाच्या लग्नापासून ८–५–२–११ ह्या स्थानापासून पंचम स्थानाचा सूर्य क्रमानें पूर्वादि चार दिशेस दार असणाऱ्याला क्रमानें वामबाजूचा होतो जसें कीं, आठव्यापासून पंचमस्थानीं असणारा सूर्य पूर्वेस तोंड असलेल्या घराला वामगत समजावा. पांचव्यापासून पंचमस्थानीं असलेला सूर्य दक्षिणमुख घराला वामगत समजावा. द्वितीयस्थानापासून पंचमस्थानचा सूर्य पश्चिमेस तोंड असलेल्याला वामगत समजावा. अकराव्यापासून पांचव्या स्थानीं असलेला सूर्य उत्तराभिमुख द्वार असलेल्याला वामगत होतो असें जाणावें ॥२१॥ ॥ अशारीतीनें आपणच केलेल्या मुहूर्तमार्तंडाची मार्तंडवल्लभानामक टीकेचें वास्तुप्रकरण समाप्त झालें.

॥ वास्तुप्रकरण समाप्त ॥

---

# ॥ अथ यात्राप्रकरणम् ॥ ७ ॥

यात्राकाल, नक्षत्रें वगैरे.

वारे चोपचयावहस्य सुदशास्विष्टं प्रयाणं जगुः।
कर्णांत्यादितिभद्विकेषु मृगमैत्रार्केषु नो जन्मभे॥
सार्पार्द्राग्नियमाजपादपितृषु त्वाष्ट्रत्रये चाशुभम्।
रिक्तापर्वगुहाष्टमीहरिसितास्येषु ज्ञशुक्रोन्मुखम्॥ १॥

श्लोकार्थ—महादशा अंतर्दशादि शुभ असतां व गोचरांत शुभ असणाऱ्या ग्रहाच्या वारीं प्रयाण करावें. श्रवण, धनिष्ठा, रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, मृगशीर्ष, अनुराधा, हस्त हीं ९ नक्षत्रें यात्रेला शुभ होत. जन्मनक्षत्र यात्रेला अशुभ जाणावें. आश्लेषा, आर्द्रा, कृत्तिका, भरणी, पूर्वाभा०, मघा, चित्रा, स्वाती, विशाखा ह्या ९ नक्षत्रांवर प्रयाण अशुभ होय. अर्थात् रोहिणी, पूर्वाफ०, उत्तराफ०, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, शततारका, उत्तराभाद्रपदा हीं ९ नक्षत्रें यात्रेला मध्यम जाणावीं. रिक्ता व पूर्णिमा, अमावास्या, षष्ठी, अष्टमी, द्वादशी शुक्लप्रतिपदा ह्या तिथींवर आणि बुध, शुक्र संमुख असतां प्रयाण अशुभ जाणावें॥ १॥

अथ यात्राप्रकरणं व्याख्यायते। तत्राऽऽदौ कस्मिन्काले यात्रा कर्तव्येत्याह—वार इति। सुदशासु शोभनदशांतर्दशाविदशोपदशासु उपचयावहस्य ग्रहस्य वारे गोचराष्टकवर्गादौ शुभफलग्रहस्य वारे प्रयाणमिष्टं शुभं जगुराचार्याः। केषु कर्णांत्यादितिभद्विकेषु कर्णः श्रवणः अंत्यं रेवती अदितिभं पुनर्वसुः एषां द्विकाः श्रवणधनिष्ठे रेवत्याऽश्विन्यौ पुनर्वसुपुष्यौ एष्वित्यर्थः। पुनः केषु मृगमैत्रार्केषु मृगः प्रसिद्धः मैत्रमनुराधा अर्को हस्तः एषु नवनक्षत्रेषु प्रयाणं शुभमित्यर्थः।

तत्र विशेषमाह–नो जन्मभ इति । जन्मभे जन्मनक्षत्रे श्रवणाद्यन्यतमेऽपि यानं शुभं नो जगुः। अथ येषु अशुभं तान्याह–सार्पेति । सार्पमाश्लेषा । आर्द्रा प्रसिद्धा अग्निः कृत्तिका यमो भरणी अजैकपात् पूर्वाभाद्रपदा पितरो मघा तेषु त्वाष्ट्रत्रये चित्रात्रये च एषु नवनक्षत्रेषु यानमशुभं जगुः अन्यानि नवनक्षत्राणि मध्यमानीत्यर्थतः सिद्धं । अथ यासु तिथिषु अशुभं तदाह–रिक्तेति । चतुर्थीनवमीचतुर्दश्यः पर्वणी पूर्णिमाऽमावास्ये गुहः षष्ठी अष्टमी प्रसिद्धा हरिद्वादशी सितास्यं शुक्लप्रतिपत् । तेषु प्रयाणं यानमशुभं जगुरर्थादन्यासु तिथिषु शुभं । अन्यद्दुष्टमाह–ज्ञेति । ज्ञो बुधः शुक्रः प्रसिद्धः तयोरुन्मुखं संमुखं यानं उक्तेष्वपि तिथिनक्षत्रादिषु अशुभं जगुः बुधशुक्रसंमुखं गमनं न कर्तव्यमित्यर्थः ॥ १ ॥

**टीकार्थ**—आतां यात्रा प्रकरण सांगतों–अगोदर कोणत्या काळीं यात्रा करावी तें सांगतों–महादशा, अंतर्दशा, उपदशा इत्यादि शुभ असतां आणि गोचरांतही शुभग्रह असलेल्या ग्रहांच्या वारीं यात्रेकरितां प्रयाण करावें असें आर्यांचें मत आहे. कोणत्या नक्षत्रावर करावें हें सांगतों–श्रवणद्वय, ह्म० श्रवण, धनिष्ठा. रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, आणि मृग, अनुराधा, अर्क ह्म० हस्त या नऊ नक्षत्रांवर प्रयाण शुभकारक आहे. आतां यांतहि विशेष आहे तों सांगतों–श्रवणादि प्रयाणास उक्त आहे परंतु या श्रवणादि नऊ नक्षत्रांतील नक्षत्र जर जन्मनक्षत्र असेल तर शुभ नाहीं. आतां प्रयाणास अशुभ नक्षत्रें सांगतों– सार्प ह्म० आश्लेषा, आर्द्रा, अग्नि ह्म० कृत्तिका, यम ह्म० भरणी, अजैकपात् ह्म० पूर्वाभाद्रपदा, पितर ह्म० मघा व चित्रात्रय ह्म० चित्रा ८ स्वाती ९ विशाखा ह्या नऊ नक्षत्रांवर प्रयाण करूं नये. पहिलीं सांगितलेलीं नऊ नक्षत्रें उत्तम हीं नऊ वर्ज्य अर्थात् बाकीचीं नऊ नक्षत्रें मध्यम आहेत. आतां ज्या तिथीवर गमन अशुभ आहे ते सांगतों–चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, पूर्णिमा, अमावास्या, षष्ठी, अष्टमी, द्वादशी, शुक्लप्रतिपदा इतक्या तिथींवर प्रयाण करणें अशुभ आहे. अर्थात् इतक्यां शिवाय बाकीच्या तिथि प्रयाणास शुभ आहेत. दुसरे दुष्ट काय आहेत ते सांगतों–वर सांगितलेल्या तिथींवर व नक्षत्रांवरही जर बुध आणि शुक्र सन्मुख असतील तर यात्रेकरितां प्रयाण करणें अशुभ आहे अर्थात् गमन करूं नये ॥ १ ॥

### शूल व योगिनी.

प्राक् चंद्रासितशक्रभं वसुपरार्धात्पंचभेज्यानपाक् ।
पश्चात्कार्कसितानुदक्कुजबुधार्यम्णस्त्यजेच्छूलकान् ॥
त्रिंशाष्टौ नवभूमयोऽग्निगिरिशा विश्वेषवोऽर्काब्धयः ।
षट्शक्रास्तिथिपर्वता दशदशोऽप्येतांस्तिथीनीशतः ॥ २ ॥

**श्लोकार्थ**—पूर्वदिशेला गमन करावयाचें असतां सोमवार, शनिवार, ज्येष्ठानक्षत्र हीं सोडावीं. दक्षिणेस गमन कर्तव्य असतां धनिष्ठेच्या उत्तरार्धापासून पांच नक्षत्रें, व गुरुवार सोडावा. पश्चिमेला गमन कर्तव्य असतां रोहिणीनक्षत्र व रविवार, शुक्रवार हे सोडावे. उत्तरेस प्रयाण कर्तव्य असतां मंगळवार, बुधवार व उत्तराफाल्गुनी हीं सोडावीं. कारण ह्या वारांवर व नक्षत्रांवर शूल असतो. ईशान्येला अमावास्या, अष्टमी; पूर्वेला नवमी, प्रतिपदा; आग्नेयीला तृतीया, एकादशी; दक्षिणेला त्रयोदशी, पंचमी; नैर्ऋत्येला द्वादशी, चतुर्थी; पश्चिमेला षष्ठी, चतुर्दशी; वायव्येला पूर्णिमा, सप्तमी; उत्तरेला दशमी, द्वितीया ह्या तिथि त्या त्या दिशेस गमनाला सोडाव्या. ह्या योगिनी होत ॥ २ ॥

अथ शूलानाह–प्रागिति । प्राक् पूर्वस्यां दिशि चंद्रासितशक्रभं त्यजेत् चंद्रः सोमवारोऽसितः शनिवारः शक्रभं ज्येष्ठा एतत्त्रयं पूर्वदिशि त्यजेदित्यर्थः । अपाक् दक्षिणस्यां वसुपरार्धात् धनिष्ठोत्तरार्धात् पंच नक्षात्राणि इज्यो बृहस्पतिवारः एतान् दक्षिणस्यां त्यजेत् । पश्चात् पश्चिमायां दिशि कार्कसितान् त्यजेत् को रोहिणी अर्को रविः सितः शुक्र एतान्पश्चिमायां त्यजेत् । उदक् उत्तरस्यां दिशि कुजबुधार्यम्णस्त्यजेत् कुजो मंगलवारः बुधः प्रसिद्धः अर्यमा नामोत्तराफाल्गुनी एतान् शूलकानुत्तरस्यां त्यजेत् शूलपदस्य प्रत्येकं संबंधः । अथ योगिनीमाह–त्रिंशाष्टाविति । एतान् प्रत्येकपदगतान् तिथीन् ईशतः ईशान्याः सकाशात् प्रदक्षिणक्रमेण त्यजेत् एके के त्रिंशा ३० ष्टौ ८ ई-

शान्त्या नव ९ सूर्यः १ प्राच्यां अग्नि ३ गिरिशाः ११ आग्नेय्यां विश्वे १३ षवः ५ दक्षिणस्यां अर्का १२ भयः ४ नैर्ऋत्यां षट् ६ शक्राः १४ पश्चिमायां तिथि १५ पर्वताः ७ वायव्यां दश १० द्वः २ उत्तरस्यां । अत्रांकन्यास एव व्याख्यानम् ॥ २ ॥

टीकार्थ—आतां शूल सांगतों—पूर्वदिशेस गमन करावयाचें असल्यास चंद्र ह्म० सोमवार असित ह्म० शनिवार शक्र ह्म० ज्येष्ठानक्षत्र हीं सोडावींत. दक्षिणदिशेस गमन करावयाचें असल्यास धनिष्ठा नक्षत्राचें उत्तरार्ध आणि पुढील पांच नक्षत्रें आणि इज्य ह्म० गुरुवार इतकीं सोडावींत. पश्चिमदिशेस गमन करावयाचें असल्यास क ह्म० रोहिणीनक्षत्र अर्क ह्म० रविवार, सित ह्म० शुक्रवार इतकीं सोडावींत. उत्तर दिशेस गमन करावयाचें असल्यास कुज ह्म० मंगळवार, बुधवार, अर्यमा ह्म० उत्तराफाल्गुनी नक्षत्र इतके हे शूल आहेत ह्मणून सोडावेत. हे वर सांगितलेले शूल प्रत्येक दिशेस समजावेत ह्मणून ते सोडावेत. आतां योगिनी सांगतों—ईशान्य दिशेपासून प्रदक्षण क्रमानें ईशान्येस ३०–८। ९–१।३–११।१३–५।१२–४।६–१४।१५–७।१०–२ ह्या तिथि त्या त्या दिशेस गमनाला वर्ज्य आहेत. जसें ईशान्येस अमावास्या आणि अष्टमी, पूर्वेस नवमी आणि प्रतिपदा, आग्नेयीला तृतीया आणि एकादशी, दक्षिणेला त्रयोदशी आणि पंचमी, नर्ऋत्येला द्वादशी आणि चतुर्थी, पश्चिमेला षष्ठी आणि चतुर्दशी वायव्येला पूर्णिमा आणि सप्तमी उत्तरेला दशमी आणि द्वितीया ह्या तिथि त्या त्या दिशेस गमन करावयाचें असल्यास त्या तिथि योगिनी समजाव्यात ॥ २ ॥

## परिघ दोष.

ऐंद्र्याद्यग्निभसप्तसप्तभगणे वाय्वग्निकाष्ठास्थितो ।
नोल्लंघ्यः परिघस्त्वपाग्वरुणभैः प्राच्यैरुदङ् न व्रजेत् ॥
सर्वाशासु रवीज्यमित्रतुरगैर्यायादथावश्यके ।
हित्वा शूलमनिष्टभैर्यदि निजाशेष्टांगलब्धिर्व्रजेत् ॥ ३ ॥

श्लोकार्थ—सप्तशलाका चक्रांत पूर्वादि चार दिशेला कृत्तिकेपासून सात सात नक्षत्रें आहेत, त्या चक्रांत वायव्येपासून आग्नेयीपर्यंत एक रेषा काढिली ह्मणजे तो परिघ होतो. गमनकर्त्यानें ह्या परिघाचें उल्लंघन करून जाऊं नये. दक्षिणेच्या ५ पश्चिमेच्या मिळून १४ नक्षत्रांवर पूर्वेस व उत्तरेस जाऊं नये. तसेंच पूर्वेच्या व उत्तरेच्या मिळून १४ नक्षत्रांवर पश्चिमेस व दक्षिणेस जाऊं नये. पश्चिमेच्या नक्षत्रांवर दक्षिणेस, आणि पूर्वेच्या नक्षत्रांवर उत्तरेस जाऊं नये. हस्त, पुष्य, अनुराधा, आश्विनी ह्या ४ नक्षत्रांवर सर्व दिशेला जावें. जाणें अवश्य असतां शूलनक्षत्र सोडून ज्या दिशेला जीं नक्षत्रें गमनाला वर्ज्य केलीं, त्यांवरही जर आपल्या गमनदिशेला शुभ लग्न सांपडत असेल तर त्या दिशेला प्रयाण करावें ॥ ३ ॥

अथान्यन्निंद्यमाह–ऐन्द्र्येति । ऐन्द्र्यादिषु दिक्षु अग्निभात् कृत्तिकायाः सकाशात् सप्त सप्त भगणो भवेत । एतदुक्तं भवति सप्तशलाकाचक्रं निष्पाद्य पूर्वगतासु सप्तसु रेखासु ईशानतः कृत्तिकादीनी । सप्त नक्षत्राणि न्यसेत् तत्पुरस्थानि सप्त दक्षिणगतरेखासु न्यसेत् । एवं पश्चिमोत्तररेखासु क्रमेण न्यसेत्ततो वायव्याग्नेयदिग्गतां रेखां कुर्यात् । अस्या रेखायाः परिघ इति संज्ञा । एवं निष्पादिते चक्रे प्रयोजनमाह–वाय्वाग्निकाष्ठास्थित इति । वायुः प्रसिद्धः अग्निः प्रसिद्धः । अनयोः काष्ठे दिशौ वायव्याग्नेय्यौ तत्र स्थितः परिघः नोल्लंघ्यः । अथान्यत्प्रयोजनमाह–अपागिति । आपाग्दक्षिणस्यां वरुणभैः प्रतीच्यैर्नक्षत्रैर्न व्रजेत् प्राच्यैर्नक्षत्रैः उदक् उत्तरस्यां दिशि न व्रजेत् न गच्छेत् । तत्तद्दिक्स्थापितनक्षत्रैस्तत्तद्दिग्गमनं सिद्धमेव सर्वासु सर्वदिक्षु रवीज्यमित्रतुरगैर्यायात् रविर्हस्तः इज्यः पुष्यः मित्रमनुराधा तुरगोऽश्विनी एभिर्नक्षत्रैः सर्वासु दिक्षु गमनं शुभमित्यर्थः । अथाऽऽवश्यके कृत्येऽस्यापवादमाह–अथाऽऽवश्यक इति । अथाऽऽवश्यके कृत्ये सति निंद्यैः अनिष्टभैः यद्दिक्षु यानि निंद्यानि तैः पूर्वोक्तैर्नक्षत्रैस्तस्या तस्यां दिशि तदा व्रजेत् तदा कदा यदा निजाशेष्टांगलब्धिर्भवेत् निजाशायां निजगमनदिशायां इष्टांगलब्धिः इष्टलग्नलाभः स्यात् इष्टलग्नं वक्ष्यमाणलक्षणं तद्यथोक्तं गुणसंपन्नं यदा स्यात्तदा गच्छेदित्यर्थः । नो चेन्नेत्यर्थात्सिद्धं । किं कृत्वा शूलभं हित्वा पूर्वोक्तं शूलनक्षत्रं त्यक्त्वा शूलनक्षत्रे सति निजाशेष्टांगलब्धावपि न गच्छेदित्यर्थः ॥ ३ ॥

**टीकार्थ**—आतां दुसरें निंद्य सांगतों–पूर्वादि चार दिशेला अग्नि नक्षत्रापासून ह्म० कृत्तिकेपासून सात सात नक्षत्रें आहेत ह्याचा अर्थ असा कीं, सप्तशलाका चक्र तयार करून पूर्वेकडच्या सात रेखांवर ईशान्य दिशेपासून कृत्तिका इत्यादि सात नक्षत्रें ठेवावींत त्यांचे पुढें दक्षिणबाजूकडेस सात रेखांवर सात नक्षत्रें ठेवावींत. अशा रितीनें पश्चिमदिशा आणि उत्तरादिशा ह्यांमध्येंही सात सात रेखांवर सात सात नक्षत्रें ठेवावींत त्यानंतर वायव्य आणि आग्नेयदिशामध्यें जाणारी अशी एक रेखा करावी. ह्या रेखेला परिघ असें ह्मणतात अशा प्रकारचें चक्र तयार केल्यावर त्याचें प्रयोजन सांगतों– अशा रितीनें वायु आणि अग्नि ह्याचे दिशेमध्यें ह्मणजे वायव्य आणि आग्नेयी ह्या दोन दिशेमध्यें परिघ असता त्याचें उल्लंघन करूं नये. आतां आणखी दुसरें प्रयोजन सांगतों. दक्षिण दिशेस जावयाचें असल्यास दक्षिणेच्या आणि पश्चिमेच्या मिळून १४ नक्षत्रांवर पूर्वेस व उत्तरेस गमन करूं नये. तसेंच पूर्वेच्या व उत्तरेच्या मिळून १४ नक्षत्रांवर पश्चिमेस व दक्षिणेस जाऊं नये. पश्चिमेच्या नक्षत्रांवर दक्षिणेस जाऊं नये आणि पूर्वेच्या नक्षत्रांवर उत्तरेस जाऊं नये. त्या त्या दिशेस स्थापन केलेल्या नक्षत्रांवर त्या त्या दिशेस गमन करणें सिद्धच आहे. सर्वही दिशांमध्यें रवि ह्म० हस्त, इज्य ह्म० पुष्य, मित्र ह्म० अनुराधा, तुरग ह्म० अश्विनी, ह्या नक्षत्रांनी गमन करूं नये. आतां अवश्यक कार्य असल्यास ह्याचा अपवाद सांगतों–फारच जरूरीचें काम असल्यास ज्या दिशेचीं जीं निंद्य ह्मणून सांगितलेलीं नक्षत्रें आहेत त्या नक्षत्रांवरही ह्म० पूर्वी सांगितलेल्या नक्षत्रांवर गमन करावें. परंतु जाणें अवश्यक असल्यास शूलनक्षत्र सोडून इष्टलग्न मिळेल त्यावर गमन करावें. शूलनक्षत्र असून जरीं इष्ट लग्न मिळालें तरीही गमन करूं नये ॥ ३ ॥

### गमननिषेध व अभिजित्.

**मिश्राख्यध्रुवभैर्दिनादिमलवे तीक्ष्णैर्द्वितीयेंऽतिमे ।**
**क्षिप्रैर्नै क्रमशो मृदूग्रचरभै रात्रित्रिभागेष्वियात् ॥**
**श्रुत्यर्केज्यमृगेष्वयं न नियमो वैश्वांत्यपादश्रव- ।**
**स्तिथ्यंशस्त्वभिजिद्गमे स फलदो यामीं विनाऽपि क्षणः ॥ ४ ॥**

**श्लोकार्थ**—दिनमानाचे तीन भाग करून त्यांतल्या पहिल्या भागांत मिश्र व ध्रुव संज्ञक नक्षत्रांवर, दुसऱ्या भागांत तीक्ष्ण नक्षत्रांवर, आणि तिसऱ्या भागांत क्षिप्र नक्षत्रांवर प्रयाण करूं नये. रात्रिमानाच्या तीन भागांपैकीं पहिल्या भागांत मृदुनक्षत्रांवर, दुसऱ्या भागांत उग्र नक्षत्रांवर. व तिसऱ्या भागांत चर नक्षत्रांवर गमन करूं नये. श्रवण, हस्त, पुष्य, मृग ह्या ४ नक्षत्रांवर गमन करण्याला हा नियम नाहीं. उत्तराषाढा नक्षत्राचा अंत्यचरण व श्रवणाचा पहिला १५ वा भाग मिळून अभिजित् नक्षत्र होतें. दक्षिणे वांचून अन्य दिशेच्या गमनाला अभिजित् नक्षत्र व मुहूर्त शुभ जाणावा ॥ ४ ॥

**अथान्यदाह-मिश्राख्येति । दिनादिमलवे त्रिधा विभक्तस्य दिनस्याद्यांशे । मिश्राख्यैः साधारणैर्नक्षत्रैर्ध्रुवभैश्च न इयात् न गच्छेत् द्वितीयभागे तीक्ष्णैरंतिमे तृतीयभागे क्षिप्रैर्नक्षत्रैर्नेयात् । अथ रात्रित्रिभागेषु क्रमशो मृदूग्रचरभैर्नेयात् रात्रेः प्रथमभागे मृदुभिः द्वितीयभागे उग्रैः तृतीयभागे चरभैर्नेयात् । अथ विशेषमाह-श्रुतीति । श्रुत्यर्केज्यमृगेषु अयं नियमो न । श्रुतिः श्रवणः अर्को हस्तः इज्यः पुष्यः मृगः प्रसिद्धः एभिर्नक्षत्रैः सर्वभागेषु गंतव्यमितिभावः । अथाभिजिल्लक्षणं तत्फलं चाऽऽह-वैश्वेति । वैश्वमुत्तराषाढा तस्यांत्यपादश्चतुर्थचरणः श्रवणस्याद्यस्तिथ्यंशः प्रथमः पंचदशांश एतत्प्रमाणोऽभिजित् स्यात् । सोऽभिजिद्यामीं दक्षिणां दिशं विना सर्वदिक्षु फलदः क्षणो मुहूर्तोऽपि अभिजिद्यामीं विना फलदः यातॄणामभीष्टफलदो भवतीत्यर्थः ॥ ४ ॥**

**टीकार्थ**—आतां दुसरे सांगतों–दिवसा जें मान असेल त्याचे तीन भाग करावे पैकीं पहिल्याभागावर मिश्र आणि ध्रुव संज्ञक नक्षत्रांवर गमन करूं नये. दुसऱ्या भागावर तीक्ष्ण नक्षत्रांवर गमन करूं नये. तिसऱ्या भागावर क्षिप्र नक्षत्रांवर गमन करूं नये. अशाच रीतीनें रात्रीचे तीन भाग करावेत. पैकीं पहिल्याभागीं मृदु नक्षत्रांनीं, दुसऱ्या भागीं उग्र नक्षत्रांनीं, तिसऱ्याभागीं चरनक्षत्रांनीं गमन करूं नये. आतां विशेष सांगतों–श्रुति ह्म० श्रवण, अर्क ह्म० हस्त, इज्य ह्म० पुष्य, मृग इतक्या नक्षत्रांविषयीं वर सांगितलेला नियम नाहीं, अर्थात् सर्व भागांवर गमन करावें. आतां अभिजिताचें लक्षण आणि त्याचें फळ सांगतों–उत्तराषाढा नक्षत्राचा शेवटला चरण आणि श्रवणाचा पहिला चरण

ह्मणजे १५ अंश ह्याला अभिजित् असें नांव आहे. अशा अभिजित् नक्षत्रावर गमन करणाऱ्यानें फक्त दक्षिण दिशाखेरीज करुन सर्व दिशेकडे जाणें उत्तम फल दायक आहे. अभिजित् मुहूर्तावरही गमन करणें शुभ कारक आहे मात्र दक्षिण दिशेस जाणें शुभ कारक नाहीं ॥ ४ ॥

### गमननियम व अडलविडल.

**एकार्केंद्वयनानुकूलमनिशं भेदे दिवारात्रयो- ।**
**भौमे प्राक् शनिचंद्रयोर्गतमपाक्पश्चाज्ज्ञगुर्वोर्हितम् ॥**
**भृग्वर्कोह्न्युदगर्कभाद्द्युभमगैस्तष्टं द्विसप्ताडल- ।**
**स्त्र्यंगाभ्यां विडलोऽनयोर्न गमनं श्रीदेवलोक्त्या हितम् ॥ ५ ॥**

श्लोकार्थ—सूर्य व चंद्र ह्या दोहोंचें अयन एक असतां त्यांच्या अयन दिशेला दिवसास व रात्रीस गमन करावें. ह्मणजे दोघांचें उत्तरायण असतां दिवारात्रौ उत्तरेस व पूर्वेस आणि दोघांचें दक्षिणायन असतां दक्षिणेस व पश्चिमेस गमन करावें. दोघांचीं अयनें वेगळीं असतील तेव्हां सूर्याच्या अयन दिशेला दिवा व चंद्राच्या अयन दिशेला रात्रौ गमन करावें. मंगळवारीं पूर्वेस, शनिवारीं व सोमवारीं दाक्षिणेस, बुधवारीं व गुरुवारीं पश्चिमेस आणि शुक्रवारीं व रविवारीं उत्तरेस गमन करणें शुभ होय. सूर्यनक्षत्रापासून दिवस नक्षत्र मोजून ७ नीं भागावें बाकी २।७ राहिली तर अडल व ३।६ असतां विडल असतो. ह्या दोहोंवर गमन करूं नये. देवलऋषीच्या वचनानें अडल विडलांवर गमन शुभ आहे ॥ ५ ॥

**अथान्यदाह—एकार्केंद्वयनानुकूलमिति । अर्कश्च इंदुश्च तयोरयनं अर्केंद्वयनं एवं च तत् अर्केंद्वयनं च तत्तथा तस्यानुकूलं गतं गमनं अनिशं अहर्निशं हितं स्यात् । भेदे सति दिवारात्रयोः क्रमेण शस्तं स्यात् । अयमर्थः । सूर्यो दिनस्वामी चंद्रो रात्रिस्वामी । द्वौ चेदुत्तरायणे स्यातां तदाऽहर्निशमुदग्गमनं शस्तं द्वौ चेद्दक्षिणायने भवतस्तदाऽहर्निशं दक्षिणगमनं शस्तं रात्रौ चंद्रायनदिशं प्रति गमनं शस्तं स्यादर्थादन्यथा न शस्तं स्यात् । अत्र प्राची उत्तरसंबंधिनी ज्ञेया तस्माद्यदा उदग्गमनं शस्तं तदा प्राग्गमनमपि शस्तं भवति । प्रतीची दक्षिणसंबंधिनी ज्ञेया तेन यदा दक्षिणदिग्गमनं शस्तं तदा प्रतीचीगमनमपि शस्तं स्यात् । तथा च रत्नकोशे । दिनकरकरप्रतप्तामकरादावुत्तरां च पूर्वां च । यायाच्च कर्कटादौ याम्याशास्यं प्रतीचीं च ॥ अथान्यदाह—भौम इति । भौमे प्राक् पूर्वदिशि गतं गमनं हितं स्यात् शनिचंद्रयोरपाक् दक्षिणस्यां ज्ञगुर्वोः बुधगुर्वोः पश्चात् । पश्चिमायां भृग्वर्कोह्नि शुक्रारविदिने उदगुत्तरस्यां गतं गमनं हितं स्यात् । अथाडलं विडलं चाऽऽह—अर्कभादिति । अर्कभात् सूर्यनक्षत्रात् शुभं दिननक्षत्रमगैः सप्तभिस्तष्टं शेषितं सत् द्विसप्त द्वौ वा सप्त वा यदा भवंति तदाडलः स्यात् त्र्यंगाभ्यां त्रिषट् संख्याकाभ्यां विडलः स्यादनयोरडलविडलयोर्गमनं श्रीदेवलोक्त्या देवर्षिवचनेन हितं न स्यात् ॥ ५ ॥**

**टीकार्थ**—आतां दुसरें ही सांगतों—सूर्य आणि चंद्र ह्या दोहोंचें अयन एक असेल तर त्यांच्या अयन दिशेला दिवसास व रात्रीस गमन करणें हितकारक आहे. दोघांचा भेद असतां अनुक्रमानें दिवसास व रात्रीस गमन प्रशस्त आहे, कारण कीं सूर्य हा दिवसाचा स्वामी आहे आणि चंद्र हा रात्रीचा स्वामी आहे. दोघेजण उत्तरायणांत असतील त्यावेळेस उत्तर दिशेकडे रात्रंदिवस गमन करणें शुभ आहे. ते दोघजण दक्षिणायनांत असतील त्यावेळेस दक्षिणेकडे रात्रंदिवस गमन करणें शुभ आहे. आतां पूर्व दिशा ही उत्तर दिशेजवळ संबंध करणारी आहे ह्मणून ज्या वेळेस उत्तर दिशेस गमन प्रशस्त आहे त्यावेळेस पूर्वेस ही गमन करणें प्रशस्त आहे. पश्चिम दिशा ही दक्षिणदिशेजवळ संबंध करणारी आहे ह्मणून ज्यावेळेस दक्षिण दिशेस गमन करणें प्रशस्त आहे. त्यावेळेस पश्चिम दिशेस ही गमन करणें प्रशस्त आहे. तेंच रत्नकोशग्रंथांत सांगितलें आहे कीं, मकरादि सहाराशींवर सूर्य किरणाचा ताप झाला असतां ह्मणजे उत्तरायणांत सूर्य असतां उत्तर आणि पूर्व ह्या दिशेस गमन करावें आणि कर्कादि सहा राशींवर सूर्य असतां ह्मणजे दक्षिणायनांत सूर्य असतां दक्षिण आणि पश्चिम दिशेस गमन करणें प्रशस्त आहे, दुसरेंही सांगतों—मंगळवारीं पूर्वेस गमन करणें, शनिवारीं व सोमवारीं दक्षिणेस

गमन करणें, बुधवारीं व गुरुवारीं पश्चिमेस गमन करणें, शुक्रवारीं व रविवारीं उत्तर दिशेस गमन करणें प्रशस्त आहे. आतां अडल व विडल सांगतों—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्र मोजून जी संख्या येईल तिला सातांनीं भागून दोन किंवा सात बाकी राहील तर त्याला अडल असें म्हणतात आणि बाकी तीन किंवा सहा राहिले तर विडल असें म्हणतात ह्यावर गमन करूं नये. देवलाच्या मतानें गमन करणें शुभ आहे ॥ ५ ॥

वारशूलदोहद व दिशादोहद.

आज्यं दुग्धगुडौ तिलान्दधियवान्माषानिनात्प्राश्यनो ।
शूले यानमनिष्टमिंद्रककुभोऽथाऽऽज्यं तिलान्नं तिमीन् ॥
दुग्धं प्राश्य च हस्त्यनोहयनरैर्यानं सुयानं तयोः ।
ध्यानाद्वा भवति ब्रुवेऽथ हरिजं तिथ्यादिलक्षाधिकम् ॥ ६ ॥

श्लोकार्थ—वारशूल असतां रविवारीं आज्य, सोमवारीं दुग्ध, मंगळवारीं गूळ, बुधवारीं तीळ, गुरुवारीं दधि, शुक्रवारीं यव, शनिवारीं उडीद हे पदार्थ भक्षण करून गेलें तर वारशूलाचा दोष नाहीं. आज्य भक्षण करून हत्तीवर बसून पूर्वेस गमन केलें असतां सफळ होतें. तीळ व अन्न भक्षण करून गाडींतून दक्षिणेस गमन केलें तर कार्यसिद्धि होते. मत्स्य भक्षण करून घोड्यावर बसून पश्चिमेस गेलें तर कार्य होतें. दुग्ध प्राशन करून पालखी मेणा वगैरे नरवाहनांतून उत्तरेस गमन केल्यानें कार्य सिद्ध होतें. हे पदार्थ प्रसंगीं मिळाले नाहींत किंवा अभक्ष्य असले तर भक्ष्य पदार्थांचें व वाहनाचें ध्यान करून गेल्यानेंही कार्यसिद्धि होते. आतां तिथींवर नक्षत्रादिकांपेक्षां लक्षपटीहून अधिक बलवान् लग्न सांगतों, असें ग्रंथकार ह्मणतो ॥ ६ ॥

अथ वारशूलदोहदमाह—आज्यमिति । सुगमं । इनादिति । इनात्सूर्यवारात्सकाशात् । आज्यादीनि प्राश्य प्राशयित्वा शूले वारशूले यानं प्रयाणमनर्थकृन्नो भवति । अथ दिग्दोहदमाह—आज्यमिति । घृतादिकं प्राश्य ऐंद्रादिषु पूर्वादिषु हस्त्यादिभिर्यानं सुयानं भवति । हस्ती प्रसिद्धः अनः शकटः हयोऽश्वः नरः शिबिकावाहकः । एतदुक्तं भवति । घृतं प्राश्य हस्तिना प्राग्गमनात्सिद्धिः । तिलान्नं तिलौदनं प्राश्य रथेन दक्षिणगमनात्सिद्धिः । मत्स्यान्प्राश्याश्वेन पश्चिमगमनात्सिद्धिः । दुग्धं प्राश्य नरैरुदग्गमनात्सिद्धिः स्यादित्यर्थः । असति संभवेऽभक्ष्ये च निर्णयमाह—तयोर्भक्ष्यवाहनयोर्ध्यानाद्वा यानं सुयानं भवति । अथ लग्नशुद्धिं सहेतुकामाह—ब्रुवेऽथ हरिजमिति । अथ हरिजं लग्नं ब्रुवे वच्मि कथंभूतं तिथ्यादिलक्षाधिकं तिथ्यादिभ्यो लक्षाधिकं बलिष्ठमित्यर्थः ॥ ६ ॥

टीकार्थ—आतां वारशूलाचे दोहद सांगतों—रविवारपासून क्रमानें आज्य ह्म० तूप, दूध, गूळ, तिळ, दहीं, यव, माष इतके पदार्थ खाऊन वारशूलावरही गमन करणें प्रशस्त आहे. त्यापासून वारशूलाचा अनर्थ होत नाहीं. ह्मणजे रविवारीं तूप खाऊन, सोमवारीं दूध पिऊन, मंगळवारीं गूळ खाऊन, बुधवारीं तिळ खावून, गुरुवारीं दहीं खाऊन, शुक्रवारीं यव खाऊन, शनिवारीं माष ह्मणजे उडीद खाऊन वारशूल असतांही गमन केलें असतां शुभकारक आहे. आतां दिशेचे दोहद सांगतों—पूर्वादिदिशेस हत्ती इत्यादिकांवर बसून घृतादिक खाऊन गमन करणें प्रशस्त आहे ह्मणजे पूर्वदिशेस तूप पिऊन हत्तीवर बसून गमन केलें ह्मणजे कार्य सिद्धि होते. दक्षिणदिशेस तिळभात खाऊन रथावर बसून गमन केलें म्हणजे कार्य सिद्धि होते. पश्चिमादिशेस मासे खाऊन घोड्यावर बसून गमन केलें असतां कार्यसिद्धि होते. उत्तरदिशेस दूध पिऊन पालखींत अथवा मेण्यांत बसून गेलें असतां कार्य सिद्धि होते. आतां ते तूप इत्यादि भक्ष्य पदार्थ न मिळाले अथवा हत्ती वगैरे वाहन पदार्थ न मिळाले तर त्या भक्ष्याचें व वाहनाचें ध्यान केल्यानें गमन शुभकारक होतें. आतां लग्नाची शुद्धि हेतुसहित सांगतों—तिथि, वार, नक्षत्र इत्यादिकांपेक्षां लग्न हें लाखपट बलवान् आहे म्हणजे लग्न चांगलें असल्यास तिथ्यादिकांची आवश्यकता लागत नाहीं ॥ ६ ॥

प्रयाणाची लग्नशुद्धि व दिशांचे स्वामी.

स्वर्क्षांनार्धिघटास्तभानृजुगृहान्षष्ठं रिपोर्भादन्- ।
स्वर्क्षांगेशरिपुं खलं जानिबलत्यक्तं तथा सांप्रतम् ॥

**यात्रालग्नगतं त्यजेदथ दिशामीशोऽर्कशुक्रौ कुजो।**
**राहुर्मंदशशांकसौम्यगुरवः केंद्रे दिगीशे व्रजेत् ॥ ७ ॥**

श्लोकार्थ—प्रयाणकर्त्याची जन्मराशि व तीपासून उपचयरहित ह्मणजे १।२।४।५।७।८।९।१२ ह्या राशि, कुंभराशि, अस्तंगत ग्रहाची राशि, वक्र झालेल्या ग्रहाची राशि, जन्मराशीच्या स्वामीच्या शत्रु राशीपासून षष्ठ-राशि, मेष, वृषभ, कर्क, धन, मकर ह्या ५ पृष्ठोदय राशि, जन्मराशीच्या व जन्मलग्नाच्या स्वामीचा शत्रु ग्रह, खलग्रह, जन्मकाळीं बलहीन असणारा ग्रह; आणि गमन काळीं निर्बळ ग्रह हे सर्व प्रयाणलग्नीं सोडावे. पूर्वेपासून १ रवि, २ शुक्र, ३ मंगल, ४ राहू, ५ शनि, ६ चंद्र, ७ बुध, ८ गुरु हे क्रमानें आठ दिशांचे स्वामी आहेत. दिशेचा स्वामी केंद्रस्थानीं असतां प्रयाण करावें ॥ ७ ॥

**स्वर्क्षे स्वर्क्षानर्धिघटादिकं यात्रालग्नगतं त्यजेत्। स्वर्क्षे स्वराशिः अनर्धिः स्वराशेः अनुपचयभवनं घटः कुंभः अस्तभं अस्तगतग्रहस्य राशिः अनृजुगृहं वक्रग्रहस्य राशिः एतान् रिपोर्भात् वैरिराशेः षष्ठं अनुपृष्ठोदयं। तथा च बृहज्जातके। गोजाऽश्विकर्किमिथुनाः समृगानिशाख्या पृष्ठोदया विमिथुनाः कथितास्त एवेति ॥ वृषमेषधनकर्कमकराः पृष्ठोदयाः स्वर्क्षांगेशरिपुं ऋक्षं च अंगं च ऋक्षांगे तयोरीशः स्वामी तस्य रिपुः तं खलः प्रसिद्धः जनिबलत्यक्तं जन्मनि बलहीनं ग्रहं तथा सांप्रतं प्रस्तुतं बलत्यक्तं इत्युक्तं सर्वं यात्रालग्नगतं त्यजेत्। अथ दिक्पतीनाह–दिशामिति। दिशां पूर्वादीनामीशाः स्वामिनः अर्कशुक्रादयः पाठक्रमात्स्युः केंद्रे १।४।७।१० दिगीशे सति व्रजेत् गच्छेत् यस्मिन्केंद्रे ललाटगत्वं भवति तत्केंद्रं वर्जयित्वा अन्यकेंद्रे दिगीशे सति व्रजेत् इदमग्रिमश्लोके वक्ष्यति ॥ ७ ॥**

**टीकार्थ**—स्वतःची जन्मराशि आणि त्या राशीपासून उपचया शिवाय म्हणजे १–२–४–५–७–८–९–१२ ह्या आठ राशि, कुंभराशी, अस्तंगत असलेल्या ग्रहाची राशि, वक्रग्रहाची राशी, इतक्या राशींनां, आणि जन्मराशीच्या स्वामीच्या शत्रुराशीपासून षष्टराशी, मेष, वृषभ, कर्क, धन, मकर, ह्या ५ पृष्ठोदय राशी, इतक्या राशी सोडाव्यात. तेंच बृहज्जातक ग्रंथांत सांगितलें आहे कीं, गो म्ह० वृषभ, अज म्ह० मेष, कर्क, धन, मकर, मृगासहित निशा नांवाचे हे पृष्ठोदय मिथुनरहित वर्ज्य करावेत. वृष, मेष, धन, कर्क, मकर, पृष्ठोदय असलेले, आणि आपल्या राशीचा अधिपती व लग्नाचा अधिपती, ह्यांचा शत्रु त्याला, खल ह्म० दुष्टग्रह, जन्मकालाचा बलहीनग्रह, तसाच गोचरींचा बलहीनग्रह, हे सर्व यात्रेच्या वेळीं लग्नीं असतील तर सोडावेत. आतां दिशाचे पती सांगतों–आतां पूर्वेपासून दिशेचे अनुक्रमानें रवि इत्यादि अधिपती आहेत, जसे पूर्वेचा अधिपती रवि, आग्नेयीचा शुक्र, दक्षिणेचा मंगळ, नैर्ऋत्येचा राहु, पश्चिमेचा शनि, वायव्येचा चंद्र, उत्तरेचा बुध, ईशान्येचा गुरु हे आठ दिशांचे आठ अधिपति आहेत. केंद्रांत ह्म० १–४–७–१० ह्या स्थानीं दिशेचे अधिपति असतील तर गमन करावें. जें केंद्रललाटगत असेल तेवढें केंद्र वर्ज्य करून दुसऱ्या केंद्रावर गमन करावें ह्मणजे दिशांचे अधिपति केंद्रीं असतां गमन करावें असें पुढल्या श्लोकीं सांगावयाचें आहे ॥ ७ ॥

ललाटगतग्रह.

**दिक्पे न प्रवसेल्ललाटग इनः प्राच्यां तनौ भालगः।**
**स्यात्पश्चान्मदनेऽर्कजोऽबुगबुधः सौम्यां खगोऽपाक्कुजः ॥**
**ऐश्यां द्वित्रिगतो गुरुर्ज्वलनदिश्याय ११ व्यय १२ स्थो भृगु–।**
**र्वायौ षट् ६ सुत ५ गो विधुर्निर्ऋतिदिश्यष्टांकसंस्थं तमः ॥ ८ ॥**

श्लोकार्थ—गमन दिशेचा स्वामी ललाटगत असतां प्रवास करूं नये, सूर्य लग्नीं असतां पूर्वेस ललाटगत जाणावा. शनि सप्तम स्थानीं पश्चिमेस; बुध चतुर्थ स्थानीं उत्तरेस, मंगळ दशमस्थानीं दक्षिणेस, गुरु द्वितीय व तृतीय स्थानीं ईशान्येस, शुक्र, एकादश व द्वादश स्थानीं आग्नेयीस; चंद्र, षष्ठ व पंचमस्थानीं वायव्येस आणि राहु, अष्टम व नवमस्थानीं नैर्ऋत्येस ललाटगत जाणावा ॥ ८ ॥

**अथ दिक्पतौ ललाटगत्वे तद्दिग्गमननिषेधं ललाटलक्षणं चाऽऽह–दिक्पे ललाटगे सति**

न प्रवसेत् प्रवासं न कुर्यात् । तनौ लग्ने वर्तमान इनः सूर्यः प्राक् प्राच्यां दिशि भालगो ललाटस्थितः स्यात । मदने सप्तमे वर्तमानोऽर्कजः शनिः पश्चिमस्यां ललाटस्थितः स्यात् । अंबुगबुधः चतुर्थगतो बुधः सौम्यामुत्तरस्यां ललाटस्थितः स्यात् । खं दशमं तद्गतः कुजो भौमः अपाक् दक्षिणस्यां ललाटस्थितः स्यात् । द्वित्रिगतो गुरुः ऐश्यामीशान्यां ललाटस्थितः स्यात् । आयव्ययस्थो भृगुः कविः ज्वलनदिशि आग्नेयां ललाटस्थितः स्यात् षट्सुतगो विधुश्चंद्रः वायौ वायव्यां ललाटस्थितः स्यात् । अष्टांकसंस्थं तमोऽष्टमनवमस्थानस्थो राहुः निर्ऋतिदिशि ललाटसंस्थः स्यादिति ॥ ८ ॥

**टीकार्थ**–ज्या दिशेस गमन करावयाचें त्या दिशेचा स्वामी ललाटगत असतां त्या दिशेस गमन करूं नये असें सांगतों– दिशेचा अधिपति ललाटगत असेल तर प्रयाण करूं नये. सूर्य लग्नीं असेल त्यावेळेस पूर्वेस तो सूर्य ललाटगत समजावा. सप्तमस्थानीं शनि असेल त्यावेळेस तो पश्चिमेस ललाटगत समजावा. चतुर्थस्थानीं बुध असेल त्यावेळेस तो बुध उत्तर दिशेस ललाटगत समजावा. दशमस्थानीं मंगळ असेल त्यावेळेस तो दक्षिणेस ललाटगत समजावा. द्वितीय आणि तृतीय स्थानीं असलेला गुरु हा ईशान्य दिशेस ललाटगत समजावा. सहा आणि पांच ह्या स्थानीं असलेला चंद्र वायव्य दिशेस ललाटगत समजावा. आठ आणि नऊ ह्या स्थानीं असलेला राहु हा नैर्ऋत्य दिशेस ललाटगत समजावा ॥ ८ ॥

### वक्रग्रहांचा निषेध व ग्रहांचीं जन्मनक्षत्रें.

वक्री केंद्र १।४।७।१० गतस्तदीयदिवसो लग्नेऽस्य वर्गोभवे- ।
द्यातुर्नाशकरः शुभोऽपि तनुगो जन्मर्क्षलग्नेड्रिपुः ॥
द्वीशाग्नचम्ब्वजभाग्यभानि गुरुभं पौष्णांतके सार्पभं ।
जन्मर्क्षाणि रवेरुपप्लुवगतः खेटस्तनौ हानिकृत् ॥ ९ ॥

श्लोकार्थ—प्रयाणलग्नापासून केंद्रस्थानीं वक्र झालेला ग्रह, त्याचा वार व लग्नीं वक्रग्रहाचा वर्ग हे गमनकर्त्याचा नाश करितात. जन्मराशीच्या व जन्मलग्नाच्या स्वामीचा शत्रु लग्नीं असतां तो शुभ असला तरी नाश करितो. सूर्यादि ग्रहांचीं त्यांच्या पुढें लिहिलेलीं जन्मनक्षत्रें होत. ज्या ग्रहाच्या जन्मनक्षत्रावर भूकंपादि उत्पात झाला असेल, तो ग्रह प्रयाणलग्नीं हानिकारक जाणावा ॥ ९ ॥

वक्रीति । वक्री ग्रहः केंद्रगतः सन् यातुर्गमनकर्तुर्नाशकरः स्यात् तदीयदिवसोऽपि वक्रग्रहस्य दिवसोऽपि यातुर्नाशकरः स्यात् लग्नेऽस्य वर्गोऽपि नाशकरः स्यात् । जन्मर्क्षे लग्नेड्रिपुः शुभोऽपि तनुगो यातुर्नाशकरः स्यात् जन्मराशिजन्मलग्ने तयोः ईशो तयोः रिपुः । अथ सूर्यादीनां जन्मनक्षत्राण्याह–द्वीशेति । रवेरर्कतो ग्रहाणां द्वीशादीनि जन्मर्क्षाणि जन्मनक्षत्राणि स्युः द्वीशं विशाखा सूर्यस्याग्निः कृत्तिका चंद्रस्यांबु पूर्वाषाढा भौमस्याजो श्रवणो बुधस्य भाग्यभं पूर्वाफल्गुनी गुरोः गुरुः पुष्यः शुक्रस्य पौष्णं रेवती शनेः याम्यं भरणी राहोः सार्पमाश्लेषा केतोः उपप्लवगत इति । उपप्लवगतो नाम यदीयभं यस्य ग्रहस्य भं जन्मनक्षत्रं हतं त्रिविधोत्पातहतं स्यादसौ ग्रहो लग्ने स्थितो हानिकृत्स्यात् ॥ ९ ॥

**टीकार्थ**–प्रयाणाचें जें लग्न असेल त्यापासून जें केंद्र ह्म० १–४–७–१० हीं स्थानें असतील त्या स्थानीं ग्रह वक्री झाला असेल तर तो गमन करणाऱ्याचा नाश करणारा होतो. त्या वक्रग्रहाचा वारही नाशकरणारा आहे. त्या वक्र ग्रहाचा वर्ग लग्नीं असेल तर तोही नाश करणारा आहे. जन्मराशीचा आणि जन्मलग्नाचा स्वामी ह्यांचा शत्रु लग्नीं असेल तर तो शुभ असला तरी नाश करितो. सूर्य इत्यादिकांचीं जन्मनक्षत्रें सांगतों–सूर्यादिकांचीं जन्मनक्षत्रें क्रमानें विशाखा इत्यादिक आहेत. जसें–सूर्याचें द्वीश ह्म० विशाखा चंद्राचें अग्नि ह्म० कृत्तिका, मंगळाचें अंबु ह्म० पूर्वाषाढा, बुधाचें श्रवण, गुरुचें भाग्यभ ह्म० पूर्वाफाल्गुनी, शुक्राचें पुष्य, शनीचें रेवती, राहुचें याम्य ह्म० भरणी, केतूचें सार्प ह्म० आश्लेषा, हीं जन्मनक्षत्रें समजावीत. ज्या ग्रहाच्या जन्मनक्षत्रांवर भूकंप इत्यादि उत्पात झाला असेल तर तो ग्रह प्रयाणाचे लग्नीं असेल तर तो हानिकारक जाणावा ॥ ९ ॥

| | | |
|---|---|---|
| सूर्य—विशाखा. | बुध—श्रवण. | शनि—रेवती. |
| चंद्र—कृत्तिका. | गुरु—पूर्वाफल्गुनी. | राहु—भरणी. |
| मंगळ—पूर्वषाढा. | शुक्र—पुष्य. | केतु—आश्लेषा. |

### प्रयाणलग्नीं शुभ ग्रह.

वेशिः सौम्ययुतस्तनौ जनुषि ये सद्भिर्युता राशयो ।
जन्माब्जोपचयस्थिता अपि तनोः स्वर्क्षोच्चमित्रर्क्षगाः ॥
पापा अप्यतिशोभनास्तनुगता जन्मेश्वरौ केंद्रगौ ।
स्वारात्यह्नि तनौ शुभो न फलदो मित्राह्नि पापोऽर्थदः ॥ १० ॥

श्लोकार्थ—ज्या राशीला सूर्य असेल तीपासून दुसऱ्या राशीला वेशि ह्मणावें. शुभग्रहानें युक्त वेशि प्रयाणलग्नीं असतां अतिशुभ होय. प्रयाणकर्त्याच्या जन्मकाळीं शुभग्रहांनीं युक्त ज्या राशि असतील त्या प्रयाणलग्नीं फार शुभ जाणाव्या. जन्मकाळीं चंद्र ज्या राशीला असेल ती पासून ३।६।१०।११ ह्या उपचय स्थानीं आणि जन्मलग्ना पासून उपचय स्थानीं जे ग्रह असतील ते प्रयाण लग्नीं असतां फार शुभ होत. जन्मकाळीं स्वगृहीं, स्वोच्चीं, स्वमित्रगृहीं असणारे खलग्रह देखील प्रयाणलग्नीं अति शुभ होत. जन्मराशीचा व जन्मलग्नाचा स्वामी, हे केंद्रस्थानीं असतां फार शुभ होत. आपल्या शत्रूच्या वारीं लग्नीं असणारा शुभ ग्रहही फल देत नाहीं. मित्राच्या वारीं लग्नीं पापग्रहही फल देणारा होतो ॥ १० ॥

वेशिरिति । सूर्याद्द्वितीयो राशिर्वेशिः स सौम्ययुतः सन् अंगगो लग्नगोऽतिशोभनः स्यात् जनुषि जन्मकाले सद्भिर्ग्रहैर्युता ये राशयः तनुगताः अतिशोभना स्युः जन्माब्जोपचयस्थिताः जन्माब्जो जन्मचंद्रः तस्मादुपचयानि त्रिषडेकादशदशमानि तेषु स्थिता ग्रहास्ते तनुगता अतिशोभनाः तनोरपि जन्मलग्नादप्युपचयस्थलग्नगता अतिशोभनाः स्युः । स्वर्क्षोच्चमित्रर्क्षगाः जन्मनि ये स्वर्क्षगा उच्चगा मित्रर्क्षगास्ते पापा अपि तनुगता अतिशोभनाः स्युः जन्मेश्वरौ जन्मराशिजन्मलग्नस्वामिनौ केंद्रगावतिशोभनौ स्यातां । स्वारात्यह्नि स्ववैरिवारे शुभः शुभग्रहः तनौ लग्ने वर्तमानो न फलदो भवति मित्राह्नि पापः तनौ वर्तमानोऽर्थदः स्यात् । तथा च्यवनः । रक्षका वर्धकाश्चैव ये स्युर्जन्मनि नायकाः । तान्पापानपि निःशंको यात्रालग्ने नियोजयेदित्यादि ॥ १० ॥

टीकार्थ—आतां वेशी ह्मणजे काय तें सांगून प्रयाणकाळीं शुभग्रह सांगतों—सूर्याच्या राशीपासून जी दुसरी राशी तिला वेशि असें नांव आहे. तो वेशी सौम्यग्रहानें युक्त असून लग्नीं असेल तर तो फारच शुभकारक समजावा. प्रयाण करणाऱ्याच्या जन्मकाळीं शुभग्रहांनीं युक्त ज्या राशि असतात त्या जर लग्नीं असतील तर त्या सर्व अति शुभकारक समजाव्यात. जन्मकाळीं चंद्र ज्या राशीवर असेल त्या राशीपासून ३–६–१०–११ ह्या उपचय स्थानीं असलेले ग्रह जर तनु ह्मणजे लग्नीं असतील तर अतिशय शुभकारक आहेत. जन्मकाळीं स्वगृहीं, स्वोच्चीं, आणि स्वमित्र गृहीं असलेले जरी पापग्रह असले तरी ते लग्नीं असतील तर अतिशय शुभकारक आहेत. जन्मराशीचा अधिपति आणि जन्मलग्नाचा अधिपति हे दोघे जर केंद्रांत ह्मणजे १–४–७–१० ह्या स्थानीं असतील तर अतिशय शुभकारक जाणावेत. आपल्या शत्रूच्यावारीं व शत्रूच्या घरीं राहणारा शुभही ग्रह जर लग्नीं रहाणारा असेल तर तो शुभफल देणारा असत नाहीं आपल्या मित्राच्या वारीं आणि लग्नीं हा असणारा पापग्रह फल देणारा होत नाहीं ॥ १० ॥

### प्रयाणाला अशुभ व शुभ ग्रह.

त्र्यायार्यन्यगताः खलाः खइनजोऽब्जोऽत्याद्यषष्ठाष्टगो ।
भूयः सोऽपचितोऽस्तखांबुसुतगः शुक्रोऽस्त इज्यो मृतौ ॥

नष्टज्ञो व्ययगो ग्रहान्वितशशी यातुर्महाविघ्नदा ।
अन्यस्थानगता जयार्थसुखदास्त्याज्यं पुरोक्तं न चेत् ॥ ११ ॥

श्लोकार्थ—प्रयाणलग्नापासून ३।११।६ ह्या तीन स्थानांशिवाय इतर सर्व स्थानीं खलग्रह, दशमस्थानीं शनि, १२।१।६।८ ह्या स्थानीं चंद्र आणि ७।१०।४।५ ह्या स्थानीं क्षीण चंद्र, सप्तम शुक्र, अष्टम गुरु, द्वादशस्थानीं अस्तंगत बुध, व कोणत्याही ग्रहानें युक्त चंद्र हे ग्रह प्रयाण कर्त्याला महाविघ्न उत्पन्न करितात. हीं स्थानें सोडून अन्यस्थानीं हेच ग्रह पूर्वी सोडूं सांगितलेलें कांहीं अशुभ नसलें तर गमन कर्त्याला जय, द्रव्य व सुख देतात ॥ ११ ॥

अथ यात्रालग्ने इष्टानिष्टाश्च श्लोकेनैकेनाऽऽह—त्र्यायार्यन्यगता इति । त्र्यायार्यन्यगताः खलाः त्र्या ३ या ११ रिभ्यः ६ अन्यानि १।२।४।५।७।८।९।१०।१२ तत्र गताः खलाः पापग्रहाः खे दशमे इनजः शनिः । त्र्याऽऽयार्यन्यगताः खला इत्यनेनैव सिद्धेऽपि विशेषदुष्टफलज्ञापनार्थं ख इनज इत्युक्तं । अंत्या १२ द्य १ षष्ठा ६ ष्ट ८ गोऽब्जश्चंद्रो भूयः पुनः स चंद्रोऽपचितः क्षीणचंद्रः कृष्णपक्षचंद्रः अस्त ७ खां १० बु ४ सुत ५ गः शुक्रः अस्ते ७ इज्यो गुरुर्मृतौ ८ नष्टज्ञोऽस्तमितबुधो व्यय १२ गतः ग्रहान्वितशशी येन केनापि ग्रहेण ग्रहाभ्यां ग्रहैर्वायुक्तश्चंद्रमाः एते प्रत्येकं यातुर्महाविघ्नदाः स्युर्नानाप्रकारेण मरणभंगादीन् ददतीत्यर्थः । अन्यस्थानगता उक्तेभ्योऽन्यस्थानगताः संतस्तदा जयार्थसुखदाः स्युः । तदा कदा चेद्यदि पुरोक्तं त्याज्यं न स्यात् ॥ ११ ॥

टीकार्थ—आतां यात्रेविषयीं इष्ट आणि अनिष्ट कोणते ग्रह ते सांगतों—त्रि ह्म० ३ आय ह्म० ११ अरी ह्म० ६ ह्म०३–११–६ ह्या स्थानांशिवाय बाकीच्या स्थानीं ह्मणजे १–२–४–५–७–८–९–१०–१२ इतक्या स्थानीं असलेले पापग्रह आणि दशमस्थानीं असलेला शनि इतके ग्रह फारच अशुभ समजावेत. वरच्या १–२–४–५–७–८–९–१० १२ ह्यांमध्यें दशमस्थानीं असलेला पापग्रह फारच अशुभ आहे असें सिद्ध होत असतां पुनः दशमस्थानचा शनि असें म्हटल्यामुळें तो दशमचा शनि फारच दुष्ट आहे असें सांगण्यास्तव लिहिलें आहे. अंत्य म्ह० १२ आद्य म्ह० १ षष्ठ म्ह० ६ अष्ट म्ह० ८ इतक्या स्थानीं असलेला चंद्र तो अपचित म्ह० क्षयपक्षांतील चंद्र फारच अशुभ समजावा. अस्त म्ह० ७ ख म्ह० १० अंबु म्ह० ४ सुत म्ह० ५ इतक्या स्थानीं असलेला शुक्र हा अनिष्ट आहे. अष्टम स्थानाचा गुरु हा अनिष्ट आहे अस्तंगत असलेला द्वादशस्थानचा बुध हा अनिष्ट आहे, आणि कोणत्याही ग्रहानेंयुक्त असा चंद्र हा अनिष्ट आहे ह्मणजे वर सांगितलेले सर्वग्रह नानाप्रकारच्या मरण इत्यादिक दोषकारक असतात. वर सांगितल्याशिवाय दुसऱ्या स्थानचे दुसरे ग्रह हे जय, अर्थ, आणि सुख देणारे आहेत. परंतु पूर्वी सांगितलेले त्याज्य नसतील तर शुभकारक आहेत ॥ ११ ॥

### संमुख शुक्र व बुधाचा अपवाद.

स्वग्रामैकपुरात्मसद्मसु चतुर्वक्त्रे चतुःशालके ।
तूद्वाहेषु वधूप्रवेशनृपभीदुर्भिक्षपीडासु च ॥
तीर्थस्वामिनिदेशयोर्भृगुवसिष्ठात्र्यंगिरःकाश्यपे ।
भारद्वाजजवात्स्ययोर्हितकरं यानं सितज्ञोन्मुखम् ॥ १२ ॥

श्लोकार्थ—स्वग्राम, एकपुर, स्वगृह, चतुर्द्वारगृह, चौसोपीघर, विवाह, वधूप्रवेश, राजभय, दुर्भिक्षाची पीडा, तीर्थगमन, स्वामीची आज्ञा ह्यांच्या ठायीं आणि भृगु, वसिष्ठ, अत्रि, आंगिरस, काश्यप, भारद्वाज, वत्स ह्या ७ गोत्रांत उत्पन्न झालेल्यास शुक्राच्या व बुधाच्या संमुख प्रयाण करणें शुभ जाणावें ॥ १२ ॥

अथ प्रतिबुधशुक्रापवादमाह—स्वग्रामेति । स्वग्रामः प्रसिद्धः एकपुरं प्रसिद्धं आत्मसद्म आत्मगृहं चतुर्मुखे चतुर्वक्त्रे चतुःशालकं प्रसिद्धं उद्वाहाः विवाहाः ब्राह्मादयाः तेषु वधूप्रवेशः नववधूप्रवेशः नृपभी राजभयं। दुर्भिक्षपीडा प्रसिद्धा तासु तीर्थस्वामिनिदेशयोः तीर्थं तीर्थगमनं स्वामिनिदेशः स्वाम्याज्ञा तयोः भृगुवसिष्ठात्र्यंगिरःकाश्यपे भृग्वादिगोत्रसमूहे भारद्वाजजवात्स्ययोर्गोत्रयोः एषूक्तेषु सितज्ञोन्मुखं शुक्रबुधसंमुखं यानं गमनं हितं स्यात् । अत्र वधूप्रवेशे प्रतिशुक्रदोषो नोक्तः तत्तु भर्त्रा सह

गमनविषयं भर्त्रा विना गमने दोषो दृश्यते नवोढायास्तु वंध्यात्वमिति । तथा च भीमपराक्रमे। स्वामिना नीयमानायां प्रतिशुक्रो न विद्यत इति ॥ तथा च मतांतरे नवोढायास्तु वंध्यात्वं यदुक्त संमुखे भृगौ । तदत्र विबुधैर्ज्ञेयं केवलं तु द्विरागम इति ॥ तथा च लल्लः ॥ स्वभवनपुरप्रवेशे देशानां विग्रहे तथोद्वाहे । नववध्वा गृहगमने प्रतिशुक्रविचारणा नास्तीति ॥ तथा च मत्स्यपुराणे । चतुः-शालं चतुर्द्वारमलिंदैः सर्वतोयुतं । नाम्ना तत्सर्वतोभद्रं न तत्र प्रतिशुक्रतेति ॥ तथा च वसिष्ठः । काश्यपेषु वसिष्ठेषु भृग्वत्र्यांगिरसेषु च । भारद्वाजेषु वात्स्येषु प्रतिशुक्रो न विद्यत इति ॥ १२ ॥

टीकार्थ—आतां प्रतिबुध आणि संमुखशुक्र ह्यांचा अपवाद सांगतो–स्वग्रामामध्यें, एकनगरामध्यें, आपल्या घरीं, ज्या घरास चार द्वारें आहेत अशा घरीं, चारसोपे असलेल्या घरीं, ब्राह्म इत्यादि चार विवाहामध्यें, नवीन वधूच्या प्रवेशामध्यें, राजभयाचेवेळीं, दुष्काळाच्या पीडेमध्यें, तीर्थगमनामध्यें, स्वामीच्या आज्ञेमध्यें, इतक्या ठिकाणीं आणि भृगु, वसिष्ठ, अत्रि, आंगिरस, काश्यप, भारद्वाज, वत्स ह्या सात गोत्रांत उत्पन्न झालेल्यांस शुक्राच्या व बुधाच्या-संमुख प्रयाण करणें शुभ आहे असें जाणावें. आतां वधू प्रवेशाविषयीं प्रतिशुक्राचा दोष सांगितला नाहीं परंतु तो नियम पतिबरोबर गमन करण्याविषयींचा आहे पतिशिवाय गमन करण्यामध्यें नवोढेला वंध्यापणाचा दोष आहे. तेंच भीम-पराक्रमग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, स्वामीबरोबर वधूनें गमन केलें असतां प्रतिशुक्राचा दोष नाहीं. तसेंच दुसऱ्या मतांत सांगितलें आहे कीं, नवोढेनें शुक्रसंमुख असतां एकटें गमन केलें असतां दोष आहे असें विद्वानांचें मत आहे. परंतु दोघांनीं बरोबर गमन केलें असतां दोष नाहीं तेंच लल्ल सांगत आहे कीं, आपल्या घरीं, नगरामध्यें देशाच्या नाशाचेवेळीं, लग्नाचे वेळीं, नववधूच्या प्रवेशाचेवेळीं प्रतिशुक्राची विचारणा करावयाचें कारण नाहीं. तेंच मत्स्यपुराणांत सांगितलें आहे कीं, चारसोपे असलेलें, चार द्वारें असलेलें, चोहोंकडे उंबरा असलेलें, अशाला सर्वतोभद्र असें ह्मणतात. तशामध्यें प्रवेश करतांना प्रतिशुक्राचा विचार करावयाचें कारण नाहीं. तेंच वसिष्ठ सांग तो कीं, काश्यप, वसिष्ठ, भृगु, आंगिरस, भारद्वाज, वात्स्य, इतक्या गोत्रांत उत्पन्न झालेल्यांस प्रतिशुक्राचा दोष नाहीं ॥ १२ ॥

### संमुखशुक्राचा अपवाद व प्रयाणविधि.

चंद्रे पूषभमेषगे सति सितोऽधः स्यात्तदा संमुखं ।
यानं सत्परपूर्वयोः सितविपर्यासात्सदाऽऽवश्यके ॥
राजा तर्पितवह्निभूसुरसुहृत्स्नेहानुवृत्तिं त्यजन् ।
तृप्तः कार्यमना व्रजेत्त्रिदिवसैरेकाब्धिषट्क्रोशकान् ॥ १३ ॥

श्लोकार्थ—रेवती नक्षत्राला व मेषराशीला चंद्र असतां शुक्र अंध होतो, तेव्हां त्याच्या संमुख प्रयाण करणें शुभ होय. अवश्य कार्य असतां शुक्राच्या उलट दिशेला ह्मणजे आकाशाच्या पूर्व कपालांत शुक्र असतां पश्चिमेला व पश्चिमकपालांत असतां पूर्वेला गमन करणें सर्वकाळ शुभ जाणावें. अग्नि, ब्राह्मण, मित्र ह्यांना तृप्त करून स्नेह संबंध सोडून, भोजन करून स्वतः तृप्त होऊन व कार्याविषयीं मन उत्कंठित ठेवून राजानें पहिल्या-दिवशीं एक कोस, दुसऱ्या दिवशीं चार कोस, व तिसऱ्या दिवशीं सहा कोस असें प्रयाण करावें चवथ्या दिव-सापासून पुढें पाहिजे तितके कोस गमन करावें ॥ १३ ॥

अथान्यं चापवादमाह–चंद्र इति। चंद्रे पूषभमेषगे सति सितः शुक्रः अंधः स्यात् तदा संमुखं यानं सत् शुभं स्यात् । तथा च गर्गः । पौष्णादिवह्निभाद्यंध्रौ यावत्तिष्ठति चंद्रमाः । तावदंधो भवे-च्छुक्रः प्रवेशे निर्गमे शुभ इति ॥ अथाऽऽवश्यके प्रवृत्तिमाह–परपूर्वयोरिति । परपूर्वयोः । पश्चिम-पूर्वयोः सितविपर्यासाच्छुक्रविपर्यासात आवश्यके कृत्ये सति यानं सत्स्यात् । एतदुक्तं भवति शुक्रे पूर्वकपालगते सति पश्चिमां गच्छेत् । पश्चिमकपालगते सति पूर्वां गच्छेत् । तथा च ज्योतिःप्रकाशे अत्युत्सुकेषु यावत्प्राक्पालस्थो भृगुर्भवेत् । तावत्पश्चिदिशं गच्छेत्प्राचिं प्रत्यक्स्थितस्तथेति ॥ अथ प्रयाणविधिमाह–राजेति । राजा त्रिदिवसैरेकाब्धिषट्क्रोशकान् व्रजेत् एतदुक्तं भवति प्रथम-दिने क्रोशं गच्छेत् । द्वितीयदिने चतुःक्रोशान् तृतीये षट्क्रोशान् अर्थात्परतो यथेच्छं गच्छेत् । कथंभूतः राजा तर्पितवह्निभूसुरसुहृत् वह्निरग्निः भूसुरा ब्राह्मणाः सुहृदो बांधवाः ते तर्पिताः वह्नि-

भूसुरसुहृदो येन स तथा । अत्रायं भावः । समिच्चरुतिलादिना वह्निंतर्पयित्वा दक्षिणान्नादिभिर्भूसुरांस्तर्पयित्वा वस्त्रालंकरणादिभिः सुहृदः कलत्रादींस्तर्पयित्वा व्रजेदिति । किं कुर्वन् स्नेहानुवृत्तिं त्यजन् सन् स्नेहेन अनुवृत्तिः पुनर्गृहागमनं । अयं भावः । यात्रार्थं बहिर्गत्वा पुत्रादि स्नेहवशात्तदवलोकनार्थं गृहं नाऽऽगच्छेदिति । कथंभूतः राजा तृप्तः बुभुक्षितो न गच्छेदिति भावः । पुनः किं लक्षण कार्यमनाः कार्याय उत्कंठितांतःकरणः । तथा च रत्नावल्यां । स्वनिकेतात्सुरभवनात्प्रधानादाश्रमाद्गुरुगृहाद्वापि । यायात्कृताग्निकार्यः प्राश्य हविष्यं द्विजानुमतमिति ॥ तथा च बृहस्पतिः दैवज्ञं पूजयित्वा तु विदुषः पूज्यः शक्तित । प्रदक्षिणमिमान्कृत्वा तिष्ठन्ध्यायेदुमापतिमिति ॥ तथा च ज्योतिःप्रकाशे संतोष्य स्वांगनां विप्रान् जह्यात्प्रतिरथादिकं । शुचिः शुक्लांबरोष्णीषो नत्वेष्टं सुमना व्रजेदिति । तथा च काश्यपः । यात्रासमयं वृद्धानुपरागे च ग्रहस्य वैषम्ये । गोभूहिरण्यवस्त्रैः संपूज्य श्रद्धया च दैवज्ञमिति ॥ बृहद्यात्रायां । स्नातो भुक्तोऽनुलिप्तश्च सर्वालंकारभूषितः । शुक्लांबरधरः श्रीमानभ्युदयं सुखमेधत इति ॥ भूपालवल्लभे । ब्राह्मणान्नावमन्येत कोपयेन्न निजांगनां । यात्रां कृत्वा गृहं नैतु सिद्धकामो विशेद्गृहमिति ॥ लल्लः । यात्रायां प्रस्थितो यश्च ब्राह्मणानवमन्यते । तदंतं जीवितं तस्य नासौ प्रतिनिवर्तत इति ॥ बृहद्यात्रायां । यस्तु संप्रस्थितो यात्रां स्वभार्यां नाभिनंदति । भार्यावानाभिनंदेत नास्य प्रतिनिवर्तनमिति ॥ तथा च रत्नावल्यां । क्रोशं वा यदि वाऽप्यर्धं प्रथमेऽहनि शस्यते द्वितीये योजनं गत्वा निवसेत महीपतिः ॥ तृतीये योजनं सार्धं वसेदाक्रम्य दूरतः । ततः परं यथेष्टं तु यायान्मार्गं महीश्वर इति ॥ १३ ॥

**टीकार्थ**—आतां दुसरा अपवाद सांगतों—रेवतीनक्षत्रावर चंद्र असतां आणि मेषराशीला चंद्र असतां शुक्र हा आंधळा असतो ह्मणून त्यावेळेस शुक्रसंमुख असल्याचा दोष नाहीं. तेंच गर्ग सांगत आहे कीं, रेवती नक्षत्रावर चंद्र असतां आणि मेषराशीवर चंद्र असतां शुक्र हा आंधळा असतो त्यावेळेस गमन करणें शुभकारक आहे. आतां अवश्यक कार्याविषयीं प्रवृत्ति सांगतो—अतिशय अवश्यक काम असेल तर शुक्राच्या उलट दिशेस जाण्यास हरकत नाहीं जसें कीं शुक्र आकाशांत पूर्व कपालांत असला तर पश्चिमेस जाण्यास हरकत नाहीं व पश्चिम कपालांत असला तर पूर्वेस जाण्यास हरकत नाहीं. तेंच ज्योतिःप्रकाशांत सांगितलें आहे कीं, अतिशय अवश्यक कार्य असतां पूर्वकपालांत शुक्र असेल तर पश्चिम दिशेस जाण्यास हरकत नाहीं. शुक्र पश्चिम कपालांत असेल तर पूर्व दिशेस जाण्यास हरकत नाहीं. आतां प्रयाण विधि सांगतों—राजानें पहिल्या दिवशीं एक कोस जावें दुसरे दिवशीं चार कोस तिसरे दिवशीं सहा कोस अशा रीतीनें गमन करावें अर्थात् पुढें आपल्या इच्छे इतके कोस चालावें राजानें निघण्याचें पूर्वीं अग्नि आणि ब्राह्मण आणि आपले मित्र ह्यांना तृप्त करावें. ह्याचा अर्थ असा कीं अग्निमध्यें तूप, चरु, तिल इत्यादि हवन करून त्याला तृप्त करावें, ब्राह्मणांला दक्षिणा इत्यादिक देऊन तृप्त करावें. आपल्या मित्रांनां वस्त्र, अलंकार इत्यादि देऊन तृप्त करावें. यात्रेस जातानां मागील पुत्रादिकांवर स्नेह न ठेवतां जावें म्हणजे यात्रे करितां बाहेर निघाल्यावर पुनः स्नेहास्तव पुत्रादिकांना पाहाण्याकरितां घरीं माघारें येऊं नये. उपवास पोटीं राजानें गमन करूं नये. व्यग्र मनानें गमन करूं नये. तेंच रत्नावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं; राजानें आपल्या घरांतून, मंदिरांतून, उत्तम महालांतून गुरु घरापासून निघतांना अग्नीला हवनांनीं तृप्त करून ब्राह्मणांनां संतुष्ट करून ब्राह्मणांच्या अनुमतीनें यात्रेस जावें. तेंच बृहस्पती सांगतो कीं, ज्योतिर्विदाची म्हणजे जोशीबोवांची पूजा करून आणि यथाशक्तीनें विद्वानांची पूजा करून त्यांना प्रदक्षिणा घालून श्रीशिवाचें ध्यान करीत निघावें तेंच ज्योतिःप्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, आपल्या स्त्रियेला आणि ब्राह्मणांनां संतुष्ट करून प्रतिरथ इत्यादिक सोडावेत. स्वच्छ वस्त्र धारण करून पवित्र मनानें आपल्या इष्ट देवतेला नमस्कार करून निघावें. तेंच काश्यप सांगतो कीं, यात्रेच्या वेळीं, ग्रहणाचे वेळीं, गृहभंगाचें वेळीं, गाय, पृथिवी, सुवर्ण, वस्त्र इत्यादिकांनीं दैवज्ञाची पूजा करावी. बृहद्यात्रा ग्रंथांत सांगितलें आहे कीं, स्नान करून, भोजन करून, चंदनादिकांचा लेप करून सर्व प्रकारचे अलंकार घालून शुभ्र वस्त्र धारण करून असा श्रीमान् राजा सुखानें वृद्धि पावत असतो, भूपाल वल्लभांत सांगितलें आहे कीं, ब्राह्मणांचा अवमान करूं नये. आपल्या स्त्रियेचा कोप होऊं देऊं नये. यात्रे करितां निघाल्यावर पुनः पुत्रादिकांच्या स्नेहानें घरीं माघारीं येऊं नये. लल्ल सांगतो कीं, जो यात्रे करितां निघतांनां ब्राह्मणांचा अपमान करितो त्याचें आयुष्य यात्रेंतच पुरें होतें तो पुनः माघारा येत नाहीं. बृहद्यात्रेंत सांगितलें आहे कीं, जो यात्रेस निघतांना आपल्या स्त्रियेला संतुष्ट करीत नाहीं अथवा स्त्रीही ज्याला अभिनंदन करीत नाहीं तो यात्रा करून पुनः माघारा परत येत नाहीं. तेंच रत्नावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं, राजानें पहिले दिवशीं एक कोस अथवा अर्धा कोस जावें व दुसरे दिवशीं एक योजन म्हणजे चार कोस जावें तिसरे दिवशीं दीड योजन म्हणजे सहा कोस जावें त्यापुढें आपल्या इच्छेप्रमाणें जावें ॥ १३ ॥

### गमनकरणाऱ्याचे व प्रस्थानाचे नियम.

क्रोधक्षौररतिश्रमामिषगुडद्यूताश्रुदुग्धासव-।
क्षाराभ्यंगभयाः सितांबरवमिस्तैलं कटूज्झेद्गमे ॥
क्षीरक्षौररतीः क्रमात्रिशरसप्ताहं परं तद्दिने ।
रोगं स्त्र्यार्तवकं सितान्यतिलके प्रस्थानकेऽपीति च ॥ १४ ॥

श्लोकार्थ—क्रोध, क्षौर, मैथुन, श्रम, मांस, गूळ, द्यूत, अश्रुमोचन ( रडणें ) दुग्ध, मद्य, क्षारधान्य ( उडीद वगैरे ) अभ्यंगस्नान, शत्रुभय, शुभ्रावांचून अन्य रंगाचें वस्त्र, वमन, तेल, तिखट हीं सर्व गमन कर्त्यानें सोडावीं. गमनापूर्वी तीन दिवस दुग्ध, पांच दिवस क्षौर व सात दिवस मैथुन वर्ज्य करावें. बाकीचीं क्रोधादि सर्व गमन दिवशीं सोडावीं. रोग झाला असतां तो नाहींसा होईपर्यंत प्रयाण करूं नये. स्त्रीला ऋतु प्राप्त झाला असतां संभोग होईपर्यंत प्रयाण वर्जावें. पांढऱ्यावांचून अन्य रंगाचा तिलक गमन दिवशीं लावूं नये. गमनाला वर्ज्य केलेलें सर्व प्रस्थान ठेवावयाचें असतां त्यालाही वर्ज्य करावें ॥ १४ ॥

अथ यात्रिकस्य नियमानाह–क्रोधेति । क्रोधः प्रसिद्धः क्षौरं प्रसिद्धं । रतिर्मैथुनं श्रमः क्लेशः आमिषं मांसं गुडः प्रसिद्धः द्यूतं द्यूतवरणं अश्रु अश्रुमोचनं दुग्धं प्रसिद्धं आसवो मद्यं क्षारं क्षारधान्यं माषादि अभ्यंगस्तैलाभ्यंगः भयं शंका रिपुभयमित्यर्थः । असितांबराणि अशुभ्रवस्त्राणि रक्तकृष्णादीनि । वमिर्वमनं तैलं प्रसिद्धं कटु मरिचादि इत्येतद्गमे गमने उज्झेत् त्यजेत् । अथोक्तेषु किं किं कतिदिनं त्यजेदित्याह–क्षीरेति । क्षीरक्षौररतीः क्रमात् त्रि ३ शर ५ सप्ताहं ७ त्यजेत् क्षीरं दुग्धं त्र्यहं ३ क्षौरं शराहं पंचाहं ५ रतिं सप्ताहं ७ त्यजेदित्यर्थः । परं उर्वरितं तद्दिने प्रयाणदिने त्यजेत् रोगं व्याधिं यावद्बाधं त्यजेत् स्त्र्यार्तवं बीजदानपर्यंतं त्यजेत् सितान्यतिलकं श्वेतव्यतिरिक्ततिलकं पीतकौंकुमादिकं तद्दिने त्यजेत् प्रस्थानकेऽपि इत्येतत्त्यजेत् प्रस्थानकं नाम मुहूर्तसमये किंचिदभीष्टवस्तुचालनं । तदुक्तं रत्नमालायां । छत्रायुधाद्यं मनसस्त्वभीष्टं प्रचालयेद्वैजयिकं जयार्थीति ॥ एतत्तु कार्यवशात्क्रियते प्रस्थाने संपूर्णफलं नास्ति । तथा च रत्नकोशे । कार्यवशात्स्वयमगमे भूभर्तुः केचिदाचार्याः । छत्रायुधाद्यभीष्टं वैजयिकं निर्गमे कुर्युः इति॥तथा च गर्गः । स्वशरीरेण यः कश्चिन्निर्गच्छन् श्रद्धयाऽन्वितः । तस्य यात्राफलं सर्वं संपूर्णं पथि सिध्यतीति ॥ तच्चालनावधिर्ग्रंथांतरात् । गृहाद्गृहांतरं गर्ग आह सीमांतरं भृगुः । शरक्षेपाद्भरद्वाजो वसिष्ठो नगराद्बहिरिति ॥ एवं प्रस्थाने कृतेऽपि स्वयमन्यस्मिन्सुदिने गच्छेत् । तथा च ज्योतिःप्रकाशे । प्रस्थानेऽपि कृते नेयान्महादोषान्विते दिने । गर्भयोगं विना कालवृष्ट्यादौ चाप्लुते तथेति ॥ रत्नमालायां । वसेन्न चैकत्र दश क्षितीशो दिनानि नो सप्त च मांडलीकः । यः प्राकृतः सोऽपि च पंचरात्रं भद्रेण यात्रा परतः प्रयोज्येति ॥ एवं विधे प्रस्थानेऽपि क्रोधक्षौररत्यादीन् वर्जयेदित्यर्थः । गर्गः । क्रोधं क्षौरं तथा वांतिं तैलाभ्यंगाश्रुमोक्षणं- द्यूतं मांसं गुडं तैलं यानं मद्यं परित्यजेदिति ॥ रत्नकोशे । कालीयकं हिंगुलकः कुंकुमं रक्तचंदनं । पीतं रक्तं च वसनं यातुर्नेष्टानि तत्क्षणादिति ॥ बृहद्यात्रायां । कटुतैलगुडक्षौरपक्वमांसाशनं तथा । भुक्त्वा यो याति मोहेन व्याधितः स निवर्तत इति ॥ लल्लः । प्रमत्तो व्याधितो भीतः शांतः क्रुद्धो बुभुक्षितः । अध्वानं न प्रपद्येत क्लीववेषस्तथैव च ॥ रत्नावल्यां । स्वकीयां परकीयां वा स्त्रियं पुरुषमेव वा । ताडयित्वा तु यो गच्छेत्तदंतं तस्य जीवितमिति ॥ भृगुः । त्रिरात्रं वर्जयेत्क्षीरं पंचाहं क्षुरकर्म च । तदहश्चावशेषाणि सप्ताहं मैथुनं त्यजेदिति ॥ यात्राया गमनलक्षणं गर्गोक्तं ज्ञेयं । मुहूर्तसमये प्राप्ते हंसचारांघ्रिणा व्रजेत् । दैवज्ञामात्यविप्राद्यपुरोगैः स्वजनैर्वृतः । पूर्वं दक्षिणमुद्धृत्य पादं यात्रां नराधिपः ॥ द्वात्रिंशतं पदं गत्वा यानमारुह्य संव्रजेत् । ततो निरीक्षयेत्सम्यक् शकुनांश्च शुभाशुभान् ॥ तथैव सदसच्छब्दान्निमित्तानि च संव्रजेदिति ॥ १४ ॥

टीकार्थ—यात्रा करण्याचे नियम सांगतो–क्रोध, क्षौर, मैथून, श्रम, मांस, गूळ, द्यूत, अश्रु, ( रडणें, ) दुग्ध, मद्य, क्षारधान्य ह्म० उडीद वगैरे, अभ्यंग स्नान, शत्रूचें भय. पांढऱ्या शिवाय दुसरें वस्त्र, वमन, तेल, तिखट इतके पदार्थ यात्रा करणाऱ्यानें सोडावेत. आतां हे सांगितलेले कोणकोणते पदार्थ कितीकिती दिवस सोडावेत

तें सांगतो—यात्रेस जाण्याचे पूर्वीं तीन दिवस दूध सोडावें पांच दिवस क्षौर वर्ज्य करावें. सात दिवस मैथुन वर्ज्य करावें. बाकीचे पदार्थ प्रयाणाचे दिवशींच वर्ज्य करावेत. रोग झाला असतां तो नाहींसा होईपर्यंत प्रयाण करूं नये. स्त्रीस ऋतु प्राप्त झाला असतां तिच्या बरोबर संभोग होईपर्यंत प्रयाण वर्ज्य करावें. पांढऱ्या तिलका शिवाय बाकीचे लाल वगैरे तिलक त्याच दिवशीं वर्ज्य करावेत. प्रयाणाचे वेळीं जें कांहीं आपलें इष्ट वस्तूचें चालन तेंही त्याच दिवशीं वर्ज्य करावें. तेंच रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, विजयाच्या इच्छेनें युद्ध यात्रेकरितां निघणाऱ्यानें छत्र, चामर इत्यादि जें प्रिय वस्तूचें चालन तेंही वर्ज्य करावें. हें सर्व कार्य प्रसंगोपात करावें लागतें त्याचें संपूर्ण फळ प्रस्थान काळीं होत नाहीं. तेंच रत्नकोश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कदाचित् कार्यवशास्तव राजानें छत्र, चामर धारण करूं नये. असें कितीएक आचार्यांचें मत आहे कित्येकांचें मत असें आहे कीं, छत्रचामरादि इष्ट पदार्थ चालन करावे. तेंच गर्ग- सांगत आहे कीं, आपल्या देहानें जो कोणी यात्रे करितां श्रद्धापूर्वक निघतो त्याला यात्रेचें संपूर्ण फल रस्त्यामध्यें मिळतें, त्यानें छत्रचामरादि चालण्याचा अवधि दुसऱ्या ग्रंथापासून जाणून घ्यावा. भृगु असें सांगतो कीं, एका घराहून दुसऱ्या घरीं जाणें हेंच सीमाबदलणें आहे असें समजावें भरद्वाजाचें असें मत आहे कीं, जेथपर्यंत बाण फेंकला जातो तेथपर्यंत सीमा बदलत्ये. वसिष्ठाचें मत असें आहे कीं, नगराच्या बाहेर गेलें म्हणजे सीमा बदलते असें मत आहे. असें जरी प्रस्थान केलें तरी दुसऱ्या सुदिनावर गमन करावें. तेंच ज्योतिःप्रकाश ग्रंथांत सांगितलें आहे कीं, प्रस्थान केलें तरी सुद्धां दोषयुक्त दिवसावर गमन करूं नये. गर्भयोगाशिवाय म्हणजे मेघाच्छादित आकाश झाल्या शिवाय एकदम अकाळ वृष्टी झाली असतांही गमन करूं नये. तेंच रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, राजानें दहा दिवस एका स्थानीं राहूं नये. मांडलिक राजानें सात दिवस एका स्थानीं राहूं नये. साधारण प्राकृत मनुष्यानेंही पांच रात्रपर्यंत एकाजागीं राहूं नये. यात्रेप्रमाणें राहाण्यास हरकत नाहीं अशा प्रकारच्या प्रस्थानावरही क्रोध, क्षौर इत्यादि पूर्वीं सांगितलेले वर्ज्य करावेत. गर्ग सांगतो कीं, क्रोध, क्षौर, वमन, तैलाभ्यंग, रडणें, द्यूत, मांस, गूळ, तैल, यान, मद्य हीं वर्ज्य करावींत. रत्नकोशांत असें सांगितलें आहे कीं, कालीयक, हिंगुलक, कुंकुम, रक्तचंदन, पिवळें आणि तांबडें वस्त्र इतके पदार्थ प्रयाण करणारास त्या क्षणीं वर्ज्य आहेत. बृहद्यात्रा ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कडू, तेल, गूळ, क्षौर, पक्वमांस भक्षण इत्यादिकांचें भक्षण जो अज्ञानानें करून जातो तो रोगग्रस्त होऊन माघारी परत येतो. लल्ल असें सांगत आहे कीं, प्रमत्त झालेला, रोगग्रस्त झालेला, भय पावलेला, शांत स्वभावाचा, रागावलेला, भुकेलेला, नपुंसकाचा वेष धारण केलेला अशानें प्रयाणास जाऊं नये. रत्नावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं, आपल्या अथवा दुसऱ्याच्या स्त्रियेला किंवा पुरुषाला ताडण करून जो प्रयाण करतो त्याचें आयुष्य तिकडेच पुरें होतें. भृगु सांगतो कीं, तीन दिवस पर्यंत दूध वर्ज्य करावें पांच दिवसपर्यंत क्षौर वर्ज्य करावें. सात दिवस मैथून वर्ज्य करावें. आणि बाकीचे पदार्थ त्याच दिवशीं वर्ज्य करावेत यात्रेच्या गमनाचें लक्षण गर्गानें सांगितलें आहे तें जाणावें. गमनाचा मुहूर्त आला असतां राजानें हंसासारखें हळू- हळू चालावें आणि दैवज्ञ, प्रधान, विप्र हे पुढें असावेत आणि अगोदर उजवा पाय उचलून बत्तीस पावलें चालून मग यानांत म्हणजे रथ, गाडी, पालखी इत्यादिकांवर बसावें नंतर हळू हळू शुभ आणि अशुभ असे शकुन पाहावेत. त्याच प्रमाणें सत् आणि असत् शब्द आणि निमित्तें पाहावींत ॥ १४ ॥

## शुभशकुन.

वस्त्रालंकरणानि पूर्णकलशस्तौर्यध्वनिः पुत्रवान् ।
शंखादर्शनृपाश्वदंतिसुरभिस्त्रीपुष्पधान्यादि च ॥
दोलादीपविधूमवह्निसुरभिद्रव्याणि शुभ्रो वृषो ।
वेश्या छत्रवितानचामरकुमार्यो मीनगोरोचने ॥ १५ ॥

श्लोकार्थ—शुभ्रवस्त्रें, सुवर्णादिकांचे अलंकार, पूर्णकलश, वाद्यांचा नाद, पुत्रवान् पुरुष, शंख, आरसा, राजा, घोडा, हत्ती, गाय, सौभाग्यवती स्त्री, पांढरीं फुलें, काळीं नव्हेत अशीं धान्यें, सुवर्णादि धातु, दोला (डोळी मेणा वगैरे), दीप धुकट न येणारा अग्नि, कापूर, चंदन वगैरे सुगंधि पदार्थ, पांढरा बैल, वेश्या, छत्र, वितान (छत्र चांदवा), चामर, कुमारिका, मत्स्य, गोरोचन हीं घरांतून बाहेर निघाल्यावर दृष्टीस पडतील तर शुभ जाणावीं ॥ १५ ॥

इदानीं शकुनानाह–वस्त्रेति । वस्त्राणि श्वेतवस्त्राणि अन्यान्यपशकुनमध्ये पठितानि । अलंकरणानि सुवर्णादिनिर्मितानि भूषणानीत्यर्थः । पूर्णकलशः प्रसिद्धः । तौर्यध्वनिः वाद्यध्वनिः । पुत्रवान् वर्धमानः पुरुषः । शंखः प्रसिद्धः । आदर्शो मुकुरः । नृपो राजा । अश्वः प्रसिद्धः । दंती हस्ती सुरभिर्गौः । स्त्री सौभाग्यवती । पुष्पाणि श्वेतानि । धान्यानि अकृष्णानि कृष्णानि त्वपशकुनमध्ये पठितानि । आदिशब्देन सुवर्णादि धातवः । दोला प्रसिद्धा दीपः प्रसिद्धः विधूमवह्निः धूमरहितोऽग्निः सुरभिद्रव्याणि सुगंधद्रव्याणि कर्पूरचंदनादीनि शुभ्रो वृषः श्वेतवृषभः वेश्या प्रसिद्धा छत्रं प्रसिद्धं वितानं वस्त्रनिर्मितं प्रसिद्धं चामरं प्रसिद्धं कुमारी प्रसिद्धा मीनो मत्स्यः जलादुद्धृतः गोरोचनं प्रसिद्धं ॥ १५ ॥

टीकार्थ—वस्त्र म्हणजे पांढरीं वस्त्रें अर्थात् त्याशिवाय दुसरीं वस्त्रें अपशकुन समजावीत पांढरीं वस्त्रें शुभ शकून आहेत. अलंकार ह्म० सोनें, मोतीं, रूपें इत्यादिकांनीं तयार केलेले डागिनें, भरलेला घडा, वाद्यांचा शब्द, पुत्रवान् पुरुष म्हणजे मुलगा असलेला पुरुष, शंख, आरसा, राजा, घोडा, हत्ती, गाय, सौभाग्यवती स्त्री, पांढरीं फुलें धान्यें म्हणजे काळ्या वर्णाशिवाय असलेलीं अर्थात् पांढरीं इत्यादि वर्णाचीं धान्यें, कारण कीं काळीं धान्यें अपशकुनांत, सांगितलीं आहेत. धान्यादि ह्यांतील आदि ह्या शब्दानें धातु, झोंपाळा, दिवा, धूमरहीत अग्नि,सुगंध द्रव्यें. ह्म०कापूर, चंदन इत्यादि. पांढरा बैल, वेश्या ह्म० रंडी, छत्र ह्म० छत्री, छत ह्म० वस्त्रानें तयार केलेलें, चामर ह्म० चवरी, कुमारी ह्म० कन्या, मीन ह्म० मासे म्हणजे पाण्यांतून काढलेले अर्थात् ओले ताजे, गोरोचनइतके पदार्थ शुभ शकुन आहेत ॥१५॥

### शुभशकुन.

यद्यत्स्वांतनितांततोषकरणं कोरुद्धृतं गोमयम् ।
मृच्चांभोर्थघटान्वितः सहचरो धौतांबरो मौत्रकः ॥
दूर्वादर्भरथाः पलास्रमदिरा वर्णी गुरुर्दैववित् ।
विप्रौ मित्रमृगावरोदनशवं सिद्धार्थं दुग्धादि च ॥ १६ ॥

श्लोकार्थ—जें जें दृष्टीस पडलें असतां मनाला फार संतोष उत्पन्न करील तें तें शुभ होय. जमिनीवरून उचललेलें गोमय, मृत्तिका, पाणी आणण्याकरितां भांडें घेऊन आपणाबरोबर निघालेला, धुतलेलीं वस्त्रें घेतलेला परीट, दूर्वा, दर्भ, रथ, मांस, रक्त, मद्य, ब्रह्मचारी, गुरु, ज्योतिषी, दोघे ब्राह्मण, मित्र, मृग, बरोबर कोणी रडत नाहीं असें प्रेत, पांढऱ्या मोहऱ्या, दध, दहीं, तूप हीं प्रयाणकर्त्याला निघाल्यावर दृष्टीस पडलीं तर शुभ होत ॥ १६ ॥

अथ संकोचेनाऽऽह–यद्यदिति । यद्यद्वस्तु स्वांतनितांततोषकरणं स्वांतं अंतःकरणं तस्य नितांतं अतिशयेन तोषकरणं संतोषजनकं तत्तत् किं बहुनोक्तेन । एवं संकोचेनोक्त्वेदानीं येषु संतोषासंतोषाभावः तानि पूर्वाचार्यैः शकुनमध्ये पठितानि तान्याह–कोरुद्धृतं गोमयं कोः पृथिव्या उद्धृतं गोमयं मृच्च पृथिव्या उद्धृता मृत्तिका अंभोऽर्थघटान्वितः सहचरः उदकार्थं कुंभयुक्तो जनः सन् सहचरः सहचरतीति सहचरः । जलार्थी रिक्तकुंभस्तु पथिकेन सह व्रजेत् । निवर्तते यथा पूर्णः कृतार्थः पथिकस्तथेत्युक्तत्वात् ॥ धौतांबरो मौत्रकः धृतवस्त्रः रजकः दूर्वा प्रसिद्धा दर्भः प्रसिद्धः दूर्वादर्भौ तृणे अपि शुभे अपशकुन मध्ये यत्तृणं पठितं तदेतद्व्यतिरिक्तं रथः प्रसिद्धः पलं मांसं अस्रं रक्तं मदिरा मद्यं वर्णी ब्रह्मचारी गुरुः प्रसिद्धः दैवविज्ज्योतिषी विप्रौ द्वौ ब्राह्मणौ मित्रं इष्टःमृगः प्रसिद्धः अरोदनशवं रोदनरहितं प्रेतं सिद्धार्थाः गौरसर्षपाः दुग्धादि दुग्धदध्याज्यं । ननु यद्यत्स्वांतनितांततोषकरणं इत्यनेन दुग्धं बृंहणत्वात्सिद्धं पुनः किमुक्तं दुग्धमिति । सत्यं दुग्धं भक्षणे निषेधितं तत्संदेहनिवृत्यर्थं दुग्धपठनमित्यदोषः । एवमेवात्र विचारणीयं । तथा च वसंतः । दध्याज्यदूर्वाक्षतपूर्णकुंभसिद्धान्नसिद्धार्थकचंदनानि । आदर्शशंखामिषमीनमद्यगोरोचनागोमयमुद्धृतं कोरिति ॥ भारद्वाजः । राजा विप्रौ सुहृद्वेश्या सपुत्रा स्त्री कुमारिका । अभिरूपो नरः स्त्री वा गजो वाजी वृषः सितः ॥ रज्ज्वाधृतान्यवर्णैर्गौः सवत्सा च विशेषतः । उद्धृतं गोमयं नीतं मृत्तिका चोद्धृता तथा ॥

रजको धौतवस्त्रश्च वेश्या तौर्यत्रिकध्वनिः । जयमंगलशब्दश्च शांतिपाठः सदीपकः ॥ दीपो वा प्रज्वलद्वह्निः पूर्णकुंभो नृपासनं । मद्यं मांसं च रुधिरं भक्ष्याणि विविधानि च ॥ इक्षवो मधु तांबूलं वस्त्रालंकरणानि च । रौप्यं ताम्रं मणि स्वर्णं द्रव्यं दर्पणमक्षताः ॥ वितानं चामरं छत्रं दूर्वा दर्भतृणध्वजाः । दोला चारुरथो वृद्धः पुत्रपौत्रार्थयुक् शुचिः ॥ चंदनानि सुगंधीनि तथा पुष्पाणि रोचना । घृतं दधि पयः पेयासिद्धमन्नं वचः शुभं ॥ दैवज्ञः सगुरुर्देवश्चित्तोत्साहकराणि च । दृष्ट्वैतानि नरो यायात्सर्वार्थं लभते तु स इति ॥ १६ ॥

**टीकार्थ**—आतां संकोच करून थोडक्यांत सांगतों– जें जें वस्तु मनाला अतिशय संतोष कारक वाटतें तें तें वस्तु शुभ शकुन समजावे, फार सांगून काय फायदा आहे. अशा रीतीनें थोडक्यांत शुभ शकुन सांगितले आतां ज्या विषयीं संतोष आणि असंतोष हे दोनही नाहींत ते पदार्थ पूर्वीच्या आचार्यांनीं शुभशकुनामध्यें सांगितले ते सांगतों– पृथ्वी पासून उकरून काढलेली मृत्तिका, पाणी आणण्या करितां भांडे बरोबर घेऊन जाणारा मनुष्य म्हणजे पाणी आणण्या करितां वाटसरू बरोबर रिकामें भांडें घेऊन जाणारा मनुष्य. तो जसा पाण्यानें भरलेला घट घेऊन येतो आणि कृतार्थ होतो तसा प्रयाण करणाराही फत्ते काम करून येईल. शुभ वस्त्रें नेसून जाणारा धोबी, दूर्वा, दर्भ, हे दोन गवत आहे ह्यास्तव अपशकुनांत यावेत परंतु ते शुभ शकूनच आहेत. ह्मणून दूर्वा आणि दर्भ ह्याशिवाय बाकीचीं तृणें अपशकुन समजावींत रथ ह्म० गाडी, मांस, रक्त, मद्य, ब्रह्मचारी, गुरु, ज्योतिषी, दोन ब्राह्मण, मित्र, हरण, रडणारे मनुष्याबरोबर नसलेलें असें प्रेत, पांढऱ्या मोहऱ्या, दूध, दही, तूप हे शुभ शकुन जाणावेत. आतां अशी शंका येते कीं, दूध खाण्याचा निषेध सांगितला असून पुनः दूध शुभ शकुनांत कसें घेतलें. ही शंका दूर करण्यास्तव पुनः दूध सांगितलें आणि मनाला जें जें संतोषकारक ह्मणून सांगितलें त्यावरून दूध येत असतां पुनः दूध असें सांगितलें आहे ह्याचें कारण त्याच्या भक्षणास निषेध सांगितला ती शंका दूर करण्यास्तव आहे. तेंच वसंत सांगतो कीं, दधि, तूप, दूर्वा, अक्षता, पूर्णकुंभ, तयार अन्न, पांढऱ्या मोहऱ्या, चंदन, आरसा, शंख, मांस, मासे, मद्य, गोरोचन, पृथ्वीपासून काढलेली माती इतके शुभ शकुन आहेत. भारद्वाज सांगतो कीं, राजा, दोन ब्राह्मण, मित्र, वेश्या ह्म० रांड, पुत्रवती स्त्री, कुमारी, सुंदर आणि कुलीन पुरुष, आणि कुलीन स्त्री, हत्ती, घोडा, पांढरा बैल, दोरीनें बांधून धरलेली दुसऱ्या वर्णाची वासरा सहित गाय, पृथ्वीपासून खणलेली माती, पांढऱ्या वस्त्राचा धोबी, वेश्या ह्म० रांड, वाद्य, ध्वनि, जयाचा व मंगल कारक शब्द, दीपासहीत शांतिपाठ, जळणारा दिवा, पेटलेला अग्नि, भरलेला घडा, राजासन, मद्य, मांस रक्त, नानाप्रकारचे भक्ष्य पदार्थ, ऊंस, मध, तांबूल, वस्त्र, अलंकार, रुपें, तांबें, मणि, सोनें, द्रव्य, आरसा, अक्षता, छत, चवरी, छत्र, दूर्वा, दर्भ, झोपाळा, उत्तम रथ, पुत्र पौत्र असलेला वृद्ध पवित्र मनुष्य, सुगंध चंदनादिक, शुभ्र पुष्पें, गोरोचन, तूप, दहीं, दूध, पेयवस्तु, सिद्ध अन्न, हितकारक भाषण, ज्योतिषी, गुरु, देव, मनाला आनंद करणारे पदार्थ, इतके सांगितलेले पदार्थ पाहून शुभ शकुन समजून प्रयाण करावें म्हणजे त्यापासून इष्ट सिद्धि होते ॥ १६ ॥

### अपशकुन.

कुर्वन्दक्षिणतः सदेतदितरद्वामे प्रकुर्वन्व्रजेत् ।
भस्मास्थींधनविट्तुषाश्मलवणोपानत्तृणायस्कराः ॥
पिण्याकौषधकृष्णधान्यरुदनं तक्रं सधूमानलः ।
कार्पासारुणपुष्पचर्म च गुडस्तैलायमी कर्दमः ॥ १७ ॥

**श्लोकार्थ**—मागच्या दोन श्लोकांत सांगितलेले शुभशकुनाचे पदार्थ उजव्या बाजूला घालून जावें. पुढें अपशकुनाचे पदार्थ आहेत ते डाव्या बाजूला घालून जावें. भस्म, हाडें, लांकडें, विष्ठा, कोंडा, दगड, मीठ, उपानह ( जुतें, जोडा वगैरे ), गवत, लोहार, पेंड, औषध, उडीद वगैरे काळें धान्य, रडें, ताक, धुमणारा अग्नि, कापूस, तांबडें फूल, चर्म, गूळ, तेल, लोखंड, चिखल हे पदार्थ अपशकुन करणारे होत ॥ १७ ॥

अथाशुभान्याह–कुर्वन्निति । एतत् अनंतरोक्तं सत् शुभं दक्षिणतः दक्षिणभागे कुर्वन् सन् इतरत् अशुभं वक्ष्यमाणं वामे कुर्वन् सन् व्रजेत् गच्छेत् । भस्मेति । भस्म प्रसि० अस्थि प्रसि० इंधनं प्रसि० विट् विष्ठा तुषं धान्यादीनां त्वक् फल्गु अश्मा पाषाणः लवणं सामुद्रिकं उपानहौ प्रसिद्धौ

तृणं प्रसि० अयस्करो लोहकारः पिण्याकं मर्दिततिलाः औषधं प्रसि० कृष्णधान्यं माषादि रुदनं रौदनादि तक्रं प्रसि० सधूमानलः धूमसहितोऽग्निः कार्पासः प्रसि० अरुणपुष्पं जपादि चर्म प्रसि० गुडः प्रसि० तैलं प्रसि० अयो लोहं कर्दमः पंकः ॥ १७ ॥

**टीकार्थ**—आतां अपशकून सांगतों– पूर्वी सांगितलेले शुभकारक पदार्थांस उजवी घालून प्रयाण करावें, आणि आतां सांगावयाचे अशुभ पदार्थांस डावीकडे करून प्रयाण करावें. भस्म, हाडकें, लांकडें, विष्ठा, कीडा, दगड, मीठ ह्म० समुद्रांतील मीठ, पायांतील जोडा, गवत, लोहार, कुटलेले तीळ, औषध, काळेंधान्य, ह्म० उडीद वगैरे, रडणें वगैरे, ताक, धूमासहीत अग्नि, कापूस, लाल फूल, ह्म० जासुंदी वगैरे, कातडें, गुळ, तैल, लोखंड, चिखल हे पदार्थ अपशकुन कारक आहेत ॥ १७ ॥

### अपशकुन.

**मत्तो वांतबुभुक्षितांतकखला मुंडी जटी व्याधितः ।**
**खंजव्यंगदिगंबरो यतिररिः काषायिमुक्तालकौ ॥**
**चोराभ्यक्तमलाविलाश्च पतितः पाश्यर्गली गुर्विणी ।**
**वंध्या कृष्णवृषाहिभेकसरटा गोधा वराहः शशः ॥ १८ ॥**

**श्लोकार्थ**—उन्मत्त, ओकणारा, भुकेलेला, प्राण्यांचीं हिंसा करणारा, दुर्जन, हजामत केलेला, जटा वाढविलेला, रोगी, लंगडा, अवयवहीन, नग्न, संन्यासी, शत्रु, तांबडें वस्त्र घेतलेला, केश मोकळे सुटलेला, चोर, तेलानें माखलेला, मलिन, जातिभ्रष्ट, प्राणी धरण्यासाठीं फांस घेतलेला, लोखंडाची कडी किंवा सांखळी घेतलेला, गरोदर बायको, वांझ बायको, काळा बैल, सर्प, बेडूक, सरडा, घोरपड, डुकर, ससा हे सर्व अपशकून करणारे होत ॥ १८ ॥

मत्त इति । मत्त उन्मतः वांतो वमितः बुभुक्षितः प्रसि० अंतकः प्राणिहिंसकः खलो दुर्जनः मुंडी मुंडितः जटी जटिलः व्याधितो रोगी खंजः पादेन खंजः व्यंगः अंगहीनः दिगंबरो नग्नः यतिः संन्यासी अरिर्वैरी काषायी गैरिकरंजितवस्त्रः मुक्तालकः मुक्तकेशः चोरः प्रसि० अभ्यक्तः तैलाभ्यक्तः मलाविलो मालिनः पतितो जातिभ्रष्टः पाशी प्राणिबंधार्थं पाशवान् अर्गली अर्गलावान् गुर्विणी सगर्भा वंध्या निरपत्या कृष्णवृषः कृष्णोनड्वान् अहिः सर्पः भेको मंडूकः सरटः प्रसि० गोधा प्रसि० वराहः प्रसि० शशः ॥ १८ ॥

**टीकार्थ**—उन्मत्त, ओकणारा, भुकावलेला, प्राण्यांची हिंसा करणारा, दुर्जन मनुष्य, हजामत केलेला, जटा वाढविलेला, रोगी, लंगडा, अवयवहीन, नागवा, संन्यासी, शत्रु, तांबडें वस्त्र घेतलेला, केस मोकळे सोडलेला, चोर, अभ्यक्त ह्म० तेलानें माखलेला, मलिन, पतित ह्म० जातिभ्रष्ट, प्राणी धरण्यासाठीं फांस घेतलेला, लोखंडाची कडी किंवा साखळी घेतलेला, गर्भिण स्त्री, वांझ बायको, काळा बैल, सर्प, बेडूक, सरडा, घोरपड, डुकर, ससा इतके सर्व पदार्थ अपशकुन करणारे आहेत ॥ १८ ॥

### अपशकुन.

**जाहौतू महिषः खरोष्ट्रमहिषारूढाश्च रिक्तो घट- ।**
**श्छिक्का प्राणिशिरोऽगकंपपदवीबंधाः कुवागाहवौ ॥**
**पातो यानपलायनं श्वकलहः षंढः क्षुतं गोऽर्ग्वेल- ।**
**द्वेश्मेतिप्रतिबंधकाः कुशकुनाश्छिक्कादिका मृत्युदाः ॥ १९ ॥**

**श्लोकार्थ**—जाह ( एक प्राणी आहे, ह्याला कोंकणांत "मंडळ" ह्मणतात ) मांजर, रेडा, गाढवावर उंटावर व रेड्यावर बसलेले, रिकामें भांडें, शिंक, प्राण्यानें आपलें मस्तक किंवा अंग कांपवणें, कोळ्यानें मार्गांत सुताचें केलेलें घर, दुर्भाषण, मांजरांचें रेड्याचें वगैरे युद्ध, वस्त्रादिकांला अडखळून पडणें, अश्वादिवाहनांचें पलायन,

कुत्र्यांचें भांडण, नपुंसक, गाईची शिंक, आगीनें पेटणारें घर हे अपशकुन कार्याचा नाश करणारे आहेत. शिंक वगैरे मरण आणणारे होत ॥ १९ ॥

जाह इति । जाहो मंडली लोके सेहलीतिप्रसिद्धा । जाहको गात्रसंकोची मंडली च बुधैः स्मृत इति हलायुधः ॥ ओतुर्मार्जारः महिषः प्रसि० खरोष्ट्रमहिषारूढाः प्रसि० रिक्तो घटः प्रसि० छिक्का क्षुतं प्राणिशिरोंगकंपः प्राणिनां गोऽश्वादीनां प्राणिनां शिरोज्झाटनमंगोज्झाटनं वा पदवीबंधो मार्गबंध ऊर्णनाभादिभिर्मार्गो बध्यते कुवाक् कुत्सितवाक्यश्रवणं आहवः संग्रामः बिडालमहिषादीनां पातः पतनं वस्त्रादीनां स्खलनं यानमश्वादि तस्य पलायनं श्वकलहः शुनां कलहः षंढो नपुंसको गोः क्षुतं प्रसि०ज्वलद्वेश्म ज्वलद्गृहदर्शनं इत्येतेऽपशकुनाः प्रतिबंधकाः कार्यप्रतिबंधकाः स्युः। छिक्कादिका अपशकुना मृत्युदाः स्युः । तथोक्तमागमांतरे । तृणतैलादि कार्पासभस्मचर्मतुषौषधं । सामुद्रं गुडपंकाहिमत्तवांतबुभुक्षितमित्यादि ॥ १९ ॥

**टीकार्थ**—जाह ह्म० मंडली लोकांत मंडळ नांवाचा प्राणी ह्मणतात, मांजर, रेडा, गाढवावर बसलेला, उंटावर बसलेला, रेड्यावर बसलेला, रिकामें भांडें, शिंका, गाय, घोडा इत्यादि प्राण्यांनीं आपलें मस्तक किंवा अंग कांपविणें, कोळ्यानें मार्गांत सुताचें केलेलें घर, दुष्ट भाषण, मांजराचें रेड्याचें वगैरे युद्ध, वस्त्र इत्यादिकांना अडखळून पडणें, घोडा इत्यादि वाहनांचें पळणें, कुत्र्यांचें भांडण, नपुंसक, गाईची शिंक, जळणारें घर, हे सर्व अपशकून समजावेत. हे झाले असतां आपलें कार्य नष्ट होणार असें जाणावें. शिंका इत्यादि अपशकुन मृत्यु कारक आहेत. तेंच दुसऱ्या आगमांत सांगितलें आहे कीं, गवत, तेल इत्यादि, कापूस, भस्म, कातडें, कोंडा, औषध, समुद्रांतील मीठ, गूळ, चिखल, सर्प, मत्त, ओकलेला, भुकेलेला इत्यादि ॥ १९ ॥

## शुभाशुभशकुन.

भृंगाल्युष्ट्रपठच्छुकाश्च नखिनः स्त्रीसंज्ञका वामतः ।
कालीकुक्कुटपुंप्रथाश्च सुरभिर्दक्षे मनोभीष्टदाः ॥
भारद्वाजशिखंडिचाषनकुलाहंसोऽज एते दृशं ।
याता इष्टफलास्तु रासभरवो वामेऽपि पृष्ठेऽर्थदः ॥ २० ॥

**श्लोकार्थ**—भ्रमर, विंचु, उंट, बोलका पोपट, नखें असणारे कुत्रे वगैरे आणि चिमणी वगैरे स्त्री संज्ञक प्राणी हे गमन कर्त्याच्या डाव्या बाजूनें गेले असतां मनोरथ पूर्ण करितात. म्हैस, कोंबडा, पुरुष संज्ञक कावळा वगैरे प्राणी आणि गाय हीं उजव्या बाजूनें गेलीं तर मनांतील हेतु पूर्ण होतात. भारद्वाज, मयूर, चाष, मुंगूस, हंस, बकरा हे दृष्टीस पडले तर इच्छित फळ देतात. गाढवाचा शब्द डाव्या बाजूला व मागल्या बाजूला झाला तर शुभ होय. वरच्या उलट होणारे अपशकुन समजावे ॥ २० ॥

अथ शकुनांतरमाह-भृंगेति । भृंगो भ्रमरः अलिर्वृश्चिकः उष्ट्रः प्रसि० पठच्छुकाः शब्दं कुर्वाणा राजशुकाः नखिनः श्वानादयः स्त्रीसंज्ञकाः चटकादयः एते वामतः मनोऽभीष्टदाः स्युः । काली महिषी कुक्कुटः प्रसि० पुंप्रथाः पुरुषसंज्ञकाः काकादयः सुरभिर्गौः एते दक्षे मनोभीष्टदाः स्युः । भारद्वाजः प्रसि० शिखंडी मयूरः चाषः प्रसि० नकुलो बभ्रुः प्रसि० हंसः प्रसि० अजो बस्त एते भारद्वाजादयो दृशं याताः संतः इष्टफलाः स्युः । अयमर्थः । भारद्वाजादयो वामे दक्षे वाऽग्रे वा दृष्टमात्रा इष्टफला अभीष्टफलदा भवंतीत्यर्थः । रासभरवो गर्दभध्वनिर्वामे पृष्ठेऽपि अर्थदोऽभीष्टार्थदो भवति ॥ २० ॥

**टीकार्थ**—आतां दुसरे शकुन सांगतों—भ्रमर, विंचू, उंट, बोलका पोपट, नखें असलेले कुत्रे वगैरे, स्त्री संज्ञक चिमणी वगैरे प्राणी, हे गमन कर्त्याच्या डाव्या बाजूनें गेले असतां मनोरथ पूर्ण करितात. म्हैस, कोंबडा, पुरुष संज्ञक कावळा इत्यादि, आणि गाय हे उजव्या बाजूनें गेले असतां मनांतील हेतु पूर्ण करणारे आहेत. भारद्वाज पक्षी, मोर, चाष पक्षी, मुंगूस, हंस, बकरा हे दृष्टीस पडले तर इच्छित फळ देतात. ह्यांतील अर्थ असा कीं, भारद्वाज इत्यादि पक्षी, उजवीकडे व डावीकडे दोहोंकडेही पाहिले असतां इच्छित फल देणारे आहेत. गाढवाचा शब्द डाव्या बाजूला व मागल्या बाजूला झाला तर शुभ होय. वरच्या उलट होणारे अपशकुन जाणावेत ॥ २० ॥

### विपरीत शकुन व परिहार.

नद्युत्तारभयप्रवेशसमरद्यूतेषु नष्टेक्षणे ।
व्याधौ स्युः शुभदा विलोमशकुना नाड्या इडाया भरे ॥
आद्ये दुःशकुने निवृत्य च शुचिर्भूत्वाऽष्टधा स्यायमं ।
कृत्वेयादपरेऽष्टिवारमपरे दत्वा सुवर्णं व्रजेत् ॥ २१ ॥
इतिश्रीमदनंताख्यसुतचातुर्मास्ययाजिनारायणवि-
रचिते मुहूर्तमार्तंडे यात्राप्रकरणं समाप्तम् ॥

श्लोकार्थ—नदी उतरून जाणें, राजादिकांचें भय, ग्रामांत प्रवेश करणें, युद्ध, द्यूत, सांडलेला पदार्थ, शोधणें आणि रोगाला उपचार करण्याकरितां जाणें ह्यांच्या वेळीं झालेले अपशकुन शुभ जाणावे. इडा नाडी ह्म० डावी नाकपुडी भरपूर वाहत असतां अशुभ शकुन शुभ जाणावा. जातांना प्रथम अपशकुन झाला तर मागें फिरून हातपाय धुवून व आचमन करून शुद्ध होऊन बसावें; व आठ वेळ प्राणायाम करून नंतर जावें. दुसऱ्या वेळीं अपशकुन झाला तर पूर्वीप्रमाणें शुद्ध होऊन सोळा वेळ प्राणायाम करून जावें. तिसऱ्यानें अपशकुन होईल तर सुवर्णदान करून जावें. प्राणायामाचा अधिकार नाहीं त्याणें तितका वेळ बसून जावें ॥२१॥

अथ येषु येषु कृत्येषु विपरीतशकुनाः शुभाश्च तानाह–नद्युत्तार इति । नद्युत्तारो नद्युत्तरणं भयं नृपादीनां प्रवेशो ग्रामादिप्रवेशः समरः संग्रामः द्यूतं प्रसि० नष्टेक्षणं नष्टवस्तुनोऽवलोकनं व्याधौ रोगोपचारे एषु विलोमशकुनाः विपरीतशकुनाः शुभदाः स्युः । अयमर्थः । गमने येऽपशकुनास्ते नद्युतारादिषु शुभदाः स्युरित्यर्थः । तथा इडाया नाड्याः भरे पूर्णतायां विलोमशकुनाः शुभदाः स्युः । तथा च वसंतः । भवेदिडायां परिपूरितायां सर्वोऽपि वामः शकुनः प्रशस्तः । स्यात्पिंगलाय परिपूरितायां सर्वोऽपसव्यः शकुनः प्रशस्तः ॥ संगे रणे कर्मणि च प्रवेशे शुक्रे ग्रहे नष्टविलोकने च । व्याधौ सरिद्दुर्गवनादिकेषु शस्तः प्रयाणाद्विपरीतभाव इति ॥ अन्यच्च । नद्युत्तारे भये युद्धप्रवेशे नष्टवीक्षणे । शकुना व्यस्तगाः शस्ता नृपालोके प्रयाणवदिति ॥ अथ प्रथमेऽपशकुने जाते सति किं कर्तव्यमाह–आद्येति । आद्ये प्रथमे दुःशकुने जाते सति निवृत्य निवर्तनं कृत्वा तत्र शुचौ देशे उपविश्य शुचिः प्रक्षालितपाणिपाद आचांतः कृताचमनोऽसवः प्राणास्तेषामायामः प्राणायामोऽष्टधाऽष्टवारं कृत्वा इयात् गच्छेत् । चेद्यदि पुनर्दुःशकुनः स्यात्तदा निवृत्य शुचिराचांतोऽष्टिवारं षोडशवारमसून्नियम्येयात् । अपरे तृतीये दुःशकुने जाते सति सुवर्णं दत्त्वेयात् । एतदावश्यकगमनविषयं । प्राणायामानधिकारी तावत्कालं स्थित्वा व्रजेत् । तथा च ज्योतिर्निबंधे । विरुद्धे शकुने पूर्वे प्राणायामाष्टकं चरेत् । द्वितीये द्विगुणान्कृत्वा तृतीये न व्रजेत्क्वचिदिति ॥ तथा च वसंतराजः । जाते विरुद्धे शकुनेऽध्वनीनो व्यावृत्य कृत्वा करपादशौचं । अचम्य च क्षीरतरोरधस्तात्तिष्ठन्प्रपश्येच्छकुनांतराणीति ॥ तथा चाऽऽर्ष्टिषेणिः । यदाऽऽपशकुनं पश्येद्विपरीतमुपस्थितं । सघृतं कांचनं दत्त्वा निर्विशंकः सुखं व्रजेदिति ॥ २१ ॥ ॥ इति मुहूर्तमार्तंडटीकायां यात्राप्रकरणं समाप्तम् ॥

टीकार्थ—आतां ज्या ज्या कृत्यामध्यें उलट शकुन असतात व ते शुभ शकुन होतात तें सांगतों–नदी उतरून जाणें, राजादिकांचें भय, ग्रामांत प्रवेश करणें, युद्ध, द्यूत ह्म० जुगार, हरवलेला पदार्थ शोधणें, आणि रोगाला उपचार करण्या करितां जाणें, अशा वेळीं झालेले अपशकुन हे शुभ जाणावेत. ह्याचा तात्पर्य अर्थ असा कीं, प्रयाण करितांनां जे अपशकुन ह्मणून सांगितले ते सर्व नदी उतरून जाणें इत्यादिकांमध्यें शुभ शकुन समजावेत. इडा ह्म० डावी नाकपुडी भरपूर वाहात असतां अशुभ शकुनाला शुभ शकून समजावेत. तेंच वसंत ग्रंथांत सांगितलें आहे कीं, इडा म्हणजे डावी नाकपुडी भरपूर वाहात असतां सर्व अपशकुन शुभ जाणावे तशीच उजवी नाकपुडी भरपूर वाहात असतां सर्व अपसव्य शकुन शुभ शकुन जाणावे. गमनास जे अपशकून आहेत ते सर्व युद्ध, ग्रहप्रवेश, शुक्रग्रह, हरवलेल्या वस्तूचें पाहाणें, रोग, नदी तरून जाणें, किल्ल्यावर चढून जाणें इत्यादि कार्यामध्यें शुभ समजावेत. दुसरें असें आहे कीं, नदी उतरून जाणें, भय पावणें, युद्ध प्रवेश, हरवलेल्याचा शोध करणें, इतक्या ठिकाणीं गमनास जे अपशकुन ते शुभ सम-

जावेत. आतां प्रथम अपशकुन झाला असतां काय करावें तें सांगतों—बाहेर निघाल्यावर अपशकुन झाला असतां आपल्या निघालेल्या जाग्यावर माघारें परत जाऊन तेथें बसून हात पाय धुवून आचमन करून आठ वेळां प्राणायाम करून घरांतून पुन: बाहेर निघावें. पुनः जर अपशकुन झाला तर आणखी आपल्या घरीं पुन: परत येऊन हातपाय धुवून आचमन करून सोळा वेळां प्राणयाम करावा. नंतर पुन: गमन करावें. पुनः तिसऱ्या वेळेस अपशकुन झाला असतां सुवर्णदान करून प्रयाण करावें. परंतु हा प्रकार आवश्यक गमनाविषयीं जाणावा. ज्याला प्राणायाम करण्याचा अधिकार नाहीं त्यानें तितका वेळ बसून नंतर जावें. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, विरुद्ध शकुन झाला असतां आठ प्राणायाम करावेत. दुसऱ्यावेळीं अपशकुन झाला असतां दुप्पट ह्मणजे सोळा प्राणायाम करावेत. तिसऱ्या वेळीं अपशकुन झाला असतां गमन करूं नये. तेंच वसंतराज सांगतो कीं, अपशकून झाला असतां वाटसरूनें ह्मणजे प्रयाण करणाऱ्यानें माघारें परतून हातपाय धुवून आचमन करून क्षीरतरूच्या ह्मणजे वडाचे वगैरे झाडाखालीं उभा राहून दुसरे शुभ शकुन येण्याची वाट पहावी. तेंच आर्ष्टिषेणि सांगत आहे कीं, ज्यावेळेस अपशकुन पाहाण्यांत येतील त्यावेळेस तूपासह सुवर्णदान करावें आणि मग निःशंकपणें गमन करावें ॥ २१ ॥ अशा रीतीनें मुहूर्तमार्तंड टीकेचें यात्राप्रकरण संपलें.

॥ यात्राप्रकरण समाप्त ॥

---

# ॥ अथ मिश्रप्रकरणम् ॥ ८ ॥

### राज्याभिषेक व देवस्थापन.

**जन्मांगर्क्षदशेशसद्ग्रहकुजैः सार्कैर्बलिष्ठैर्मृदु-।**
**क्षिप्रेंद्रध्रुवभैः स्थिरर्धिनृतनौ व्याराह्नि भूपस्थितिः ॥**
**स्वस्वर्क्षैः समृदुध्रुवर्क्षचरभैः क्षिप्रैः सुरस्थापनं।**
**प्रोचुर्माघयुगे च राधयुगले व्याराह्नि पूर्वाह्णके ॥ १ ॥**

श्लोकार्थ—जन्मलग्न, जन्मराशि, आणि अभिषेक समयीं असणारी दशा ह्यांचे स्वामी आणि शुभग्रह, मंगळ, रवि, हे बलवान् असतां; मृदु, क्षिप्र, ज्येष्ठा, ध्रुव ह्या नक्षत्रांवर; स्थिर असून जन्मराशीपासून व जन्मलग्नापासून ३।६।१०।११ ह्या उपचय राशींपैकीं मनुष्य लग्नावर; मंगळावांचून इतर वारीं राज्याभिषेक शुभ जाणावा. ज्या देवाचें स्थापन करावयाचें त्याच्या त्याच्या नक्षत्रावर आणि मृदु, ध्रुव, चर, क्षिप्र, ह्या नक्षत्रांवर; माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ ह्या महिन्यांत, मंगळ रहित वारीं आणि पूर्वाण्हांत सर्व देवांचें स्थापन करावें असें श्रेष्ठ ऋषि ह्मणतात ॥ १ ॥

**अथ मिश्रप्रकरणं विवक्षुरादौ राजाभिषेकं वृत्तार्धेनाऽऽह—जन्मेति । जन्मांगर्क्षदशेशादिभिर्बलिष्ठैः तथा मृद्वादिभिः स्थिरर्धिनृतनौ व्याराह्नि भूपस्थितिः शस्ता स्यादित्यध्याहारः । अंगं च ऋक्षं च अंगर्क्षे जन्मनि अंगर्क्षे जन्मांगर्क्षे जन्मलग्नजन्मराशी ते च दशा च जन्मांगर्क्षदशाः दशा वर्तमाना तस्या ईशाः ते च सद्ग्रहाश्च कुजश्च सूर्यश्च ते च तैः सार्कैः अर्कोरविस्तेन सह बलिष्ठैः स्थानादिबलसमृद्धैः सद्भिः । तथा मृदुक्षिप्रेंद्रध्रुवभैः स्पष्टं । स्थिरर्धिनृतनौ ऋद्धिं गता नृतनुः ऋद्धिनृतनुः । स्थिरा चासौ ऋद्धिनृतनुश्च सा तथा तस्यां जन्मराशिजन्मलग्नाभ्यां स्थिरोपचयनृलग्ने । व्याराह्नि भौमरहितदिने भूपस्थितिः राजप्रतिष्ठा शुभा स्यादित्यर्थः । लग्नबलं प्राग्वत् प्रायश्चंद्र त्यजेत्याद्यवलोकनीयं । अथ देवस्थापनमुत्तरार्धेनाऽऽह—स्वस्वर्क्षैरिति । स्वस्वर्क्षैः यस्य देवस्य प्रतिष्ठा क्रियते तस्य नक्षत्रैः समृदुध्रुवर्क्षचरभक्षिप्रैः शेषं स्पष्टं । माघयुगे माघफाल्गुनयोः तथा राधयुगे राधो वैशाखस्तस्माद्युगं युगलं तस्मिन् वैशाखज्येष्ठयोरित्यर्थः । तथा व्याराह्नि विगत आरो यस्मात् एवं विधमहस्तस्मिन् भौमरहितदिन इत्यर्थः । पूर्वाह्णके अत्र दिनस्य द्वौ भागौ पूर्वभागः पूर्वाह्णः तस्मिन् आचार्याः सुरस्थापनं प्रोचुः शेषं स्पष्टं सर्वामरस्थापनमिति शेषः । लग्नबलं प्राग्वत् ॥ १ ॥**

टीकार्थ—आतां अगोदर मिश्र प्रकरण सांगण्याच्या इच्छेनें राज्याभिषेक अर्ध्या वृत्तानें सांगतों–जन्मांग ह्म० जन्मलग्न, जन्मऋक्ष ह्म० जन्मराशि, दशा ह्मणजे अभिषेक करावयाचे वेळीं असलेली दशा ह्या तिघांचे स्वामी बलिष्ठ असावेत आणि शुभ ग्रह हेही बलवान् असावेत तसेच रवि आणि मंगळ हेही स्थान इत्यादिकांनीं बलवान् असावेत. त्याप्रमाणें मृदु नक्षत्रें, क्षिप्रनक्षत्रें, इंद्र ह्म० ज्येष्ठा नक्षत्र, ध्रुव नक्षत्रें ह्या नक्षत्रांवर आणि जन्म लग्नापासून उपचय ह्म० ३–६–१०–११ ह्या राशींपैकीं मनुष्य लग्नावर आणि मंगळवाराशिवाय दुसऱ्यावारीं राज्याभिषेक करणें प्रशस्त आहे. लग्नबल जें पाहावयाचें तें पूर्वींप्रमाणेंच पाहावें. "प्रायश्चंद्रं त्यजां०" ह्या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें त्याज्याचा त्याग करावा. आतां देवस्थापन उत्तरार्धानें सांगतों–ज्या देवाची प्रतिष्ठा करावयाची त्या देवाच्या नावा वरून जें नक्षत्र आलें असेल त्या नक्षत्रांवर आणि मृदु, ध्रुव, चर, क्षिप्र ह्या नक्षत्रांवर आणि माघाचें युग्म ह्मणजे माघ, फाल्गुन ह्या दोन महिन्यामध्यें राध युग्म ह्म० वैशाख आणि ज्येष्ठ ह्या चार महिन्यामध्यें आर ह्मणजे मंगळ त्याचा जो वार ह्मणजे मंगळवार तेवढा वर्ज्य करून दुसऱ्यावारीं पूर्वाण्हकालीं. येथें दिवसाचे दोन भाग करावयाचे पैकीं पहिला भाग तो पूर्वाण्ह समजावा ह्या पूर्वाण्हावर पूर्वींच्या आचार्यांनीं देवस्थापन करावें असें सांगितलें आहे, ह्या वेळीं सर्व देवांचें स्थापन करावें, लग्नाचें बल पूर्वीं प्रमाणेंच पाहावें ॥ १ ॥

### वस्त्रधारण, क्षालन वगैरे.

धार्यं वस्वदितीनपंचगुरुभाश्व्यंत्यध्रुवैर्ज्ञत्रये ।
ज्ञोने क्षाल्यमिहाखुभक्षितमसन्मध्यत्रिभागेऽवरम् ॥
स्त्री रक्तांबरभूषणेऽत्र बिभृयाद्यादित्यपुष्यध्रुवे ।
श्वेतेऽब्जोऽरुणरुक्मयोः कुजरवी कृष्णे शनिः शस्यते ॥ २ ॥

श्लोकार्थ—धनिष्ठा, पुनर्वसु, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, पुष्य, अश्विनी, रेवती, ध्रुव संज्ञक या नक्षत्रांवर; आणि बुध, गुरु, शुक्र ह्या वारीं नवें वस्त्र धारण करावें. बुधवार सोडून याच मुहूर्तावर वस्त्र धुवावें. वस्त्राचे तीन भाग मानून मधल्या भागांत उंदरानें, गुरानें खाल्लें, जळलें किंवा डाग पडला तर अशुभ होय. पुनर्वसु, पुष्य, ध्रुव ह्या नक्षत्रां वांचून वस्त्र धारणाच्या मुहूर्तावर स्त्रीनें तांबडें वस्त्र व सुवर्णादि–कांचे अलंकार धारण करावे. शुभ्र रंगाचीं वस्त्रें व रुप्याचे मोत्यांचे वगैरे शुभ्र, अलंकार धारण करण्यास सोमवार शुभ, तांबडीं पिंवळीं वस्त्रें व अलंकार यांना मंगळवार व रविवार शुभ आणि काळीं निळीं वस्त्रें अलंकार यांना शनिवार शुभ होय ॥ २ ॥

अथ वस्त्रपरिधानं तस्य क्षालनमुंदुरादिभक्षितफलं चाऽऽह–धार्यमिति । वसुर्धनिष्ठा अदितिः पुनर्वसुः इनपंचकं हस्तपंचकं गुरुभं पुष्यः अश्विः अश्विनी अंत्यं रेवती ध्रुवाणि पूर्वोक्तानि एतैर्न. क्षत्रैः ज्ञत्रये बुधगुरुशुक्रवारे अंबरं वस्त्रं धार्यं नान्यत्र यत उक्तं । रवौ जीर्णं विधौ स्तोकं जलार्द्रं दुःखदं कुजे । बुधे धनं गुरौ ज्ञानं शुक्रे सौख्यं शनौ मलामिति ॥ लग्नबलं प्राग्वत् । अथ क्षालनमाह- इहास्मिन् वस्त्रधारणोक्तनक्षत्रादौ क्षाल्यं प्रक्षालनीयं कथं भूते ज्ञोने बुधवाररहिते। उक्तं च। वस्त्रहेमा- द्यलंकारधारणोक्तैश्च भादिभिः । तत्संहतिश्च निर्माणं विदध्यात्क्षालनादिकमिति ॥ यद्यपि यस्यांगं यददोऽगिनो गदितभे कुर्यादिति पूर्वमेवांगभूतं कर्मोक्तं तथाऽपि क्षालने बुधवर्जनार्थं ज्ञोने इह क्षाल्यमित्युक्तं बुधनिषेधश्रवणात् । उक्तं च। शनौ सोमसुते श्राद्धे षष्ठ्यामावास्ययोस्तथा। वस्त्राणां क्षालनं चैव दहत्यासत मं कुलमिति ॥ अथोंदुरादिभक्षितफलमाह–आखुभक्षितमिति । आखुः उंदुरः तेन अंबरं मध्यत्रिभागे भक्षितं असत् दुष्फलं स्यात् । एतदुक्तं भवति। वस्त्रं त्रिगुणं कृत्वा यदि भक्षितभागो मध्यत्रिभागे पतति सदात दुष्टमित्यर्थः । आखुरित्युपलक्षणं तेनाग्निदग्धं गवादि- भक्षितं मष्यादिलिप्तं ज्ञेयं । तथा चोक्तं वृत्तशते । दग्धं वा स्फुटितं च गोमयमषीपंकैर्विलिप्तं तदा दृष्टं मूषकपूर्वकैरशुभदं मध्यत्रिभागेऽशुकमिति ॥ अथ स्त्रिया रक्तवस्त्रधारणं भूषणधारणमनुक्तग्रहा णां कुत्र कुत्र प्राशस्त्यं तदुत्तरार्धेनाऽऽह–स्त्रीति । स्त्री अत्रोक्ते वस्त्रधारणभादावंबरं भूषणं सुवर्णादि भूषणं बिभृयात् धारयेत् । कथंभूते व्यादित्यपुष्यध्रुवे विगतानि आदित्यपुष्यध्रुवाणि यस्मात्तस्था- तस्मिन् यतोऽत्र स्त्रिया रक्तवस्त्रभूषणधारणे दोषो दृश्यते। तथा चोक्तं। पुष्यादित्यध्रुवैर्धिष्ण्यैः स्वर्णं

रक्तांबरादिकं । नवं न भूषणं धार्यं नार्या दयितुरायुष इति ॥ लग्नबलं प्राग्वत् । अथ चंद्रादीनां प्राशस्त्यमाह–श्वेते वस्तुनि रौप्यमुक्ताफलादिकेऽब्जश्चंद्रो हितः सोमवारे श्वेतं वस्तु धार्यमित्यर्थः । कुजरवी अरुणरुक्मयोः शस्येते । शनिः कृष्णे वस्तुनि नीलवस्त्रादिके शस्यते शनौ तद्धार्यमितिभावः ज्ञत्रयेतु सर्वं धार्यमिति पुरैवोक्तम् ॥ २ ॥

**टीकार्थ**—आतां वस्त्र धारण आणि तें वस्त्र, उंदीर इत्यादिकांनीं खाल्लें असतां त्याचें फळ सांगतों–वसु ह्म० धनिष्ठा, अदिति ह्म० पुनर्वसु, इन ह्म० सूर्य त्याचें नक्षत्र ह्म० हस्त हीं पांच नक्षत्रें ह्म० हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा. गुरु ह्म० पुष्य, अश्वि ह्म० अश्विनी, अंत्य ह्म० रेवती हीं नक्षत्रें शिवाय ध्रुव संज्ञक नक्षत्रें सांगितलीं आहेत त्या नक्षत्रांवर ज्ञ ह्म० बुध हे तीन ह्म० बुधवार, गुरुवार, शुक्रवार, ह्या तीन वारांवर नवीन वस्त्र धारण करावें दुसऱ्या नक्षत्रीं व वारीं धारण करूं नये. कारण असें सांगितलें आहे कीं, रविवारीं वस्त्र जीर्ण होतें, सोमवारीं अल्प होतें, मंगळवारीं पाण्यांत बुचकळलें असतां दुःख देणारें होतें, बुधवारीं धन प्राप्ति होते. गुरुवारीं ज्ञान प्राप्त होतें. शुक्रवारीं सौख्य मिळतें. शनिवारीं मळकट होतें. लग्नबळ पूर्वीं प्रमाणेंच समजावें. आतां वस्त्राचें क्षालन सांगतों–वस्त्र धारणाकरितां सांगितलेल्या नक्षत्रांवर वस्त्राचें क्षालन करावें. मात्र ह्या क्षालनाला बुधवार वर्ज्य आहे. असें सांगितलें आहे कीं. वस्त्र, सुवर्ण इत्यादि धारण करण्यास जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत. त्याच नक्षत्रांवर त्याची संहति, निर्माण, क्षालन इत्यादिक करावें. जरी पूर्वीं सांगितलें आहे कीं, ज्याचें जें अंग असतें तें त्या अंगीच्या नक्षत्रावर करावें, तें करणें प्रशस्त आहे तथापि क्षालन करण्याकारितां बुधवार हा वर्ज्य आहे ह्मणून श्लोकांत ' ज्ञोने ' ह्मणजे बुधवारा शिवाय, असें ह्मटलें आहे. कारण बुधवाराचा निषेध सांगितला आहे, शनिवारीं, बुधवारीं, श्राद्धदिवशीं, षष्ठीस, अमावास्येस वस्त्राचें क्षालन केलें असतां सात पिढ्यांपर्यंत कुळाला जाळीत असतें. आतां उंदीर इत्यादिकांनीं खाल्लें असतां त्याचें फळ सांगतों–वस्त्राचे तीन भाग करावेत. पैकीं मध्यभाग उंदरांनीं खाल्ला असतां त्याचें फळ दुष्ट आहे. उंदीर शब्दानें उंदीरच नुसता न घेतां अग्नि इत्यादिकांनीं जळलें असतांही दुष्ट समजावें. तेंच वृत्तशत ग्रंथांत सांगितलें आहे कीं, वस्त्र जळलें, फाटलें, शेणानें भरलें, शाईनें भरलें, चिखलानें भरलें उंदीरादिकांनीं खाल्लें तर अशुभ समजावें. मात्र वस्त्राचे तीन भाग करून त्याच्या मधल्याभागीं वर सांगितलेले दोष घडले असतां अशुभ समजावें. आतां स्त्रियांनीं लाल वस्त्र धारण करणें, दागिने धारण करणें, पूर्वी न सांगितलेल्या ग्रहांचा कोठें कोठें प्रशस्तपणा आहे तो श्लोकाच्या उत्तरार्धानें सांगतों–वस्त्र धारण करण्याकारितां पूर्वीं सांगितलेल्या नक्षत्र इत्यादिकांवरच स्त्रीनें वस्त्र धारण करावें आणि सोनें इत्यादिकांनीं तयार केलेले दागिनेही धारण करावेत. मात्र आदित्य ह्म० पुनर्वसु, पुष्य आणि ध्रुव नक्षत्रें मात्र वर्ज्य आहेत. कारण त्या नक्षत्रांवर स्त्रियांना दोष सांगितला आहे. तेंच सांगितलें आहे कीं, स्त्रियांनीं सुवर्णाचे अलंकार. लाल वस्त्र इत्यादिकांचें धारण पतीच्या आयुष्याचे वृद्धीस्तव पुष्य, पुनर्वसु आणि ध्रुव संज्ञक नक्षत्रें ह्यांवर करूं नये. लग्नाचें बलाबल पूर्वींप्रमाणेंच समजावें. आतां चंद्र इत्यादि ग्रहांचा प्रशस्तपणा सांगतों–पांढऱ्या रंगाच्या वस्तुविषयीं ह्म० रुप्याचे व मोत्याचे दागिन्याविषयीं सोम ह्म० चंद्र हितकारक आहे ह्मणून सोमवारीं ते धारण करावेत. तांबडीं, पिंवळीं वस्त्रें अलंकार हे धारण करण्याकारितां रवि आणि मंगळ हे ग्रह हितकारक आहेत ह्यास्तव त्या दोनवारीं ह्म० रविवारीं व मंगळवारीं धारण करावेत. काळीं निळीं वस्त्रें व अलंकार धारण करण्याविषयीं शनिग्रह हितकारक आहे ह्मणून ते शनिवारीं धारण करावेत. बुधादि तीन वारांवर ह्मणजे बुधवार व गुरुवार, आणि शुक्रवार ह्या तीन वारांवर सर्व धारण करावें ॥ २ ॥

### पुरुषाचें अलंकार धारण व क्रयविक्रय.

वस्त्रोक्तैर्व्यनिलद्वयाश्विभिरगेऽगे नुर्विभूषा हिता ।
विप्राज्ञोत्सवलब्धिषूदितमनुक्तेऽपीष्टकृद्धारणम् ॥
मैत्रार्कानिलमूलदस्रहरिभेंद्वीज्याजपादोत्तरे ।
पण्यानां क्रयविक्रयौ घटपरध्यंगे स्वशुद्धौ तनु ॥ ३ ॥

श्लोकार्थ—स्वाती, विशाखा, अश्विनी हीं ३ नक्षत्रें सोडून मागल्या श्लोकांतील वस्त्रधारणाच्या नक्षत्रादिकांवर आणि स्थिरलग्नावर पुरुषानें अलंकार धारण करावे. ब्राह्मणाची आज्ञा असतां, विवाहादि उत्सवाच्या वेळीं अथवा मिळालें तर त्याच वेळीं मुहूर्त नसतांही वस्त्रालंकार धारण करणें शुभ होय. अनुराधा, हस्त, स्वाती, मूळ, अश्विनी, श्रवण, मृग, पुष्य, पूर्वाभा०, उत्तराफ०, उत्तराषाढा, उत्तराभा० ह्या १२

नक्षत्रांवर, कुंभाशिवाय जन्मराशि व जन्मलग्न ह्यां पासून ३।६।१०।११ ह्यांतल्या उपचय लग्नावर आणि द्वितीयस्थानीं खलग्रह नसतां विकण्याचे पदार्थ आपण विकत घ्यावे व दुसऱ्याला विकावे ॥ ३ ॥

अथ नराणां भूषणधारणं वृत्तचरणेनाऽऽह—वस्त्रोक्तैरिति। वस्त्रोक्तैर्भादिभिर्वस्वदितीत्यत्रोक्ते अंगे स्थिरलग्ने नुः नरस्य अलंकृतिरलंकरणं हितं स्यात्। किंलक्षणैर्वस्त्रोक्तैः व्यनिलद्वयाश्विभिः अनिलद्वयं स्वातीयुगं स्वातीविशाखेति अश्विनी प्रसिद्धा विगते अनिलद्वयाश्विन्यौ येभ्यस्तानि तथा तैः स्वातीविशाखाश्विनीरहितैरित्यर्थः। लग्नबलं प्राग्वत्। अथ द्वितीयचरणेन विशेषमाह—विप्राज्ञेति। विप्राज्ञा ब्राह्मणाज्ञा उत्सवो विवाहादिकः लब्धिर्लाभ आसु सत्सु अनुक्तेऽपि भादौ धारणं वस्त्रादिधारणमिष्टकृत्स्यात्। तथा चोक्तं व्यासेन। लब्धं राजप्रसादेन विप्रादेशात्करग्रहे। प्रीत्या दत्तोत्सवे वस्त्रं धार्यं निंद्येऽपि भादिक इति ॥ अथोत्तरार्धेन पण्यानां क्रयविक्रयावाह—मैत्रेति। मैत्रमनुराधा शेषं सुगमं। घटपरर्क्ष्यंगे घटः कुंभः तस्मात्परमन्यत्। तच्च तत् ऋक्ष्यंगं च ऋक्ष्यंगं उपचयलग्नं तस्मिन् कुंभव्यतिरिक्तोपचयलग्ने पण्यानां पूगीफलखर्जूरादीनां क्रयविक्रयौ तनु विस्तारय कुर्वित्यर्थः। कस्यां सत्यां स्वशुद्धौ सत्यां स्वं धनभावः तस्य शुद्धिः पापराहित्यं तस्यां सत्यां। शेषं प्राग्वत्। तथा चोक्तं। दशमैकादशे लग्ने वित्तकेंद्रत्रिकोणगैः। शुभैः पण्यस्य कर्मोक्तं वर्जयित्वा घटोदयमिति ॥ ३ ॥

**टीकार्थ**—आतां पुरुषांनीं अलंकार धारण करावयाचे तें एका वृत्ताच्या चरणानें सांगतों—वस्त्र धारण करण्याकरितां जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत त्यांतून स्वाती, विशाखा, अश्विनी नक्षत्र वर्ज्य करून बाकीच्या वस्त्र धारणाच्या नक्षत्रांवर पुरुषांनीं अलंकार धारण करावे. आतां दुसऱ्या चरणानें विशेष सांगतों—ब्राह्मणाची आज्ञा झाल्यावर उत्सव असल्यास, विवाह इत्यादिक मंगल कार्य असल्यास, मोठा लाभ असल्यास सांगितलेलें नक्षत्र नसेल तरी सुद्धां वस्त्रादि धारण करावेत. तेंच व्यासानें सांगितलें आहे कीं, राजानें प्रसन्न होऊन दिलें असतां, ब्राह्मणानें आज्ञा केली असतां, लग्नादि मंगल कार्य प्राप्त झालें असतां, प्रीतीनें उत्सवाचे वेळीं वस्त्र धारण करावें, त्यावेळीं निंद्य नक्षत्र असेल तरी तें पाहूं नये. आतां उत्तरार्धानें पदार्थांचा क्रय आणि विक्रय सांगतों—मैत्र ह्म० अनुराधा, अर्क ह्म० हस्त, अनिल० ह्म० स्वाती, मूळ, दस्र ह्म० अश्विनी, हरि ह्म० श्रवण, मृग, इज्य म्ह० पुष्य, पूर्वाभा०, उत्तरा फ०, उत्तराषाढा, उत्तराभा०, ह्या १२ नक्षत्रांवर कुंभराशीशिवाय जन्म राशि व जन्म लग्न ह्या दोहोंपासून ३–६–१०–११ ह्यांतल्या उपचय लग्नावर आणि द्वितीय लग्नीं ग्रह नसेल तर पण्य ह्म० विकत घेण्याचे पदार्थ घ्यावेत व विकण्याचे पदार्थ विकावेत ॥ ३ ॥

## धनिष्ठापंचकांत वर्ज्य, सेवा व संन्यास.

प्रेतज्वालनशय्यकावितनने स्तंभोच्छ्रयं याम्यदिक्।
यानं काष्ठतृणोच्चयं परिहरेत्कुंभद्वयस्थे विधौ ॥
सेवेष्टा ध्रुववारुणांत्यवसुभैः खाये रवौ वा कुजे।
संन्यासः स्थिरभे खलैर्गतबलैः षष्ठांत्यगे भार्गवे ॥ ४ ॥

श्लोकार्थ—प्रेतदहन, पलंग, माचा वगैरे नवीन करणें किंवा विणणें, घराचे खांब व धारण उभे करणें, दक्षिणदिशेला प्रयाण करणें आणि लांकडें व गवत यांचा संग्रह, हीं कर्में कुंभ व मीन ह्या दोन राशींला चंद्र असतां करूं नये. ध्रुव, शततारका, रेवती, धनिष्ठा ह्या नक्षत्रांवर दशमस्थानीं किंवा एकादशस्थानीं रवि अथवा मंगळ असतां सेवेला आरंभ करावा. स्थिर नक्षत्रांवर व स्थिरलग्नावर खलग्रह निर्बल असतां आणि षष्ठ किंवा द्वादशस्थानीं शुक्र असतां संन्यास घेणें शुभ जाणावें ॥ ४ ॥

अथ वृत्तार्धेन धनिष्ठापंचके वर्ज्यमाह—प्रेतेति। कुंभद्वयस्थे विधौ सति कुंभमीनगे चंद्रे सति परिहरेत् सर्वथा नाऽऽचरेत् स्पष्टं अथोत्तरार्धे चरणेन सेवामाह—सेवेति। ध्रुवादिभिर्नक्षत्रैः सेवा इष्टा स्यात् सुगमं। कस्मिन् सति खाये रवौ सति वा इत्यथवा कुजे सती खं दशमं आय एकादशं अनयोरन्यतमे रविभौमयोरन्यतमे सतीत्यर्थः यस्मिंल्लग्ने सेवा क्रियते तस्माल्लग्नाद्दशमे एकादशे वा रवौ भौमे वा सति सेवा इष्टा हितकरा स्यादित्यर्थः। शेषं प्राग्वत्। अथ चतुर्थचरणेन संन्यासमाह—संन्यास इति। स्थिरभे

स्थिरनक्षत्रे स्थिरलग्ने च संन्यास इष्टः स्यात् कैः खलैर्गतबलैः पापग्रहैर्हीनबलैरित्यर्थः। सप्तम्यर्थे तृतीया कस्मिन् सति भार्गवे शुक्रे षष्ठांत्यगे ६।१२ सति। शेषं लग्नबलं प्राग्वत्। उक्तं च। त्रिषडेकादशे सौरिर्व्यये षष्ठे च भार्गवः। सबले धर्मपे जीवे केंद्रे दीक्षाविरक्तिकृदिति ॥ ४ ॥

**टीकार्थ**—आतां अर्ध्या वृत्तानें धनिष्ठा पंचक नक्षत्रांत जें वर्ज्य तें सांगतों—दोन कुंभ ह्म० कुंभ व मीन ह्या राशींवर चंद्र असतां प्रेतदहन, पलंग माचा वगैरे नवीन तयार करणें किंवा विणणें, घराचे स्तंभ ह्म० खांब आणि धारण उभे करणें,दक्षिणदिशेला प्रयाण करणें,व लांकडें आणि गवत यांचा संग्रह करूं नये.आतां उत्तरार्धानें सेवा सांगतों—ध्रुवनक्षत्रें, शततारका, रेवती व धनिष्ठा ह्या नक्षत्रांवर ख ह्म० दशमस्थानीं आणि आय ह्म० एकादशस्थानीं रवि आणि कुज ह्म० मंगळ असतां सेवेला आरंभ करावा. बाकीचें लग्नबल पूर्वीप्रमाणेंच समजावें. आतां चवथ्या चरणानें संन्यास सांगतों—स्थिरनक्षत्रावर स्थिर लग्नावर आणि पापग्रहांचें बळ नसेल तर ह्मणजे पापग्रह निर्बळ असतां आणि शुक्र ग्रह ६–१२ ह्यास्थानीं असेल तर संन्यास घ्यावा. असें सांगितलें आहे कीं, ३–६–११ ह्यास्थानीं शनि असेल तर १२–६ ह्यास्थानीं शुक्र असेल तर वर्णाधिपति ह्म० नवमाधिपति प्रबल असेल तर आणि गुरु हा केंद्रीं असेल तर संन्यास घ्यावा ॥ ४ ॥

### कृषिकर्म व नांगरण्याचा मुहूर्त.

उद्वाहर्क्षचरद्विपेंद्रलघुभत्वाष्ट्रैः शुभा स्यात्कृषि- ।
र्व्यार्किज्ञारखगाह्नियुग्मझषगोकन्याविलग्ने तिथौ ॥
व्यंकौजे सदिशि प्रणम्य खगभूमुख्यान् सिताच्छादनः ।
स्वर्णोद्घृष्टहलं समुष्कसुवृषैः सौमीं पटुस्त्रिर्नयेत् ॥ ५ ॥

श्लोकार्थ—विवाहाचीं ११ नक्षत्रें, व चर, विशाखा, ज्येष्ठा, लघु, चित्रा ह्या नक्षत्रांवर; शनि, बुध, मंगळ, ह्यांवांचून अन्य ग्रहांच्या वारीं; मिथुन, मीन, वृषभ, कन्या ह्या लग्नांवर; दशमीसहित व नवमी रहित विषम तिथींवर ह्म० १।३।५।७।१०।११।१३।१५ ह्या तिथींवर; नवग्रह, भूमि, अग्नि इत्यादि देवतांला नमस्कार करून मस्तकाला शुभ्र वस्त्र बांधून, नांगरण्याविषयीं कुशल पुरुषानें, फाळाचें अग्र सुवर्णानें घांसून वृषण असणारे ( आंडील ) बळवान् असे बैल नांगराला जुंपून तो आरंभीं तीन वेळ उत्तरेकडे न्यावा ॥ ५ ॥

अथ वृत्तद्वयेन कृषिकर्माऽऽह–उद्वाहेति। उद्वाहर्क्षाणि पूर्वोक्तानि मूलांत्यार्केत्यादीनि एकादशसंख्यानि चराणि प्रसिद्धानि द्विपं विशाखा इंद्रो ज्येष्ठा लघुभानि प्रसिद्धानि त्वाष्ट्रं चित्रा तैः व्यार्किज्ञारखगाह्नि आर्किः शनिः ज्ञो बुध आरो भौमो विगता आर्किज्ञारा येभ्यस्ते तथा ते च ते खगाश्च तेषामह्नः दिनं तस्मिन् शनिबुधभौमरहितवार इत्यर्थः। युग्मझषगोकन्याविलग्ने युग्मं मिथुनं झषो मीनः गौर्वृषः कन्या प्रसिद्धा एषामन्यतमविलग्ने तिथौ व्यंकौजे विगतः अंको नवमी यस्मात् असौ व्यंकः सचासौ ओजश्च ओजो विषमस्तस्मिन् नवमीव्यतिरिक्तविषमतिथावित्यर्थः।किंलक्षणे व्यंकौजे तिथौ सदिशि दिग्दशमी तया सह वर्तमाने१।३।५।७।११।१३।१५कृषिः शुभा स्यात्। तथा चोक्तं चंद्रे शुभे शुभतिथौ शुभवारयोगे वारे गुरौ शशिजशुक्रगभस्तिवारे । लग्ने वृषे मिथुनके झष कन्यकायां शस्तं कृषिप्रकरणं प्रवपेन्निधान इति। अन्यच्च। दशम्येकादशी चैव तृतीया च त्रयोदशी । सप्तमी पंचमी चैव प्रतिपच्च सुखावहा॥हंत्यष्टमी बलीवर्दान्नवमी सस्यघातिनी। चतुर्थी कीटजननी पतिं हंति चतुर्दशी ॥ रवौ बृहस्पतौ चंद्रे शुक्रे कुर्याद्विशेषतः। बुधार्किभूमिपुत्राश्च न भवंति फलप्रदा इति॥अथ विधिमाह–सिताच्छादनः श्वेतवस्त्रधरः पटुः कुशलः कर्ता खगभूमुख्यान् देवान्प्रणम्य कृष्यारंभः पूर्वोक्तः सीतायज्ञः क्रियते तत्र पूजितान् खगभूमुख्यान् ग्रहभूम्यग्न्यादीन् प्रदक्षिणापूर्वकं प्रणम्य मनोवाकायकर्मभिर्नमस्कृत्य स्वर्णोद्घृष्टहलं सुवर्णघर्षिताग्रं हलं समुष्कसुवृषैः मुष्का वृषणास्तैः सहवर्तमानाः समुष्काः शोभना वृषाः सुवृषा गुणावयवपूर्णा नीरोगाः समुष्काश्च ते सुवृषाश्च तथा तैः कृत्वा सौमीं उत्तरां दिशं प्रति त्रिवारं नयेत् हलेन पद्धतीः कुर्यादितिभावः। उत्तरादिशं प्रति त्रिवारनयनेन पंच रेखा उत्पद्यंते। तद्यथा। प्रथमगमनेनैका आवर्तने द्वितीया पुनरुत्तरां प्रति द्वितीयगमनेन तृतीया पुनरावर्त्तने चतुर्थी पुनरुत्तरां प्रति तृतीयगमनेन पंचमी रेखा उत्पद्यते। अधिका न

कार्या इति भावः। सौमीं पटुत्रिनेयेदित्य त्र पटुपदग्रहणमखंडऋजुरेखाकरणार्थं। तथा चोक्तं। शस्तासु चंद्रतारासु शुचिः शुक्लेन वाससा। स्नात्वा गंधैश्च पुष्पैश्च पूजयित्वा विशेषतः। पृथिवीं ग्रहसंयुक्तां पूजयित्वा प्रजापतिं। अग्निं प्रदक्षिणीकृत्य दातव्या चैव दक्षिणा॥ शुक्लौ वृषौ नियोक्तव्यौ नवीनैश्च युतेन वा। विबलं छिन्नलांगूलं कपिलं वृषभं त्यजेत्॥ हलप्रवाहनं कार्यं नीरुग्भिर्वृषकर्षकैः। हलादिभिर्दृढैः क्षेमं कुदृढैरशुभं भवेत्॥ वृषभा यदि युध्येयुस्तस्य विघ्नं सदा भवेत्। हेमघृष्टहलाग्रेण छिन्नरेखां न कारयेत्॥ उत्तराभिमुखो भूत्वा क्षीरेणार्घ्यं प्रदापयेत्। तस्य सर्वप्रकारेण निर्विघ्नं कारयेत्तदा॥ एका जयकरी रेखा तृतीया चार्थवृद्धिदा। पंचमी च भवेद्रेखा बहुसस्यफलप्रदा॥ अत ऊर्ध्वं न कर्तव्या महादोषस्ततो भवेत्। स्मर्तव्या वसवः शुक्रः पृथनामा सुचंद्रमाः। पराशरो हली चैव सर्वविघ्नोपशांतय इति॥ अत्र दुर्निमित्तानि तत्रैवोक्तानि। हले प्रवाह्यमाणे तु कूर्म उत्पद्यते यदि। गृहिणो मृतये तस्य ततोऽग्नेश्च भयं भवेत्॥ ईषाभंगो यदा कष्टः संशयो जीवितस्य च। सुतनाशो युगे भग्ने समाने म्रियते शिशुः॥ योक्त्रच्छेदे तु व्यासंगः सस्यहानिश्च जायते। हले प्रवाह्यमाणे तु गौरेकः प्रपतेद्यदि॥ प्रपतेद्युक्तमात्रस्तु बंधनं च प्रयच्छति। ज्वरातिसाररोगेण कृषिभंगं विनिर्दिशेत्॥ प्रवहेद्युक्तमात्रस्तु ततो गौः खनते यदि। हलेन युक्तमात्रस्तु तदा सस्यं चतुर्गुणमिति॥ ५॥

**टीकार्थ**—आतां दोन वृत्तांनीं कृषिकर्म सांगतों–विवाहास सांगितलेल्या ११ नक्षत्रांवर ह्मणजे मूळ, रेवती इत्यादिकांवर, चर नक्षत्रांवर, द्विप ह्म० विशाखा, इंद्र ह्म० ज्येष्ठा, लघुनक्षत्र, त्वाष्ट्र ह्म०चित्रा, ह्या नक्षत्रांवर आर्कि ह्म० शनि, ज्ञ ह्म० बुध, आर ह्म० मंगळ ह्या तीन वारांशिवाय बाकीच्या ह्म० गुरु, शुक्र रवि, सोम ह्या चारवारीं युग्म ह्म० मिथुन, झष ह्म० मीन, गौ ह्म० वृष, कन्या, ह्यांपैकीं एखाद्या लग्नावर अंक ह्म०९ ह्म० नवमी आणि दिश् ह्म० १०ह्म० दशमी ह्या दोन तिथी वर्ज्य करून बाकी उरलेल्या तिथीं मध्यें विषम तिथींवर ह्म० १–३–५–७–११–१३–१५ ह्या तिथींवर, नवग्रह, भूमि, अग्नि ह्यांना नमस्कार करून मस्तकाला शुभ्र वस्त्र गुंडाळून नांगरण्याविषयीं कुशल असणाऱ्या पुरुषानें नांगराचे फाळाचें अग्र सोन्यानें घांसून आंडील असे बैल नांगराला जुंपून तो नांगर आरंभीं तीनवेळ उत्तरेकडे न्यावा. तिथी इत्यादिकांचा विचार असा सांगितला आहे कीं, चंद्र शुभ असतां शुभ तिथीवर शुभ वारावर ह्म० गुरुवार, बुधवार,शुक्रवार आणि रविवार असतां त्यांवर वृष,मिथुन,मीन आणि कन्या ह्या लग्नांवर नांगरण्याचा आरंभ करणें प्रशस्त आहे. दुसरें असें कीं, दशमी,एकादशी,तृतीया, त्रयोदशी,सप्तमी, पंचमी, प्रतिपदा ह्या तिथी नांगरण्यास सुखकारक आहेत. अष्टमी बैलाचा नाश करणारी,नवमी धान्याचा नाश करणारी, चतुर्थी किडे उत्पन्न करणारी, चतुर्दशी मालकाचा नाश करणारी आहे.रविवार, सोमवार, शुक्रवार, ह्यावारीं विशेषें करून आरंभ करावा. बुधवार, शनिवार, मंगळवार हे वर्ज्य आहेत. ह्यावारीं नांगरलें असतां फल होत नाहीं. आतां नांगरण्याचा विधि सांगतों–शुभ्रवस्त्र धारण करावें, नांगरण्याच्या कामांत कुशल असणाऱ्यानें नवग्रह, भूमि, अग्नि ह्यांनां मनानें, वाणीनें व कायानें नमस्कार करून सोन्यानें नांगराचा अग्रभाग घांसावा आणि आंड असलेले असे मोठमोठे बैल नांगरास जोडावे ते बैल पुष्ट असून बलवान् असावेत. ते रोगी नसावेत. अशा बैलांसह वर्तमान नांगरण्यास आरंभ करावा तो उत्तरदिशेकडे तीन वेळां जावें, ह्मणजे नागरानें पांच रेखा होतात त्या अशा प्रथमगमनानें एक रेखा उत्पन्न होते, तसेंच पुनः माघारी आल्यानें दुसरी रेखा उत्पन्न होते, दुसऱ्या खेपेस पुनः जातानां एक रेखा, माघारी येतानां एक रेखा, मिळून चार रेखा आणि तिसऱ्या खेपेस उत्तरेकडे जातानां एक रेखा सर्व मिळून पांच रेखा होतात. ह्या पांच रेखा शिवाय अधिक रेखा करूं नये. नांगरण्यामध्यें कुशल असणाऱ्यानें असें ह्मटल्यामुळें अखंड एकसारखी सरळ रेखा करावी, असें सांगितल्या सारखें होतें. तेंच सांगितलें आहे कीं, चंद्र आणि ग्रह हे अनुकूल असतां स्नानादिक करून शुभ्रवस्त्र धारण करून गंधफुलांनी पूजा करावी. आणि विशेषें करून नवग्रहसहित पृथ्वीची पूजा आणि प्रजापतीची पूजा करून अग्निला प्रदक्षिणा करून ब्राह्मणांनां दक्षिणा द्यावी.पांढरे आणि पुष्ट असे बैल नांगराला जोडावेत. बैल अशक्त असून शेंपूट तुटलेला आणि काळे असूं नयेत. कारण कीं, नांगर ओढण्याचें काम निरोगी आणि बळकट अशा पुष्ट बैलाकडूनच होणें शक्य आहे. जर नांगरतांना बैल परस्पर लढतील तर त्याला नेहमी विघ्न होईल. सोन्यानें नांगराचें अग्र घांसून ज्या रेखा करावयाच्या त्या रेखा तुटक्या नसाव्यात. उत्तरेस तोंड करून दुधानें अर्घ्य द्यावा असें केल्यानें त्याला कोणत्या प्रकारचें विघ्न येणार नाहीं. एक रेखा जयकारक आहे, तिसरी अर्थ वृद्धि करणारी आहे, पांचवी रेखा पुष्कळ धान्य देणारी आहे, पांचांहून अधिक रेखा करूं नयेत. कारण त्यापासून फार दोष आहे. नेहमी वसूची आणि शुक्राची व पृथनामाची, चंद्राची, पराशराची, बलरामाची स्मृति ह्म० स्मरण करावें. त्यापासून सर्व विघ्नांचें शमन होतें. आतां दुर्निमित्तें तेथेंच सांगितलीं आहेत तीं अशीं कीं,

नांगर ओढतांना जर कूर्म उत्पन्न झाला तर त्यापासून मालकाचें मरण होतें आणि अग्निपासून भय होतें, नांगर मोडला तर नांगरणारास मरणाचा संशय येतो. युगाचा नाश झाला तर पुत्राचा नाश होतो, समानच राहिला तर बालक मरण पावतो. योक्काचा नाश झाला असतां विघ्न येतें आणि धान्यहानि होते. हा नांगर ओढतांना जर एक बैल पडला तर आणि बैल जोडल्या बरोबरच जर तो पडला तर बंधन प्राप्त होतें. आणि ज्वर, अतिसार रोग होऊन नांगरणाऱ्याचा नाश होतो. बैल जोडल्याबरोबर जर तो भराभर नांगर ओढून नांगरावयास लागला तर त्यापासून चौपट धान्य होईल असें जाणावें ॥ ५ ॥

### हलचक्र, बीज पेरणें, शेत कापणें व फणिचक्र.

त्रित्रित्रीष्वनलार्थरामहुतभुग्भेष्वर्कभुक्तादस- ।
त्सद्द्वयः कृषिभैर्विवारुणहरींद्रैर्बीजवापः शुभः ॥
सूर्यर्क्षाद्वितृतीयतोऽतिधृतितश्चाष्टाष्टभिः सत्फलः ।
प्रोक्तोऽन्यैः फणिसप्तमाद्रविमितैस्तच्छेदनं वापभैः ॥ ६ ॥

श्लोकार्थ—ज्या नक्षत्राला सूर्य असेल त्याच्या मागल्या नक्षत्रापासून ३ अशुभ, ३ शुभ, ३ अशुभ, ५ शुभ, ३ अशुभ, ५ शुभ, ३ अशुभ, ३ शुभ अशीं असतात. नांगरण्याच्या मुहूर्ताला ह्या हलचक्रांतलें शुभ नक्षत्र घ्यावें. शततारका, श्रवण, ज्येष्ठा ह्यांशिवाय मागच्या श्लोकांतील नांगरण्याच्या तिथि, नक्षत्र, वारादिकांवर बीज पेरणें शुभ होय. सूर्य नक्षत्रापासून ३ अशुभ, ८ शुभ, ८ अशुभ, ८ शुभ अशीं नक्षत्रें आहेत. हें फणिचक्र बीज पेरण्याला असल्यास शुभ फळ देतें. अन्यमतानें राहू असेल त्या नक्षत्रापासून ६ अशुभ, १२ शुभ, ९ अशुभ, असें आहे. हेंही फणिचक्र बीज पेरण्याला पहावें. बीज पेरण्याच्या नक्षत्रांवर शेत कापावें ॥ ६ ॥

अथ कृषिविषये लांगलचक्रमाह—त्रित्रीति । अर्कभुक्तात्सूर्यभुक्तनक्षत्रात्सकाशात् त्र्यादिषु स्थानाष्टकस्थितेषु नक्षत्रेषु असत्सदित्येतत्फलद्वयं वारं वारं स्यात् । एतदुक्तं भवति । सूर्याक्रांतनक्षत्रस्य आदिमान्नक्षत्रात्सकाशात् त्रिषु असत् दुष्टफलं स्यात् तदनंतरं त्रिषु सत् शुभं स्यात् ततस्त्रिषु असत् ततः इषुषु पंचसु सत् ततोऽनलेषु त्रिषु असत् ततः अर्थेषु पंचसु सत् ततो रामेषु त्रिषु असत् ततो हुतभुक्षु त्रिषु सत्स्यादित्यर्थः । अथ बीजोप्तिमाह—कृषिभैरिति । कृषिभैः कृषिनक्षत्रैरुद्वाहर्क्षचरद्विपेत्यादिभिर्बीजवापः शुभः प्रोक्तः किंलक्षणैः कृषिभैः विवारुणहरींद्रैः वारुणं शततारका हरिः श्रवणः इंद्रो ज्येष्ठा विगताः वारुणहरींद्रा येभ्यस्तानि तथा तैः शततारकाश्रवणज्येष्ठारहितैरित्यर्थः । कृषिभैरित्युपलक्षणं तस्मात्कृष्युक्तं सर्वं तिथिवारादिकं ज्ञेयं । तथा चोक्तं । मूषकानां भयं भौमे मंदे शलभकीटयोः । नवमे च तिथौ रिक्ते हीने सोमे विशेषतः ॥ वृषलग्नेऽथवा मीने कन्यायां मिथुनेऽथ वा । वापयेत्सर्वसस्यानि यदीच्छेत्सस्यसंपद इत्यादि ॥ लग्नबलं प्राग्वत् । अथ बीजवापविषये द्विभेदं फणिचक्रमाह—सूर्यर्क्षादिति । सूर्ययुक्तनक्षत्रादि तृतीयं तस्मादतिधृतिरेकोनविंशं तस्मात् अष्टाष्टभिः तृतीयादष्टभिः एकोनविंशादष्टभिर्नक्षत्रैः बीजवापः सत्फलः । अथ द्वितीयभेदमाह—अन्यैरिति । अन्यैराचार्यैः फणिसप्तमात् राहुसप्तमात्सकाशात् रविमितैर्द्वादशभिर्नक्षत्रैः बीजवापः शुभः प्रोक्तः । एतदुक्तं भवति । राहुर्यस्मिन्नक्षत्रे भवति तस्माद्यत्सप्तमं नक्षत्रं तत्फणिसप्तममुच्यते तस्मात्सकाशाद्द्वादशभिरित्यर्थः । राहोस्तु फणीति नाम ग्रंथांतरे प्रसिद्धं । वराहमिहिराचार्येण राहुस्वरूपविकल्पा ग्रंथांतरोक्ता उद्घाटिताः स्वकृतसंहितायां । अमृतास्वादविशेषाच्छिन्नमपि शिरः किलासुरस्येदं । प्राणैरपरित्यक्तं ग्रहतां यातं वदंत्येके ॥ इंद्वर्कमंडलाकृतिरसितत्वात्किल न दृश्यते गगने । अन्यत्र पर्वकालाद्वरप्रदानात्कमलयोनेः ॥ मुखपुच्छविभक्तांगं भुजंगमाकारमुपदिशंत्यन्य इति ॥ भुजंगमाकारकथनात्फणीत्यभिधानं प्रसिद्धं । रत्नमालायामपि फणिभाद्बीजोप्तिकाले स्फुटमिति ॥ तथा चाऽऽगमांतरे । राहुभादष्टमं यावद्बीजोप्तिं परिवर्जयेदिति ॥ अथ धान्यछेदनमाह—तच्छेदनं वापभैरिति । तेषां धान्यानां छेदनं तच्छेदनं वापभैः बीजवापनक्षत्रैः प्रोक्तं । ननु यस्यांगं यदद्रोगिणो गदितभे कुर्यादिति पुरैवोक्तं तत्कथं

**पुनरुक्तं तच्छेदनं वापभैरिति । सत्यं कृषिनक्षत्राणां बीजवापनक्षत्राणां च किंचिद्भेदोऽस्ति द्वयोः कृष्यंगत्वात् कैः कार्यमिति संदेहनिवारणार्थं तच्छेदनं वापभैरित्युक्तम् ॥ ६ ॥**

**टीकार्थ**—आतां नांगरण्याविषयीं लांगल चक्र सांगतों—ज्या नक्षत्रावर सूर्य असतो त्याचे मागील नक्षत्रापासून तीन तीन इत्यादि ८ वर्गांच्या नक्षत्रांचीं अशुभ शुभ, अशुभ शुभ अशीं फळें आहेत. ह्याचा अर्थ असा कीं, ३ अशुभ पुढें ३ शुभ पुढें ३ अशुभ पुढें ५ शुभ पुनः ३ अशुभ पुनः ५ शुभ नंतर ३ अशुभ नंतर ३ शुभ अशीं असतात. हीं जीं शुभ आणि अशुभ अशीं नक्षत्रें आहेत त्यांपैकीं नांगरण्याच्या मुहूर्ताला हलचक्रांतलें शुभ नक्षत्र घ्यावें. आतां बीज पेरण्याचीं नक्षत्रें सांगतों—मागील श्लोकांत जीं नांगरण्याकारतां नक्षत्रें सांगितलीं आहेत त्या नक्षत्रांवर बीं पेरावें. हें शुभकारक आहे. परंतु त्यांत वरुण ह्म० शततारका, हरि ह्म० श्रवण, इंद्र ह्म० ज्येष्ठा, हीं नक्षत्रें वर्ज्य करावींत. नांगरण्याचीं नक्षत्रें बीं पेरण्यास घ्यावीं एवढेंच नाहीं तर नांगरण्याची तिथि,वार, नक्षत्रें सर्व घ्यावींत. तेंच सांगितलें आहे कीं, मंगळवारीं बीं पेरलें असतां उंदरांचें भय होतें. शनिवारीं बीं पेरलें असतां टोळ आणि किडे ह्याचें भय समजावें. नवमी तिथीस, रिक्तातिथिस, हीन तिथीस,सोमवारीं विशेषेंकरून नाशाचें भय आहे. वृषलग्नीं अथवा मीनलग्नीं,कन्यालग्नीं,मिथुनलग्नीं सर्व प्रकारचें बीं पेरावें त्यापासून धान्याची समृद्धी होते. लग्नाचें बल वगैरे पूर्वींप्रमाणेंच पाहावें.आतां बीं पेरण्याविषयीं दोन प्रकारचें हलचक्र सांगतों—सूर्ययुक्तनक्षत्रापासून तिसरें अशुभ ८ वें शुभ ८ वें अशुभ ८ वें शुभ अशीं नक्षत्रें समजावींत ३–८–८–८ मिळून सत्तावीस नक्षत्रांनां बीं पेरणें शुभकारक आहे असें सांगितलें आहे.आतां दुसरा प्रकार सांगतों—दुसऱ्या आचार्यांचें असें मत आहे कीं, राहू असेल त्या नक्षत्रापासून बारावें नक्षत्र शुभ आहे त्यावर बीं पेरण्याचें करावें. ह्याचा अर्थ असा कीं, ज्या नक्षत्रावर राहु असतो त्यापासून जें सातवें नक्षत्र असतें त्याला फणि सप्तम असें नांव आहे, त्यापासून बारावे नक्षत्रावर बीं पेरणें शुभ आहे.राहूला फणी असें नाव दुसऱ्या ग्रंथांत प्रसिद्ध आहे.राहूचे स्वरूपाचे विकल्प दुसऱ्या ग्रंथांत सांगितले ते वराहमिहिराचार्यानें आपण केलेल्या संहितेंत सांगितले आहेत. ते असे कीं, ह्या राहु नामक असुराचें मस्तक जरी तोडलें तरी त्यानें अमृताचा आस्वाद केला होता म्हणून त्याचा प्राण गेला नाहीं आणि तो राहू ग्रह होऊन राहिला आहे. तो राहु, चंद्र आणि सूर्य ह्यांच्या मंडलासारखा आकृतीनें आहे परंतु तो काळा असल्यामुळें आकाशांत दिसण्यांत येत नाहीं आणि कमलयोनि ह्म०ब्रह्मदेवाचें वरदान असल्यामुळें तो राहु पर्वकाळाशिवाय दुसऱ्या दिवशीं दिसत नाहीं तोंड आणि पुच्छ ह्या दोहोंकडे अंगाचा विभाग केला आहे म्हणून तो भुजंग ह्म० सर्प त्याच्या आकाराचा आहे असें कित्येकांचें मत आहे. तो राहु भुजंगाचे आकारा सारखा आहे म्हणूनच त्याला फणी असें नांव आहे. रत्नमालाग्रंथांतही स्पष्ट सांगितलें आहे कीं, फणि ह्म० राहूच्या नक्षत्रापासून बीं पेरण्याचा काळ आहे. तसेंच दुसऱ्या आगमांत सांगितलें आहे कीं, राहू नक्षत्रापासून आठवें नक्षत्र बीं पेरण्यास वर्ज्य आहे. आतां धान्याचें छेदन सांगतों—धान्याचें छेदन बीं पेरण्याच्या नक्षत्रांवरच करावें, आतां अशी शंका येते कीं, मुख्य कार्य करावयास जें नक्षत्र सांगितलें असेल त्या कार्याचें अंग ह्म० अवयव कार्य करावयास तें नक्षत्र घ्यावें असा नियम आहे. असें पूर्वीं सांगितलें आहे तर आतां पुनः छेदनाकरितां बीं पेरण्याचें नक्षत्र घ्यावें हें सांगण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं हें म्हणणें बरोबर आहे. नांगरण्याचीं नक्षत्रें आणि बीं पेरण्याचीं नक्षत्रें ह्यांच्यामध्यें थोडा भेद आहे. दोनही नांगरण्याचीं अंगें असल्यामुळें कोणत्या नक्षत्रावर कोणतें कार्य करावें ह्या संशय दूर करण्याकरितां बीं पेरण्याच्या नक्षत्रांवर धान्य कापावें असें सांगितलें आहे ॥ ६ ॥

### मळणीचा खांब पुरणें, नवान्नप्राशन, नृत्य, संगीत.

**मेथिं क्षीरतरोरुफानुरहितैरुद्वाहभे रोपयेत् ।**
**अन्नप्राशनभैर्वसंतशरदोः प्रोक्तं नवान्नं बुधैः ॥**
**मैत्रार्कांत्यवसूत्तरेज्यवरुणैः सेंद्रैः शुभं नर्तनं ।**
**लग्ने ज्ञे गुरुवीक्षिते हिबुकगैः सौम्यैश्च संगीतकम् ॥ ७ ॥**

**श्लोकार्थ**—ज्यांतून दुधासारखा चीक निघतो अशा वृक्षाचा मेथि ( मळणीचा खांब ) उत्तराफ० व अनुराधारहित विवाह नक्षत्रांवर पुरावा, वसंत ऋतूंत व शरत् ऋतूंत अन्न प्राशनाच्या तिथि नक्षत्रादिकांवर नवान्न प्राशन करावें. अनुराधा, हस्त, रेवती, धनिष्ठा, उत्तराफ०, उत्तराषा०, उत्तराभा०, पुष्य, शततारका, ज्येष्ठा ह्या नक्षत्रांवर; लग्नीं बुध असून, त्यावर गुरूची दृष्टि असतां; आणि चतुर्थस्थानीं शुभग्रह असतां नृत्य व संगीत यांचा आरंभ शुभ जाणावा ॥ ७ ॥

अथ निष्पन्ने धान्ये क्रमप्राप्तं मेथिरोपणं वृत्तचरणेनाऽऽह–मेथिमिति । क्षीरतरोर्वटवृक्षादेर्मेथिं उद्वाहभैर्विवाहनक्षत्रैर्मूलांत्यार्केत्यादिभिरारोपयेत् निखनेत् मेथिर्नाम खले धान्यमर्दनार्थं काष्ठमारोप्यते मेथ्यंते संगम्यंते वृषभा अस्मिन्निति मेथिः । मेथृ संगमे । पुंसि मेथिः खले दारुन्यस्तं यत्पशुबंधनमित्यमरः ॥ किंलक्षणैरुद्वाहभैः उफानुरहितैः उफा उत्तराफाल्गुनी अनुः अनुराधा ताभ्यां रहितैः । उक्तं च । रेवती रोहिणी मूलं स्वाती हस्तो मृगस्तथा । आषाढोत्तरयुक्ता च तथा भाद्रपदा मघा ॥ बंधने सर्वबीजानां तथा शालाप्रवेशने । दुःखदा वनदा चैवानुराधोत्तरफाल्गुनी ॥ वटश्च सप्तपर्णश्च गंभारी शाल्मली तथा । औदुंबरी तथा धात्री या चान्या क्षीरवाहिनी ॥ स्त्रीनाम्नी कर्षकैर्नित्यं मेथिः कार्या फलप्रदेति ॥ अथ नवधान्यप्रसंगेन नवान्नकर्म द्वितीयचरणेनाऽऽह–अन्नप्राशनभैरिति । वसंतशरदो ऋत्वोरन्नप्राशनभैर्नवान्नं नवान्नकर्म बुधैः प्रोक्तं । अन्नप्राशनभैरित्युपलक्षणं तस्मादन्नप्राशनोक्तं तिथिवारादिकमत्रग्राह्यं । साग्निकस्य नवान्नकर्मणा विना व्रीह्यादीनां नवनवमितानां धान्यानां भक्षणे दोषप्रसंगादावश्यकं कर्मैतत् । नवधान्यानीमानि । व्रीहयो यवगोधूमा नीवाराः कंगुवैणकाः । शालयो मुद्गमाषाश्च नवधान्यानि च क्रमात् ॥ एषां मध्ये शरत्संभवानि धान्यानि व्रीह्याग्रयणेन विना न भक्षणीयानि । वसंतसंभवानि यवाग्रयणेन विना न भक्षणीयानीति नियमादिं कर्म शरद्वसंतयोः क्रियत इति । तदन्नप्राशनोदितैस्तिथिभादिभिः मासे षष्ठेऽष्टमे वेत्यत्रोक्तैर्नवान्नं कर्तव्यमित्यर्थः । अथोत्तरार्धेन नृत्यसंगीतयोरारंभमाह–मैत्रार्कांत्येति । मैत्रमनुराधा अर्को हस्तः अंत्यं रेवती वसवो धनिष्ठा उत्तरास्तिस्त्र इज्यः पुष्यः वरुणः शततारका इंद्रो ज्येष्ठा तैर्नर्तनमारभेत् संगीतकं च आरभेत् कस्मिन्सति लग्ने वर्तमाने ज्ञे गुरुवीक्षिते सति कैः हिबुकगैः सौम्यैः चतुर्थस्थानस्थितैः सौम्यग्रहैः । शेषं प्राग्वत् ॥ ७ ॥

**टीकार्थ**—आतां धान्य तयार झाल्यावर क्रमानें प्राप्त झालेला मेथि ह्म० मळणीचा खांब वृत्ताच्या चरणानें सांगतों–क्षीर वृक्ष ह्म० ज्यापासून दुधा सारखा चीक निघतो अशा वृक्षाचा ह्मणजे वड वगैरे वृक्षांचा खांब मळणीकरितां तयार करून तो विवाहास सांगितलेल्या नक्षत्रांवर पुरावा मेथि ह्मणून त्या खांबाला नांव आहे. कारण कीं, त्या खांबाच्या चोहोंकडे बैल फिरत असतात कारण मेथृ असा धातु आहे त्याचा अर्थ संगम करणें असा आहे. तीं विवाह नक्षत्रें घ्यावयाचीं ह्मणून सांगितलें, परंतु त्यामध्यें उफा ह्म० उत्तरा फाल्गुनी अनु ह्म० अनुराधा हीं दोन नक्षत्रें वर्ज्य करावयाचीं आहेत. असें सांगितलें आहे कीं, रेवती, रोहिणी, मूळ, स्वाती, हस्त, मृग, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मघा इतकीं नक्षत्रें सर्व धान्यांचें छेदन करण्याकरितां आणि घरांत आणून रचण्याकरितां सांगितलीं आहेत आणि अनुराधा व उत्तराफाल्गुनी हीं दोन नक्षत्रें दुःखदायक आहेत. मळणीचा खांब वडाचा, सप्तपर्ण वृक्षाचा, गंभारीचा, शाल्मलीचा, उंबराचा, आवळीचा अथवा ह्या शिवाय दुसरे जे क्षीरवाही ह्म०दुधा सारखा चीक निघणारे वृक्ष आहेत त्यांचा खांब शेतकऱ्यांनीं करावा त्यापासून उत्तम फल प्राप्त होतें. आतां नवीन धान्याच्या प्रसंगानें नवान्न प्राशनाचा विचार दुसऱ्या चरणानें सांगतों–वसंत ऋतूंत आणि शरद् ऋतूंत अन्न प्राशनाला सांगितलेल्या नक्षत्रांवर नवान्न प्राशन करावें असें विद्वानांनीं सांगितलें आहे. नुसतीं अन्न प्राशनाचीं नक्षत्रेंच घ्यावींत असें नाहीं;तर त्याची तिथि, वार,नक्षत्र इत्यादिकही घ्यावेत. ज्याचे घरीं अग्निहोत्र असेल त्याला नवान्न प्राशनाचें कर्म केल्याशिवाय तांदूळ इत्यादिक नवीन झालेल्या धान्यांचें भक्षण केल्याबद्दल दोष सांगितला आहे ह्मणून नवान्न प्राशनाचें कर्म आवश्यक केलेंच पाहिजे. नवीन धान्यांचीं नामें अशीं कीं, तांदूळ, यव, गोधूम, नीवार, कांग, वैणक, शालि, मूग, उडीद हीं नव धान्यें समजावींत. ह्यामध्यें शरत् ऋतूंत उत्पन्न झालेलीं धान्यें व्रीही आग्रायण झाल्याशिवाय खाऊं नयेत. आणि वसंत ऋतूंत झालेलीं धान्यें यवादिक आग्रायण झाल्याशिवाय खाऊं नयेत. हेंच कर्म शरत् आणि वसंत ह्या दोन ऋतूंत करावें लागतें. तें कर्म अन्न प्राशनाच्या नक्षत्र इत्यादिकांवर करावें आणि त्याचीच तिथि व मास इत्यादिक घ्यावे असा नियम आहे. आतां उत्तरार्धानें नृत्य आणि संगीत ह्यांचा आरंभ सांगतों–मैत्र ह्म० अनुराधा, अर्क ह्म० हस्त, अंत्य ह्म० रेवती, वसु ह्म० धनिष्ठा, उत्तरात्रय ह्म० उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, उत्तराफल्गुनी, इज्य ह्म० पुष्य, वरुण, ह्म० शततारका, इंद्र ह्म० ज्येष्ठा इतक्या नक्षत्रांवर नृत्याचा आरंभ करावा. तसाच गाण्याचाही आरंभ करावा. लग्नीं बुध असून त्या बुधावर गुरूची दृष्टि असतां आणि हिबुक ह्म० चतुर्थस्थानीं शुभ ग्रह असतां नृत्य व संगीत ह्यांचा आरंभ करावा. बाकीचें सर्व पहिल्या प्रमाणेंच समजावें ॥ ७ ॥

### पशुसंबंधीं कर्मे.

द्वीशार्केंद्वदितीज्यवासवशिवाश्व्यंत्याग्निपाशींद्रभैः ।
पूर्वाभिः शुभदा विसिंहभतनौ नानापशूनां क्रिया ॥
वारेष्वर्कचतुष्के कोत्तरहरित्वाष्ट्रेष्वमारिक्तयो-।
रष्टम्यां न हितोदिता स्वभगभे न स्याद्भदोषः किल ॥ ८ ॥

श्लोकार्थ—विशाखा, हस्त, मृग, पुनर्वसु, पुष्य, धनिष्ठा, आर्द्रा, अश्विनी, रेवती, कृत्तिका, शततारका, ज्येष्ठा, पूर्वाफ० पूर्वाषा० पूर्वाभा० ह्या नक्षत्रांवर आणि सिंह रहित लग्नीं अनेक प्रकारचे पशु विकत देणें, घेणें, आणणें, नेणें, वगैरे पशुसंबंधीं कर्म शुभ जाणावें. रवि, सोम, मंगळ, बुध ह्या ४ वारीं रोहिणी, उत्तराफ०, उत्तराषाढा, उत्तराभा०, श्रवण, चित्रा ह्या नक्षत्रांवर व अमावास्या, रिक्ता, अष्टमी ह्या तिथींवर पशु कर्म शुभ नव्हे, ज्या नक्षत्राची जी पशुयोनि त्या नक्षत्रांवर त्या पशूचें कर्म करण्याला नक्षत्र अशुभ असलें तरी दोष नाहीं ॥ ८ ॥

अथ नानापशूनां कर्म वृत्तेनैकेनाऽऽह—द्वीशेति । द्वीशं विशाखा अर्को हस्तः इंदुर्मृगः आदितिः पुनर्वसुः इज्यः पुष्यः वासवं धनिष्ठा शिव आर्द्रा अश्विनी प्रसिद्धा अंत्यं रेवती अग्निः कृत्तिका पाशी शततारका इंद्रो ज्येष्ठा तैः पूर्वाभिस्तिसृभिः विसिंहभतनौ विगतः सिंहो येभ्यस्तानि विसिंहानि तानि च तानि भानि विसिंहभानि सिंहरहितराशयः तेषां तनुर्लग्नं तस्मिन् नानापशूनां क्रिया शुभदा उदिता पशूनां क्रयविक्रयादि कर्म शुभदं प्रोक्तमित्यर्थः । अथोत्तरार्धेन वर्ज्यमाह—अर्कचतुष्के वारेषु रविचंद्रभौमबुधवारेषु कोत्तरहरित्वाष्ट्रेषु कः रोहिणी उत्तरास्तिस्रः आसां समाहारः कोत्तरं हरिः श्रवणः त्वाष्ट्रं चित्रा तेषु अमारिक्तयोः अमा अमावास्या रिक्ताश्चतुर्थीनवमीचतुर्दशीनामन्यतमा तयोः अष्टमी प्रसिद्धा तस्यां नानापशूनां क्रिया हिता नोदिता । अपवादमाह— स्वभगभे सति भदोषो नक्षत्रदोषः क्वचित्पशुकर्मणि न स्यात् । लग्नबलं प्राग्वत् । उक्तं च । द्व्यादित्यद्विवसुद्व्यांत्यार्केंद्रद्वीशैः क्रयादि गोः । दर्शभूताष्टमीचित्राध्रुवकर्णैर्गमाद्यसत् ॥ सोमार्कवैधृतौ पाते लग्ने पंचानने बुधे । भद्रासंक्रांतिरिक्तासु पशुकर्म विवर्जयेत् ॥ शुभग्रहोदये शुद्धेनैधने स्वर्क्षयोनिषु । रक्षावृद्धिक्रिया शस्ता पशूनां मुनिभिः स्मृतेति ॥ तथा चाऽऽगमांतरे । सोमे भौमे बुधे गावो न चाल्यास्तुरगाः शनाविति ॥ अन्यच्च । पूर्वात्रयामृतमयुखहुताशनेषु शक्राग्निवाजिवसुवारुणशांकरेषु । एतेषु गोमहिषदंतितुरंगमादिनानाप्रकारपशुजातिगतिः प्रशस्तेति ॥८॥

टीकार्थ—आतां नाना पशूंचें कर्म एका वृत्तानें सांगतों—द्वीश ह्मणजे ज्या नक्षत्राचे दोन स्वामी आहेत असें ह्म० विशाखा, अर्क ह्म० हस्त, इंदु ह्म० मृग, अदिति ह्म० पुनर्वसु, इज्य ह्म० पुष्य, वसु ह्म० धनिष्ठा, शिव ह्म० आर्द्रा, अश्विनी, अंत्य ह्म० रेवती, अग्नि ह्म० कृत्तिका, पाशी ह्म० शततारका, इंद्र ह्म० ज्येष्ठा आणि पूर्वात्रय ह्म० पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, इतक्या नक्षत्रांवर आणि सिंहराशी शिवाय बाकीची कोणतीही राशि, लग्नीं असेल तर नानाप्रकारच्या पशूंचा क्रय आणि विक्रय करणें शुभकारक आहे. आतां उत्तरार्धानें वर्ज्य सांगतों—अर्कादि चार वार ह्मणजे रविवार, सोमवार, मंगळवार, बुधवार, हे चार वार आणि क ह्मणजे रोहिणी, उत्तरात्रय ह्म० उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, हरि ह्म० श्रवण, त्वाष्ट्र ह्म० चित्रा इतकीं नक्षत्रें. अमा ह्म० अमावास्या, रिक्ता ह्म० चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ह्यांपैकीं, कोणती तरी एक तिथी, अष्टमी, ह्या पूर्वी सांगितलेल्या नक्षत्र, तिथींवर पशूंचा क्रय, विक्रय करणें हितकारक, नाहीं ह्याचा अपवाद सांगतों—ज्या नक्षत्राची जी पशुयोनि असेल त्या नक्षत्रावर त्या पशूचा क्रय, विक्रय करण्यास हरकत नाहीं; लग्नाचें बलाबल पूर्वी प्रमाणेंच पाहावें. असें सांगितलें आहे कीं, द्वि आदित्य ह्म० पुनर्वसु आणि पुष्य, द्विवसु ह्म० धनिष्ठा व शततारका, द्वि अंत्य ह्म० रेवती व अश्विनी, अर्क ह्म० हस्त, इंद्र ह्म० ज्येष्ठा, ह्या नक्षत्रांवर गाईचे क्रय, विक्रय अमावास्या, चतुर्दशी, अष्टमी, चित्रा नक्षत्र, ध्रुव करण ह्यांवर पशूंचे क्रय विक्रय असत्. ह्म० अशुभ फल दायक आहेत. सोमवार, रविवार, वैधृति, व्यतिपात, बुधवार, लग्नीं सिंह राश असतां, भद्रा, संक्रांति, रिक्ता तिथी इत्यादिकांवर पशूचा क्रय आणि विक्रय वर्ज्य आहे. शुभ ग्रहाचा उदय असतां निधन स्थान ह्म० अष्टमस्थान शुद्ध असतां, अथवा ज्या पशूंचा विक्रय अथवा क्रय करावयाचा असेल त्या नक्षत्राची जी पशु योनि असेल ह्म० अश्विनी नक्षत्रावर अश्वाचा क्रय आणि विक्रय किंवा भरणीवर हत्तीचा क्रय विक्रय अथवा रक्षण करणें वगैरे करावें असें मुनींनी सांगितलें आहे, तेंच

दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सोमवारीं, मंगळवारीं, बुधवारीं गाईचा क्रय विक्रय करूं नये. शनिवारीं घोड्यांचा क्रय विक्रय करूं नये. दुसरें असें आहे कीं, तीन पूर्वा ह्म० पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वा भाद्रपदा, अमृतमुख ह्म० चंद्र ह्म० मृग, अग्नि ह्म० कृत्तिका, शक्र ह्म० ज्येष्ठा, अग्नि ह्म० कृत्तिका, वाजि नक्षत्र, वसूचें नक्षत्र, वारुण नक्षत्र, शिवनक्षत्र, इतक्या नक्षत्रांवर गाय, म्हैस, हत्ती, घोडा इत्यादि नाना प्रकारच्या पशुजातींचा क्रय, विक्रय करणें शुभ आहे ॥ ८ ॥

### अश्वकर्म व अश्वचक्र.

द्व्यादित्यद्विवसुस्थिराश्विभमृदुस्वात्यर्कभैर्ज्ञत्रया- ।
र्कारार्क्षीज्यभृगूदये द्विकमदेष्विंदौ क्रियाऽऽश्वी हिता ॥
तत्राप्यर्कभतः क्रमात्तिथिमितैः पश्चात्त्रिभिः साभिजि- ।
च्छस्ता या नृसमा तदुक्तभमुखैः कार्या परैभिर्बुधैः ॥ ९ ॥

श्लोकार्थ—पुनर्वसु, पुष्य, धनिष्ठा, शततारका, स्थिर, अश्विनी, मृदु, स्वाती, हस्त ह्या नक्षत्रांवर, बुध, गुरु, शुक्र, रवि, मंगळ ह्या वारीं; गुरु, शुक्र लग्नीं असतां; आणि २।४।७ ह्या स्थानीं चंद्र असतां घोडा विकत देणें, घेणें वगैरे अश्वकर्म शुभ जाणावें. सूर्य नक्षत्रापासून पुढचीं १५ व मागचीं ३ नक्षत्रें अश्वकर्माला शुभ होत. हीं अभिजितासह मोजावीं. हें अश्वचक्र अश्वकर्माच्या नक्षत्रांला पाहावें. मनुष्याप्रमाणें जें अश्वकर्म करावयाचें तें, मनुष्याच्या कर्माला सांगितलेल्या मुहूर्तावर करावें. इतर कर्म अश्वकर्माच्या नक्षत्रांवर करावें ॥ ९ ॥

**अथाश्वकर्म वृत्तेनैकेनाऽऽह—द्व्यादित्येति । द्व्यादित्यं पुनर्वसुपुष्यौ द्विवसु धनिष्ठाशतता- रके स्थिराणि प्रसिद्धानि । अश्विनी प्रसिद्धा मृदूनि प्र० स्वाती प्र० अर्को हस्तः तैर्ज्ञत्रयार्कारार्क्षि ज्ञत्रयं बुधगुरुशुक्राः अर्कः सूर्य आरो भौमः एषामह्नो दिनं तस्मिन् इज्यभृगूदये उदये लग्ने इज्यभृगौ इति इज्यभृगूदयं तस्मिन् गुरुशुक्रयुते लग्न इत्यर्थः । द्विकमदेषु इंदौ द्वौ द्वितीयं कं चतुर्थं मदः सप्तमं एषु चंद्रे सतीत्यर्थः । आश्वी क्रिया क्रयविक्रयादिका हिता शुभकर्त्री स्यात् । अथाश्वचक्रमाह—तत्रापीति । तत्रापि द्व्यादित्यादिषु नक्षत्रेषु सत्स्वपि अर्कभतः सूर्यन- क्षत्रात्सकाशात् क्रमात्तिथिमितैर्नक्षत्रैः पश्चादुत्क्रमतस्त्रिभिर्नक्षत्रैः साभिजिद्यथा तथा आश्वी क्रिया शस्ता शोभना स्यात् । एवं सामान्यतोऽश्वकर्मोक्त्वेदानीं विशेषमाह—येती । या आश्वी क्रिया नृसमा मनुष्यसदृशी सा क्रिया तदुक्तभमुखैः कार्या तस्मै मनुष्याय उक्तानि भमुखानि नक्ष- त्रादीनि तैः कार्येत्यर्थः । परा या नृसमा न भवति सा एभिः सामान्यैर्द्व्यादित्यादिभिर्बुधैः कार्येत्यर्थः । लग्नबलं प्राग्वत् । तथा च नारदः । विविष्णुचरभे क्षिप्रे मृदुभे स्थिरभेषु च । वाजिकर्माखिलं सूर्यवारे कार्यं विशेषत इत्यादि ॥ तथा चोक्तं । घृतान्नचणकक्षीरतृणमुद्गादिभ- क्षणे । अन्नप्राशनवद्दक्षं स्नानं सौम्यग्रहोदये ॥ चौलोक्तं क्षुरकर्मादौ भेषजे भेषजोदितं । गर्भाधा- नोक्तमश्वानां मैथुने तु विलोकयेत् ॥ गृहारंभोदिते काले हयशाला विधीयते । शिक्षाविद्योक्तकाले च भूषणं भूषणोदिते ॥ चर्मकर्मादिकं कार्यं जययोगे शुभोदये । एवं खरोष्ट्रादिकार्यं पूर्वोक्ते वाहनादिकमिति ॥ ९ ॥**

**टीकार्थ**—आतां अश्वकर्म एका वृत्तानें सांगतों—द्व्यादित्य ह्म० पुनर्वसु आणि पुष्य, द्विवसु ह्म० धनिष्ठा आणि शततारका, स्थिर नक्षत्रें, अश्विनी, मृदु नक्षत्रें, स्वाती, अर्क ह्म० हस्त, ह्या नक्षत्रांवर ज्ञत्रय ह्म० बुधवारापासून तीन वार ह्म० बुधवार, गुरुवार आणि शुक्रवार व रविवार ह्या चार वारांवर गुरु आणि शुक्र हे दोन ग्रह लग्नीं असतां चंद्र, द्वि ह्म० द्वितीयस्थान, क ह्म० सुख ह्म० चतुर्थस्थान, मद ह्म० सप्तमस्थान ह्या ठिकाणीं असतां घोडा घेणें व देणें ह्याची क्रिया करणें प्रशस्त आहे. आतां अश्वचक्र सांगतों—वर सांगितलेलीं नक्षत्रें असूनही शिवाय सूर्यनक्षत्रापासून पुढचीं पंधरा नक्षत्रें आणि मागचीं तीन नक्षत्रें आणि अभिजित् नक्षत्र ह्यांवर अश्वकर्म ह्मणजे घोड्याचा विक्रय आणि क्रय करणें शुभ आहे. अशा रीतीनें अश्वाचें कर्म सांगून आतां विशेष सांगतों—मनुष्याप्रमाणेंच अश्व कर्म करावयाचें आहे. तेंच सांगितलें आहे कीं, मनुष्यांच्या कामाला जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत तींच नक्षत्रें वगैरे घोड्याच्या कामाला समजावींत आतां जीं कर्में मनुष्यासारखीं नसतील तीं घोड्यांचीं कर्में द्व्यादित्य इत्यादि नक्षत्रांवर करावींत. लग्नाचें बला-

वल पूर्वी प्रमाणेंच जाणावें. तेंच नारद सांगतो कीं, विष्णु नक्षत्रावर ह्मणजे श्रवण नक्षत्रीं, क्षिप्र नक्षत्रांवर, मृदु नक्षत्रांवर, स्थिर नक्षत्रांवर संपूर्ण अश्व कर्म करावें आणि विशेषेंकरून रविवारीं अश्व कर्म करावें. तेंच सांगितलें आहे कीं, मनुष्याला अन्न प्राशनाचीं जीं नक्षत्रें सांगितलीं आहेत. त्या नक्षत्रांवर घोड्यांला घांस, अन्न, दाणा, गवत, मूग इत्यादि खाण्यास द्यावे. सौम्य ग्रहांवर त्याला स्नान घालावें. चौल कर्मास सांगितलेल्या नक्षत्रादिकांवर त्या घोड्याचे केश काढणें, खरारा वगैरे करावा. औषध देण्यास औषध देण्याचीं नक्षत्रें, अश्वाच्या मैथुनाला गर्भाधानाचीं नक्षत्रें घ्यावींत. घर बांधण्याच्या नक्षत्रांवर हयशाला ह्मणजे तबेला वगैरे बांधावा. घोड्याला शिकविण्याचें काम मनुष्याचे विद्यारंभावर करावें. घोड्याला दागिने घालावयाचे ते मनुष्याचे दागिने घालण्याच्या नक्षत्रांवर घालावेत. घोड्याला लगाम खोगीर वगैरे घालावयाचें तें काम मनुष्यांच्या शुभकारक जय योगावर करावें.अशाच रीतीनें खेचर आणि उंट इत्यादिकांवर बसण्याचें पूर्वाण्हकाळीं करावें ॥ ९ ॥

### अभ्यंगाचा काळ.

**भद्रासंक्रमपातवैधृतिसितेज्यार्कारषष्ठ्यादिषु ।**
**श्राद्धाहे प्रतिपद्द्वये परिहरेद्धेतुं विनाऽभ्यंजनम् ॥**
**मांगल्यं विजयोत्सवोऽब्दवदनं दीपावली हेतवो- ।**
**ऽभ्यंगस्य क्थितादितैलमनसन्निंद्येऽह्नि नित्येऽखिलम् ॥ १० ॥**

श्लोकार्थ—भद्रा करण, संक्रांति, व्यतीपात, वैधृति योग, शुक्र, गुरु, रवि, मंगळ हे वार, षष्ठीपासून पुढच्या सर्व तिथि, श्राद्धदिवस, प्रतिपदा, द्वितीया ह्यांवर कारणावांचून अभ्यंग करूं नये. विवाहादि मंगलकार्य, दसरा, पाडवा, दिवाळी, हीं अभ्यंग करण्याचीं कारणें आहेत, ह्मणून अशा दिवशीं तिथि, वार, योगादि कांहीं अशुभ असलें तरी अभ्यंग करावा. तापविलेलें तेल, मोहऱ्यांचें तेल व सुगंधि तेल निषिद्ध दिवशीं अंगाला लावणें शुभ जाणावें, दररोज अभ्यंग करण्याला कसलाच दोष नाहीं. सगळे दिवस व सर्व प्रकारचीं तेलें शुभ होत ॥ १० ॥

**अथाभ्यंगनिषिद्धकालमाह–भद्रेति । भद्रा प्रसिद्धा । संक्रमः संक्रांतिः पातो व्यतीपातः वैधृतिः प्र० सितः शुक्रवारः इज्यो गुरुवारः अर्को रविवारः आरो भौमवारः षष्ठ्यादयः सर्वास्तिथयः तासु ६।७।८।९।१०।११।१२।१३।१४।१५।३० । श्राद्धाहः श्राद्धदिनं प्रतिपद्द्वयं प्रतिपद्द्वितीये तस्मिन् हेतुं कारणं विना अभ्यंजनं अभ्यंगं परिहरेत् । कारणे साति अवश्यं चरेदित्यर्थसिद्धं । तथा चोक्तं । सप्तम्यां न स्पृशेत्तैलं नवम्यां प्रतिपत्तिथौ । चतुर्दश्यामथाष्टम्यां षष्ठ्यां चैव विशेषत इति ॥ ग्रंथांतरे । चतुर्दश्यष्टमी चैव पौर्णमास्यर्कसंक्रमः । तैलस्नानं न कुर्वीत सुतबंधुधनक्षयादिति ॥ तथा च वृद्धमनुः । दर्शे स्नानं न कुर्वीत मातापित्रोस्तु जीवतोः। नवम्यां च न चेत्तत्र निमित्तांतरसंभवः ॥ प्रतिपद्यनपत्यः स्याद्द्वितीयायामपत्निकः । दशम्यामधनः स्नाने सर्वं हंति त्रयोदशीति ॥ रत्नमालायां । रविस्तापं कांतिं वितरति शशी भूमितनयो मृतिं लक्ष्मीं चांद्रिः सुरपतिगुरुर्वित्तहरणं । विपत्तिं दैत्यानां गुरुरखिलभोगानुभवनं नृणां तैलाभ्यंगात्सपदि कुरुते सूर्यतनय इति ॥ अथाभ्यंगहेतूनाह–मांगल्यमिति । मांगल्यं विवाहादि विजयोत्सव आश्विनशुक्लदशम्यां क्रियते अब्दवदनं संवत्सरप्रतिपत् दीपावलिः प्रसिद्धा एतेऽभ्यंगस्य हेतवः कारणानि । एषु निषिद्धतिथ्यादावपि अभ्यंगः कर्तव्यः । तथा चोक्तं व्यवहारसारे । वत्सरादौ वसंतादौ सूतकांते महोत्सवे । दीपोत्सवे चतुर्दश्यामभ्यंगनियमो न चेति॥ तथा चोक्तं स्कांदे विजयादशमीविषयं । निषिद्धमपि कर्तव्यं तैलाभ्यंजनमादरात् इति ॥ अथाभ्यंगनिषिद्धापवादमाह–क्थितादीति । निंद्येऽह्नि क्थितादि तैलं अनसत् शुभं स्यात् आदिग्रहणात् सार्षपसुगंधपुष्पवासितादि तैलं गृह्यते । एवं क्थितादि तैलं निंद्यदिनेऽपि शुभमित्यर्थः । उक्तं च । सार्षपं गंधतैलं च यत्तैलं पुष्पवासितं । द्रव्यांतरयुतं वाऽपि न दुष्यति कदाचन ॥ सूर्यशुक्रारवारेषु निषिद्धासु तिथिष्वपि । कर्तव्ये यदि वा स्नाने पक्वतैलं न दुष्यति ॥ रवौ पुष्पं गुरौ दूर्वा भौमवारे च मृत्तिका । भार्गवे गोमयं क्षिप्त्वा तैलस्नानं सुखावहमिति ॥ अथ नित्याभ्यंगे विशेषमाह–नित्येऽखिलमिति । नित्येऽभ्यंगेऽखिलं तैलं पक्वादिकं अनसत् शुभं स्यात् उक्तं च । नित्यस्नाने च कर्तव्ये तिथिदोषो न विद्यत इति ॥ १० ॥**

**टीकार्थ**—आतां अभ्यंगाचा निषिद्ध काल सांगतों–भद्राही प्रसिद्धच आहे, संक्रांति ह्म० संक्रमण, पात ह्म० व्यतिपात, वैधृति योग, सित ह्म० शुक्रवार, इज्य ह्म० गुरुवार, अर्क ह्म० रविवार, आर ह्म० मंगळवार, षष्ठीपासून सर्व तिथि ह्म० ६–७–८–९–१०–११–१२–१३–१४–१५–३० श्राद्धाह ह्म० श्राद्धाचा दिवस, प्रतिपद्द्वय ह्म० दोन प्रतिपदा ह्यां शिवाय अभ्यंग स्नान ह्म० तेल लावून स्नान करावें. अभ्यंग स्नानाचें कारण असेल तर आवश्यक करावें. तेंच सांगितलें आहे कीं, सप्तमीला तैलास स्पर्श करूं नये. तसेंच नवमीस, प्रतिपदेस, चतुर्दशीस, अष्टमीस, षष्ठीस, विशेषेंकरून तेलाचा स्पर्श करूं नये. दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, चतुर्दशी, अष्टमी, पौर्णमासी, सूर्य संक्रमण, इतक्या दिवशीं तेल लावून स्नान करूं नये. कारण कीं, त्यापासून पुत्र, बंधु आणि धन ह्यांचा नाश होतो. तेंच वृद्ध मनु सांगत आहे कीं, अमावास्येस, आईबापाचे श्राद्ध दिवशीं, आणि नवमीस तेल लावून स्नान करूं नये, परंतु विशेष कांहीं निमित्त नसेल तर अर्थात् विशेष निमित्त असेल तर तेल लावून स्नान करण्यास हरकत नाहीं, प्रतिपदेस अभ्यंग स्नान केलें असतां पुत्र रहित होतो. द्वितीयेस केलें असतां पत्नी रहित होतो. दशमीस केलें असतां धनरहित होतो. त्रयोदशीस अभ्यंग स्नानानें सर्वांचा नाश होतो. रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, रविवारीं तैलाभ्यंग केला असतां रवि ताप देतो. सोमवारीं केलें असतां चंद्रमा कांति देतो. मंगळवारीं केलें असतां मंगळ हा मरण देतो. बुधवारीं केलें असतां बुध लक्ष्मी देतो. गुरुवारीं केलें असतां सुरपतिगुरु ह्म० गुरु हा द्रव्याचें हरण करतो. शुक्रवारीं केलें असतां दैत्यगुरु ह्म० शुक्र हा विपत्ति देतो. शनिवारीं केलें असतां सूर्यपुत्र ह्म० शनि हा मनुष्यांनां सर्व प्रकारचे भोग देतो. आतां* अभ्यंग स्नानाचे हेतु सांगतों–विवाह इत्यादि मंगल कार्यामध्यें, विजयोत्सवाचे वेळीं ह्म० आश्विन शुक्लदशमीस ह्मणजे दसऱ्याचे दिवशीं, वर्षप्रतिपदेच्या दिवशीं, दीपावली मध्यें, तेल लावून स्नान करावें. इतक्या सांगितलेल्या हेतुवर वर सांगितलेल्या निषिद्ध तिथि असल्या तरी हरकत नाहीं. तेंच व्यवहारसार ग्रंथांत सांगितलें आहे कीं, वर्षाचे आरंभीं ह्मणजे पाडव्याचे दिवशीं, वसंत ऋतूचे आरंभीं, सूतकाचे शेवटीं, मोठ्या उत्सवाचे दिवशीं, दिवाळीचे दिवशीं, अभ्यंग स्नान करण्यास नियमाची आवश्यकता नाहीं, अर्थात् निषिद्ध तिथि असतांही अभ्यंग स्नान करावें. तेंच स्कंद पुराणांत सांगितलें आहे कीं, विजयादशमीस अभ्यंग स्नान करावें. जरी दशमीस अभ्यंगाचा निषेध सांगितला आहे तरी सुद्धां मोठ्या आदरानें दसऱ्याचे दिवशीं अभ्यंग स्नान करावें. आतां अभ्यंगाचा निषेध सांगितला आहे, पण त्याचा अपवाद सांगतों–निंद्य सांगितलेल्या दिवसावरही कढलेलें तेल ह्मणजे औषधाकारितां तयार केलेलें तेल लावून स्नान करावें एवढेंच नाहीं. परंतु मोहऱ्यांचें तेल, सुवासिक तेल ह्म० चंदनी अत्तर इत्यादिक लावून स्नान करण्यास हरकत नाहीं. असें सांगितलें आहे कीं, मोहऱ्यांचें औषधीक तेल, सुवासिक तेल, दुसऱ्या पदार्थांच्या मिश्रणांनीं तयार केलेलें तेल अंगास लावून स्नान करण्यास कधींच दोष नाहीं. रविवारीं, शुक्रवारीं, मंगळवारीं, निषिद्ध तिथींवरही वर सांगितलेल्या औषधि तेलानें आणि सुवासिक तेलानें स्नान करण्यास हरकत नाहीं. रविवारीं फूल घालून, गुरुवारीं दूर्वा घालून, मंगळवारीं मृत्तिका घालून, शुक्रवारीं शेण घालून तैलाभ्यंग केला असतां दोष नाहीं. आतां नित्य अभ्यंग करण्यामध्यें विशेष सांगतों–दररोज अभ्यंग करण्यास पक्व ह्म० कढलेलें वगैरे सर्व प्रकारचें तेल शुभकारक आहे. असें सांगितलें आहे कीं, नित्य स्नान करतांना तेल लावणाऱ्यास तिथि वगैरेंचा दोष नाहीं ॥ १० ॥

### आमलक स्नान, सूतिका स्नान.

दिग्विश्वाद्रिद्विगंकदर्शतिथिषु स्नानं न धात्रीफलैः ।
श्रीकामोऽथ बुधांबुपक्षेपितृभाभ्यंगात्पतिघ्न्यंगना ॥
पुत्री सोमदिने प्रसूर्यमपितृत्वाष्ट्रेंद्रमिश्रांबुप- ।
क्रव्यादेश्वरभे कुपुत्रहरिजे स्नायान्निशास्येऽपि न ॥ ११ ॥

**श्लोकार्थ**—दशमी, त्रयोदशी, सप्तमी, द्वितीया, नवमी, अमावास्या ह्या तिथींवर, वैभवाची इच्छा करणारानें, आंवळे घातलेल्या उदकानें स्नान करूं नये. बुधवारीं व शततारका, मघा ह्या नक्षत्रांवर स्त्रीनें अभ्यंग स्नान केलें तर ती पतीचा नाश करिते. पुत्रवान् पुरुषानें सोमवारीं अभ्यंग स्नान करूं नये. भरणी, मघा, चित्रा, ज्येष्ठा, कृत्तिका, विशाखा, शततारका, मूळ, आर्द्रा ह्या नक्षत्रांवर; पंचमस्थानीं पापग्रह असणाऱ्या लग्नीं आणि रात्रीच्या आरंभीं ह्मणजे प्रदोषकाळीं सूतिका ( बाळंत ) स्त्रीनें स्नान करूं नये ॥ ११ ॥

अथ प्रसंगेन तिलामलकस्नाने निषिद्धतिथीनाह–दिगिति । दिक् दशमी विश्वे त्रयोदशी अद्रिः

सप्तमी दृक् द्वितीया अंको नवमी दर्शः अमावास्या एतेषु तिथिषु श्रीकामः धात्रीफलैः आमलकीफलैः स्नानं नाऽऽचरेत् । तथा चोक्तं । यः करोति दशम्यां च स्नानमामलकैः सह । पुत्रहानिर्भवेत्तस्य त्रयोदश्यां धनक्षयः ॥ अर्थपुत्रक्षयस्तस्य द्वितीयायां न संशयः । अमायां च नवम्यां च सप्तम्यां च कुलक्षय इति ॥ अथ स्त्रीणां बुधादिषु अभ्यंगनिषेधमाह–बुधो बुधवारः अंबुपर्क्षं शततारका पितृभं मघा एतेष्वभ्यंगस्तस्मात् अंगना स्त्री पतिघ्नी स्यात् । उक्तं च । स्नानं कुर्वंति या नार्यश्चंद्रे शतभिषग्गते । सप्तजन्मभवेयुस्ता विधवा दुर्भगा ध्रुवमिति ॥ त्रिविक्रमशते । स्नानं नाऽऽरार्कशुक्रेज्यविष्टिसंक्रांतिपर्वसु । द्व्यष्टषड्दिक्त्रयोदश्यां स्त्रियस्तु न मघाबुधे ॥ अथ पुत्रवतः सोमवारेऽभ्यंगनिषेधमाह–पुत्रीति । पुत्रवान् सोमवारे न स्नायात् । उक्तं च । पुत्रवान् स्वगृहे नित्यं न स्नायादुत्तरामुखः । सोमवारे तथाऽभ्यंगं वर्जयेत्सर्वथा बुध इति ॥ अथ प्रसंगेन प्रसूतिकास्नाने निषेधकालमाह–प्रसूरिति । यमो भरणी पितरो मघा त्वाष्ट्रं चित्रा इंद्रो ज्येष्ठा मिश्रे कृत्तिकाविशाखे अंबुपः शततारा क्रव्यादो मूलं ईश्वरभमार्द्रा एषां समाहारस्तस्मिन् कुपुत्रहरिजे कुत्सितः पुत्रः पुत्रभावो यस्य तत्कुपुत्रं तच्च तद्धरिजं च तस्मिन् यस्माल्लग्नात्पंचमस्थः पापग्रहो भवति तस्मिन्नित्यर्थः । निशास्यं रात्रिमुखं सायंकालस्तस्मिन् प्रसूता न स्नायात् शेषं लग्नबलं प्राग्वत् । उक्तं च मघामूलविशाखार्द्राचित्रादितियमद्वये । ज्येष्ठासार्पजलेशर्क्षेनैव स्नायात्प्रसूतिका ॥ शुभग्रहयुते लग्ने पंचमे पापवर्जिते । परित्यज्य महादोषान् सूतिका स्नानमाचरेत् ॥ ११ ॥

**टीकार्थ**—आतां प्रसंगोपात आंवळेल तेलानें स्नान करण्यास निषिद्ध तिथि सांगतों–दिक् ह्म० दशमी, विश्व ह्म० त्रयोदशी, अद्रि ह्म० सप्तमी, दृक् ह्म० द्वितीया, अंक ह्म० नवमी दर्श ह्म० अमावास्या इतक्या दिवसांवर वैभव मिळण्याची इच्छा करणाऱ्यानें आंवळा घातलेल्या तेलानें स्नान करूं नये. तेंच सांगितलें आहे कीं, आंवळ्याच्या तेलानें दशमीस स्नान करण्यानें पुत्रहानि होते. त्रयोदशीस स्नान केलें असतां धनाचा क्षय होतो. द्वितीयेस केलें असतां द्रव्य आणि पुत्र ह्यांचा नाश होतो. अमावास्येस, नवमीस आणि सप्तमीस कुलाचा क्षय होतो. आतां स्त्रियांचा बुधवार इत्यादिकांवर अभ्यंग स्नानाचा निषेध सांगतों–बुध ह्म० बुधवार, अंबुप नक्षत्र ह्म० शततारका, पितृ नक्षत्र ह्म० मघा ह्यांवर स्त्रीनें अभ्यंग स्नान केलें असतां तिचा पति मरण पावतो. असें सांगितलें आहे कीं, ज्या स्त्रिया, चंद्र शताभिषक् नक्षत्रावर गेल्यावर अभ्यंग स्नान करितात. त्या स्त्रिया सात जन्म पर्यंत विधवा आणि दरिद्री अशा निश्चयानें होतात. त्रिविक्रम शत नामक ग्रंथांत सांगितलें आहे कीं, पुरुषांनीं, मंगळवारीं, रविवारीं, शुक्रवारीं, गुरुवारीं, विष्टि वर, संक्रांतीवर, पर्व ह्म० अमावास्या आणि पौर्णिमेवर, द्वितीया तिथीवर, अष्टमीवर, दशमीवर, त्रयोदशीवर अभ्यंग स्नान करूं नये. आणि स्त्रियांनीं मघा नक्षत्रावर आणि बुधवारीं अभ्यंग स्नान करूं नये. आतां पुत्रवानाला सोमवारीं अभ्यंग स्नानाचा निषेध सांगतों—ज्याला पुत्र आहे त्यानें सोमवारीं अभ्यंग स्नान करूं नये. असें सांगितलें आहे कीं, पुत्रवानानें आपल्या घरीं दररोज उत्तरेस तोंड करून स्नान करूं नये. आणि सोमवारीं व बुधवारीं अभ्यंग स्नान करूं नये. आतां प्रसंगोपात प्रसूतिकेला स्नान करण्याचा निषेध सांगतों–यम ह्म० भरणी, पितर ह्म० मघा, त्वाष्ट्र ह्म० चित्रा, इंद्र ह्म० ज्येष्ठा, मिश्र ह्म० कृत्तिका विशाखा, अंबुप ह्म० शततारका, क्रव्याद ह्म० मूळ, ईश्वर ह्म० आर्द्रा इतक्या नक्षत्रांवर आणि ज्या लग्नापासून पंचमस्थानीं पापग्रह असतो अशा लग्नीं रात्रीच्या आरंभीं ह्मणजे सायंकालीं प्रसूतिकेनें ह्म० बाळंत स्त्रीनें स्नान करूं नये. लग्नाचें बल पूर्वी प्रमाणेंच पहावें. असें सांगितलें आहे कीं, मघा, मूळ, विशाखा, आर्द्रा, चित्रा, अदिति नक्षत्र, यम ह्म० भरणी, द्वय ह्म० कृत्तिका व विशाखा, ज्येष्ठा, सार्प ह्म० आश्लेषा, वरुण ह्म० शततारका, इतक्या नक्षत्रांवर बाळंत स्त्रीनें स्नान करूं नये. पंचमस्थानीं पापग्रह नसून लग्नीं शुभ ग्रह असेल अशा सुमुहूर्तावर बाळंत स्त्रीनें स्नान करावें ॥ ११ ॥

### औषध करणें व रोग्यास देणें.

मंदारान्यदिने मृदुध्रुवचरक्षिप्रैर्वलक्षे सुधा- ।
योगे भेषजमाचरेत्सुमृतिकेंद्रारिव्ययांगे भिषक् ॥
तद्द्यादिहविध्रुवेंदुतनयप्रद्योतने रोगिणेऽ- ।
सृक्स्रावव्रणकर्मसूर्यकुजयोरह्नीह केंद्रस्थयोः ॥ १२ ॥

टीकार्थ—शनि, मंगळ रहित अन्यवारीं, मृदु, ध्रुव, चर, क्षिप्र संज्ञक नक्षत्रांवर; शुक्लपक्षांत, अमृत

सिद्धियोगावर आणि ८।१।४।७।१०।६।१२ ह्या स्थानीं पापग्रह नसून शुभग्रह असतील अशा लग्नीं वैद्यानें औषध तयार करावें. ध्रुव नक्षत्रें व बुध, रविवार सोडून वरील नक्षत्रादिकांवर रोग्याला औषध द्यावें. रवि, मंगळ ह्या वारीं व हे केंद्रस्थानीं असतां रक्तस्राव करणें, क्षतास औषध लावणें वगैरे कर्में करावीं ॥ १२ ॥

**अथौषधनिष्पादनमाह–मंदारेति। मंदः शनिरारो भौमस्ताभ्यामन्ये रविचंद्रबुधगुरुशुक्रास्तेषां दिनं तस्मिन् मृदुध्रुवचरक्षिप्रैर्नक्षत्रैः वलक्षे शुक्लपक्षे सुधायोगे अमृतयोगे ग्रंथांतरप्रसिद्धे सुमृति-केंद्रारिव्ययांगे शोभनानि पापग्रहरहितानि मृतिकेंद्रारिव्ययानि यस्य तत् सुमृतिकेंद्रारिव्ययं तच्च तदंगं च तस्मिन् भिषक् वैद्यः भेषजमाचरेत् कुर्यात्। शेषं लग्नबलं प्राग्वत्। अथौषधदानमाह–तदौषधं इहानंतरोक्ते भादौ दद्यात् कथं भूते इह विधुवेंदुतनयप्रद्योतने ध्रुवनक्षत्रबुधरविरहिते। अथ रक्तस्रावव्रणयोर्विशेषमाह–असृक्स्रावो रक्तस्रावः व्रणः क्षतं अनयोः कर्म सूर्यकुजयोरह्नि दिवसे आचरेत् कयोः सतोः सूर्यकुजयोः केंद्रस्थयोः सतोः। तथा चोक्तं। मंदारवर्जिते वारे चरक्षिप्रमृदुध्रुवैः। सूर्यसौम्यैः केंद्रगतैर्भेषजोत्पादनं हितं ॥ रक्तस्रावं कुजे कुर्यात्तद्धोरायामथापि वा। कुजे केंद्रेऽथ वा मंदे रवौ वा विखलेऽष्टमे ॥ व्रणक्रिया कुजे सूर्ये केंद्रगे तद्दिनेऽष्टमे। शुद्धषष्ठे च सक्रूरे चरलग्ने युवस्वर इति ॥ १२ ॥**

**टीकार्थ**—आतां औषध करावयाचा काळ सांगतों–मंद म्ह० शनिवार, आर म्ह० मंगळवार, ह्या दोन वारांशिवाय बाकीच्या वारीं म्ह० रवि, सोम, बुध, गुरु, आणि शुक्र ह्यांचे वारीं मृदु, ध्रुव, चर, क्षिप्र ह्या नक्षत्रांवर वलक्ष म्ह० शुक्लपक्षावर, अमृत सिद्धि योगावर ( जो अमृतसिद्धि योग दुसऱ्या ग्रंथांत प्रसिद्ध आहे. ) अष्टमस्थानीं, षष्ठस्थानीं, केंद्र म्ह० १-४-७-१० आणि बाराव्या स्थानीं पापग्रह नसतील अशा उत्तम लग्नीं वैद्यानें औषध करण्याचा आरंभ करावा. बाकीचें लग्नबल पूर्वीप्रमाणेंच जाणावें. आतां औषध देण्याचें तें सांगतों–आतां ह्या जवळच सांगितलेल्या नक्षत्रांवर औषध द्यावें. वर सांगितलेल्या नक्षत्रांपैकीं ध्रुवनक्षत्रें, बुधवार आणि रविवार इतके सोडून बाकीच्या नक्षत्रांवर व बाकीच्या वारांवर औषध देण्यास आरंभ करावा. आतां रक्ताचा स्राव आणि व्रण ह्यांचा विशेष सांगतों–रक्तस्रावाचें आणि क्षतास औषध लावण्याचें काम रवि आणि मंगळ ह्या दोन वारीं करावें किंवा रवि आणि मंगळ हे दोन ग्रह केंद्रस्थानीं असतील तेव्हां रक्तस्रावाचें आणि क्षतास औषध लावण्याचें काम करावें. तेंच सांगितलें आहे कीं, शनिवार आणि मंगळवार ह्या दोहोंखेरीज बाकीच्या वारांवर आणि चर, क्षिप्र, मृदु, ध्रुव ह्या नक्षत्रांवर सूर्य आणि बुध हे केंद्रीं असतां औषध तयार करावें आणि मंगळवारीं रक्ताचा स्राव करावा व मंगळाच्या होरावर आणि मंगळ केंद्रीं असतां रक्तस्राव करावा. तसेंच क्षतास औषध लावण्याचें काम शनिवारीं, मंगळवारीं आणि मंगळ व सूर्य हे केंद्रीं असतां षष्ठस्थान शुद्ध असतां आणि तेथें क्रूर ग्रह असतां चर लग्नावर क्षतास औषध लावण्याचें काम करावें ॥ १२ ॥

### रोगाचा अवधि व स्नान.

याम्याहित्रयवायुमूलजलपोपांत्यैंद्रहस्तांबुभे ।
शांत्याजद्विपयोर्नृपैर्नवदिनैरन्यत्र रुग्णो विरुक् ॥
आदित्याह्यनिलध्रुवांत्यपितृभे शुक्रेंदुवारे गद- ।
त्यक्तस्नानमनिष्टमिष्टमशुभे भादौ खलास्तस्थिरे ॥ १३ ॥

**श्लोकार्थ**—भरणी, आश्लेषा, मघा, पूर्वा, स्वाती, मूळ, शततारका, उत्तराभा०, ज्येष्ठा, हस्त, पूर्वाषाढा ह्यां नक्षत्रांवर, ज्वरादि व्याधि उत्पन्न झाला तर त्याची यथाविधि शांति केली म्हणजे रोगी रोगरहित होतो. श्रवण, विशाखा, ह्यांवर उत्पन्न झालेल्या रोगाची १६ दिवस पीडा, आणि बाकीच्या सर्व नक्षत्रांवर उत्पन्न झालेल्या रोगाची ९ दिवस पीडा जाणावी. पुनर्वसु, आश्लेषा, स्वाती, ध्रुव, रेवती, मघा ह्या नक्षत्रांवर आणि शुक्र, सोमवारीं रोगमुक्तानें स्नान करणें अशुभ जाणावें. व्यतीपात, वैधृति, भद्रा, संक्रांति, रिक्तातिथि इत्यादि अशुभ नक्षत्रादिकांवर आणि खलग्रह सप्तमस्थानीं असतील अशा स्थिर लग्नावर रोगमुक्तानें स्नान करणें शुभ होय ॥ १३ ॥

**अथ प्रसंगेन रोगमुक्तिदिवसानाह–वृत्तार्धेन याम्येति। याम्यं भरणी अहित्रयमाश्लेषात्रयं वायुः स्वाती मूलं प्रसिद्धं। जलपः शततारका उपांत्यं उत्तराभाद्रपदा इंद्रो ज्येष्ठा हस्तः प्रसिद्धः।**

अंबुभं पूर्वाषाढा अस्मिन्नक्षत्रगणे रुग्णो रोगी शांत्या यथोक्तशांतिकेन विरुक् ज्वरमुक्तो भवति। अजद्विपयोः श्रवणविशाखयोः रुग्णः नृपैः षोडशभिर्दिनैर्विरुक् स्यात् अन्यत्र अन्येषु नक्षत्रेषु रुग्णो नवदिनैर्विरुग्भवति एतज्ज्योतिषार्काभिप्रायं किंचिद्रत्नकोशाभिप्रायमुक्तं तत्र येषु नक्षत्रेषु ज्वरितस्य मृत्युरुक्तः येषु च कृच्छ्रेण बहुभिर्दिनैः ज्वरमुक्तिरुक्ता तत्फलमत्र शांत्या विरुगित्युक्तं क्वचिदन्यथा फलदर्शनात् । तथा येषु येषु नक्षत्रेषु सप्तभिर्नवभिरेकादशभिर्दिनैर्ज्वरनिर्मोचनमुक्तं तत्फलमत्र मध्यमत्वेन नवदिनैर्विरुगित्युक्तं ग्रंथलाघवाय स्वल्पांतरत्वात्। तथा च ज्योतिषार्के। सप्ताहमृतिनंदाद्रिरुद्रमृत्युनगाद्रिभिः। कृच्छ्रमृत्यू मृतीशैश्च कच्छ्रेशे व्यसुतान्नृपैरित्यादि ॥ अथोत्तरार्धेन रोगमुक्तिस्नानमाह—आदित्येति। आदित्यं पुनर्वसुः अहिराश्लेषा अनिलः स्वाती ध्रुवाणि पूर्वोक्तानि अंत्यं रेवती पितृभं मघा अस्मिन्नक्षत्रगणे शुक्रेंदुवारे शुक्रसोमवारे । गदत्यक्तस्नानं रोगमुक्तस्नानं अनिष्टं स्यात्। तर्हि कुत्र कर्तव्यमित्यत आह—अशुभे भादौ इष्टं शुभं स्यात् कस्मिन्सति खलास्तस्थिरे सति खलः पापग्रहः अस्ते यस्य तत्तथा तच्च तत्स्थिरं च तस्मिन्स्थिरलग्ने पापे सप्तमे सतीत्यर्थः। तथा चोक्तं। वैधृतौ व्यतिपाते च भद्रायां धिष्ण्यसंक्रमे। रोगमुक्तो नरः स्नायात्कुवारर्क्षतिथिष्वपि ॥ द्यूनं पापयुतं शस्तं दशमं च शुभान्वितं। सौम्यक्रूरयुतं रंध्ररोगस्थानेऽरिभं तथेति ॥ चंद्रबलं सर्वत्र योज्यं। कुतिथिभादौ सदित्यनेन चंद्रादिबलविषये मोहो मा भूदित्यतः चंद्रबलं सूचितं यतः ग्रंथादौ गर्भाधाने सदा इत्युक्तं तत्सर्वकर्मसु ज्ञेयमिति सर्वग्रंथकारसंमतं। यथा चोक्तं संहितायां स्पष्टम्। स्नायाद्रोगविमुक्तस्तु शुभयोश्चंद्रतारयोरिति ॥ १३ ॥

**टीकार्थ**—आतां प्रसंगानें रोगांतून मुक्त होण्याचे दिवस अर्ध्या वृत्तानें सांगतों—यम ह्म० भरणी, अहित्रय ह्म० आश्लेषा, मघा, पूर्वा, वायु ह्म० स्वाती, मूल, जलप ह्म० वरुण त्याचें नक्षत्र शततारका, उपांत्य ह्म० शेवटच्या नक्षत्राचे जवळचें ह्म० उत्तरा भाद्रपदा, इंद्र ह्म० ज्येष्ठा, हस्त, अंबुभ ह्म० पूर्वाषाढा, ह्या नक्षत्रांवर ज्वरादि रोग उत्पन्न झालेला रोगी, औषधोपचारादिक उपायांनीं शांत होऊन रोग रहित होतो. अज ह्म० श्रवण, द्विप ह्म० विशाखा ह्या दोन नक्षत्रांवर रोग झालेला रोगी सोळा दिवसांनीं रोगरहित होतो. ह्या शिवाय दुसऱ्या नक्षत्रावर रोग झालेला रोगी नऊ दिवसांनीं रोगरहित होतो. हा सर्व प्रकार ज्योतिषार्क ग्रंथाचा अभिप्राय घेऊन आणि रत्नकोश ग्रंथाचा अभिप्राय घेऊन सांगितला आहे. आतां ज्या नक्षत्रावर रोग उत्पन्न झाला असतां मृत्यु होतो ह्मणून सांगितलें त्या नक्षत्रावर मोठ्या संकटानें पुष्कळ दिवसांनीं त्या ज्वरादिक रोगाची शांति होते ह्मणून रोगमुक्त होतो असें सांगितलें आहे. कोठें कोठें तसें न होतां उलट प्रकारही दृष्टीस पडतो. तसेंच ज्या नक्षत्रांवर सात, नऊ, अकरा दिवसांनीं ज्वराची शांति सांगितली आहे त्या सर्वांचें फळ येथें मध्यमपक्ष घेऊन नऊ दिवसांनीं रोग शांति होते असें ग्रंथाचा विस्तार न होण्याकरितां थोडक्यांत सांगितलें आहे. तेंच ज्योतिषार्क ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सात दिवस, आठ दिवस, नऊ दिवस, अकरा दिवस, सतरा दिवस, अशा इतक्या दिवसांनीं मोठ्या कष्टानें मृत्यु होतो अथवा सोळा दिवसांनींही मोठ्या कष्टानें मृत्यु होतो. आतां उत्तरार्धानें रोगांतून बरा झाल्यावर स्नान करावयाचें तें सांगतों—आदित्य ह्म० पुनर्वसु, अहि ह्म० आश्लेषा, अनिल ह्म० स्वाती, ध्रुवनक्षत्रें, अंत्य ह्म० रेवती, पितृभ ह्म० मघा, ह्या नक्षत्रांवर शुक्रवारीं आणि सोमवारीं रोगांतून मुक्त झालेल्यानें स्नान केलें असतां त्यापासून त्याचें अनिष्ट होतें. तर केव्हां केलें असतां इष्ट होतें तें सांगतों— अशुभ अशा नक्षत्रादिकांवर केलें असतां शुभ होतें तें असें कीं, पापग्रह सप्तमस्थानीं असतील अशा स्थिर लग्नावर रोगमुक्त झालेल्यानें स्नान केलें असतां त्यापासून रोग्याचें इष्ट होतें. तेंच सांगितलें आहे कीं, वैधृति, व्यतिपात, भद्रा, संक्रमणावर, कुवारावर, कुतिथीवर सप्तमस्थान पापग्रह युक्त असेल आणि दशमस्थान शुभ ग्रह युक्त असेल आणि सौम्य व क्रूर युक्त असें अष्टमस्थान, तसेंच षष्ठस्थान असेल तर स्नान करणें प्रशस्त आहे. तसेंच चंद्र बल सर्व ठिकाणीं पाहणें आवश्यक आहे. कुतिथिं, कुवार इत्यादि सांगितलें ह्मणून चंद्राच बलाची ही आवश्यकता लागत नाहीं कीं काय ही शंका दूर करण्यास्तव चंद्र बल पाहिजे असें सांगितलें आहे कारण ग्रंथाचे आरंभीं गर्भाधानाविषयीं जें सांगितलें तें सर्व कर्माविषयीं घ्यावें असें ग्रंथकाराचें मत आहे. ज्याप्रमाणें संहितेंत स्पष्ट सांगितलें आहे. रोगमुक्त झालेल्यानें चंद्र आणि तारा ह्मणजे ग्रह शुभ असतां स्नान करावें ॥ १३ ॥

## द्रव्याचा व्यवहार.

द्रव्यं संव्यवहारतो लघुचरैर्योज्यं चरांगे बुधे।
ध्रमाष्टात्मजगेऽथ तस्य हरणे हस्तो रविर्ज्ञः कुजः॥

संक्रांतिर्भरणीत्रिपुष्करयमौ कुंभांत्ययोश्चंद्रमाः ।
वृद्धिश्चेति शुभा विदून इह यत्कुर्याद्दणं तत्स्थिरम् ॥ १४ ॥

श्लोकार्थ—लघु व चर संज्ञक नक्षत्रांवर; चर लग्नांवर आणि ९।८।५ ह्या स्थानीं बुध असतां व्याजानें द्रव्य द्यावें. हस्तनक्षत्र, रवि, बुध, मंगळ हे वार, संक्रांतिदिवस, भरणीनक्षत्र, त्रिपुष्कर व द्विपुष्कर योग, कुंभ व मीन राशीला असणारा चंद्र, आणि वृद्धियोग इतकीं हीं व्याजीं लाविलेलें द्रव्य परत घेण्याला शुभ होत. बुधवारावांचून वरच्या हस्त नक्षत्रादिकांवर कर्ज काढिलें तर स्थिर होतें; फिटत नाहीं ॥ १४ ॥

अथ व्यवहारद्रव्यं वृत्तेनैकेनाऽऽह–द्रव्यमिति । द्रव्यं सुवर्णादि संव्यवहारतः कुसीदव्यवहारेण लघुचरैर्नक्षत्रैर्योज्यं देयमित्यर्थः । क चरांगे चरलग्ने कस्मिन् सति बुधे धर्माष्टात्मजगे सति धर्मो नवमं अष्टमं प्र० आत्मजः पंचमं एष्वन्यतमस्थानगते सतीत्यर्थः । अन्यत्पूर्वोक्तं ज्ञेयं । अथानंतरं तस्य प्रयुक्तस्य हरणं पुनर्ग्रहणं तस्मिन्विषये हस्तो नक्षत्रं रविः रविवारः ज्ञो बुधवारः कुजो भौमवारः संक्रांतिः सूर्यसंक्रमणदिनं भरणी प्र० त्रिपुष्करो योगः यमो यमलयोगः त्रिपुष्करयमलयोगौ ग्रंथांतरे प्रसिद्धौ । रत्नमालायां । विषमचरणं धिष्ण्यं भद्रातिथिर्यदि संस्पृशेत्सुरगुरुशनिक्ष्मापुत्राणां कथंचन वासरे । मुनिभिरुदितः सोऽयं योगस्त्रिपुष्करसंज्ञक इत्यादि ॥ अथ यमलयोगः । शनिभौमेज्यवारेषु तिथिर्भद्रा द्विपादभं । तदा द्विगुणयोगः स्याद्विसंगुणफलप्रदः ॥ कुंभांत्ययोश्चंद्रमाः धनिष्ठापंचकं वृद्धिर्वृद्धियोगोऽपि शुभः हस्तादयोत्र स्वकीयद्रव्यहरणे शुभाः विदूने बुधदिनं विना । इह हस्तादौ यद्दणं कुर्यात् तत्स्थिरं स्यात् ॥ तथा चोक्तं । चरैः क्षिप्रैश्चरे लग्ने बुधे धर्मसुताष्टमे । व्यवहारविना द्रव्यप्रयोगो मुनिभिः स्मृतः ॥ भरण्यां संग्रहं कुर्यात्पंचके ज्ञे त्रिपुष्करे । ऋणकर्म चरैः क्षिप्रैर्ऋणच्छेदः कुजे हितः ॥ पंचके पंचगुणितं त्रिगुणं च त्रिपुष्करे ॥ यमले द्विगुणं प्रोक्तं हानिवृद्ध्यादिकं बुधैः ॥ ऋणं भौमे न कुर्वीत न देयं बुधवासरे । ऋणच्छेदं कुजे कुर्यात्संचयं सोमनंदने ॥ हस्तार्कवारे संक्रांतौ यद्दणं स्यात्कुलेषु तत् । वृद्धियोगे तथा ज्ञेयमृणच्छेदं तु कारयेदिति ॥ १४ ॥

टीकार्थ—आतां व्यवहार द्रव्य एका वृत्तानें सांगतों—सोनें इत्यादिक ठेवून व्याजबट्टा करण्याकरितां जो व्यवहार ह्मणजे देवघेव करावयाची ती लघु आणि चर अशा नक्षत्रांवर करावी. चर लग्न असूनही बुध ग्रह ९–८–५ ह्या स्थानीं असावा. बाकीचें सर्व पूर्वीप्रमाणेंच समजावें. आतां दिलेलें द्रव्यादि पुनः घेण्याविषयीं. हस्त नक्षत्र, रविवार, बुधवार, मंगळवार, सूर्यसंक्रमण दिवस, भरणी,त्रिपुष्करयोग, यमलयोग,(द्विपुष्कर योग) हे दोन योग दुसऱ्या ग्रंथांत प्रसिद्ध आहेत. रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, गुरुवारीं, शनिवारीं, मंगळवारीं ह्यांपैकीं एका वारीं विषम चरणाचें नक्षत्र आणि भद्रा तिथि हे तिघे असतील तर त्रिपुष्करयोग होतो असें मुनींनीं सांगितलें आहे. आतां यमलयोग सांगतों—शनिवार, मंगळवार, गुरुवार ह्यांपैकीं एक वार, भद्रातिथि, द्विचरण नक्षत्र, इतके असतील त्या वेळेस दुप्पट योग असतो ह्मणून हा योग दुप्पट फल देणारा आहे. कुंभ आणि मीनराशीचा चंद्र, धनिष्ठापंचक, वृद्धियोग इतके हस्तादिक आपलें दिलेलें द्रव्य माघारें घेण्यास शुभकारक आहेत. मात्र बुधवार वर्ज्य करावा. ह्या हस्तादिकांवर कर्ज केलें तर तें फारच स्थिर होऊन रहातें. तेंच सांगितलें आहे कीं, चर, क्षिप्र, अशा नक्षत्रांवर आणि चर लग्नावर, बुध हा ९–८–५ ह्या स्थानीं असतां व्यवहाराशिवाय एरव्हीं द्रव्याचा प्रयोग करावा असें मुनींनीं सांगितलें आहे. भरणी नक्षत्रावर द्रव्याचा संग्रह करावा. धनिष्ठा पंचकावर, बुधवारीं, त्रिपुष्करयोगावर, कर्ज करावें आणि चर आणि क्षिप्र नक्षत्रांवर बुधवारीं ऋणाचा छेद करावा. धनिष्ठा पंचकांतील कर्ज पांचपट होतें. त्रिपुष्करांतील तिप्पट होतें. यमलांतील दुप्पट होतें, ह्मणजे धनको व रिणको ह्यांस वृद्धि आणि हानि होते. मंगळवारीं ऋण करूं नये, बुधवारीं ऋण देऊं नये. ऋणाचा निकाल मंगळवारीं करावा, सोमवारीं द्रव्याचा संग्रह करावा. हस्त नक्षत्र, रविवार, संक्रमण दिवस ह्यांवर ज्या कुळांत ऋण झालें असेल तें वृद्धियोगाकरितां जाणावें ह्मणून त्या ऋणाचा छेद करवावा ॥ १४ ॥

### नष्ट द्रव्यलाभ, द्रव्यनिक्षेप, मंत्रग्रहण व वृक्षारोपण.

तीक्ष्णोग्रध्रुवमिश्रवायुषु धनं नष्टादिकं नैति का- ।
द्रेऽब्ध्याप्ते त्रिखशेषयोर्न गतमेत्यंत्यांबुशुद्धौ क्षिपेत् ॥

विद्यां प्रोक्तवदिष्टदेवतिथिभेऽथ द्वीशमूलध्रुवै-।
र्मृद्वश्वीज्यकरांबुपैः सुजलखाब्जांगे तरून् रोपयेत् ॥ १५ ॥

श्लोकार्थ—तीक्ष्ण, उग्र, ध्रुव, मिश्र, स्वाती ह्या नक्षत्रांवर उसनें दिलेलें, व्याजीं लाविलेलें, पुरलेलें किंवा हरवलेलें द्रव्य प्राप्त होत नाहीं. रोहिणी नक्षत्रापासून प्रश्नकाळचें दिवसनक्षत्र मोजून ४ नीं भागून बाकी ३।० राहील तर गेलेलें द्रव्य परत मिळणार नाहीं. मागें विद्यारंभाला सांगितलेल्या मुहूर्तावर आणि जी मंत्रविद्या ग्रहण करावयाची तिच्या इष्ट देवतेच्या तिथिनक्षत्रादिकांवर, ती मंत्रविद्या गुरूपासून शिकावी. विशाखा, मूळ, ध्रुव, मृदु, अश्विनी, पुष्य, हस्त, शततारा ह्या नक्षत्रांवर आणि जलचरलग्नीं चंद्र असून, ४।१० स्थानीं पापग्रह नसतां सर्व प्रकारचीं झाडें लावावीं ॥ १५ ॥

अथ तीक्ष्णादिषु नष्टादिद्रव्यस्य प्राप्तिं तथा द्रव्यनिक्षेपं वृत्तार्धेनाऽऽह–तीक्ष्णेति। तीक्ष्णोग्रध्रुवमिश्राणि पूर्वोक्तानि वायुः स्वाती एषु नष्टादिकं धनं नष्टप्रयुक्तविनिक्षिप्तादिकं सुवर्णादिकं द्रव्यं नैति तथा कात् रोहिणीनक्षत्रात् भे इष्टनक्षत्रे अब्ध्याप्ते चतुर्भक्ते सति त्रिखशेषयोः गतं न एति। अथ द्रव्यनिक्षेपमाह–अंत्यांबुशुद्धौ क्षिपेत् धनमित्यनुषंगः अंत्यं द्वादशं अंबु चतुर्थं अनयोः शुद्धिः पापराहित्यं तस्यां सत्यां क्षिपेत् निक्षिपेदित्यर्थः। तथा चोक्तं। साधारणोग्रतीक्ष्णेषु स्वात्यां द्रव्यं न लभ्यते। दत्तं प्रयुक्तं निक्षिप्तं नष्टमित्याह नारदः॥अथ नृसिंहादिमंत्रविद्यासाधनमुहूर्तं तथा वृक्षारोपणमुहूर्तमुत्तरार्धेनाऽऽह-विद्यामिति।विद्यां मंत्रविद्यां प्रोक्तवत् वेदविद्योक्तभादौ विद्या मौंज्युक्तभादौ इत्याद्युक्तेः।तथा स्वदेवतिथिभे स्वेष्टदेवतिथिनक्षत्रे साधयेत् गुरुमुखाद्गृह्णीयादित्यर्थः। तत्राऽऽगमोक्तमंत्रग्रहणेऽनध्यायदोषो नास्ति तत्तु स्वदेवतिथिभे इत्यनेनैव पदेन परिहृतम्। तथा चोक्तं। मृदुध्रुवचरक्षिप्रैर्वारार्कौ धर्मसत्क्रिया। कार्या विद्योक्तभैर्दीक्षा स्वदेवतिथिभेषु चेति ॥ अथ वृक्षारोपणमाह–द्वीशं विशाखा मूलं प्र० ध्रुवमृदूनि पूर्वोक्तानि अश्विनी प्र० इज्यः पुष्यः करो हस्त. अंबुपः शततारका एभिर्नक्षत्रैः तरून् पादपान् रोपयेत् कस्मिन् सुजलखाब्जांगे अंगेऽब्जः अब्जांगं अंगं लग्नं तस्मिन्नब्जः चलचरराशिः चंद्रो वातदब्जांगमुच्यते जलं च खं च जलखे शोभने जलखे यस्य तत् सुजलखं तच्च तदब्जांगं च सुजलखाब्जांगं तस्मिन् शोभने पापग्रहरहिते जलखे चतुर्थदशमे यस्याब्जांगस्य तस्मिन्नित्यर्थः। शेषं पूर्ववत् ॥ १५ ॥

टीकार्थ—आतां तीक्ष्ण इत्यादि नक्षत्रांवर हरवलेलें द्रव्य, इत्यादि प्रकारच्या द्रव्याची प्राप्ति तसाच द्रव्याचा निक्षेप अर्ध्या वृत्तानें सांगतों—तीक्ष्ण, उग्र, ध्रुव आणि मिश्र हीं नक्षत्रें पूर्वी सांगितलीं आहेत त्या नक्षत्रांवर आणि वायु ह्म० स्वाती ह्या नक्षत्रांवर उसनें दिलेलें, हरवलेलें,व्याजीं लावलेलें, जमिनींत पुरलेलें सोनें इ० द्रव्य माघारीं येत नाहीं.तसेंच क ह्म० रोहिणी नक्षत्रापासून तों इष्ट नक्षत्रापर्यंतचीं नक्षत्रें ४ नीं भागावींत तीन आणि शून्य बाकी राहील तर गेलेलें द्रव्य पुनः मिळणार नाहीं. आतां द्रव्याचा निक्षेप सांगतों—अंत्य स्थान ह्मणजे बारावें स्थान आणि अंबु ह्म० चतुर्थ स्थान ह्या दोन स्थानीं पापग्रह नसेल अशा लग्नीं द्रव्याचा निक्षेप करावा. तेंच सांगितलें आहे कीं, साधारण, उग्र आणि तीक्ष्ण ह्या नक्षत्रांवर आणि स्वाती नक्षत्रावर गेलेलें, ठेवलेलें वगैरे द्रव्य पुनः मिळत नाहीं. नारद ह्मणतो कीं, दिलेलें, व्याजीं लावलेलें, ठेवलेलें, नाहींसें झालेलें असें चार प्रकारचें द्रव्य घ्यावें. आतां नृसिंह इत्यादि देवांचे जे मंत्र असतात ते शिकण्याचे व साधन करण्याचे मुहूर्त, झाड लावण्याचे मुहूर्त उत्तरार्धानें सांगतों–पूर्वी विद्यारंभाला जे मुहूर्त सांगितले आहेत त्याच मुहूर्तांवर ह्मणजे मौंजीच्या वेळीं वेदविद्येच्या वेळेस सांगितलेल्या मुहूर्तांवर नृसिंहादि मंत्रविद्या गुरूपासून शिकून घ्यावी. मात्र हे नृसिंहादि मंत्र आगमोक्त असल्याकारणानें त्याला अनध्यायाचा दोष नाहीं. हे आपल्या देवाची जी तिथि व नक्षत्र असेल त्या तिथीवर व नक्षत्रांवर त्या मंत्रविद्येचा गुरूपासून स्वीकार करावा. ह्या सांगण्यानेंच अनध्यायाचा दोष नाहीं असें झालें आहे. तेंच सांगितलें आहे कीं, मृदु, ध्रुव, चर, क्षिप्र ह्या नक्षत्रांवर मंगळवारीं, रविवारीं विद्यारंभास सांगितलेल्या नक्षत्रांवर अथवा आपल्या देवाच्या तिथि व नक्षत्रांवर नृसिंहादि मंत्र शिकावा. आतां वृक्ष लावण्याचा मुहूर्त सांगतों–द्वीश ह्म० विशाखा, मूल, ध्रुव नक्षत्रें, मृदु नक्षत्रें, अश्विनी, इज्य ह्म० पुष्य, कर ह्म० हस्त, अंबुप ह्म० पाशी ह्म० शततारका इतक्या नक्षत्रांवर झाडें लावावींत. मात्र लग्नीं जलचरराशी अथवा चंद्र असे असावेत आणि जल ह्म० चतुर्थ स्थान आणि ख ह्म० दशम ह्या स्थानीं पापग्रह नसावा, बाकीचें पूर्वीप्रमाणेंच जाणावें ॥ १५ ॥

वापीकूपादि, राजदर्शन व शांतिक, पौष्टिक.

उद्वाहर्क्षहरित्रयादिति हयेज्यर्क्षैस्तडागादयः ।
ज्ञेज्याब्जैस्तनुगैः सिते दशमगे सिद्ध्यंति सद्वासरे ॥
राजेक्षा श्रवणत्रयध्रुवमृदुक्षिप्रैः स्वकेंद्रायगैः ।
सौम्यैः शांतिकपौष्टिके सचरभैरेतैः सुधर्मोदये ॥ १६ ॥

श्लोकार्थ—विवाहाचीं ११ नक्षत्रें व श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, अश्विनी, पुष्य ह्या नक्षत्रांवर, जलचर लग्नीं बुध, गुरु, चंद्र असून शुक्र दशमस्थानीं असतां; आणि शुभग्रहांच्या वारीं वापी, कूप, तडाग इत्यादि जलाशयांचा आरंभ केला तर तीं सिद्धीस जातात. श्रवण, धनिष्ठा, शततारका, ध्रुव, मृदु, क्षिप्र ह्या नक्षत्रांवर, आणि २।१।४।७।१०।११ ह्या स्थानीं शुभग्रह असतां प्रथम राजदर्शन करावें. ह्याच राजदर्शनाच्या श्रवणादि नक्षत्रांवर, व चरनक्षत्रांवर, आणि नवमस्थानीं पापग्रह नसतील अशा लग्नीं शांतिक व पौष्टिक कृत्यांचा आरंभ करावा ॥ १६ ॥

अथ वापीकूपादीन्वृत्तार्धेनाऽऽह–उद्वाहेति । उद्वाहर्क्षाण्येकादशसंख्याकानि पूर्वोक्तानि हरित्रयं श्रवणत्रयं अदितिः पुनर्वसुः हयः अश्विनी इज्यः पुष्य एभिस्तडागादयो जलाशयाः सिद्ध्यंति कैः ज्ञेज्याब्जैस्तनुगैः ज्ञो बुधः इज्यो गुरुः अब्जश्चंद्रः जलचरराशिश्च एतैस्तनुगैर्लग्नगतैः कस्मिन् सति सिते दशमगे सति शुक्रे दशमगे सति क्व सद्वासरे सद्ग्रहवासर इत्यर्थः । तथा चोक्तं चित्रा स्वातिपुनर्वसू मृगशिरोमूलाश्विनीरोहिणीहस्ताः पुष्यधनिष्ठकं शतभिषङ्मित्रोत्तररेवती । एतेषु श्रवणान्वितेषु मकरे लग्ने च कुंभे झषे वापीकूपजलाशयाखिननं शस्तं प्रशस्ते दिने ॥ अन्यच्चोक्तं । सर्वतोयाशयारंभः कर्तव्यो विबलैः खगैः । लग्नस्थे ज्ञेऽथ वा जीवे लग्नभेऽब्जे स्थिते खग इति ॥ अथोत्तरार्धेन राजदर्शनं शांतिकपौष्टिके चाऽऽह– राजेक्षेति । श्रवणत्रयध्रुवमृदुक्षिप्रैर्नक्षत्रैः राजेक्षा राजदर्शनं कार्यं शुगमं पुनः कैः सौम्यग्रहैः स्वकेंद्रायगैः २।१।४।७।१०।११। लग्नात् स्व २ केंद्रा-१।४।७।१० यं ११ गैः शुभग्रहैरित्यर्थः । शेषं प्राग्वत् । शांतिकपौष्टिके आह– शांतिकपौष्टिके एतैरेव नक्षत्रैः श्रवणत्रयादिभिर्विधेये कथं भूतैरेभिः सचरभैः चरनक्षत्रसहितैः कस्मिन्सति सुधर्मोदये शोभनः पापरहितः धर्मो नवमं यस्य ससुधर्मः स चासावुदयश्च स तथा । उदयो लग्नं तस्मिन्नित्यर्थः । शेषं पूर्ववत् ॥ १६ ॥

**टीकार्थ**—आतां वापी कूप ह्मणजे विहीर, आड इत्यादिक करण्याचा आरंभ अर्ध्या वृत्तानें सांगतों–विवाहाचीं अकरा नक्षत्रें सांगितलीं आहेत त्या नक्षत्रांवर, श्रवणत्रय ह्म० श्रवण, धनिष्ठा, शततारका, अदिति ह्म० पुनर्वसु, हय ह्म० अश्विनी, इज्य ह्म० पुष्य, इतक्यांवर आड, विहीर, तलाव इत्यादि खणण्याचा आरंभ केला असतां ते सिद्धीस जातात आणि त्यावेळीं ज्ञ ह्म० बुध, इज्य ह्म० गुरु, अब्ज ह्म० चंद्र, आणि जलचर राशि हे तनु ह्म० लग्नीं असले पाहिजेत. आणि दशमस्थानीं शुक्र असावा. तसेंच वारही शुभवार असावेत. तेंच सांगितलें आहे कीं, चित्रा, स्वाती, पुनर्वसु, मृगशीर्ष, मूळ, अश्विनी, रोहिणी, हस्त, पुष्य, धनिष्ठा, शतभिषक्, मित्रनक्षत्र, रेवती, श्रवण इतक्या नक्षत्रांवर मकर, कुंभ, मीन, ह्या लग्नांवर आड, तलाव, विहीर इत्यादिकांचें खनन करणें प्रशस्त आहे. दुसरे ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, सर्व ग्रह विबल असतां आणि लग्नीं बुध, गुरु आणि चंद्र असतां सर्व प्रकारच्या जलाशयांचा आरंभ करावा. आतां उत्तरार्धानें राजाचें दर्शन आणि शांतिक व पौष्टिक सांगतों–श्रवणत्रय ह्म० श्रवण, धनिष्ठा आणि शततारका, ध्रुवनक्षत्रें, मृदुनक्षत्रें, क्षिप्रनक्षत्रें ह्यांवर राजाचें दर्शन करावें परंतु शुभ ग्रह हे स्व ह्म० २ केंद्र ह्म० १–४–७–१०– आय ह्म० ११ अर्थात्–२–१–४–७–१०–११ इतक्या स्थानीं असतां राजाचें दर्शन करावें. बाकीचें पूर्वीप्रमाणेंच समजावें. आतां शांतिक आणि पौष्टिक सांगतों–ह्यापूर्वीं सांगितलेल्यां नक्षत्रांवरच शांतिक आणि पौष्टिक कर्में करावींत. मात्र या नक्षत्रांत चार नक्षत्रें अधिक घ्यावींत. आणि धर्म ह्म० नवमस्थान या ठिकाणीं शुभग्रह असावा. अर्थात् भाग्यस्थानीं पापग्रह नसावा. तसाच लग्नींही पापग्रह नसून शुभ ग्रह असावा. बाकीचें पूर्वीं प्रमाणेंच जाणावें ॥ १६ ॥

## दिव्य आणि अस्तनिर्णय.

दिव्यं नैव मलिम्लुचे विधुसितेज्यास्ते रवावष्टमे ।
मंदाराह्नि खलोदये स्थिरतनौ कुर्यात्कृतेऽदोऽन्यथा ॥
श्रीशैलग्रहणायनेषु विषुवे संकीर्णजातावुपा- ।
कृत्युत्सर्गवधूप्रवेशनगयागोदासु नित्याब्दिके ॥ १७ ॥

श्लोकार्थ—अधिक मासांत, चंद्र, शुक्र, गुरु ह्यांचें अस्त असतां, जन्मराशीपासून रवि अष्टमस्थानीं असतां, शनिवारीं व मंगळवारीं, ज्याचा स्वामी खल आहे अशा लग्नीं खल ग्रह असतां व स्थिर लग्नावर दिव्य ( शपथ ) करूं नये. केलें तर तें विपरीत होतें. ज्यावर मल्लिकार्जुन लिंग आहे तो श्रीशैल, चंद्राचें व सूर्याचें ग्रहण, अयन संक्रांति ह्म० कर्क, मकर, विषुवसंक्रांति ह्म० मेष, तूळ, मिश्रजातीकर्म, उपाकर्म, उत्सर्जन, वधूप्रवेश, गयाक्षेत्र, गोदातीर्थ व नवरात्रादि प्रतिवर्षीं करावयाचीं कृत्यें ह्यांविषयीं गुरु शुक्राच्या अस्ताचा दोष नाहीं ॥ १७ ॥

अथ वृत्तार्धेन दिव्यमाह–दिव्यमिति । मलिम्लुचे मासे विधुसितेज्यास्ते विधुश्चंद्रः सितः शुक्रः इज्यो गुरुस्तेषामस्ते विधोरस्तः कृष्णपक्षे भवति रवावष्टमे गोचरेण सूर्येऽष्टमे मंदाराह्नि शनिभौमदिने खलोदये पापराश्युदये यद्वा उदये खलः खलोदयस्तस्मिन् स्थिरतनौ स्थिरलग्ने दिव्यं नैव कुर्यात् । अत्र दिव्ये कृते सति अदो दिव्यमन्यथा विपरीतं स्यात् । असत्यवादिनो जयकारि भवतीत्यर्थः । अर्थादन्यत्र कर्तव्यमिति सिद्धं । लग्नबलं प्राग्वत् । अथ गुरुशुक्रयोः मौढ्यदोषः कुत्र कुत्र नास्तीति वृत्तार्धेनाऽऽह– श्रीशैलेति । श्रीशैलः प्रसिद्धः यत्र मल्लिकार्जुनाभिधानं लिंगमस्ति ग्रहणं सूर्यचंद्रयोः अयने दक्षिणोत्तरे विषुवं मेषतुलासंक्रमः संकीर्णजातिर्हीनजातिः उपाकृतिरुपाकर्म उत्सर्गश्छंदसामुत्सर्गः वधूप्रवेशनं प्रसिद्धं गया प्रसिद्धा गोदा गोदावरी नित्याब्दिकं प्रतिवर्षं यत्क्रियते तथा नवरात्रम् ॥ १७ ॥

टीकार्थ—आतां अर्ध्या वृत्तानें दिव्य ह्मणजे शपथ सांगतों—अधिक महिन्यांत विधु ह्म० चंद्र, सित ह्म० शुक्र, इज्य ह्म० गुरु ह्यांचा अस्त असतां, गोचरीं रवि अष्टमस्थानीं असतां, शनिवारीं, मंगळवारीं पापराशींचा उदय असतां, अथवा उदयीं खलाचा उदय ह्म० स्थिरलग्नीं दिव्य ह्म० शपथ करूं नये. अशा सांगितलेल्या प्रकारांवर दिव्य केलें असतां तें पुनः उलट होतें ह्म० खोटें करणारास जय मिळतो. अर्थात् वर सांगितलेल्या प्रकारांशिवाय दुसऱ्या वेळीं दिव्य करावें, असें सिद्ध झालें. लग्नबल पूर्वीप्रमाणेंच समजावें. आतां गुरु आणि शुक्र ह्यांच्या अस्ताचा दोष कोठें कोठें नसतो तें अर्ध्या वृत्तानें सांगतों—श्रीशैलावर ह्मणजे जेथें मल्लिकार्जुन नांवाचें लिंग आहे तेथें, चंद्रसूर्यांचे ग्रहणीं, दक्षिणायन आणि उत्तरायण, विषुव संक्रांती ह्म० मेष, तूळ, मिश्रजातिकर्म, उपाकर्म, उत्सर्जन, वधूप्रवेश, गयाक्षेत्र, गोदातीर्थ, प्रतिवर्षीं करावयाचीं नवरात्रादिक कार्यें इतक्या कार्यांविषयीं गुरूच्या व शुक्राच्या अस्ताचा दोष नाहीं ॥ १७ ॥

## गुरुशुक्रास्ताचे अपवाद.

ईशानादिबलौ हरेः शयनपर्यावर्तने नैत्यके ।
याने जीर्णगृहेऽवरोहदमनारोपे पवित्रार्पणे ॥
चातुर्मास्यविधौ न जीवसितयोर्मूढत्वदोषोऽष्टका- ।
सूत्साहांबरधारणेषु गदितो गर्भादिसप्तस्वपि ॥ १८ ॥

श्लोकार्थ—ईशानबलि, सर्पबलि, आषाढ शु० १२ चें विष्णुशयन, भाद्रपद शु० १२ चें पर्यावर्तन, नित्यागमन, जीर्णगृह, देवांचें दोलावरोहण, दमनारोपण, पवित्रार्पण, चतुर्मासांत करावयाचीं व्रतें, मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गुन ह्यांच्या वद्य अष्टमीला करावयाचीं अष्टकाश्राद्धें, पुत्रजन्मादि उत्साह, वस्त्रधारण आणि गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन हे सात संस्कार ह्या सर्वांला गुरु व शुक्र यांच्या अस्ताचा दोष नाहीं ॥ १८ ॥

ईशानेति। ईशानाहिबलिः ईशानबलिः प्रसिद्धः अहिबलिः सर्पबलिः हरेः शयनपर्यावर्तने विष्णोः शयनमाषाढशुक्लद्वादश्यां भवति पर्यावर्तनं भाद्रपदशुक्लद्वादश्यां भवति नैत्यकं यानं नित्यगमनं जीर्णगृहं प्रसिद्धं अवरोहः देवानां दोलारोहः पूजाविशेषः दमनारोपश्चैत्र्यां पवित्रार्पणं श्रावण्यां चातुर्मास्यविधौ चातुर्मास्यव्रतेऽष्टकाः पवर्गीयाक्षरनाम्नां मासानां कृष्णाष्टम्योऽष्टकाः मार्गपौषमाघफाल्गुनानां कृष्णाष्टम्य इत्यर्थः। उत्साहाः पुत्रोत्पत्त्यादयोंऽबरधारणं वस्त्रधारणं एषु जीवसितयोर्गुरुशुक्रयोर्मूढत्वदोषो नास्तीत्यर्थः। न केवलमेषुगर्भादिसप्तस्वपि गर्भाधानाद्यन्नप्राशनांतेषु सप्तसु संस्कारेषु मूढत्वदोषो न गदितः गर्भाद्यन्नाशनांतेष्वित्यत्र श्लोके यद्यपि प्रागुक्तं। तथा च गर्गः। नित्ययाने गृहे जीर्णे प्राशने पारिधानके। वधूप्रवेशमांगल्ये न मौढ्यं गुरुशुक्रयोः॥ भृगुः। उपाकर्मोत्सर्जनं च पवित्रदमनार्पणं। अवरोहः सहेमंतः सर्पाणां बलिरष्टकाः॥ ईशानस्य बलिर्विष्णोः शयनं परिवर्तनं। कुर्याच्छुक्रस्य च गुरोर्मौढ्येऽपीति विनिश्चयात्॥ धर्मप्रदीपे। गोदावर्यां गयायां च श्रीशैले ग्रहणद्वये। अयने विषुवे चैव चातुर्मास्यव्रतेषु च॥ उत्सवेषु च सर्वेषु सीमंतक्रतुकर्मणि। सुरासुरेज्ययोश्चैव मौढ्यदोषो न विद्यते॥ कालनिर्णये। नष्टे शुक्रे तथा जीवे सिंहस्थे च बृहस्पतौ। कार्या चैव स्वदेव्यर्चा प्रत्यब्दं कुलधर्मतः॥ मत्स्यपुराणे। मौढ्येऽपि च प्रकर्तव्या मिश्रजातिक्रियाः शुभाः। सुरेज्यशुक्रयोर्वर्णिक्रियाश्चौलादिका न चेति॥ १८॥

**टीकार्थ**—ईशान बलि, सर्प बलि, विष्णूचें शयन, ह्म० आषाढ शुद्ध १२ विष्णूचें पर्यावर्तन, ह्म० भाद्रपद शुद्ध १२ नित्यागमन, जीर्णगृह, देवांचे दोलावर आरोहण करणें, दमनारोपण ह्मणजे चैत्र महिन्यांत दवणा समर्पण करणें, पवित्रारोपण ह्मणजे श्रावण महिन्यांत पवित्रारोपण करावयाचें तें, चातुर्मास्याच्या उद्देशानें करावयाचीं व्रतें, ज्या महिन्याच्या नावांत पवर्गाचीं ह्मणजे प, फ, ब, भ, म, अशीं अक्षरें आहेत ह्मणजे मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गुन ह्या चार महिन्यांमध्यें वद्य अष्टमीस करावयाचीं अष्टका श्राद्धें, उत्साह ह्मणजे पुत्राचे जन्मादिकांचा उत्साह ह्मणजे वाढदिवस, वस्त्र धारण करणें इतक्या कार्यांमध्यें गुरु आणि शुक्र ह्यांच्या अस्ताचा दोष नाहीं. केवळ इतक्याच कार्यांमध्यें गुरु आणि शुक्र ह्यांच्या अस्ताचा दोष नाहीं एवढेंच नाहीं तर गर्भाधानापासून अन्नप्राशनापर्यंतच्या सात संस्कारांमध्येंही अस्ताचा दोष नाहीं. जसें कीं, गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन हे सात संस्कार अमुक अमुक महिन्यांतच करावेत असें सांगितल्यामुळें त्याला काल नियम झाला, ह्याकरितां त्यांना अस्ताचा नियम नाहीं. हे संस्कार पूर्वीं सर्व सांगितले आहेत. तेंच गर्ग सांगतो कीं, नित्यगमन, जीर्णगृह, अन्नप्राशन, वस्त्रधारण, वधू प्रवेश, मांगलिक कार्य ह्मणजे गर्भाधानादि इतक्या कार्यांमध्यें गुरु आणि शुक्र ह्यांच्या अस्ताचा दोष नाहीं. भृगु सांगतो कीं, उपाकर्म, उत्सर्जन, पवित्रारोपण, दमनारोपण, अवरोह ह्म० देवाचें दोलारोहण ( तें हेमंतऋतूंमधील घ्यावयाचें ) सर्प बलि, अष्टका श्राद्धें ( मार्गशीष, पौष, माघ, फाल्गुन ह्यांतील वद्य अष्टमीचीं श्राद्धें ) ईशान बलि, विष्णूचें शयन, विष्णूचें परिवर्तन, इतकीं कार्यें शुक्राचें आणि गुरूचें मौढ्य ह्मणजे अस्त असतांही करावें असा निश्चय आहे. धर्मप्रदीप ग्रंथांत सांगितलें आहे कीं, गोदा यात्रेंत, गया यात्रेंत, श्रीशैलपर्वतावर मल्लिकार्जुन यात्रेंत, चंद्र आणि सूर्य ह्या दोघांच्या ग्रहणाविषयीं, दक्षिणायन आणि उत्तरायण ह्या दोन अयनांमध्यें, विषुव संक्रांतीमध्यें, चातुर्मास्यांतील व्रताविषयीं, सर्व प्रकारच्या उत्सव कार्यांमध्यें सीमंतोन्नयन, गर्भाधान ह्या सर्व कार्यां विषयीं सुरगुरु ह्म० गुरु, असुरगुरु ह्मणजे शुक्र ह्यांच्या अस्ताचा दोष नाहीं. काल निर्णय ग्रंथांत सांगितलें आहे कीं, शुक्राचा आणि गुरूचा अस्त असतां आणि गुरु सिंहराशीस असतां आपल्या देवीची अर्चा ह्म० पूजा करावी कारण ती प्रति वर्षास करावयाची असते व तो कुलधर्म आहे. मत्स्य पुराणांत सांगितलें आहे कीं, सुरेज्य ह्म० गुरु आणि शुक्र ह्या दोघांचा अस्त असतांही मिश्रजातीक्रिया आणि वर्णी ह्मणजे आश्रमी ह्यांच्या क्रिया कराव्यात, मात्र चौल इत्यादिक क्रिया करूं नयेत ॥ १८ ॥

### तीर्थयात्रानिषेध व प्रेतकर्म निषेध.

शुक्रेज्यास्तमयेऽधिकक्षयजनुर्मासेषु जन्मर्क्षके।
नापूर्वामरतीर्थदर्शनमियाद्गोदागयाभ्यामृते॥
एष्वाषाढसहस्यविष्णुशयनेष्वप्यंत्यकर्म त्यजे-।
द्यद्वर्षाधिकलंबितं भवति तद्गोदागयातोऽन्यतः॥ १९॥

इति मिश्रप्रकरणं समाप्तम्॥

श्लोकार्थ—गुरुच्या व शुक्राच्या अस्तांत, अधिक मासांत, क्षयमासांत, जन्ममासांत आणि जन्मनक्षत्रावर, गोदा व गया ह्या दोहींवांचून पूर्वी न गेलेल्या देवास व तीर्थास मनुष्यानें प्रथम जाऊं नये. वरील गुरुशुक्राच्या अस्तादिकांत, आषाढांत, पौषांत आणि आषाढ शु० १२ पासून कार्तीक शु० १२ पर्यंत विष्णु निजलेला असतो त्या चातुर्मासांत, एकवर्षापुढें राहिलेलें प्रेतकर्म गोदा, गया ह्यांहून अन्य ठिकाणीं करूं नये. गोदानदीवर व गयेंत प्रेतकर्म करण्याला कालनियम नाहीं ॥ १९ ॥

**अथ तीर्थयात्रानिषेधं प्रेतकर्मनिषेधं च सापवादं वृत्तेनैकेनाऽऽह–शुक्रेति । शुक्रेज्ययोरस्तमयेऽधिकोऽधिकमासः क्षयः क्षयमासो जनुर्मासो जन्ममासः तेषु जन्मर्क्षके जन्मनक्षत्रेऽपूर्वं प्रथमं तीर्थामरदर्शनं तन्निमित्तं न इयात् न गच्छेत् काभ्यामृते गौदागयाभ्यामृते गोदागययोर्दर्शनं सदैव कुर्यादित्यर्थः । प्रेतकर्मनिषेधमाह–एष्विति । एषु गुरुशुक्रास्तादिषु आषाढः प्रसिद्धः सहस्यः पौषः विष्णुशयनं तेष्वपि यद्वर्षाधिकलंबितं अंत्यकर्म प्रेतकर्म भवति तत्त्यजेत् । गोदागयातोऽन्यतो गोदागययोः सदैवकार्यं । आषाढशुक्लद्वादश्यादिकार्तिकशुक्लद्वादशीपर्यंतं विष्णुशयनं प्रथमवर्षे निषिद्धकालेऽपि कर्तव्यमित्यर्थसिद्धं । अतिक्रांतवर्षं प्रेतकर्म गयागोदयोर्निषिद्धेऽपि शुक्रेज्यास्तादिके काले विदधीतेत्यर्थः । तथा चोक्तं । बाले वा यदि वा वृद्धे शुक्रेचास्तमुपागते । मलमास इवैतानि वर्जयेद्देवदर्शनं ॥ व्यासः । अधिमासे च मन्मर्क्षे नष्टयोर्गुरुशुक्रयोः । तीर्थयात्रा न कर्तव्या गयां गोदावरीं विना ॥ भृगुः । मलमासेऽप्यनावृत्तं तीर्थस्नानं विवर्जयेत् । अनादिदेवतां द्रष्टुं शुचिः स्यान्नष्टभार्गवे ॥ तीर्थखंडे । गुरुशुक्रास्तादिदोषः प्रोक्तो यस्तीर्थयात्रिणां । अपूर्वयायिनामेव न त्वसौ पूर्वगामिनाम् ॥ पितृखंडे । शुक्रस्यास्तमने चैव देवेज्यस्य तथैव च । प्रेतकार्थं प्रदुष्येत प्रथमं वत्सरं विना ॥ मांडव्यः । मलिने जन्ममासे वा मौढ्ये वा गुरुशुक्रयोः । तीर्थयात्रा न कर्तव्या गयां गोदावरीं विना ॥ गरुडपुराणे । न कुर्याद्गुरुशुक्रास्ते पुष्ये स्वापे मलिम्लुचे । विलंबितं प्रेतकार्यं गयां गोदावरीं विना ॥ मेधातिथिः । अस्तंगते गुरौ शुक्रे पुष्याषाढाधिमासके । प्रेतकार्यं न कुर्वीत गयां गोदावरीं विना ॥ प्रेतमंजर्यां । प्रेतकार्याणि सर्वाणि व्रतस्नानजपादिकं । वर्ज्यं शुक्रेज्ययोरस्ते गयां गोदावरीं विनेति॥१९॥इति स्वकृतमु० टीकायां मार्तंडवल्लभायां मिश्रप्रकरणं समाप्तम् ॥**

**टीकार्थ**—आतां तीर्थयात्रेचा निषेध आणि प्रेतकर्माचा निषेध व त्यांचे अपवाद हे एका वृत्तानें सांगतों—गुरु आणि शुक्र ह्या दोहोंच्या अस्तांत, अधिक महिन्यांत, क्षयमासांत, जन्ममासांत, जन्मकालच्या नक्षत्रीं, अपूर्व ह्म० पूर्वी कधीं न केलेलें तीर्थदर्शन आणि देवदर्शन करण्याच्या निमित्तानें यात्रेस जाऊं नये. मात्र ह्याचा अपवाद गोदावरी आणि गया ह्यांचे तीर्थी जाण्यास आहे,ह्म०गोदा आणि गया ह्यांचें दर्शन नेहमीं करावें. आतां प्रेतकार्याचा निषेध सांगतों—गुरु, शुक्र ह्यांचा अस्त इत्यादि कार्यांमध्यें, आषाढांत, पौष महिन्यांत, विष्णुशयन ह्म० आषाढ शुद्ध १२ पासून तों कार्तिक शुद्ध १२ पर्यंत चार महिने श्रीविष्णुपरमात्मा निजलेला असतो त्या चार महिन्यांत, जें वर्षानंतर राहिलेलें प्रेत कर्म तें करूं नये. परंतु ह्यास अपवाद गोदा आणि गया हे आहेत ह्म० गोदावरीस व गयेस नेहमीं प्रेतकर्म करावें. ह्याचा अर्थ असा कीं, आषाढ शुद्ध द्वादशीपासून तों कार्तिक शुद्ध द्वादशीपर्यंत विष्णूचें शयन असतें. त्यांत पहिल्या वर्षीं जीं निषिद्ध कार्यें असतील तीं सर्व करावींत असें सिद्ध झालें. अतिक्रांत प्रेतकर्म ह्मणजे एक वर्षापुढें राहिलेलें प्रेतकर्म गोदा आणि गया ह्या तीर्थी शुक्र, गुरु ह्यांचा अस्त वगैरे निषिद्धकालींही करावें. तेंच सांगितलें आहे कीं, बाल असो अथवा वृद्ध असो असा शुक्र अस्तंगत असेल तर आणि मलमासांत याप्रमाणें हीं देवदर्शनें वर्ज्य करावींत. व्यास सांगतो कीं, अधिकमासीं, जन्मनक्षत्रीं, गुरुशुक्राच्या अस्तांत, तीर्थयात्रा करूं नये. मात्र गोदावरी आणि गया ह्यांच्या यात्रा कराव्यात. भृगु सांगतो कीं, पूर्वी न केलेलें असें तीर्थस्नान मलमासांत वर्ज्य करावें. शुक्राचा अस्त असतां अनादिदेवतेचें दर्शन करण्यास तो शुचि असतो. तीर्थखंड ग्रंथांत सांगितलें आहे कीं, तीर्थयात्रा करण्याकरितां गुरु आणि शुक्र ह्यांचा अस्त वगैरे जे निषेध सांगितले आहेत ते सर्व अपूर्व ह्म० नवीन यात्रेस जाणाऱ्याकरितां आहेत. परंतु एकदां जाऊन आलेल्या यात्रा करणाऱ्यास नाहींत. पितृखंड ग्रंथांत सांगितलें आहे कीं, शुक्राचा आणि गुरूचा अस्त असतां पहिल्या वर्षांतील प्रेतकर्माशिवाय बाकीचें प्रेतकर्म ह्मणजे पुढील प्रेतकर्म करूं नये. मांडव्य सांगतो कीं, मलमासांत, जन्ममासीं, गुरु आणि शुक्र ह्यांचा अस्त असतां, तीर्थयात्रा करूं नये. मात्र गोदावरी व गया ह्या दोहोंची यात्रा करण्यास हरकत नाहीं. गरुडपुराणांत सांगितलें आहे कीं, गुरु आणि शुक्र ह्यांचे अस्तांत, पौष महिन्यांत, चातुर्मास्यांत, मलमासांत वर्षानंतरचें प्रेतकर्म करूं नये. परंतु गोदावरी व गया ह्या दोन ठिकाणीं मात्र करावें. मेधातिथि

असें सांगतो कीं, गुरूचा अस्त आणि शुक्राचा अस्त असतां, पौष महिना, आषाढ मास, अधिक मास, ह्यांमध्यें प्रेतकर्म करूं नये. मात्र गया आणि गोदावरीस करावें. प्रेतमंजरी ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, सर्व प्रकारचीं प्रेतकार्यें, व्रत, स्नान, जप इत्यादिक सर्व कार्यें शुक्र आणि गुरु ह्यांचा अस्त असतां करूं नयेत, मात्र गया आणि गोदावरी ह्या ठिकाणीं करावींत ॥ १९ ॥ अशा रीतीनें आपण केलेल्या मार्तंडवल्लभानामक मुहूर्तमार्तंडटीकेचें मिश्रप्रकरण समाप्त झालें.

॥ मिश्रप्रकरण समाप्त ॥

---

## ॥ अनध्यायप्रकरणम् ॥ ९ ॥

पर्वाग्रादियुगष्टमीति तिथयो मध्वादिपक्षद्वयेऽ- ।
नध्यायाश्चरसंक्रमा अथ मधौ वह्निश्च शुक्रे यमः ॥
राधेऽग्निस्त्वसितो यमः शुचिदृगाशार्कास्त्रियोदश्यथो ।
मार्गे कृष्णनगग्रहाविषदृगंकाशाग्नयः कीर्तिताः ॥ १ ॥

श्लोकार्थ—चैत्रादि सर्व मासांच्या शुक्ल व कृष्ण पक्षांत पूर्णिमा, अमावास्या, प्रतिपदा, चतुर्दशी, अष्टमी ह्या तिथि, मेष, कर्क, तूळ, मकर ह्या चर संक्रांति, चैत्र शु० तृतीया, ज्येष्ठ शु० द्वितीया, वैशाख शु० तृतीया व कृ० द्वितीया, आषाढ शु० द्वितीया, दशमी, द्वादशी, त्रयोदशी, मार्गशीर्ष कृ० सप्तमी, नवमी, आश्विन शु० द्वितीया, नवमी, दशमी, तृतीया ह्या तिथींला अनध्याय ह्मणतात ॥ १ ॥

अथानध्यायप्रकरणमारभ्यते ॥ छिद्राण्येतानि विप्राणां येऽनध्यायाः प्रकीर्तिताः । छिद्रेभ्यः स्रवति ब्रह्म ब्राह्मणेन यदर्जितं ॥ तत्काले तस्य रक्षांसि श्रियं ब्रह्म यशो बलं । सर्वमादाय गच्छंति वर्जयंतोप्सितं फलमित्यनध्याये पठनादौ प्रदोषा निगदिताः । तत्राऽऽदौ प्रसंगात्पठनादौ निषेधात् मौंज्यादिनिषेधाच्च वृत्तद्वयेनानध्यायानाह–पर्वेति । पर्व अमा पूर्णिमा किंलक्षणं पर्व अग्रादियुक् अग्रं प्रतिपत् आदिश्चतुर्दशी ताभ्यां युक् युक्तं। अष्टमी प्र० इति तिथयश्चतस्रस्तिथयो मध्वादिपक्षद्वये मधुश्चैत्रः तदादिषु मासेषु पक्षद्वयं शुक्लकृष्णाख्यं तस्मिन् अनध्यायाः स्युः कीर्तिताः कथिता बुधैरित्यध्याहारः । अथान्यानाह–चरसंक्रमाः चरराशिसंक्रांतयः मेषकर्कतुलामकरसंक्रांतय इत्यर्थः । मधुश्चैत्रस्तस्मिन् वह्निः वह्निसंख्याकस्तिथिस्तृतीयेत्यर्थः । शुक्रे ज्येष्ठे मासे यमः द्वितीया यत्र प्रकरणे शुक्लकृष्णपक्षनिर्देशो न दृश्यते तत्र शुक्लपक्षजस्तिथिर्ज्ञेयः राधे वैशाखेऽग्निस्तृतीया शुक्ले तु पुनरसितः कृष्णो यमः द्वितीया शुचिदृगाशार्काः शुचिराषाढः तस्य दृक् द्वितीया आशा दशमी अर्को द्वादशी त्रयोदश्यपि आषाढशुक्लद्वितीया दशमी द्वादशी त्रयोदशीत्यर्थः। अथ मार्गे मार्गशीर्षे कृष्णनवग्रहौ कृष्णसप्तमीनवम्यौ इषदृगंकाशाग्नय इष आश्विनः तस्य दृक् द्वितीयाऽको नवमी आशा दशमी अग्निस्तृतीया आश्विनशुक्लद्वितीया नवमी दशमी तृतीयेत्यर्थः ॥ १ ॥

टीकार्थ—आतां अनध्यायाचें प्रकरण आरंभितों. ब्राह्मणांना जे अनध्याय ह्मणजे ज्या दिवशीं वेदाध्ययन करूं नये असे दिवस सांगितले आहेत, ते सर्व छिद्र आहेत. ह्मणून ब्राह्मणानें जें ब्रह्म संपादन केलें असेल तें सर्व छिद्रांतून गळून जातें. ह्यास्तव त्या अनध्यायाचे वेळीं सर्व राक्षस येऊन त्या ब्राह्मणांची लक्ष्मी, यश, बल हें सर्व घेऊन जातात आणि जें इच्छित मिळावयाचें फळ तें नाहींसें करितात. अशा रीतीनें अनध्यायाचें दिवशीं पठन, पाठन इत्यादिकाचा दोषपूर्वक निषेध सांगितला आहे. त्यांत अगोदर प्रसंगोपात पठन इत्यादिकांविषयीं निषेध सांगितला आहे आणि मौंजी इत्यादिक निषेध सांगितला ह्मणून दोन वृत्तांनीं अनध्याय सांगतों. पर्व ह्म० पौर्णिमा व अमावास्या, त्यांचे आदिच्या दोन चतुर्दशी आणि पुढच्या दोन प्रतिपदा अर्थात् दोन १४ दोन १ मिळून चार दिवस व १५–३० मिळून ६ दिवस, अष्टमी २ इतक्या ह्या आठ तिथि चैत्रापासून फाल्गुनपर्यंतच्या सर्व महिन्यांमध्यें शुक्ल आणि कृष्ण ह्या दोन पक्षांतील मिळून आठ तिथी अनध्याय आहेत, असें विद्वानांनीं सांगितलें आहे. आतां दुसरे अनध्याय सांगतों–चर राशीच्या ह्मणजे मेष, कर्क, तुळ, मकर ह्यांच्या संक्रांतीही अनध्याय आहेत. मधु ह्म० चैत्र त्यांतील वन्हि ह्म० तृतीया, शुक्र ह्म०

ज्येष्ठ ह्या महिन्यांतील यम ह्म० द्वितीया, हे अनध्याय आहेत. जेथें शुक्ल आणि कृष्ण असा निर्देश केला नसेल तेथें शुक्ल पक्षांतील तिथी घ्यावी. राध ह्म० वैशाख महिन्यांतील अग्नि ह्म० तृतीया ती शुक्ल तृतीया व कृष्ण तृतीया दोन्हीही, शुचि ह्म० आषाढांतील दृक् ह्म० द्वितीया, आशा ह्म० दशमी, अर्क ह्म० द्वादशी, त्रयोदशी इतके अनध्याय आहेत. आतां मार्गशीर्ष महिन्यांत नवमी आणि सप्तमी अनध्याय आहेत. इष ह्म० आश्विनांत दृक् ह्म० द्वितीया, अंक ह्म० नवमी, आशा ह्म० दशमी, अग्नि ह्म० तृतीया ह्या तिथींना अनध्याय असें ह्मणतात ॥ १ ॥

## अनध्याय.

पौषेशस्त्वसिता दृगंकमुनयोऽन्त्ये कृष्णखेटाद्रिदृङ् ।
माघेऽर्काब्धिदृगद्रयस्त्वसितजा बाह्वंकपृथ्वीधराः ॥
ऊर्जे द्व्यंकरवीश्वरास्त्वसितजा दृग्विश्वसूर्या नभ- ।
स्येऽग्निः कृष्णदृगाद्रिविश्वनवमी पैत्रं यमोऽन्यः श्रवाः ॥ २ ॥

श्लोकार्थ—पौष शु० एकादशी व कृ० द्वितीया, नवमी, सप्तमी; फाल्गुन कृ० नवमी, सप्तमी, द्वितीया; माघ शु० द्वादशी, चतुर्थी, द्वितीया, सप्तमी व कृ०द्वितीया, नवमी, सप्तमी; कार्तिक शु० द्वितीया, नवमी, द्वादशी, एकादशी व कृ० द्वितीया, त्रयोदशी, द्वादशी; भाद्रपद शु० तृतीया व कृ० द्वितीया, सप्तमी, त्रयोदशी, नवमी आणि भाद्रपद कृष्णपक्षांत मघा व भरणी हीं नक्षत्रें व शुक्लपक्षांत श्रवण नक्षत्र हे सर्व अनाध्याय जाणावे ॥ २॥

**पौषेति । पौषेशः पौषस्य ईशः एकादशी शुक्ला तु पुनः असिताः कृष्णा दृगंकमुनयः द्वितीया-नवमीसप्तम्यः । अंत्ये फाल्गुने कृष्णखेटाद्रिदृक् खेटो नवमी अद्रिः सप्तमी दृक् द्वितीया एषां समाहारः । खेटाद्रिदृक् कृष्णं च तत् खेटाद्रिदृक् च तथा कृष्णनवमी सप्तमी द्वितीया इत्यर्थः । माघेऽर्काब्धिदृगद्रयोऽर्को द्वादशी अब्धिश्चतुर्थी दृक् द्वितीया अद्रिः सप्तमी एते शुक्लाः तु पुनः असितजा बाह्वंकपृथ्वीधराः असितजाः कृष्णपक्षजाः बाह्वंकपृथ्वीधराः बाहुर्द्वितीया अंको नवमी पृथ्वीधरः सप्तमी ऊर्जे कार्तिके द्व्यंकरवीश्वराः द्विर्द्वितीया अंको नवमी रविर्द्वादशी ईश्वर एकादशी एते शुक्लाः तु पुनः असितजाः कृष्णपक्षजाः दृग्विश्वसूर्याः दृक् द्वितीया विश्वे त्रयोदशी सूर्यो द्वादशी नभस्ये भाद्रपदेऽग्निस्तृतीया शुक्ला कृष्णदृगाद्रिविश्वनवमी पैत्रं दृक् द्वितीयाऽद्रिः सप्तमी विश्वे त्रयोदशी नवमी प्रसिद्धा पैत्रं मघा यमो भरणी अन्यः शुक्लः श्रवाः श्रवणः भाद्रपदशुक्ल-श्रवण इत्यर्थः ॥ २ ॥**

**टीकार्थ**—पौष महिन्यांतील ईश ह्म० शुक्लपक्षांतील एकादशी आणि कृष्णपक्षांतील दृक् ह्म० द्वितीया, अंक ह्म० नवमी, मुनि म्ह० सप्तमी हे अनध्याय आहेत. अंत्य ह्म० फाल्गुन महिन्यांत कृष्णपक्षांत खेट ह्म० नवमी, अद्रि ह्म० सप्तमी, दृक् ह्म० द्वितीया इतके अनध्याय आहेत. माघ महिन्यांत शुक्लपक्षांत अर्क ह्म० द्वादशी, अब्धि ह्म० चतुर्थी, दृक् ह्म० द्वितीया, अद्रि ह्म० सप्तमी आणि कृष्णपक्षांत बाहु ह्म० द्वितीया, अंक ह्म० नवमी, पृथ्वीधर ह्म० सप्तमी इतके अनध्याय आहेत. ऊर्ज ह्म० कार्तिकमहिन्यांत शुक्लपक्षीं द्वि ह्म० द्वितीया, अंक ह्म० नवमी, रवि ह्म० द्वादशी, ईश्वर ह्म० एकादशी आणि कृष्णपक्षी दृक् ह्म० द्वितीया, विश्व ह्म० त्रयोदशी, सूर्य ह्म० द्वादशी, इतके अनध्याय आहेत. नभस्य ह्म० भाद्रपदमासीं शुक्लपक्षीं अग्नि ह्म० तृतीया आणि कृष्णपक्षीं, दृक् ह्म० द्वितीया, अद्रि ह्म० सप्तमी, विश्व ह्म० त्रयोदशी, नवमी, इतक्या तिथि आणि पैत्र ह्म० मघा नक्षत्र, यम ह्म० भरणी नक्षत्र आणि शुक्लपक्षीं श्रवण नक्षत्र इतके सर्व अनध्याय आहेत ॥ २ ॥

## अनध्याय निर्णय.

योऽनध्यायतिथिः स पूर्वदिवसेऽस्तात्माद्द्मुहूर्तोन्मितोऽ- ।
न्यस्मिन्वोदयतः क्षणत्रयगतो ब्रह्मेह नैवाभ्यसेत् ॥
पर्वाग्राद्दियुगष्टमीति च तिथींस्त्यक्त्वैषु शास्त्रस्मृती ।
वेदांगानि समभ्यसेच्च निखिलेषूक्तं पठेन्नैत्यकम् ॥ ३ ॥

**श्लोकार्थ**—जी अनध्यायतिथि, ती पूर्व दिवशीं सूर्यास्तापूर्वीं दोन घटिका किंवा अधिक असेल तर पूर्व दिवशीं वेदाभ्यास करूं नये. अथवा दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर ६ घटिका किंवा अधिक असेल तर त्या दिवशीं वेदपठन करूं नये. पूर्णिमा, अमावास्या, प्रतिपदा, चतुर्दशी, अष्टमी ह्या तिथि सोडून सर्व अनध्याय असतां शास्त्र, स्मृति, वेदांगें यांचा अभ्यास करावा. सर्व अनध्यायांवर जें पठन करावें असें सांगितलें आहे तें आणि संध्या, होम, ब्रह्मयज्ञादि नित्य करावयाचें तें पठन करावें॥ ३ ॥

अथैषां निर्णयं वृत्तेनैकेनाऽऽह—य इति । यः कश्चिदनध्यायतिथिः स पूर्वदिवसेऽस्तात्सूर्यास्तात्प्राक् मुहूर्तोन्मितः स्यात् । अत्र पूर्वदिवसे ब्रह्म वेदं न पठेत् वा इत्यथवा अन्यस्मिन्दिवसे परदिवसे क्षणत्रयगतो भवति । अत्रास्मिन्दिवसे ब्रह्म नो संपठेत् । पर्वाग्रादियुगष्टमी पूर्ववत्पदविभागः । इति चतुरस्तिथींस्त्यक्त्वा एषु अनंतरोक्तेषु अनध्यायेषु शास्त्रस्मृती वेदागांनि समभ्यसेत् । सुगमं । निखिलेषु सर्वेष्वनध्यायेषु उक्तं पठेत् । नैत्यकं च पठेत्। उक्तमिति। यथाऽमावास्यायामश्नंस्तु जपेद्व्याहृतिपूर्विकां । गायत्रीं सप्रणवां सकृत्त्रिर्वा राक्षोघ्नीः पित्र्यमंत्रान् पुरुषसूक्तमप्रतिरथमन्यानि च पवित्राणीति । नैत्यकं संध्याहोमब्रह्मयज्ञादि। तथा च मनुः। वेदोपाकरणे चैव स्वाध्याये चैव नैत्यके । न निरोधोऽस्त्यनध्याये होममंत्रजपेषु चेति ॥ वेदोपाकरणानि अंगानि स्मृतिरत्नावल्याम् । नित्ये जपे च नांगे च क्रतौ पारायणेऽपि च । नानध्यायोऽस्ति वेदानां ग्रहणे ग्राहणे स्मृतः ॥ देवतार्चनमंत्राणां नानध्यायः स्मृतः सदा । नानध्याये जपेद्वेदान्रुद्रांश्चैव विशेषतः ॥ पौरुषं पावमानं च गृहीतनियमादृत इति ॥ स्मृत्यर्थसारे । चतुर्दश्यष्टमीपर्वप्रतिपद्वर्जितेषु च । वेदांगन्यायमीमांसाधर्मशास्त्राणि चाभ्यसेदिति ॥ कूर्मपुराणे । इंदौ वृद्धिं क्षयं प्राप्ते ब्रह्मयज्ञं न कारयेत् । न जपेद्वैदिकं मंत्रं गायत्र्यष्टोत्तरं शतमिति ॥ स्मृतिरत्नावल्यां। अल्पं जपेदनध्याये पर्वण्यल्पतरं जपेदिति ॥ ३ ॥

**टीकार्थ**—आतां ह्या अनध्यायांचा निर्णय एका वृत्तानें सांगतों—जी कोणती अनध्यायाची तिथि असते ती पूर्व दिवशीं सूर्यास्ताचे पूर्वी दोन घटिका अथवा अधिक असेल तर त्या पूर्वदिवशींही वेदाचा अभ्यास करूं नये. अथवा दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर सहा घटिका किंवा त्याहून अधिक असेल तर त्या दिवशीं वेदाचा अभ्यास करूं नये. पर्व, प्रतिपदा, चतुर्दशी आणि अष्टमी ह्यांचा विभाग पूर्वीप्रमाणें समजावा. अशा रीतीनें पर्व ह्मणजे पौर्णिमा आणि अमावास्या, दोन प्रातपदा ह्या चार तिथी सोडून बाकीच्या दुसऱ्या पूर्वी सांगितलेल्या अनध्यायांचे ठिकाणीं वेदांचीं अंगें आणि शास्त्रें व स्मृति ह्यांचा अभ्यास करावा. परंतु दररोज ज्या वेदादि भागाचा पाठ करणें आवश्यक आहे असा जो नैत्यक पाठ तो तर सांगितलेल्या अनध्यायांच्या तिथींवरही करावा. असें सांगितलें आहे कीं, जसें अमावास्येस भोजन न करितां व्याहृतिपूर्वक गायत्रीचा पाठ, प्रणव सहित गायत्रीचा पाठ एकवार किंवा तीन वेळां किंवा राक्षोघ्न नांवाचें जें सूक्त आहे तें पितरांनां उद्देशून सांगितलें आहे, त्याचा पाठ करावा व पुरुषसूक्ताचे मंत्र आणि दुसरींहीं पवित्र सूक्तें पठण करावींत. नित्य पठण करावयाचीं ह्मणजे संध्या, होम, ब्रह्मयज्ञाचे बद्दलचें वेद पठण करण्यास हरकत नाहीं. तेंच मनूनें सांगितलें आहे कीं, वेदांचीं उपाकरणें ह्मणजे अंगें आणि नित्य पठण करण्याचे स्वाध्याय, होम, मंत्र, जप हे करण्यास अनध्यायाची अडचण नाहीं ह्मणजे अनध्यायाचे दिवशींही ह्यांचा पाठ करावा. वेदांचीं उपाकरणें ह्मणजे अंगें असें सांगितलें आहे.स्मृति रत्नावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं, नित्य कर्म, जप, वेदांचीं अंगें, यज्ञ, पारायण इतक्यांच्या पठणाविषयीं अनध्यायाच दोष नाहीं परंतु वेदांचा पाठ करणें व पाठ देणें ह्याविषयीं मात्र अनध्याय आहेत. देवतांचें पूजन करण्याचे जे मंत्र सांगितले आहेत त्यांचें पठण करण्यास अनध्याय नाहींत.अनध्यायांचे दिवशीं वेदांचें, रुद्राचें विशेषें करून पठण करूं नये, पुरुषसूक्त, पवमानसूक्त ह्यांचेंही पठण करूं नये परंतु जर ह्यांचा पठण करण्याचा नियम घेतला असेल तर पठण करण्यास अनध्यायाची अडचण नाहीं. स्मृत्यर्थसार ग्रंथांत सांगितलें आहे कीं, चतुर्दशी, अष्टमी, पूर्णिमा, अमावास्या, प्रतिपद इतक्या तिथी सोडून बाकीच्या अनध्याय तिथींवर वेदांचीं अंगें, न्याय, मीमांसा. धर्मशास्त्र ह्यांचें पठण आणि पाठन करावें कूर्म पुराणांत सांगितलें आहे कीं, चंद्रमाची वृद्धि आणि क्षय झाला असेल त्या दिवशीं ह्मणजे पौर्णिमा, अमावास्या ह्या दिवशीं ब्रह्मयज्ञ करवूं नये आणि वैदिक मंत्राचा जप करूं नये. गायत्रीचा अष्टोत्तर जप मात्र करावा. स्मृति रत्नावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं. अनध्याय तिथि असतां थोडा पाठ करावा आणि पर्व दिवशीं फारच थोडा पाठ करावा ॥ ३ ॥

## नैमित्तिक अनध्याय.

बभ्रोत्वेणखराग्न्यजांब्वहिगजाश्वोष्ट्रांत्यमुकोन्नता- ।
नोयानांतरिते त्र्यहं प्लवखगाद्यैर्नो च स ज्योतिषम् ॥
स्त्रीगोस्थ्यंतरितेहरुत्सवनिशीथाशौचमार्गेषु च ।
छायायां न कपित्थशाल्मलिमधुश्लेष्मातकादेः पठेत् ॥ ४ ॥

श्लोकार्थ—मुंगुस, मांजर, हरिण, गर्दभ, अग्नि, बकरा, उदक, सर्प, हत्ती, घोडा, उंड, अंत्यज, मुका, उन्मत्त, गाडा आणि पालखी, मेणा वगैरे यान हीं गुरु व शिष्य ह्यांच्यामध्यें आलीं तर तीन दिवस अनध्याय होतो. बेडूक, पक्षी, घोरपड, पाल वगैरे व पुरुष मध्यें आल्यास सज्योति अनध्याय होतो. स्त्री, गाय, हाडें हीं गुरु शिष्यांमध्यें येतील तर एक अहोरात्र अनध्याय होतो. विवाहादि उत्सवांत, मध्यरात्रीस, अशौचांत व मार्गांत पठन करूं नये. कवठ, सांवरी, मोहा, भोंकरी, कांचन, एरंड वगैरे वृक्षांच्या छायेला पठन करूं नये ॥ ४ ॥

अथ नैमित्तिकाननध्यायान्वृत्तद्वयेनाह—बभ्रिवति । बभ्रुर्नकुलः । ओतुर्मार्जारः । एणो हरिणः । खरः प्र० । अग्निः प्र० । अजो मेषः । अंबु उदकं । अहिः सर्पः । गजः प्र० । अश्वः प्र० । उष्ट्रः प्र० । अंत्योऽन्त्यजजाती रजकचर्मकारादयः । मूकः प्र० । उन्नतो मत्तः । अनः शकटः । यानं शिबिकादि । एभिरंतरिते गुरौ सति त्र्यहं त्रिरात्रमनध्यायः । प्लवो मंडूकः । खगः पक्षी । आदिशब्दाद्गोधादि । एभिरंतरिते सज्योतिषमनध्यायः । अयमर्थः । दिवा अंतरिते सति सूर्यास्तमानपर्यंतमनध्यायो रात्रावंतरिते रात्रिशेषपर्यंतमनध्याय इत्यर्थः । स्त्रीगोस्थ्यंतरितेऽहः । स्त्री प्र० गौः प्र० अस्थि प्राण्यंगं एभिरंतरितेऽहर्दिनमहोरात्रमनध्यायः उत्सवो महोत्सवो विवाहादिकः । निशीथं मध्यरात्रं आशौचं सूतकं मार्गोऽध्वा एषु न पठेत् । च परं कपित्थशाल्मलिमधुश्लेष्मातकादेश्छायायां न पठेत् । सुगमं । आदिशब्दात्कोविदारबिभीतकैरंडादीनां ग्रहणम् ॥ ४ ॥

टीकार्थ—आतां नैमित्तिक अनध्याय दोन वृत्तानें सांगतों—बभ्रु ह्म० मुंगुस, ओतु ह्म० मांजर, एण ह्म० हरिण, खर ह्म० गाढव, अग्नि ह्म० विस्तव, अज ह्म० बकरा, अंबु ह्म० उदक, अहि ह्म० सर्प, गज ह्म० हत्ती, अश्व ह्म० घोडा, उष्ट्र ह्म० उंट, अंत्य ह्म० चांडाल वगैरे नीच जाति ह्मणजे धोबी, चांभार वगैरे, मूक ह्म० मुका, उन्नत ह्म० मत्त, अन ह्म० गाडा, यान ह्म० मेणा इत्यादिक पदार्थ गुरु आणि शिष्य ह्यांच्या मधून गेले असतां तीन दिवस अनध्याय करावा. प्लव ह्म० बेडूक, खग ह्म० पक्षी आदि शब्दानें गोधा इत्यादि प्राणी गुरु आणि शिष्य ह्यांच्या मधून गेले असतां नक्षत्र दर्शन पर्यंत अनध्याय करावा. ह्याचा अर्थ असा कीं, दिवसा दोघांच्या मधून हे प्राणी गेले असतां सूर्यास्तापर्यंत अनध्याय करावा; रात्रीस दोघांमधून हे प्राणी गेले असतां रात्र संपेपर्यंत अनध्याय करावा. स्त्री, गाय, हाडकें हे मधून गेले असतां एक अहोरात्र अनध्याय करावा. विवाहादि महोत्सव, मध्यरात्र, सूतक, रस्ता ह्या ठिकाणीं अनध्याय करावा. कपित्थ ह्म० कवठ, शाल्मली ह्म० सांवरी, मधु ह्म० मोह, श्लेष्मातक ह्म० भोंकरी, कोविदार ह्म० कांचन, एरंड इत्यादिक झाडांच्या छायेखालीं बसून अध्ययन करूं नये अर्थात् अनध्याय करावा ॥ ४ ॥

ग्रामांतः कुणपे श्वशूद्रनिकटे श्राद्धाशने वक्त्रगे ।
तांबूले ग्रहणाद्गुरुक्षितिपतिप्रांतादुपोत्सर्गतः ॥
भूकंपाशनिपाततः पुरदहेरिष्टावलोकात्र्यहं ।
गर्जेऽनार्तवके त्र्यहं समयजे सज्योतिरंते सतः ॥ ५ ॥

श्लोकार्थ—गावांत प्रेत असतां, कुत्रा किंवा शूद्र जवळ असतां, श्राद्ध भोजन केल्यावर अन्न जिरेपर्यंत, मुखांत तांबूल असतां, सूर्यचंद्राच्या ग्रहणानंतर, गुरु किंवा राजा मरण पावला असतां, उपाकर्म व उत्सर्जन केल्यानंतर, भूकंप झाला असतां, वीज पडली असतां, गांवांत आग लागली असतां, गंधर्व नगर, भूत इत्यादि अरिष्ट पाहिलें असतां, ह्या सर्वांपासून तीन दिवस पठन करूं नये, अकालीं मेघ गर्जना झाली तर ३ दिवस व

यथाकाळीं गर्जना झाली तर सज्योति अध्ययन करूं नये. स्वशाखी सत्पुरुष मरण पावला असतां सज्योति पठन करूं नये ॥ ५ ॥

**ग्रामांतरिति । ग्रामांतः कुणपे ग्राममध्ये कुणपे प्रेते सति न पठेत् । श्वशूद्रनिकटे श्वानशूद्रसन्निधौ न पठेत् । श्राद्धाशने श्राद्धभोजने कृते सति जीर्णावधि न पठेत् । वक्त्रगे मुखगते तांबूले सति न पठेत् । ग्रहणात्सकाशात्त्र्यहं न पठेत् तथा गुरुक्षितिपतिप्रांतान्मरणात् त्र्यहं उपोत्सर्गतस्त्र्यहं उप उपाकर्म उत्सर्गश्छंदसामुत्सर्गः तथा उपोत्सर्गतः सकाशात्त्र्यहं । भूकंपाशनिपाततस्त्र्यहं भूकंपः प्र० अशनिपातो विद्युत्पातः ताभ्यां त्र्यहं पुरदहेः पुरदाहात् स्ववसतिग्रामदाहादित्यर्थः । त्र्यहं रिष्टावलोकात् गंधर्वनगरभूतादिदर्शनात् त्र्यहं न पठेत् । गर्जनार्तवके त्र्यहं ऋतौ भवः आर्तवः न आर्तवः अनार्तवः अनार्तव एव अनार्तवकस्तस्मिन् अकालगर्जे जाते सति त्र्यहं न पठेत् । समयजे ऋतुजे गर्जे सति सज्योतिर्यथास्यात्तथा न पठेत् । दिवा गर्जे सति सूर्यास्तपर्यंतं । रात्रौ गर्जे सति सूर्योदयपर्यंतं न पठेदित्यर्थः । सतः अंते स्वशाखिसत्पुरुषस्य मृतौ जाते सति सज्योतिर्न पठेत् ॥ ५ ॥**

**टीकार्थ**—गावांत प्रेत असतां अध्ययन करूं नये. कुत्रा आणि शूद्र हे जवळ असतां अध्ययन करूं नये. श्राद्धाचें भोजन केल्यावर तें अन्न पचेपर्यंत अध्ययन करूं नये. तोंडांत तांबूल असतां अध्ययन करूं नये. सूर्य आणि चंद्र ह्यांचे ग्रहणानंतर तीन दिवस पर्यंत अध्ययन करूं नये. तसेंच गुरु आणि राजा हे मरण पावले असतां तीन दिवसपर्यंत अध्ययन करूं नये. उपाकर्म आणि उत्सर्जन केल्यावर तीन दिवस अध्ययन करूं नये. भूमिकंप झाला असतां, विद्युत्पात झाला असतां तीन दिवस अध्ययन करूं नये. नगरामध्यें आग लागली असतां तीन दिवस अध्ययन करूं नये. गंधर्व नगर, भूत, पिशाच इत्यादि अरिष्ट पाहिलें असतां तीन दिवस अध्ययन करूं नये. ऋतु नसतां जर मेघांनीं गर्जना केली तर तीन दिवस अनध्याय करावा ह्मणजे अध्ययन करूं नये. समयावर मेघांची गर्जना झाली असतां नक्षत्र दर्शनपर्यंत अध्ययन करूं नये, ह्मणजे दिवसास गर्जना झाली असतां सूर्यास्तपर्यंत अध्ययन करूं नये, रात्रीस गर्जना झाली असतां सूर्योदयपर्यंत अध्ययन करूं नये. आपल्या शाखेचा मोठा सत्पुरुष मेला असतां सज्योति अध्ययन करूं नये ॥ ५ ॥

अन्य अनध्याय.

**वाद्योलूकखरार्तजंबुकरवे साम्नां च वाते जले ।**
**नीहारे पतिताभिशस्तनिकटे धावज्जनालोकने ॥**
**ग्रामांते पितृकाननेऽप्यथ सतानूनत्प्रिणीते दिवं ।**
**तद्वत्सद्व्रतिनि त्र्यहं च न पठेद्भुक्त्वाऽऽर्द्रपाणिर्न च ॥ ६ ॥**

श्लोकार्थ—वाद्यांचा नाद ऐकूं येत असतां, घुबड, गाढव, पीडित, कोल्हा हीं ओरडत असतां, सामवेदाचें गायन चाललें असतां; मोठा वारा सुटला असतां, उदकांत, धुकें पडलें असतां, जातिभ्रष्ट व खोटें बोलणारा हे जवळ असतां, धांवणारे लोक पहात असतां, गांवाच्या सीमेवर, स्मशानांत, यज्ञांतील ऋत्विज व महानाम्न्यादि व्रतें झालेला हे मरण पावले असतां तीन दिवस, जेवल्यावर हात ओले असेपर्यंत पठन करूं नये ॥ ६ ॥

**अनध्यायांतरमाह-वाद्येति । वाद्यादीनां रवे शब्दे श्रूयमाणे साम्नां च रवे श्रूयमाणे वाते वातस्य सर्वदा विद्यमानत्वादतिवाते जले जलमध्ये नीहारे धूमरूपोत्पाते पतितो जातिभ्रष्टः अभिशस्तो मिथ्याभिशापी तत्समीपे धावज्जनालोकने धावन्मनुष्यालोकने ग्रामांते ग्रामसीमासमीपे पितृकानने श्मशाने न पठेत् सतानूनत्प्रिणीते दिवं स्वर्गं प्रति इते गते मृते सति त्र्यहं न पठेत् । तानूनत्प्रं नामघृतं यागे येन येन ऋत्विजा सह स्पृष्टं स सतानूनत्प्री तस्मिन् मृते सति त्र्यहं न पठेत् । तद्वत्सद्व्रतिनि मृते सद्व्रतं वेदव्रतं चरितं येन सद्व्रती तस्मिन् मृते त्र्यहं न पठेत् । भुक्त्वा यावदार्द्रपाणिस्तावन्न पठेत् । अन्येऽनध्याया मूलग्रंथतोऽवगंतव्याः ॥ ६ ॥**

**टीकार्थ**—दुसरे अनध्याय सांगतों-वाद्यांचा शब्द ऐकूं आला असतां आणि उलुक ह्म० घुबड, खर ह्म० गाढव,

पीडित मनुष्य, कोल्हा हे ओरडत असतां, साम वेदाचें गायन चाललें असतां, मोठा वारा सुटला असतां, पाण्यांत, नीहार ह्मणजे धूकें उद्भवलें असतां, पतित ह्म० जातिभ्रष्ट आणि मिथ्याभिलाषी ह्मणजे खोटें बोलणारा हे जवळ असतां, धांवणारे लोक पहात असतां, गांवाच्या सीमेवर, पितृकानन ह्म० स्मशानामध्यें अध्ययन करूं नये. तानून ह्मणजे घृत हें ज्यानें ऋत्विजां बरोबर अग्नीमध्यें हवन केलें आहे असा ऋत्विज मरण पावला असतां, त्याप्रमाणेंच सत्रती ह्मणजे वेदादिक उत्तम व्रतें ज्यानें आचरण केलीं आहेत असा मरण पावला असतां तीन दिवस अध्ययन करूं नये. भोजन केल्यावर ओला हात आहे तोंपर्यंत अध्ययन करूं नये ॥ ६ ॥

### प्रदोष, अनध्याय.

रात्र्यर्धे मदनो मुनिर्दलयुते यामे चतुर्थ्याद्यके ।
प्राग्रात्रौ पठनं ह्युपाकरणतो मासं निशः प्राग्दले ॥
श्वोऽनध्याय इतीह रात्रिपठनं वर्ज्यं सदा संध्ययो- ।
श्चोरोपद्रवयामके त्रिदिवसं दुर्भुक्प्रतिग्राहयोः ॥ ७ ॥

### इति अनध्यायप्रकरणम् ॥

श्लोकार्थ—ज्या दिवशीं मध्यरात्रीच्या आंत त्रयोदशी, दीड प्रहर रात्रीच्या आंत सप्तमी व एक प्रहर रात्रीच्या आंत चतुर्थी असेल त्या दिवशीं प्रदोष होतो; ह्मणून त्या दिवशीं पूर्वरात्रीस पठन करूं नये. उपाकर्मापासून एक महिनापर्यंत रात्रीच्या पूर्वार्धांत पठन वर्ज्य होय. उद्यां अनध्याय आहे असें जाणून त्या अनध्यायाच्या पूर्व दिवसाच्या सर्व रात्रींत पठन वर्ज्य करावें. प्रातःसायंसंध्या समयीं पठन वर्ज्य होय. चोरांचा उपद्रव होईल त्याप्रहरांत पठन वर्ज्य करावें. दुष्टभोजन व दुष्टप्रतिग्रह केल्यानंतर तीन दिवस अध्ययन करूं नये ॥ ७ ॥

अथ प्रदोषानध्यायानाह-रात्र्यर्धे इति । रात्र्यर्धे मदनस्त्रयोदशी यस्मिन् दिने स्यात्.मुनिः सप्तमी रात्रेर्दलयुते यामे सार्धप्रहरे यद्दिने स्यात् चतुर्थी आद्यके प्रथमे प्रहरे यद्दिने स्यात् । अत्र दिने प्राग्रात्रौ पूर्वरात्रौ पठनं वर्ज्यं तु पुनः उपाकर्मतः सकाशात् मासमात्रं रात्रेः प्राग्दले पठनं वर्ज्यं । श्वोऽनध्याय इतीह इत्यत्र रात्रिपठनं समस्तरात्रौ पठनं वर्ज्यं । सदा संध्ययोरुभयोः पठनं वर्ज्यम् । चोरोपद्रवेण उपलक्षितो यामः प्रहरः तस्मिन्पठनं वर्ज्यं । त्रिदिवसं दुर्भुक्प्रतिग्राहयोः दुष्टौ भुक्प्रतिग्रहौ दुर्भुक्प्रतिग्रहौ तयोः दुष्टभोजनदुष्टप्रतिग्रहयोः त्रिदिवसं पठनं वर्ज्यम् । तथा च श्रीधर्यां स्मृतिवचनानि । अष्टम्योश्च चतुर्दश्योः पंचदश्योश्च सूतके । शावे प्रतिपदोर्यत्र भये चैव महोत्सवे ॥ रोगे युद्धे विवादे च द्यूते पथि निशीथके । नाधीयीताशुचिश्चापि नास्नातश्च न तंद्रितः ॥ उपाकर्मणि चोत्सर्गे ग्रहणे चंद्रसूर्ययोः । त्रिरात्रं स्यादनध्यायो मृते भूपे गुरावपि॥ फाल्गुन्यां पौर्णमास्यां तु चैत्र्यां तु ऽयहमिष्यते । अनध्यायस्तथाऽऽषाढ्यां श्रावण्यां कार्तिके तथा ॥ तथैव मार्गशीर्षस्य पूर्णमास्यां न संचरेत् । अशन्याः पतने कंपे भूमेर्दाहे पुरस्य च ॥ मृगस्य सर्पमार्जारनकुलाद्यश्वदंतिनां । अंतरागमनेऽजोष्ट्रखराणां च ऽयहं स्मृतं ॥ पताकातोरणादर्शरथयानजलाग्निनां । मूकोन्मत्तादिशूद्राणामंतरागमने ऽयहं ॥ नारीणामपि सर्वासां गवां चैवांतरागमे । अहोरात्रमनध्यायो गर्जने रात्रिसंभवे ॥ द्यूगर्जने च रात्रौ चापररात्रे दिनं स्मृतम् । दिनं तूभयसंध्यायामथास्यां चांतरागमे ॥ पक्षिमंडूकगोधासु नराणां चांतरागमे । दिने दिवसशेषः स्याद्राऽयां रात्र्याश्च तद्भवेत् ॥ श्वसृगालरवे नृणां श्रोत्रियागमनेऽध्वनि । तात्कालिकोऽप्यनध्यायस्तांबूलस्य च भक्षणे ॥ श्राद्धे निमंत्रितो यस्तु भुक्त्वा नाध्ययनं चरेत् । करिष्यंश्च तथा विप्र प्राग्विप्राणां विसर्जनात् ॥ एते प्रोक्ताह्यनध्याया वैदिकास्तांत्रिकास्ततः । प्रवक्ष्यंतेऽष्टमीद्वंद्वे चतुर्दश्यां च केवलं ॥ विषुवद्वितये चैवमयनद्वितये तथा । न पठेत्पाठयेद्धीमान् पुराणमपि सत्तमः॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां यावदस्तमिते रवौ । दिनशेषमनध्यायं वैदिकं परिकीर्तितं ॥ तथोदिते दिवारात्रं तत्कालमुदिते तयोः । प्रतिपद्यां च संक्रांतौ तत्कालमखिलासु च ॥ नभोनभस्ययोः कृष्णे मासयोस्त्रिदिनं द्विजः । न सप्तम्यामधीयीत त्रयोदश्यां च पैत्र्ययोः ॥ सदा त्रयोदशी यावत्प्राङ्निशीथात्तिथिर्भवेत् । प्राक् तदह्नोपराह्णांतादधीयीत न च द्विजः ॥ अष्टम्यां च चतुर्दश्यां प्रतिपद्यां

च वर्जयेत् । धर्मशास्त्रपुराणानि शास्त्रं तात्कालिकं बुधः॥ विमिश्रितासु कर्तव्यं सप्तम्यादिषु यत्नतः । पुराणाभ्यसनादीनि पंचदश्योश्च वा न वा ॥ नांतरागमने दोषः पुराणादिषु विद्यते । न शस्यते च तत्काले घृतं संप्राश्य वा बुधः ॥ नीयमानं शवं दृष्ट्वा महीस्थं वा द्विजोत्तमः । अकालगर्जितादौ च पर्वस्वाशौचकादिषु ॥ अनध्याया बुधैः कार्या उपरागादिकेषु च । श्वोऽनध्याये च शर्वर्यां नाधीयीत कदाचन ॥ स्मृत्यंतरे । प्रदोषे च त्रयोदश्यां नाध्येयं प्रतिपत्स्वपि । प्रदोषलक्षणं। षष्ठी च द्वादशी चैव अर्धरात्रोननाडिका । प्रदोषे न त्वधीयीत तृतीया नवनाडिकाः॥ अर्धरात्रोननाडिकार्धरात्राद्घटिकया एकयोनेत्यर्थः॥ अत्र नैमित्तिकप्रदोषमाहापस्तंबः । श्रावण्यां पौर्णमास्यामध्ययनमुपाकृत्य मासं प्रदोषे नाधीयीतेति । प्रदोषः पूर्वरात्रः । तथा च गर्गः । अध्यायानामुपाकर्म श्रावण्यां श्रवणेन वा । यावन्मासं पूर्वरात्रे नाधीयीत कदाचनेति ॥ नारदः। अयने विषुवे चैव शयने बोधने हरेः । अनध्यायं प्रकुर्वीत मन्वादिषु युगादिषु ॥ मन्वादयो मत्स्यपुराणेऽभिहिताः । आश्वयुक्शुक्लनवमी कार्तिकी द्वादशी सिता । तृतीया चैत्रमासस्य तथा भाद्रपदस्य च ॥ फाल्गुनस्य त्वमावास्या पौषस्यैकादशी सिता । आषाढस्यापि दशमी माघमासस्य सप्तमी ॥ श्रावणस्याष्टमी कृष्णा आषाढस्यापि पूर्णिमा । कार्तिकी फाल्गुनी चैत्री ज्येष्ठी पंचदशी सिता ॥ मन्वंतरादयश्चैते दत्तस्याक्षयकारकाः ॥ युगादयो विष्णुपुराणे दर्शिताः । वैशाखमासस्य तु या तृतीया नवम्यसौ कार्तिकशुक्लपक्षे । नभस्य मासस्य च कृष्णपक्षे त्रयोदशी पंचदशी च माघे ॥ उपाकर्मणि चोत्सर्गे त्रिरात्रं क्षपणं स्मृतं । अष्टकासु त्वहोरात्रं मृतं तासु च रात्रिषु ॥ मार्गशीर्षे तथा पौषे माघे मासे तथैव च । तिस्रोऽष्टकाः समाख्याताः कृष्णपक्षे तु सूरिभिः ॥ स्मृतिरत्नावल्यां । चतुर्दश्यां यदा पर्व प्रागस्ताद्दृश्यते रवेः । अनध्यायं प्रकुर्वीत त्रयोदश्यां तु धर्मवित् ॥ विद्युत्स्तनितवर्षे तु महोल्कानां तु संभवे । अकालिकमनध्यायमेतेषु मनुरब्रवीत् ॥ स्तनितं मेघगर्जितं । अनुराधर्क्षमारभ्य षोडशर्क्षे तु भास्करः । यावच्चरति वै तावदकालं मुनयो विदुः ॥ काले वृष्टौ च तत्कालमकाले च त्रिरात्रकं । अतिमात्राऽथवा वृष्टिर्नाधीयीत दिनत्रयं ॥ अकालवर्षणे जाते जलौकाश्च प्रवर्तते । एकरात्रमनध्यायमिति कात्यायनोऽब्रवीत् ॥ मेषे च वृषभे चैव तृणाग्रात्स्रवते जलं । भूमिद्रावमनध्यायं कुर्वंति वृषकुंभयोः ॥ अत ऊर्ध्वं द्विपादेषु तृणप्रच्यवनं जलं ॥ तृणप्रच्यवनं तृणप्रवाहः । चौरैरुपद्रुते ग्रामे संग्रामे चाग्निकारिते । अकालिकमनध्यायं विद्यात्सर्वाद्भुतेषु च ॥ प्रादुष्कृतेष्वनग्नीषु विद्युत्स्तनितनिःस्वने । सज्योतिः स्यादनध्यायः शेषरात्रौ तथा दिवा ॥ मनुः । निर्घाते भूमिचलने ज्योतिषां चोपसर्जने । एतानकालिकान् विद्यादनध्यायानृतावपि ॥ निर्घात आंतरालिको ध्वनिविशेषः । ज्योतिषां चोपसर्जनं चंद्रसूर्ययोः परिवेषः।आपस्तंबः । प्रतिगृह्य द्विजो वेदानेकोद्दिष्टस्य केतनं । त्र्यहांते कीर्तयेद्ब्रह्म राहोरन्यत्र सूतके ॥ केतनं निमंत्रणं । कूर्मपुराणे। समानविद्ये तु मृते तथा सब्रह्मचारिणी । आचार्ये संस्थिते चापि त्रिरात्रं क्षपणं स्मृतं ॥ याज्ञवल्क्यः। त्र्यहं प्रेतेष्वनध्यायः शिष्यर्त्विग्गुरुबंधुषु । उपाकर्मणि चोत्सर्गे स्वशाखाश्रोत्रिये मृते ॥ संध्यागर्जितनिर्घातभूकंपोल्कानिपातने । समाप्य वेदं द्युनिशमारण्यकमधीत्य च ॥ पशुमंडूकनकुलश्वाहिमार्जारमूषकैः । कृतेऽतरे त्वहोरात्रं शुक्रपाते तथोच्छ्रये ॥ पराशरः । सर्पस्यऽनकुलस्याथ अजमार्जारयोस्तथा । मूषकस्य तथोष्ट्रस्य मंडूकस्य च योषितः ॥ पुरुषस्यैलकस्यापि शुनोऽश्वस्य खरस्य च । एषां यो विततश्चैव अंतरागमने कृते ॥ त्रिरात्रमुपवासश्च त्रिरात्रमभिषेचनं । अथ तात्कालिकाः । खरोष्ट्रगर्दभोलूकसामबाणार्तनिःस्वने । अमेध्यशवशूद्रांत्यश्मशानपतितांतिके ॥ देशेऽशुचौ वर्त्मनि च विद्युत्स्तनितसंप्लवे । भुक्त्वाऽऽर्द्रपाणिरंभोंतरर्धरात्रेऽतिमारुते ॥ पांसुवर्षे दिशां दाहे संध्यानीहारभीतिषु । धावतः पूतिगंधे च शिष्टे च गृहमागते ॥ खरोष्ट्रयानहस्त्यश्वनौवृक्षे रथरोहणे । सप्तत्रिंशदनध्यायानेतास्तात्कालिकान्विदुरिति ॥ अथानध्यायापवादः ॥ मनुः । वेदोपाकरणे चैव स्वाध्यायो चैव नैत्यके । न निरोधोऽस्त्यनध्याये होममंत्रजपेषु चेति॥७॥इति मुहूर्तमार्तंडटीकायां मार्तंडवल्लभायामनध्यायप्रकरणं॥

**टीकार्थ**—आतां प्रदोषाचे अनध्याय सांगतों—रात्रीच्या अर्धभागीं ज्या दिवशीं मदन ह्म० त्रयोदशी असेल, मुनि ह्म० सप्तमी रात्रीच्या पहिल्या दीड प्रहरीं असेल, चतुर्थी रात्रीच्या पहिल्या प्रहरीं असेल, त्या दिवशीं प्रदोष असतो. ह्मणून त्या दिवशीं पूर्व रात्रीस अध्ययन करूं नये. उपाकर्म केल्यापासून एक महिनापर्यंत रात्रीच्या पूर्वार्धांत पठण वर्ज्य आहे. श्वः ह्म० उद्यां अनध्याय असेल तर आदले दिवशीं सर्वरात्र अध्ययन करूं नये. नेहेमी दोन्हीं संध्याकाळीं अध्ययन करूं नये. ज्या प्रहरांत चोरांचा उपद्रव असेल त्यांत अध्ययन करूं नये. दुर्भुक् ह्म० दुष्ट भोजन ह्मणजे दुष्टाचे

घरचें अन्न खाल्लें असतां आणि दुष्टपरिग्रह ह्म० दुष्टाकडून परिग्रह ह्म० दान दक्षिणा घेतली असतां तीन दिवस पर्यंत अध्ययन करूं नये. तसेंच श्रीधरीग्रंथांत स्मृतीचीं वचनें अशीं आहेत कीं, दोन अष्टमी, दोन चतुर्दशी, पौर्णिमा आणि अमावास्या, मरणाचें सूतक, दोन प्रतिपदा, मोठें भय, मोठा उत्सव, रोग, युद्ध, विवाद, द्यूत, रस्ता, मध्यरात्र, इतक्या ठिकाणीं अनध्याय करावे ह्मणजे अध्ययन करूं नये. तसेंच अपवित्र आणि स्नान केल्याशिवाय आळसी राहून अध्ययन करूं नये. उपाकर्म, उत्सर्ग, चंद्र सूर्यांचें ग्रहण ह्या ठिकाणीं तीन दिवसपर्यंत अनध्याय करावेत ह्म० अध्ययन करूं नये. राजा मेला अथवा गुरु मेला असतां आणि फाल्गुनी पौर्णिमा व चैत्री पौर्णिमा इतक्या ठिकाणीं तीन दिवसपर्यंत अनध्याय करावेत. त्या प्रमाणेंच आषाढी पौर्णिमा, श्रावणी पौर्णिमा, तशीच कार्तिकी पौर्णिमा, मार्गशीर्षी पौर्णिमा इतक्या दिवशीं अध्ययन करूं नये. वीज पडली असतां, भूमिकंप झाला असतां, नगरांत आग लागली असतां अध्ययन करूं नये. हरिण, सर्प, मांजर, मुंगूस, घोडा, वाघ वगैरे हिंसक प्राणी, बकरा, उंट, गाढव इतके प्राणी गुरु आणि शिष्य ह्यांच्या मधून गेले असतां तीन दिवस अध्ययन करूं नये. पताका, तोरण, आरसा, गाडी, मेणा वगैरे यान, पाणी, अग्नि, मुका, उन्मत्त, शूद्र हे गुरु आणि शिष्य ह्यांच्यामधून गेले असतां तीन दिवस अनध्याय करावेत ह्मणजे अध्ययन करूं नये. सर्व स्त्रिया आणि गाई ह्या मधून आल्या तर एक अहोरात्र अनध्याय ह्मणजे अध्ययन करूं नये. रात्रीस मेघगर्जना झाली असतां दुसऱ्या दिवशीं अध्ययन करूं नये. दिवसास मेघगर्जना झाली असतां रात्रीस अध्ययन करूं नये. दोन्ही संध्येस गर्जना झाली असतां एक अहोरात्र अध्ययन करूं नये. आतां गुरु आणि शिष्य ह्यांच्यामधून पक्षी, बेडूक, पाल, मनुष्यें हीं गेलीं असतां तो बाकीचा उरलेला दिवस अनध्याय करावा. तशीच उरलेली रात्र अनध्याय करावी. तसेंच कुत्रा, कोल्हा, ह्यांचें ओरडणें ऐकिलें असतां, श्रोत्रिय विद्वान् ब्राह्मण आला असतां, रस्त्यामध्यें, तेवढ्यापुरता अनध्याय करावा. तांबूल भक्षण केलें असतां अध्ययन करूं नये. श्राद्धीं जेवलेल्या ब्राह्मणानें अध्ययन करूं नये. तसेंच श्राद्ध भोजन पुढें करावयाचें असतां आणि त्याचें विसर्जन केल्याशिवाय अध्ययन करूं नये हे सर्व वैदिक अनध्याय सांगितले. आतां तांत्रिक अनध्याय सांगतों कीं, दोन अष्टमी, दोन चतुर्दशी, दोन विषुव संक्रांति, दोन अयनें, ह्या दिवशीं बुद्धिवानानें पुराणांचें सुद्धां पठण आणि पाठण करूं नये. अष्टमीस आणि चतुर्दशीस सूर्य अस्त झाल्यावर बाकीचा काळ ह्म० रात्र ही वैदिक अनध्याय जाणावा. अथवा सूर्य उदय काळीं जर त्या तिथी असतील तर सर्व दिवस अनध्याय करावा. प्रतिपदा आणि संक्रांति तत्काल जरी तिथि असली तरी सर्व दिवसभर अनध्याय करावा. नभ ह्म० श्रावण आणि नभस्य ह्म० भाद्रपद ह्या दोन महिन्यांच्या कृष्णपक्षांत तीन दिवसपर्यंत अध्ययन करूं नये. तें असें कीं, सप्तमीस आणि पितृपक्षांतील त्रयोदशीस ह्मणजे मध्यरात्रपर्यंत सर्व दिवसभर अध्ययन करूं नये. त्या दिवसाच्या अपराण्हापर्यंत अध्ययन करूं नये. अष्टमी, चतुर्दशी, प्रतिपदा इतक्या तिथींवर ती तिथि आहे तोंपर्यंतच विद्वानानें धर्मशास्त्र आणि पुराणें ह्यांचा अनध्याय करावा. ह्या शिवाय मिश्रित अशा सप्तम्यादि तिथींवर प्रयत्न पूर्वक पुराणादिकांचा अभ्यास करावा. पौर्णिमा आणि अमावास्या ह्या तिथींवर पुराणांचा अभ्यास करावा अथवा न करावा. गुरु आणि शिष्य ह्यांच्या मधून पूर्वीं सांगितलेले प्राणी वगैरे गेले असतां पुराणादिकांचा अभ्यास करण्यास व कराविण्यास हरकत नाहीं, परंतु तेवढ्या काळापुरताच अनध्याय करावा. अथवा तुप पिऊन पुनः अध्ययनास आरंभ करावा. प्रेत जमिनीवर पडलें असतां अथवा प्रेत वाहून नेतांना पाहिलें असतां, अकाळीं मेघगर्जना झाली असतां, पर्वकाळीं, आशौचादिकामध्यें, ग्रहणादिकांमध्यें विद्वानानीं अनध्याय करावेत असें सांगितलें आहे. दुसऱ्या दिवशीं अनध्याय असतां पहिले दिवशींच्या रात्रीस अध्ययन करूं नये दुसऱ्या स्मृतींत असें सांगितलें आहे कीं, प्रदोष, त्रयोदशी, प्रतिपदा ह्या दिवशीं अध्ययन करूं नये. आतां प्रदोष लक्षण सांगतों– षष्ठी आणि द्वादशी ह्या दिवशीं मध्यरात्रीच्या पूर्वीं एक घटिका कमीपर्यंत प्रदोषकाल असतो आणि तृतीयेस नऊ घटिका प्रदोष असतो. आतां आपस्तंब नैमित्तिक प्रदोष सांगतो कीं, श्रावण पौर्णिमासीला अध्ययन आरंभ केल्यावर एक महिनापर्यंत प्रदोषकाळीं अध्ययन करूं नये. प्रदोष ह्म० पूर्व रात्र समजावी. तेंच गर्ग सांगतो कीं, श्रावण पौर्णिमेला उपाकर्म केल्यावर मग एक महिनापर्यंत प्रदोषकाळीं ह्म० पूर्व रात्रीं अध्ययन करूं नये. नारद असें सांगतो कीं, दोन संक्रांतीस, विषुव संक्रांतीस, श्रीहरीच्या शयनीं ह्म० आषाढ शुद्ध एकादशीस आणि श्रीहरीच्या प्रबोधीं ह्म० कार्तिक शुद्ध एकादशीस अनध्याय करावा आणि सर्व मन्वादिकांचे दिवशीं अनध्याय करावा. मत्स्य पुराणांत मन्वादि किती आहेत ते सांगितले आहेत. ते असें कीं, आश्विन महिन्यांतील शुक्लनवमी, कार्तिकाचे महिन्यांतील शुक्ल द्वादशी, चैत्र महिन्यांतील शुक्ल तृतीया, भाद्रपदाची शुक्ल तृतीया, फाल्गुनाची अमावास्या, पौष महिन्यांतील शुक्ल एकादशी, आषाढाची शुक्ल दशमी, माघाची शुक्ल सप्तमी, श्रावणाची कृष्ण अष्टमी, आषाढी, कार्तिकी, फाल्गुनी, चैत्री, ज्येष्ठी पौर्णिमा ह्या पांच पौर्णिमा इतके दिवस मन्वादिक आहेत ह्यांवर दान केलें असतां,तें अक्षयदान होतें. युगादिक विष्णुपुराणांत सांगितले आहेत ते असे कीं, वैशाख महिन्याची शुक्ल तृतीया, कार्तिक शुक्लपक्षाची नवमी, भाद्रपदाच्या कृष्ण पक्षाची त्रयोदशी, माघांतील पौर्णिमा उपाकर्माचे आणि उत्सर्गाचे वेळीं तीन दिवसपर्यंत अनध्याय समजावेत. अष्टका श्राद्धाचे दिवशीं

अहोरात्र, मरणाच्या रात्रीस, मार्गशीर्ष, पौष, माघ ह्या तीन महिन्यांत कृष्ण पक्षांत तीन अष्टका श्राद्धें असतात. असें विद्वानांनीं सांगितलें आहे. स्मृतिरत्नावलि ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, ज्या वेळेस चतुर्दशीस रवीच्या अस्ताचे पूर्वी पर्व दिसतें त्या वेळेस अनध्याय करावा तसाच त्रयोदशीसही धर्मवेत्त्यानें अनध्याय करावा. अकालिक वीजेचा उत्पात आणि मेघांची गर्जना, मोठी उल्का पडली असतां अनध्याय करावेत असें मनूचें वाक्य आहे. अकालिक ह्मणजे अनुराधा नक्षत्रापासून तों पुढील सोळा नक्षत्रांवर जोंपर्यंत सूर्यनारायण प्रवेश करितो तोंपर्यंत अकालिक समजावा असें मुनींचें मत आहे. काळीं वृष्टि झाली असतां तेवढ्यापुरता अनध्याय करावा आणि अकालिक वृष्टि झाली असतां तीन रात्रपर्यंत अनध्याय करावेत. अथवा अतिवृष्टि झाली असतां तीन दिवस पर्यंत अनध्याय करावेत. अकाल वृष्टि झाली असतां जलौका प्रवृत्त होतात. त्यावेळीं एक रात्र अनध्याय करावा असें कात्यायनाचें मत आहे. मेष आणि वृषभ ह्या दोन राशींवर सूर्य असतां गवताच्या अग्रापासून पाणी झरतें आणि भूमीपासून स्राव होतो त्यावेळीं अनध्याय करावा. वृष आणि कुंभ राशीवर सूर्य असतां त्यापुढें द्विपाद प्राणी राशीवर असतां गवताचा स्राव होतो आणि गवताचा प्रवाह असतो त्यावेळीं अनध्याय करावा. चोरांनीं गांवास उपद्रव केला असतां, युद्धांत, गावांत आग लागली असतां, सर्व प्रकारचे अद्भुत चमत्कार झाले असतां, अकालिक ह्म० एकदम अनध्याय करावा. वीजेचा कडकडाट, मेघांची गर्जना ह्या ऐकल्या असतां सज्योति अनध्याय करावा. अथवा जेव्हां गर्जना इत्यादिक झाल्या असतील तेव्हांपासून त्या त्या रात्रीचा शेषपर्यंत अनध्याय करावा. मनु सांगतो कीं, त्या त्या कार्याचा ऋतु असूनही आकाशांतील शब्द, भूमिकंप, चंद्रसूर्याचें खळ, हे झाले असतां अनध्याय करावेत. आपस्तंब असें सांगतो कीं, ब्राह्मणानें वेद शिकण्याचा आरंभ केल्यावर एकोद्दिष्टाचे बद्दल निमंत्रण असेल तर तीन दिवस अनध्याय करावेत. राहूचे सूतकाशिवाय दुसरें सूतक असतां अनध्याय करावेत. कूर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, समान विद्या शिकलेला आपला सहाध्यायी, आपला गुरु मरण पावला असतां तीन रात्रपर्यंत अनध्याय करावेत. याज्ञवल्क्य सांगतो कीं, शिष्य, ऋत्विक्, गुरु आणि गुरुबंधु इतके मरण पावले असतां, तीन दिवसपर्यंत अनध्याय करावेत. उपाकर्म, उत्सर्जन, स्वशाखेचा श्रोत्रिय मेला असतां, संध्या, मेघगर्जना, उत्पात, भूकंप, उल्का ह्म० ज्वाला निघणें इतके झाले असतां, वेदाची समाप्ति झाली असतां, आरण्यग्रंथ अध्ययन केल्यावर अहोरात्र अनध्याय करावा. तसेंच गुरु आणि शिष्य ह्यांच्यामधून पशु, बेडूक, मुंगूस, कुत्रा, सर्प, मांजर, उंदीर हे गेले असतां, एक अहोरात्र अनध्याय करावा. तसाच शुक्राचा पात झाला असतां, किंवा अधिकपणा झाला असतां अनध्याय करावा. पराशर सांगतो कीं, साप, मुंगूस, बोकड, मांजर, उंदीर, उंट, बेडूक, स्त्री, पुरुष, एडका, कुत्रा, घोडा, गाढव ह्यांपैकीं कोणी एखादा गुरु आणि शिष्य ह्यांच्या मधून गेला असतां तीन दिवस उपवास, तीन दिवस अनध्याय करावेत. आतां तात्कालिक ह्म० तेवढया पुरते अनध्याय सांगतों—गाढव, उंट, खेचर, घुबड, साम, बाण, रडणाऱ्यांचा शब्द, अपवित्रांचा शब्द, प्रेत, शूद्र आणि अंत्यज जवळ असतां, अपवित्र देशीं, रस्त्यांत, विजेची गर्जना आणि मेघांची गर्जना झाल्यावर, चंद्रग्रहण, सूर्याचें ग्रहण, भोजन केल्यावर ओला हात आहे तोंपर्यंत, पाण्यामध्यें, मध्य रात्रीस, अति वारा सुटला असतां, अतिशय धूळ उडाली असतां, दिशा जळत असतां, संध्येच्या वेळीं, थुंक्याच्या वेळीं, भीतीमध्यें, धावणाऱ्यांस पाहिलें असतां, दुर्गंध आला असतां, शिष्टाचें आगमन झालें असतां, खर, उंट, यान, हत्ती, घोडा, नौका, वृक्ष, गाडी ह्यांवर आरोहण केलें असतां, असे एकंदर सदतीस अनध्याय तेवढ्यापुरते आहेत. आतां अनध्यायाचा अपवाद सांगतों—वेदाच्या उपाकरणाचे वेळीं, नित्य स्वाध्यायाचे वेळीं, होम, मंत्र आणि जप ह्या सर्वांमध्यें अनध्यायाचा अपवाद आहे ह्मणजे अध्ययन करावें ॥ ७ ॥ अशा रीतीनें मार्तंडवल्लभानामक टीकेचें अनध्याय प्रकरण समाप्त झालें. ॥ अनध्यायप्रकरण समाप्त ॥

---

## ॥ अथ पल्लीसरठपतनम् ॥ १० ॥

दक्षांगोदरनाभिहृत्सु पतिता पल्ली वरांगे हनुम् ।
त्यक्त्वा नुः शुभदा स्त्रियाः फलमिदं वामे[illegible]व्यत्ययात् ॥
इत्याहुः सरठप्ररोहणफलं पाते[illegible]थैके वृथा ।
पल्ल्यारोहणकेऽपि व[illegible]सहितं स्नात्वा चरेच्छांतिकम् ॥ १ ॥

॥ इतिपल्लीसरठयोः पतनादिविचारः ॥

श्लोकार्थ—उजवें अंग, उदर, नाभि, हृदय ह्यांवर व हनुवटी सोडून मस्तकावर पाल पडली तर पुरुषाला शुभ जाणावी, हें पुरुषांचें फळ स्त्रीला विपरीत घ्यावें. स्त्रीच्या डाव्या अंगीं पल्लीपतन शुभ होय. ह्या प्रमाणेंच ज्या ठिकाणीं पाल पडली तर शुभ, त्या ठिकाणीं सरठ ( सरडा ) चढला असतां शुभ जाणावा. ज्या ठिकाणीं सरडा चढला असतां शुभ, त्याठिकाणीं पडला तर अशुभ जाणावा. सरडाच्या पतनाचें फळ नाहीं व पालीच्या चढण्याचेंही फळ नाहीं असें कित्येक ह्मणतात. पल्ली, सरडा यांचें पतन किंवा आरोहण झालें तर सचैल स्नान करून यथाविधि शांति करावी ॥ १ ॥

अथ पल्लीसरठयोः पतनादिविचारः। अथ पल्लीसरठयोः फलं वृत्तेनैकेनाऽऽह–दक्षांगेति । दक्षांगोदरनाभिहृत्सु पतिता पल्ली तथा हनुं त्यक्त्वा वरांगे उत्तमांगे पतिता पल्ली नुः नरस्य शुभदा स्यात्। उत्तमांगे हनुं विना सर्वत्र शुभेत्यर्थः। अर्थादन्यत्र न शुभा । अन्यांगेषु पुरःपार्श्वपृष्ठेषु न शुभा स्यात् । अथ स्त्रिया विशेषमाह–स्त्रिया इदं पुरुषोक्तं फलं वामेतरव्यत्ययाज्ज्ञेयं। वामं वामांगं इतरं दक्षिणांगं तयोर्व्यत्ययो वैपरीत्यं तस्मात्पुरुषस्य दक्षांगे यत्फलमुक्तं तत्स्त्रिया वामांगे ज्ञेयं पुरुषस्य वामांगे यदुक्तं तत्स्त्रिया दक्षांगे ज्ञेयमित्यर्थः। अथाद्यत्रांगे वामेतरविभागाभावस्तत्र पुरुषतुल्यं फलं ज्ञेयं। वरांगे तूभयोः समानमेव फलं वामदक्षिणफलाविशेषात् । सरठफलमाह–इत्याहुः सरठप्ररोहणफलमिति। एवमेव आहुर्मुनय इत्यध्याहारः । सरठस्य प्ररोहणे पल्लीवत्फलमित्यर्थः। पाते सरठस्य पाते अन्यथा विपरीतं फलमाहुः। सरठस्य प्ररोहणे यत्फलं तत्तस्य पाते विपरीतं फलमाहुरित्यर्थः। एके वृथा एके आचार्या वृथा फलमाहुः सरठस्य प्ररोहण एव फलं पाते वृथा फलं शुभं न चाप्यशुभमित्याहुरित्यर्थः । पल्ल्यारोहणकेऽपि अन्यथाफलमाहुः पल्लीपतने यत्फलं तत्तस्या आरोहणेऽन्यथा विपरीतफलमाहुः एके वृथाफलमाहुः पल्ल्याः पतने एव फलं प्ररोहणे वृथेत्येके आहुरित्यर्थः। अथात्र विधिमाह–वस्त्रसहितः स्नात्वा चरेच्छांतिकमिति । सचैलस्नानं कृत्वा शांतिकं शास्त्रोक्तमाचरेत् । तथा च ज्योतिर्निबंधे । पल्लीस्पर्शफलं वक्ष्ये यदुक्तं ब्रह्मणा पुरा। ब्रह्मस्थाने भवेद्राज्यं स्थानलाभो ललाटके ॥ कर्णयोर्भूषणावाप्तिर्नेत्रयोः प्रियदर्शनं। नासिकायां सुगंधानि मुखे मिष्टान्नभोजनं ॥ कपोलयोर्भवेत्सौख्यं हनुदेशे महद्भयं। भृकुट्यां विग्रहश्चैव कंठे वा व्यसनागमः॥ कलिर्वंशे मुखं पृष्ठ्यां दक्षे वामे गदादयः । दक्षांगे विजयो नित्यं वामांगे शत्रुजं भयं॥ इष्टलाभो भुजे सव्ये कूर्परे मणिबंधके। दक्षे करतले द्रव्यं तत्पृष्ठे सद्व्ययो भवेत् ॥ वामे भुजे कूर्परे च मणिबंधे धनक्षयः। वामे करतले हानिस्तत्पृष्ठे चार्थनाशनं॥ हृदये राजसंमानं सौभाग्यं दक्षिणे स्तने। दक्षपार्श्वे च भोगाप्तिः स्तने वामे यशो धनं ॥ वामपार्श्वे भवेत्पीडा वामकुक्षौ शिशोस्तथा। दक्षकुक्षौ सुतावाप्तिरुदरे च विशेषतः॥ वस्त्राप्तिर्दक्षकट्यां च वामकट्यां सुखक्षयः। नाभ्यामनोरथावाप्तिर्बस्तौ गर्भच्युतिर्भवेत् ॥ गुह्ये मृत्युर्गुदे रोगो दक्षोरौ प्रीतिवर्धनं। वामोरौ मृत्युतो दुःखं दक्षजानौ सुवाहनं॥ पशुहानिर्वामजानौ दक्षिणे जघने सुखं । क्लेशः स्याद्वामजंघायां स्फिचि दक्षेऽर्थवृद्धिकृत् ॥ स्फिचि वामे स्त्रीवियोगो दक्षे गुल्फे प्रियागमः । उपप्लवो वामगुल्फे पादयोर्गमनं भवेत् ॥ अत्र यद्यपि सामान्येनोभयोर्गमनफलमुक्तं तथाऽपि दक्षिणपादे गमनाल्लाभो वक्तव्यः। वामपादे गमने हानिर्वक्तव्या। पुरोभागे च दुर्वार्ता नष्टवार्ता च पृष्ठतः। वामे हानिर्धनं दक्षे परितो भ्रमणे क्षितिः॥ वामदक्षिणभागेन यत्फलं कथितं नृणां। विपर्ययेण तत्स्त्रीणां ज्ञेयं शेषं द्वयोः समं॥ इत्थं पल्ल्याः प्रपतने फलं ज्ञेयं विचक्षणैः। एतदेव फलं विद्यात्सरठस्य प्ररोहणे ॥ पल्ल्याः प्ररोहणे चैव पतने सरठस्य च। तयोः फलस्य व्यत्यासात्तद्वदेव हि जायते॥ पल्ल्याः प्ररोहणं रात्रौ सरठस्य प्रपातनं। नातिदुष्टफलं विद्याद्ब्रह्याधिमुग्रं विपर्यये॥ पतनानंतरं यस्य रोहणं यदि जायते । पतने फलमुत्कृष्टं रोहणेऽल्पफलं भवेत् ॥ मृत्युयोगे च जन्मर्क्षे विष्ट्यां पाते च वैधृतौ। चंद्रेऽष्टमे च सक्रूरे लग्ने विघ्नं प्रजायते ॥ अंगं दक्षिणमारुह्य वामेनोत्तरते स्फुटं। तदा हानिकरी ज्ञेया व्यत्यये न तु हानिदा॥ चरणादूर्ध्वगीभूय सद्यो रोहिति शीर्षणं। प्राज्यराज्यं तदा दत्ते पल्ली श्वेता विशेषतः॥ चिंतिताभ्यधिकं लाभं स्थिता भोजनभाजने। पादांगुलीषु संपाताद्धानिश्च महती भवेत्॥ पल्ल्योः सरठयोर्वाऽपि युग्ममंगे शुभे पतेत्। दंपत्योर्जायते प्रीतिर्भिन्नभागे वियोगिता॥ शीर्षस्योपरि पतिता शुभाय पल्ली सिता नान्या। सितगृहगाधोस्पर्शे सर्वेष्वंगेषु शोभना ज्ञेयेति॥ कृकलासः पतेद्यस्य मूर्ध्नि तद्विघ्नशांतये। मृतसंजीविनीं

**विद्यां जपेन्मुंडितमस्तकः ॥ अथ पल्लीसरठयोः शांतिः । पल्लीसरठयोः स्पर्शे सचैलस्नानमाचरेत् । पंचगव्यं प्राशयित्वा कुर्यादाज्यावलोकनं ॥ शस्ते वाऽप्यथवाऽशस्ते यदीच्छेदात्मनः सुखं । पुण्याहवाचनं कृत्वा शांतिकर्म समाचरेत् ॥ प्रतिरूपं सुवर्णेन कुर्याद्वित्तानुसारतः। रक्तवस्त्रेण संवेष्ट्य गंधपुष्पैः प्रपूजयेत् ॥ तदग्रे मृन्मयंरम्यं कलशं जलपूरितं।वस्त्रमाल्यैरलंकृत्य स्थापयेत्तंडुलोपरि ॥ पंचामृतं पंचगव्यं पंचरत्नानि शक्तितः । पंचवृक्षकषायांश्च निक्षिप्याऽऽवाहयेत्ततः॥पूजयेद्गंधपुष्पाद्यैर्लोकपालान् क्रमेण च । अग्निसंस्थापनं कृत्वा होमकर्म समाचरेत् ॥ मृत्युंजयेन मंत्रेण समिद्भिः खादिरैः शुभैः । तिलैर्व्याहृतिभिर्होममष्टोत्तरसहस्रकं ॥ अष्टोत्तरशतं वाऽपि कुर्याद्वित्तानुसारतः । अभिषेकं ततः कृत्वा पावमानस्य च द्विजैः ॥ पुण्यवारुणसूक्तैश्च दोषशांत्यै द्विजोत्तमाः । धौतांबराणि धृत्वाऽथ स्वर्णवस्त्रतिलान्ददेत् ॥ ब्राह्मणान् भोजयेदित्थं शांतिकर्म करोति यः । तस्याऽऽयुर्विजयो लक्ष्मीः कीर्तिर्बुद्धिः शुभं भवेत् ॥ पल्लीसरठयोः शांतिः कथिता भृगुणा पुरा । शौनकाय मुनींद्राय लोकानुग्रहकारिणे ॥ १ ॥ इति मु० मा० टी० मार्तंडवल्लभायां पल्लीसरठयोः शांतिप्रकरणम् ॥**

**टीकार्थ**—आतां पाल आणि सरडा ह्यांच्या पतनाचा विचार एका वृत्तानें सांगतों—उजवें अंग, उदर नाभि, हृदय ह्यांवर आणि हनुवटी सोडून मस्तकावर पाल पडली असतां पुरुषाला शुभकारक आहे. मस्तकावर, हनुवटी खेरीज सर्व मस्तकाचे भागावर पडली असतां शुभकारक आहे. इतक्या स्थानांशिवाय बाकीचीं स्थानें अशुभ आहेत. आतां स्त्रियांना विशेष सांगतों——जें फल पुरुषांनां सांगितलें त्याच्या उलट स्त्रियांना समजावें. जसें कीं, पुरुषांच्या उजव्या अंगांस जें फळ सांगितलें तें फळ स्त्रियांच्या डाव्या अंगांस जाणावें. परंतु मस्तकावर पडली असतां सारखेंच फळ आहे. कारण मस्तकाला डावें आणि उजवें असा विशेष समजत नाहीं. आतां सरडाचें फळ सांगतों—अशाच रीतीनें सरठाचें फळही पालीच्या फळासारखेंच जाणावें. आतां सरठ आंगावर चढला असतां पालीच्या पडण्याप्रमाणें फल आहे परंतु तो अंगावर पडला असतां त्या चढण्याच्या उलट फळ आहे असें जाणावें. कित्येक आचार्यांचें मत असें आहे कीं, सरठ चढण्याचें फळ आहे परंतु सरठ पडण्याचें फळ मुळींच नाहीं, तसें पाल पडण्याचें फळ आहे परंतु पाल चढण्याचें फळ मुळींच नाहीं. आतां ह्याचा विधि सांगतों—वस्त्रासहित स्नान करून शास्त्रांत सांगितल्या प्रमाणें शांतिकर्म करावें. तसेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेवानें पूर्वीं सांगितल्या प्रमाणें पाल पडण्याचें फल सांगतों—मस्तकावर पडली असतां राज्य प्राप्ति होते. ललाटावर पडली असतां स्थानाचा लाभ होतो, कानावर पडली असतां अलंकार मिळतात. डोळ्यावर पडली असतां प्रियदर्शन होतें. नाकावर पडली असतां सुगंधाची प्राप्ति होते. मुखावर पडली असतां मिष्टान्न भक्षणास मिळतें. गालावर पडली असतां सौख्य प्राप्त होतें. हनुवटीवर पडली असतां मोठें भय प्राप्त होतें. भुवईवर पडली असतां तंटा कलह होतो. गळ्यावर पडली असतां संकट प्राप्त होतें. माकडहाडावर पडली असतां कलह होतो. मुखावर, पाठीवर मग उजव्या अथवा डाव्या क्रमानें पुरुष आणि स्त्रिया ह्यांना रोग वगैरे होतात. उजव्या अंगावर पडली तर विजय मिळतो,डाव्या अंगावर पडली असतां शत्रुपासून भय होतें.सव्य भुजावर पडली असतां इष्ट लाभ होतो. कोंपरावर पडली असतां इष्ट लाभ होतो, मणगटावर पडली असतांही इष्ट लाभ होतो. उजव्या करतळावर पाल पडली असतां द्रव्य लाभ होतो आणि त्या उजव्या हाताच्या पाठीवर पडली असतां उत्तम खर्च होतो. वाम भुजावर, कोंपरावर, मणगटावर पाल पडली असतां धनाचा नाश होतो. डाव्या करतळावर पडली असतां हानि होते, त्याच्या पृष्ठभागीं पडली असतां अर्थाचा नाश होतो. हृदयावर पडली असतां राजाकडून मान मिळतो. उजव्या स्तनावर पडली असतां सौभाग्य प्राप्त होतें. उजव्या कुक्षीवर पडली असतां भोगाची प्राप्ति होते. डाव्या स्तनावर पडली असतां यश आणि धन मिळतें. डाव्या कुक्षीवर पडली असतां पिडा होते. तसेंच बालकाच्या डाव्या कुक्षीवर पिडा होत. उजव्या कुक्षीवर पडली असतां पुत्र प्राप्ति होते. पोटावर पडली तर विशेषें करून पुत्र प्राप्ति होते. उजव्या कटीवर पडली असतां वस्त्र मिळतें. डाव्या कटीवर पडली असतां सुखाचा क्षय होतो. नाभीवर पडली असतां मनोरथ पूर्ण होतो. बस्तीवर पडली असतां गर्भाचा स्राव होतो. गुह्यावर पडली असतां मृत्यु होतो. गुदस्थानीं पडली असतां रोग होतो. उजव्या मांडीवर पडली असतां प्रीति वाढते. डाव्या मांडीवर पडली असतां मृत्यू संबंधी दुःख होतें. उजव्या जंघेवर पडली असतां उत्तम वाहन मिळतें. डाव्या जंघेवर पडली असतां पशूंची हानि होते. दक्षिण जघनावर पडली असतां सुख प्राप्त होतें, वाम जघनावर पडली असतां क्लेश होतो. उजव्या कुल्यावर पडली असतां अर्थाची वृद्धि होते. डाव्या कुल्यावर पडली असतां स्त्रीचा वियोग होतो. उजव्या घोंट्यावर पडली असतां प्रियेची प्राप्ति होते आणि डाव्या घोंट्यावर.पडली असतां पीडा होते. पायांवर पडली असतां गमन होतें. आतां जरी ही सामान्यपणें पांयावर पाल पडली असतां गमन होतें असें फळ सांगितलें आहे, तथापि उजव्या पांयावर पाल पडली असतां गमन।

पासून लाभ होतो असें समजावें आणि डाव्या पायांवर पडली असतां गमना पासून हानि होते असें समजावें, आपल्या पुढल्याभागीं पडली असतां दुष्ट वार्ता ऐकूं येते. पाठीमागें पडली असतां नष्ट वार्ता ऐकूं येते. डाव्या बाजूकडे पडली असतां हानि होते आणि उजव्या बाजूस पडली असतां धन प्राप्ति होते. चोहोंकडे तिनें भ्रमण केलें असतां नाश होतो. आतां डावा, उजवा ह्या भागांचें जें पुरुषाला फळ सांगितलें. त्याच्या उलट स्त्रियांनां समजावें बाकी फळ सारखेंच आहे. अशा रीतीनें पाल पडण्याचें फळ विद्वानांनी जाणावें. अशाच रीतीनें सरडा चढण्याचें फळ समजावें. पाल चढण्याचें आणि सरडा पडण्याचें ह्या दोघांच्या फळाचा व्यत्यास करून जाणावें. रात्रीस पाल चढली असतां आणि सरडा पडला असतां त्याचें आति दुष्ट फळ नाहीं असें जाणावें आणि अतिशय उग्र व्याधि उत्पन्न होतो. पडल्यावर जर चढणें होईल तर पतनाचें फळ फारच उत्कृष्ट आहे. परंतु चढण्याचें फळ अल्प आहे. मृत्युयोग, जन्मनक्षत्र, विष्टियोग, व्यतिपात, वैधृति, आठवा चंद्र, लग्नीं क्रूर ग्रह असतां पाल पडली तर विघ्न उत्पन्न होतें. उजव्या अंगावर चढून डाव्या अंगावरून खालीं उतरेल तर मोठी हानि होते असें जाणावें आणि ह्याच्या उलट होईल तर हानि होणार नाहीं. पायापासून वर चढून जर तत्काल मस्तकावर चढेल तर मोठें राज्य प्राप्त होतें आणि ती पाल जर पांढरी असेल तर तिचें फळ विशेषें करून जाणावें जेवणाच्या भांड्यांत जर बसलेली असेल तर मनांत चिंतिलेल्या फळापेक्षां अधिक फळ मिळतें. पायांच्या बोटांत येऊन आडखळली तर फार मोठी हानि होते. पाल आणि सरडा हे दोघे जर शुभ अंगावर पडलीं तर स्त्री पुरुषांमध्यें मोठी प्रीति होते. निंद्य स्थानीं पडली असतां स्त्री पुरुषांचा वियोग होतो, मस्तकावर पडलेली पाल पांढरी असेल तर शुभकारक आहे, दुसरी पडली तर शुभकारक नाहीं. घरांतील पांढऱ्या पालीचा स्पर्श झाला असतां सर्व अंगावर क्षोभ प्राप्त होतो. सरडा ज्याच्या मस्तकावर पडेल त्यापासून होणाऱ्या विघ्नांची शांति होण्यास्तव क्षौर करून मृतसंजीविनी विद्येचा जप करावा. आतां पाल आणि सरडा ह्यांची शांति सांगतों—पाल आणि सरडा ह्यांचा स्पर्श झाला असतां वस्त्रासहित स्नान करावें. पंचगव्य प्राशन करावें. तुपांत अवलोकन करावें. मग तें पतन शुभकारक असो अथवा अशुभकारक असो जर आपल्या कल्याणाची इच्छा असेल तर पुण्याहवाचन करून शांतिकर्म आचरण करावें. आपल्या शक्त्यनुसार सुवर्णाची प्रतिमा करून तिला लाल वस्त्रानें वेष्टन करावें, गंध आणि फूल ह्यांनीं त्याची पूजा करावी. तिच्या पुढें मृत्तिकेचा एक कलश पाण्यानें भरलेला आणि वस्त्र, फूल ह्यांनीं सुशोभित केलेला तांदुळावर ठेवावा. त्या कलशामध्यें, पंचामृत, पंचगव्य, पंचरत्न, पांच वृक्षांचे कषाय टाकून त्याचें आवाहन करावें, त्याची पूजा गंध फूलांनीं करून लोकपालांचें क्रमानें पूजन करावें. अग्नीचें स्थापन करून होम करावा. तो होम मृत्युंजय मंत्रानें खादिराच्या समिधांनी आणि व्याहृति उच्चारून तिलांनीं एक हजार आठ अथवा एकशें आठ आहुति टाकाव्यात अथवा आपल्या द्रव्यानुसार होम करावा. नंतर पावमान सूक्तांनीं अभिषेक करावा आणि पुण्याहवाचनाच्या सूक्तांनीं अभिषेक करावा. त्यापासून दोषाची शांति होते ब्राह्मणांकडून शुभ वस्त्रें धारण करवून त्यांना सोनें, वस्त्र, तिळ द्यावेत आणि ब्राह्मणांनां भोजन द्यावें. अशा रीतीनें जो शांतिकर्म करतो त्याला आयुष्य, विजय, लक्ष्मी, कीर्ति, बुद्धि इत्यादि शुभ फल प्राप्त होतें अशा रीतीनें पाल आणि सरडा ह्यांची शांति पूर्वी भृगुनें लोकांवर अनुग्रह करणाऱ्या अशा मुनिश्रेष्ठ शौनकाला सांगितली आहे ॥ १ ॥ अशा रीतीनें मार्तंडवल्लभा टीकेचें पाल आणि सरडा ह्यांच्या शांतीचें प्रकरण पुरें झालें ॥

॥ पल्ली सरठ पतनादि प्रकरण समाप्त ॥

---

## ॥ गोचर प्रकरणम् ॥ ११ ॥

### शुभग्रह व ताराबल.

स्वर्क्षाच्चंद्रखलास्त्रिखारिषु शुभाः सप्ताद्यगोब्जः पुनः ।
र्वापुत्राद्व्ययधर्ममृत्युषु कविः स्वास्तत्रिकोणे गुरुः ॥
सौम्यो व्यंत्यसमेऽखिला भवगताः शुक्रे नवेषुद्विगः ।
चंद्रोऽथो निजभाच्छुभं नवहृतं त्र्यद्रीषु शेषं न सत् ॥ १ ॥

श्लोकार्थ—आपल्या जन्मराशीपासून चंद्र आणि खलग्रह ३।१०।६ ह्या स्थानीं शुभ आणि ७।१ ह्या स्थानीं चंद्र शुभ जाणावा. शुक्र १।२।३।४।५।१२।९।८ ह्या स्थानीं शुभ, गुरु २।७।९।५ ह्या स्थानीं शुभ, बुध

२।४।६।८।१० ह्या स्थानीं शुभ होय. एकादशस्थानीं सर्व ग्रह शुभ होत. शुक्लपक्षांत ९।५।२ ह्या स्थानीं चंद्र शुभ समजावा. आपल्या जन्मनक्षत्रापासून दिवस नक्षत्र मोजून ९ नीं भागावें, बाकी ३।५।७ राहिली तर शुभ नाहीं ह्मणजे तारावल नाहीं. १।२।४।६।८।० हे अंक बाकी राहतील तेव्हां तारावल आहे असें समजावें. ॥ १ ॥

अथ गोचरप्रकरणं विवक्षुस्तावज्जन्मराशेः सकाशात् को ग्रहः कस्मिन् स्थाने शुभः कस्मिन्नशुभ इति चंद्रे शुक्लपक्षे विशेषं ताराबलं च वृत्तेनैकेनाऽऽह–स्वर्क्षाच्चंद्रखला इति । स्वर्क्षात् स्वजन्मराशेः सकाशात् चंद्रखलास्त्रिखारिषु शुभाः स्युः । त्रिः तृतीयं खं दशमं अरिः षष्ठं तेषु चंद्रखलाः चंद्रः प्रसिद्धः खलाः पापग्रहाः रविभौमशनिराहुकेतवः शुभाः शुभफला भवंति । पुनः सप्ताद्यगोऽब्जश्चंद्रः शुभः स्यात् । सुगमं । आपुत्राद्व्ययधर्ममृत्युषु कविः शुभः स्यात् । आपुत्राज्जन्मराशितः क्रमेण पंचमपर्यंतं १।२।३।४।५ व्ययो द्वादशं धर्मं नवमं मृत्युरष्टममेषु कविः शुक्रः शुभः स्यात् । स्वास्तत्रिकोणे गुरुः शुभः स्यात् स्वं द्वितीयमस्तं सप्तमं त्रिकोणं नवमं पंचमं च तत्र गुरुर्बृहस्पतिः शुभः स्यात् । सौम्यो व्यंत्यसमे शुभः स्यात् । सौम्यो बुधः विगतमंत्यं यस्मात्तद्व्यंत्यं तच्च तत्समं च तथा तस्मिन् द्वादशस्थानवर्ज्यसमस्थाने द्वितीयचतुर्थादिके शुभः स्यादित्यर्थः । अखिला भवगताः शुभाः स्युः । सर्वे ग्रहा एकादशस्थाने शुभाः स्युरिति । शुक्ले नवेषुद्विगश्चंद्रः शुभः स्यात् न कृष्णपक्ष इति । अथ ताराबलमाह–निजभात् शुभं नवहृतं त्र्यद्रीषु शेषं न सत् निजभं स्वजन्मनक्षत्रं तस्मात् शुभं दिननक्षत्रपर्यंतं संगण्य नवहृतं सत् त्र्यद्रीषु शेषं त्रिसप्तपंचशेषं न सत् न शुभं अन्यच्छुभमित्यर्थात्सिद्धं । तथा च विशेषसंग्रहो व्यवहारसारे । पंथा हानिः प्रियं व्याधिर्दैन्यं स्वास्थ्यं गतिं गदः । पापं सुखं धनं हानिं करोत्यर्कः स्वजन्मभात् ॥ वस्त्रं हानिर्धनं रोगं पीडां वित्तं प्रियं वसु । भयं सुखं धनं रोगं करोतींदुः स्वजन्मभात् ॥ भयं हानिर्धनं वैरं दुःखं लाभं भयं क्षयं । पापं लाभं सुखं हानिं जनेभौमफलं क्रमात् ॥ बंधं लाभं भयं वित्तं शोकं लक्ष्मीं क्षयं धनं । रोगं भोगं सुखं हानिं करोति ज्ञः स्वजन्मभात् ॥ भयं वित्तं रुजं हानिं लाभं शोकं सुखं रुजं । मानं दैन्यं धनं पीडां करोति जन्मभाद्गुरुः ॥ जयं वित्तं धनं सौख्यं पुत्रान् वैरं शुभं सुखम् । धर्मं दुःखं धनं लाभं जनेः शुक्रो ददाति वै ॥ भयं शोकं धनं दुःखं हानिं सुहृत्क्षयं मृतिं । पापं श्रमं धनं हानिं जनेः पंगुफलं क्रमात् । राहुकेत्वोः फलं शनिकुजवत् ॥ १ ॥

टीकार्थ—आतां गोचर प्रकरण सांगण्याच्या इच्छेनें अगोदर जन्म राशीपासून कोणता ग्रह कोणत्या स्थानीं शुभ आणि कोणता अशुभ हें आणि चंद्राविषयीं शुक्लपक्षींचा विशेष आणि तारावल एका वृत्तानें सांगतो– जन्म राशीपासून त्रि ह्म० ३ ख ह्म० १० अरि ह्म० ६ ह्या स्थानीं असलेले चंद्र, आणि पापग्रह ह्म० रवि, मंगळ, शनि, राहु, केतु इतके ग्रह शुभ फल देणारे आहेत. आणि पुनः सप्त ह्म० ७ आद्य ह्म० १ ह्या स्थानाचा चंद्र शुभकारक समजावा. शुक्र हा पुत्रापर्यंत ह्मणजे लग्नापासून तों पुत्र ह्म० पंचमस्थान ह्या पर्यंत ह्म० १–२–३–४–५ इतक्या स्थानाचा आणि व्यय ह्म० १२ धर्म ह्म० ९ अष्ट ह्म० ८ ह्या ठिकाणचा शुभकारक समजावा. गुरु हा स्व ह्म० २ अस्त ह्म० ७ त्रिकोण ह्म० ९–५ अर्थात् २–७–९–५ ह्या स्थानांचा शुभकारक आहे. सौम्य ह्म० बुध अंत्याशिवाय ह्म० १२ स्थानाशिवायसम ह्म० २–४–६–८–१० ह्या स्थानचा शुभकारक आहे. सर्व ग्रह, एकादशस्थानीं असलेले शुभकारक आहेत. शुक्लपक्षांतील चंद्र हा नव ह्म० ९ इषु ह्म० ५ द्वि ह्म० २ ह्या स्थानचा शुभकारक आहे. कृष्णपक्षांतील शुभकारक नाहीं. आतां तारावल सांगतो– निज ह्म० आपल्या भ ह्म० नक्षत्रापासून अर्थात् आपल्या जन्मनक्षत्रापासून शुभ ह्म० दिवसाचें नक्षत्र जें असेल तें मोजावें आणि जी संख्या येईल तिला नव हृत ह्म० नवांनीं भागावें त्रि ह्म० ३ सप्त ह्म० ७ पंच ह्म० ५ हे बाकी राहिले तर शुभ नाहीं ह्मणजे तारावल नाहीं अर्थात् ३–७–५ ह्यां शिवाय दुसरी बाकी राहील तर शुभकारक आहे ह्मणजे तारावल आहे. ह्मणजे १–२–४–६–८–० इतके अंक बाकी राहातील तर शुभ समजावें. तोच व्यवहारसारांत विशेष संग्रह असा आहे कीं, रवि हा आपल्या भ पासून क्रमानें पंथा, हानि, प्रिय, व्याधि, दैन्य, स्वस्थपणा, गमन, रोग, पाप, सुख, धन, हानि इतके करतो. चंद्र हा आपल्या राशीपासून अनुक्रमानें वस्त्र, हानि, धन, रोग, पीडा, वित्त, प्रिय, वसु, भय, सुख, धन, रोग इतके करतो. मंगळ हा आपल्या राशीपासून क्रमानें भय, हानि, धन, वैर, दुःख, लाभ, भय, क्षय, पाप, लाभ, सुख, हानि इतके करतो. बुध हा आपल्या राशीपासून क्रमानें बंध, लाभ, भय, वित्त, शोक, लक्ष्मी, क्षय, धन, रोग, भोग, सुख, हानि इतके करतो. गुरु हा आपल्या राशीपासून क्रमानें भय, वित्त, रोग, हानि, लाभ, शोक, सुख, रोग, मान, दैन्य, धन, पीडा इतके करितो. शुक्र हा आपल्या राशीपासून क्रमानें

जय, वित्त, धन, सौख्य, पुत्र, वैर, शुभ, सुख, धर्म, दुःख, धन, लाभ इतके क्रमानें करितो. शनि हा जन्मराशीपासून अनुक्रमानें भय, शोक, धन, दुःख, हानि, सुहृत्क्षय, मरण, पीडा, पाप, श्रम, धन, हानि, इतके करितो. राहूचें फळ शनिप्रमाणें आणि केतूचें फळ मंगळाप्रमाणें जाणावें ॥ १ ॥

### ग्रहांचे वेध.

षष्ठांत्ये खजले सुतायभवने त्र्यंके रवेः स्यान्मिथ- ।
द्व्यंके जन्मसुते खके मृतिभवे द्व्यस्ते षडंत्ये विधोः ॥
त्र्यंके लाभसुते सपत्नतपसोर्व्यर्काशुभानां व्यधोऽ- ।
ष्टाद्ये पुत्रधनेऽष्टखे कसहजेऽर्यंके भवांत्ये विदः ॥ २ ॥
द्व्यस्तेऽष्टादिमयोः खके नवसुते त्रीशेऽष्टपुत्रे त्रिका- ।
द्येऽर्यंत्ये कभवे भृगोर्ज्ञशशिनोः शन्यर्कयोर्न व्यधः ॥
विद्धो व्यस्तफलो भवेद्दिविचरो हेमाद्रिविंध्यांतरे ।
खेटर्क्षाद्व्यधखेचरं विगणयाऽन्यत्रोभयं जन्मभात् ॥ ३ ॥
॥ इति मुहूर्तमार्तंडे गोचरप्रकरणम् ॥

श्लोकार्थ—षष्ठ व द्वादश ह्या दोन स्थानांचा परस्पर वेध होतो, पहिल्या श्लोकांत षष्ठस्थानीं सूर्य शुभ आहे, परंतु त्याच्या १२ व्या वेधस्थानीं कोणी ग्रह नसेल तर तो षष्ठ सूर्य शुभ व तेथें कोणी ग्रह असेल तर शुभ नव्हे. द्वादश रवि, अशुभ परंतु षष्ठस्थानीं कोणी ग्रह असतां तो शुभ जाणावा. बुधाचा व चंद्राचा आणि शनीचा व रवीचा एकमेकांस वेध होत नाहीं. विद्धग्रह विपरीत फळ देणारा होतो. हिमालय व विंध्यपर्वत यांच्यामध्यें ग्रह असेल त्या राशीपासून त्याच्या वेधराशीपर्यंत मोजून वेध पहावा. अन्य ठिकाणीं ग्रह व वेधस्थान हीं दोन्हीं आपल्या जन्मराशीपासून मोजावीं. पुढें सर्व ग्रहांचीं शुभस्थानें व वेधस्थानें आहेत त्यांवरून वेध जाणावा ॥ २ ॥ ३ ॥

अथ सर्वेषां ग्रहाणां वेधं वृत्तद्वयेनाऽऽह–षष्ठांत्य इति । षष्ठं प्रसिद्धं अंत्यं द्वादशं तस्मिन् मिथः परस्परं वेधः । तद्वत् खजले सुतायभवने त्र्यंके अयं रवेर्वेधः स्यात् । अत्रांकन्यास एव व्याख्यानं । सप्तम्युपलक्षितैः पदैः वेधा ज्ञेयाः । तद्यथा षष्ठां ६ त्यं १२ ख १० जले ४ सुता ५ य ११ त्र्यं ३ के ९ रवेः सूर्यस्यायं वेधः । त्र्यं ३ के ९ जन्म १ सुते ५ ख १० के ४ मृति ८ भवे ११ द्व्य २ स्ते ७ षडं ६ त्ये १२ विधोरयं वेधः । त्र्य ३ कें १२ लाभ ११ सुते ५ सपत्न ६ तपसो ९ व्यर्काशुभानां व्यधोऽयं विगतोऽर्कौ येभ्यस्ते व्यर्का । तेच तेऽशुभाश्च व्यर्काशुभा रविरहितपापग्रहास्तेषामयं वेध इत्यर्थः । अष्टा ८द्ये १ पुत्र ५ धने २ ऽष्ट ८ खे १० क ४ सहजे ३ ऽर्य ६ के ९ भवां ११ त्ये १२ विदः बुधास्यायं वेधः ॥ २ ॥ द्व्यस्तेति । द्व्य २ स्ते ७ ऽष्टा ८ दिमयोः १ ख १० के ४ नव ९ सुते ५ त्री ३ शे ११ ऽष्ट ८ पुत्रे ५ त्रिका ३ द्ये १ ऽर्य ६ त्ये १२ क ४ भवे ११ भृगोः शुक्रस्यायं वेधः । गुरोर्वेधः संस्कारप्रकरणे कथितः सोऽत्र सिद्धो ज्ञेयः । अत्र वेधविधाने ज्ञशशिनोः बुधचंद्रयोः शन्यर्कयोश्च परस्परं नो व्यधः स्यात् । परस्परं वेधो नास्ति । एतदुक्तं भवति । विंध्यहिमाचलयोर्मध्ये जन्मराशेः सकाशादन्यतमग्रहाधिष्ठितराशिपर्यंतं गणयित्वा तद्राशेः सकाशात् यथोक्तवेधस्थानपर्यंतं गणयेत् । तत्र यदि कश्चिद्ग्रहो भवति तदा गणितो ग्रहो विद्धो भवति । अन्यदेशेषु जन्मराशेः सकाशादुभयग्रहं तद्वेधस्थानं च गणयेत् यदा वेधस्थाने कश्चिद्ग्रहो भवति तदाऽन्यो ग्रहो विद्धो भवति । तत्र सूर्यस्य शनिवेधो नास्ति शनेः सूर्यस्य वेधो नास्ति । एवं चंद्रबुधयोः परस्परं ज्ञेयं । अथ वेधप्रयोजनमाह–विद्धो व्यस्तफलो भवेद्दिविचर इति । विद्धो ग्रहो व्यस्तफलः स्यात् प्रथमश्लोकोदितं फलं व्यस्तं विपरीतं भवतीत्यर्थः । रत्नमालायामपि । वामवेधविधिना त्वशोभना अप्यमी शुभफलं दिशंत्यलं । ते मृषावचनभाषिणो जना यांति हास्यमपि कीर्तिलांछनामिति ॥ अथ देशविशेषेण वेधगणनाविशेषमाह–हेमाद्रिविंध्यांतर इति । अस्यार्थः पूर्वमेव व्याख्यातः ॥ ३ ॥ ॥ इति मुहूर्तमार्तंडटीकायां गोचरप्रकरणं समाप्तम् ॥

**टीकार्थ—**आतां सर्व ग्रहांचे वेध दोन वृत्तानें सांगतों— रवीचा षष्ठ ह्म० ६ अंत्य ह्म० १२ ह्यांचा परस्पर वेध आहे तसाच ख ह्म० १० जल ह्म० ४ ह्यांचा परस्पर वेध आहे. सुत ह्म० ५ आय भवन ह्म० ११ ह्यांचा परस्पर वेध आहे हा सूर्याचा वेध झाला. आतां चंद्राचा त्रि ह्म० ३ अंक ह्म० ९ ह्याचा परस्पर वेध आहे तसाच जन्म ह्म० १ सुत ह्म० ५ ह्यांचा परस्पर वेध आहे, ख. ह्म० १० क ह्म० ४ मृति ह्म० ८ भव ह्म० ११ द्वि ह्म० २ अस्त ह्म० ७ षट् ह्म० ६ अंत्य ह्म० १२ इतके चंद्राचे वेध आहेत. रवीशिवाय बाकीच्या पापग्रहांचा वेध त्रि ह्म० ३ अर्क ह्म० १२ लाभ ह्म० ११ सुत ह्म० ५ सपत्न ह्म० ६ तप ह्म० ९ इतके मंगळ, शनि, राहु, केतु ह्या पापग्रहांचे वेध आहेत. बुधाचा वेध अष्ट ह्म० ८ आद्य ह्म० १ पुत्र ५ धन २ अष्ट ८ ख ह्म० १० क ह्म० ४ सहज ह्म० ३ अरि ह्म० ६ अंक ह्म० ९ भव ह्म० ११ अंत्य १२ इतके वेध बुधाचे आहेत ॥ २ ॥ शुक्राचा वेध द्वि ह्म० २ अस्त ह्म० ७ अष्ट ह्म० ८ आदिम ह्म० १ ख ह्म० १० क ह्म० ४ नव ह्म० ९ सुत ह्म० ५ त्रि ह्म० ३ ईश ह्म० ११ अष्ट ह्म० ८ पुत्र ह्म० ५ त्रिक ह्म० ३ आय ह्म० १ आरि ह्म० ६ अंत्य ह्म० १२ क ह्म० ४ भव ह्म० ११ इतके शुक्राचे वेध आहेत. गुरूचा वेध संस्कार प्रकरणांत पूर्वी सांगितला आहे तोच येथेंही घ्यावा. ह्या वेधांमध्यें बुध आणि चंद्र ह्यांचा परस्पर वेध नाहीं तसाच शनि आणि रवि ह्यांचा परस्पर वेध नाहीं. ह्याचा अर्थ असा निघतो कीं, विंध्य पर्वत आणि हिमालय पर्वत ह्या दोहोंच्यामध्यें जो ग्रह असेल तो जन्मराशीपासून ज्या कोणत्या एखाद्या राशीवर राहिला असेल त्या राशीपर्यंत मोजून त्या राशीपासून पूर्वी सांगितल्याप्रमाणें वेधाचे स्थानापर्यंत मोजावे. त्यांत जर एखादा ग्रह वेध स्थानीं असेल तर त्याहून निराळा ग्रह विद्ध झाला असें होतें. त्यांत सूर्याचा वेध शनीस लागू पडत नाहीं. आणि शनीचा वेध सूर्यास लागू पडत नाहीं अशाच रीतीनें चंद्र आणि बुध यांचा परस्पर वेध लागू पडत नाहीं. आतां वेधांचें काय प्रयोजन आहे तें सांगतों— जो ग्रह विद्ध असेल त्यापासून पूर्वींच्या श्लोकांत सांगितलेलें फळ मिळत नाहीं. वाम वेध असेल तर अशुभ असूनही ते शुभ फल देतात. असे जे कोणी सांगतात ते मृषा ह्म० खोटें बोलणारे आहेत ह्मणून ते हास्यास्पद होतात आणि त्यांची अपकीर्ति होते. आतां देशपरत्वें वेध कसा गणावा हें सांगतों—ह्याचा अर्थ आतांच पूर्वीं सांगितला आहे ॥ ३ ॥

**वेध कोष्टक.**

| ग्रह. | रवि. | चंद्र. | मं. श. रा. के. | बुध. |
|---|---|---|---|---|
| शुभस्थान. | ६।१०।११।३ | ३।१।१०।११।७।६ | ३।११।६ | ८।२।१०।४।६।११ |
| वेधस्थान. | १२।४।५।९ | ९।५।४।८।२।१२ | १२।५।९ | १।५।८।३।९।१२ |

| ग्रह. | शुक्र. | गुरु. |
|---|---|---|
| शुभस्थान. | २।१।४।५।११।८।३।१२।९ | २।५।११।७।९ |
| वेधस्थान. | ७।८।१०।९।३।५।१।६।१० | १२।४।८।३।११ |

॥ गोचर प्रकरण समाप्त ॥

## ॥ संक्रांति प्रकरणम् ॥ १२ ॥

### संक्रांतीचा पुण्यकाळ व शुभाशुभत्व.

ऊर्ध्वं ह्यात्ममृगेऽर्कसंक्रमणतः पूर्वं स्थिरे कर्कटे ।
जूकाजोभयतः खरामघटिकाः पुण्या मृगे दिग्युताः ॥
कर्काजांत्यवृषैणसूर्यचलनं निश्यन्यभं सद्दिवा ।
सूर्यारार्किदिने तृतीयकरणे मांत्येऽष्टमेऽदुःखदम् ॥ १ ॥

श्लोकार्थ—द्विस्वभाव ह्म० मिथुन, कन्या, धन, मीन ह्यांच्या व मकरसंक्रांतीच्या पुढें ३० घटिका पुण्यकाल, स्थिर ह्म० वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ ह्यांच्या व कर्काच्या पूर्वी ३० घटिका पुण्यकाळ. तूळ, मेष यांच्या पूर्वी १५ घ० व पुढें १५ घ० असा ३० घ० पुण्यकाळ. मकराला पूर्वीच्या ३० व अधिक १० असा ४० घटिका पुण्यकाळ जाणवा. कर्क, मेष, मीन, वृषभ, मकर ह्या ५ संक्रांति रात्रीस होतील तर शुभ होत. ह्यांहून अन्य संक्रांति दिवसास होतील तर शुभ होत. रवि, मंगळ, शनि ह्या वारीं किंवा कौलव, किंस्तुघ्न, शकुनि ह्या करणांवर कोणतीही संक्रांति झाली असतां अशुभ जाणावी ॥ १ ॥

**अथ संक्रांतिप्रकरणम् । अथ संक्रांतिफलं विवक्षुस्तावद्राशिपरत्वेन पुण्यकालं वृत्तार्धेनाऽऽह-ऊर्ध्वं ह्यात्मेति । ह्यात्मानो द्विस्वभावा राशयो मिथुनकन्याधनुर्मीना मृगो मकर एषां समाहारस्तस्मिन्नर्कसंक्रमणतः सूर्यसंक्रमणकालात्सकाशात् ऊर्ध्वं उपरि खरामघटिकाः पुण्याः स्युः । स्थिरे वृषसिंहवृश्चिककुंभानामन्यतम राशौ कर्कटः प्र० अर्कसंक्रमणतः पूर्वं प्रथमं खराम ३० घटिकाः पुण्याः स्युः जूकाजोभयतः जूकास्तुलाऽजो मेषोऽनयोरर्कसंक्रमणतः सकाशादुभयतः खराम३०घटिकाः पुण्याः स्युः । पूर्वं पंचदश ऊर्ध्वं पंचदशेति त्रिंशद्घटिका इत्यर्थः । एवं सर्वराशिसंक्रमणपुण्यकालमुक्त्वेदानीं मकरे विशेषपुण्यकालमाह–मृगे दिग्युता इति । मृगे मकरे ताः खराम ३० घटिका दिग्युता दशयुताः चत्वारिंशद्घटिकाः पुण्या इत्यर्थः । तथा चोक्तं ज्योतिर्निबंधे । संक्रांतिसमयः सूक्ष्मो दुर्लभः पिशितेक्षणैः । तस्य योगादधश्चोर्ध्वं त्रिंशन्नाड्यः प्रकीर्तिताः ॥ अर्वाक् षोडश नाड्यस्तु परतश्चैव षोडश । पुण्यकालोऽर्कसंक्रांतेः स्नानदानादिकर्मसु ॥ त्रिंशत् कर्कटसंक्रांतौ पूर्वतः पुण्यनाडिकाः । मकरे तूत्तराः पुण्याश्चत्वारिंशतिनाडिकाः ॥ स्थिरे विष्णुपदे कर्के दक्षिणायनमादितः । मृगे सौम्यायनं ह्यंगे षडशीतिमुखं पुरः ॥ घटते विषुवे मध्ये पुण्यं दानाद्यनंतकं । प्रागर्धरात्रात्पूर्वेद्युः पुण्यं पश्चात्परं दिनं ॥ प्रागर्धरात्रादित्येतद्विषुवविषयम् । कार्मुकं तु परित्यज्य मृगं संक्रमते रविः । प्रदोषे वाऽर्धरात्रे वा तदा भोगः परेऽहनि ॥ रविसंक्रमणे पुण्ये यो न स्नातीह मानवः । सप्तजन्मांतरे रोगी दुःखभाङ्निर्धनो भवेत् ॥ आदित्यपुराणे । शतमिंदुक्षये दानमुपरागे त्वनंतकं । षडशीत्यां सहस्रं तु विष्णुपद्यां तथैव च ॥ विषुवे शतसाहस्रं कोटिघ्नं दक्षिणायने । शतकोटिगुणं पुण्यं जायते उत्तरायण इति ॥ अथोत्तरार्धेन संक्रांतेः सदसत्फलमाह–कर्केति । कर्कः प्र० अजो मेषः अंत्यो मीनः वृषः प्रसि० एणो मकर एतान् सूर्यचलनं निशि रात्रौ सत्स्यात् । अन्यभं प्रति सूर्यचलनं सूर्यसंक्रमणं दिवा सत्स्यात् । अर्थाद्विपरीतं न शोभनं । सूर्यारार्किदिने रविभौमशनिदिने तृतीयकरणे कौलवे प्रांत्ये किंस्तुघ्ने अष्टमे शकुनौ सर्वराशिसंक्रमणं दुःखदं स्यात्। तथा चोक्तं । मृगकर्काजगोमीनसंक्रांतिर्निशि सौख्यदा । शेषेषु सप्तसु दिवा व्यत्ययादशुभं भवेत्॥ संक्रांतिर्जायते यत्र भास्करे प्रसुते शनौ । तत्र मासि भवेद्घोरं दुर्भिक्षं वृष्टिचौरजं ॥ स्यादुत्थितस्य किंस्तुघ्ने शकुने कौलवे रवेः । संक्रांतिस्तैतिले नागे प्रसुतस्य चतुष्पदे ॥ निविष्टस्य गरे विष्ट्यां वणिजे बालवे बवे । दुर्भिक्षं रोगबाहुल्यमूर्ध्वं संक्रमते रविः । सुप्तः करोति कल्याणमुपविष्टः समं फलमिति ॥ १ ॥**

**टीकार्थ**—आतां संक्रांतीचें प्रकरण सांगतों. संक्रांति फल सांगण्याच्या इच्छेनें अगोदर राशिपरत्वानें पुण्यकाल अर्ध्या वृत्तानें सांगतों–द्विस्वभाव राशि ह्म० मिथुन, कन्या, धनु, मीन, मृग ह्म० मकर, इतक्या राशींवर सूर्याचें संक्रमण झालें असतां त्या संक्रमण कालापासून पुढें खराम ह्म० ३० घटिकांपर्यंत पुण्यकाल समजावा. स्थिर राशी ह्म० वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ आणि कर्क ह्या राशींवर सूर्याचें संक्रमण झालें असतां त्या काळाचे पूर्वी खराम ह्म० ३० घटिका पुण्यकाळ समजावा. जूका ह्म० तूळा, अज ह्म० मेष ह्या दोन राशींवर सूर्याचें संक्रमण झालें असतां संक्रमण काळाचे पूर्वी १५ घटिका आणि संक्रमणानंतर १५ घटिका मिळून ३० घटिका पुण्यकाळ जाणावा. अशा रीतीनें सर्व राशींचे संक्रमण काळ सांगून आतां मकर राशीचे संक्रमणाचा विशेष काळ सांगतों–मकर राशीवर सूर्याचें संक्रमण झालें असतां खराम ह्म० ३० आणि दिक् ह्म० १० मिळुन ४० घटिका हा पुण्यकाळ समजावा. तेंच ज्योतिर्निबंध ग्रंथांत सांगितल आहे कीं, संक्रांतीचा काळ समजणें आपल्या सारख्या चर्मचक्षु लोकांना फारच दुर्लभ आहे. ह्मणून त्या संक्रांतीच्या योगाचे पूर्वी व नंतर मिळून तीस घटिका पुण्य काळ समजावा. पूर्वी १६ घटिका व नंतर १६ घटिका हा पुण्यकाळ स्नान, दान इत्यादि कर्म करण्यास सांगितला आहे. कर्क संक्रांति लागण्याच्या पूर्वी ३० तीस घटिका पुण्यकाळ आहे.

आणि मकर संक्रांतीच्या नंतर चाळीस घटिका पुण्यकाळ आहे. स्थिरराशी ह्मणजे कर्कराशीवर सूर्यसंक्रमण झालें असतां दक्षिणायनाचा आरंभ होतो आणि मकर राशीवर सूर्य संक्रमण झालें असतां उत्तरायणाचा आरंभ होतो. त्यांचा पुण्यकाळ पूर्वी आणि नंतर मिळून ८६ घटिका आहे. विषुव संक्रांतीमध्यें पुण्य ' दान ' हें अनंत फळदायक आहे. त्यांत पहिल्या दिवसा पासून मध्यरात्रीपर्यंत पुण्यकाळ आहे. नंतर दुसरे दिवशींही पुण्यकाळ आहे. धनुराशी सोडून मकर राशीवर सूर्य संक्रमण करितो त्याचे पूर्व दिवशीं प्रदोषकाळीं अथवा मध्यरात्रीं पुण्य करण्याचा भोग काळ आहे. रवि संक्रमण पावतो त्या काळीं जो मानव स्नान करीत नाहीं, तो सात जन्मपर्यंत रोगी होतो व महादुःखी आणि निर्धन असा होतो. आदित्य पुराणांत सांगितलें आहे कीं, इंदुक्षयीं ह्म० अमावास्येस एरव्हीं पेक्षां शतपट पुण्य आहे. ग्रहणास अनंत पुण्य आहे. षडशीतीमध्यें हजारपट पुण्य आहे. भागिरथीसही हजारपट पुण्य आहे. विषुव संक्रांतीस शंभर हजारपट पुण्य आहे. दक्षिणायनास कोटिपट पुण्य आहे. आणि उत्तरायणांत शंभर कोटिपट पुण्य आहे. आतां उत्तरार्धानें संक्रांतीचें शुभ व अशुभ असें फळ सांगतों—कर्क, अज ह्म० मेष, अंत्य ह्म० मीन, वृष, एण ह्म० मकर, इतक्या राशीवर सूर्याचें संक्रमण जर रात्रीस होईल तर तें संक्रमण उत्तम फलदायक आहे. इतक्या राशींशिवाय बाकीच्या राशींवर सूर्य संक्रमण दिवसास शुभकारक आहे. अर्थात् ह्या शिवाय उलट होईल तर शुभकारक नाहीं असें जाणावें. रवि, मंगळ, शनि ह्या वारांवर तिसऱ्या ह्म० कौलव करणावर, किंस्तुघ्न करणावर, आठव्या ह्म० शकुनि करणावर सर्व राशीवरील सूर्य संक्रमण झालें असतां तें दुःखकारक आहे. तेंच सांगितलें आहे कीं, मकर, कर्क, मेष, वृषभ, मीन इतक्या राशींवरचें संक्रमण रात्रीस सौख्यकारक आहे. बाकीच्या उरलेल्या सात राशीवरचें संक्रमण दिवसास सुखकारक आहे. ह्याच्या उलट अशुभ समजावें. ज्यावेळेस संक्रांति रविवारीं, मंगळवारीं, शनिवारीं होईल त्यामासीं भयंकर दुर्भिक्ष होईल. मग अतिवृष्टि पडून अथवा चोरापासूनही दुर्भिक्ष होतें. किंस्तुघ्न, शकुनि आणि कौलव ह्या करणावर रवीचें संक्रमण झालें असतां अशुभ समजावें अर्थात् ह्या तीन करणा शिवाय बाकीच्या तैतिल, नाग, चतुष्पद, ह्यांवर सूर्य सुप्त असतां आणि गर नामक करणावर निविष्ट ह्म० बसला असतां, विष्टि, वणिज, बालव ह्यांवर रवीचें संक्रमण झालें असतां दुर्भिक्ष, रोगबाहुल्य फार होतें, सुप्त झाला असतां कल्याण करतो आणि बसला असतां सारखेंच फल आहे ॥ १ ॥

### अधिकमास आणि क्षयमास.

ब्रह्माद्यैरिनमंडलांत उदितश्चांद्रस्त्वमांतः परै- ।
र्मासोऽसंक्रमणो द्विसंक्रमणको ज्ञेयोऽधिकोऽथ क्षयः ॥
कर्माण्यन्यगतीनि नात्र तनुयाच्चज्जन्ममृत्यू क्षये ।
तन्मासौ तिथिखंडयोश्चयमुखे भृत्येऽधिको गण्यते ॥ २ ॥

श्लोकार्थ—ब्रह्मसिद्धांतादि ग्रंथकारांनीं रविमंडलांत मास सांगितला आहे. सूर्यबिंबाला चंद्रबिंबाचा स्पर्श होतो तेव्हां अमावास्येचा अंत होतो. नंतर चंद्राला सगळ्या सूर्यमंडळाचें क्रमण करण्यास ६ घटिका लागतात, ह्मणून त्या काळाला ' रविमंडलांत ' असें ह्मणतात. दुसऱ्या कित्येकांनीं अमांत मास सांगितला आहे. असे चांद्रमासाचे दोन भेद आहेत. सूर्याची संक्रांति ज्यांत होत नाहीं तो अधिक मास व दोन संक्रांति होतात तो क्षयमास जाणावा. अधिक व क्षयमासांत अन्यगतिक ह्मणजे पुढें दुसऱ्या वेळीं करितां येणारीं कर्मे करूं नये. क्षयमासांत जन्म किंवा मरण झालें तर तिथीच्या पूर्वार्धांत पूर्वमास व उत्तरार्धांत पुढचा मास समजावा. व्याज, गर्भ व सेवकांचें वेतन ह्याविषयीं अधिक मास मोजितात ॥ २ ॥

अथ संक्रांतिप्रसंगेनाधिमासक्षयमासयोर्लक्षणं तत्र कर्तव्याकर्तव्यं क्षयमासे जन्ममरणादौ मासज्ञानं वृत्तेनैकेनाऽऽह—ब्रह्माद्यैरिति । ब्रह्माद्यैः सिद्धांतकर्तृभिः इनमंडलांतः सूर्यमंडलांतः चांद्रः चांद्रमास उदितः परैराचार्यैरमांतश्चांद्रो मास उदितः । एतदुक्तं भवति। अमावास्यांतादपरोऽमावास्यांतो यावत्तावदमांतो मासः । अमावास्यांते सूर्यचंद्रमंडलयोर्योगो भवति परतः षड्भिर्घटिकाभिर्वियोगो भवति तस्माद्वियोगादपरो वियोगो यावत्तावद्रविमंडलांतो मासः स ब्रह्माद्यैः क्षयमासाधिमासनिर्णयविषयेऽङ्गीकृतः । अपरैरमांतो मासोऽङ्गीकृत इत्यर्थः । अत्र यद्यपि सूर्यग्रहणे मध्यग्रहणकालानंतरं मोक्षस्थितिकालः षड्घटिकाभ्यो न्यूनो दृश्यते तथाऽपि सूक्ष्मदर्शिभिः पूर्वाचार्यै

रसनाड्योऽर्कमंडलमित्युक्तं तत्राऽऽगम एव प्रमाणं । तत्र उक्तलक्षणो मासोऽसंक्रमणः संक्रांतिरहितोऽधिको ज्ञेयः । द्विसंक्रमणकः संक्रांतिद्वययुक्तः क्षयो ज्ञेयः। अस्योदाहरणं ब्रह्ममतानुसारिणा श्रीभास्कराचार्येण सिद्धांतशिरोमणौ दर्शितं । असंक्रांतिमासोऽधिमासः स्फुटः स्याद्विसंक्रांतिमासः क्षयाख्यः कदाचित् । क्षयः कार्तिकादित्रये नान्यथा स्यात्तदा वर्षमध्येऽधिमासद्वयं च ॥ गतोऽब्ध्यद्रिनंदै ९७४ र्मिते शाककाले तिथीशै १११५ र्भविष्यत्यथांगाक्षसूर्यैः १२४६ । गजाद्र्यग्निभूमि १३७८ स्तथा प्रायशोऽयं कुवेदेंदु १४१ वर्षैः क्वचिद्गोकुभिश्च १९ ॥ श्रीभास्कराचार्येणाब्ध्यद्रिनंदै ९७४ मितशाककालादुपरि तिथीशै १११५ मितशाककालात्पूर्वं सिद्धांतशिरोमणिर्विरचितः । अत एवोक्तं गतोऽब्ध्यद्रिनंदैर्मिते शाककाले तिथीशैर्भविष्यतीति । तत्र गजाद्र्यग्निभूमिः तुल्ये शाककाले रविमंडलांतमासप्रमाणेन क्षयमासाधिमासौ प्रदश्र्येते । आश्विन्यमावास्या बुधे चतुश्चत्वारिंशद्घटिका ४४ तस्मिन्नेव दिने सप्तत्रिंश ३७ द्घटिका स्वाती तासु तुलासंक्रमणमभूत् आश्विनस्तुलासंक्रांतियुक्तत्वाच्छुद्धः कार्तिकी अमावास्या शुक्रे सप्तदशघटिकाः १७ तस्मिन्नेव दिने सप्तत्रिंशद्घटिका स्वाती तासु वृश्चिकसंक्रांतिरभूत् । अयमसंक्रांतित्वादधिकः कार्तिकः अपरो मासो वृश्चिकसंक्रांतियुक्तः तस्माच्छुद्धोऽयं कार्तिकः । तस्यामावास्या शनौ सप्तचत्वारिंशत् ४७ घटिकास्तस्मिन्नेव दिने एकोनषष्टिघटिका स्वाती तासु धनुःसंक्रमणमभूत् । धनुःसंक्रमणं मार्गशीर्षे जातं तस्यामावास्या सोमे पादोनपंचदशघटिकाः तस्मिन्नेव दिने एकोनविंशद्घटिका स्वाती तासु मकरसंक्रांतिरभूत् । इयं मकरसंक्रांतिर्यद्यपि अमांतमतिक्रम्य जाता तथापि रविमंडलांतमासप्रमाणेन पूर्वमासे एव पतिता तस्मात्संक्रांतिद्वययुक्तत्वात् मार्गपौषयुगलं क्षयाह्वयं जातं माघी अमा भौमे एकचत्वारिंशत् ४१ घटिकास्तस्मिन्नेव दिने षट्चत्वारिंशत् ४६ घटिका स्वाती तासु कुंभसंक्रांतिरभूत् । इयमपि संक्रांतिर्यद्यपि मासमतिक्रम्य जाता तथापि मंडलांतमासप्रमाणेन पूर्वमासस्यैव । तस्मान्माघः शुद्धः अन्यथा मंडलांतमासानंगीकारे । न क्षयो नाधिमासः स्यान्माघो वै परिकीर्तित इत्येतच्छास्त्रमनर्थकं स्यात् । आर्यपक्षे तु संदेहो नास्ति यतो ब्रह्मपक्षतिथितः आर्यपक्षतिथिश्चतुर्घटिकाधिका ब्रह्मपक्षसंक्रांतितः आर्यपक्षसंक्रांतिस्त्रिघटिकोना तस्मादार्यपक्षे संदेहाभावः । तथा च फाल्गुनी अमा गुरौ षट्घटिकास्तस्मिन्नेव दिने पंचत्रिंश ३५ द्घटिका स्वाती तासु मीनसंक्रांतिर्जाता यस्मादयं फाल्गुनोऽसंक्रांतित्वादधिकः क्षयः कार्तिकादित्रये नान्यथा स्यात्तदा वर्षमध्येऽधिमासद्वयं चेति । तस्योदाहरणं दर्शितं । यत्तु ब्रह्मपक्षे क्षयमासाधिमासनिर्णयेऽमांतं मासं गणयंति तैर्ब्रह्ममतं न विदितं । पौलास्तसिद्धांते । स्फुटगत्या यदा चंद्रो रविमंडलमध्यगः । तदूर्ध्वं संक्रमो भानोर्मासः स स्यान्मलिम्लुचः ॥ कालनिर्णये । संक्रमो यदि भवेद्रवेस्ततो मंडलाद्बहिरनिर्गते विधौ । उच्यतेऽथ स हि संक्रमो बुधैः शुद्धमास इतरो मलिम्लुचः ॥ लल्लः । यदा शशी याति गभस्तिमंडलं दिवाकरः संक्रमणं करोत्यनु । विवाहयज्ञोत्सवनाशहेतुकस्तदाऽधिमासः कथितः स्वयंभुवा ॥ रत्नमालायां । सवितृमंडलमेति यदा शशी तदनु संक्रमणं कुरुते रविः । मखमहोत्सवनाशकरस्तदा मुनिवरैर्गदितोऽधिकमासकः ॥ शार्ङ्गधरफलग्रंथे । चंद्रार्कयोस्तु बिंबैक्यं प्रतिपद्दर्शसंधिषु । तिथ्यंतात्तदुभयतो रसनाड्योऽर्कमंडलं ॥ तन्मंडलाच्छशीगच्छेत्ततः सूर्यस्य संक्रमः। मासोऽसौ मलिनः प्रोक्तो न तद्धीनोऽधिकः स्मृतः ॥ पितामहः । प्रतिपद्दर्शसंधौ तु बिंबैक्यं चंद्रसूर्ययोः । जवांतरात्तं षष्टिघ्नं नाडिका अर्कमंडलं ॥ अत्र कलात्मकबिंबग्रहणं ज्योतिःप्रकाशे । दर्शांत एकैः कथितोऽत्र मासः परैः प्रदिष्टो रविमंडलांतः । मतद्वये चेद्रविसंक्रमः स्यात्स एव पूर्वस्य न चापरस्य ॥ पितामहः । अष्टाधिमासाः स्युर्नित्यं प्रोच्यंते फाल्गुनादयः । सौम्यपौषौ क्षयौ नित्यं भवेतामिति निश्चितम् ॥ क्षयो वाऽप्यधिमासो वा स्यादूर्जे इति निश्चितं । न क्षयो नाधिमासः स्यान्माघो वै परिकीर्तितः ॥ पंचमासास्तु वैशाखादधिमासा व्यवस्थिताः । भवंति चाष्टभिर्वर्षैर्भवै ११ र्वाऽकनिशाकरैः १९ ॥ तथैव फाल्गुनश्चैत्र आश्विनः कार्तिकोऽधिकः । एते कृंद्रैः १४१ शरांगै ६५ र्वा कदाचिद्गोकु १९ वत्सरैः ॥ मार्गपौषौ क्षयौ स्यातां कदाचित्कार्तिको भवेत् । अधिमासस्तदा ज्येष्ठो भवेन्नित्यं क्षयो यदा ॥ क्षयात्प्रागधिमासः स्यान्नित्यं भाद्रपदत्रये । आश्विनोर्जौ सदा स्यातामादौ भाद्रपदः सकृत् ॥ यस्मिन्वर्षे कार्तिकः क्षयो भवति तस्मिन्वर्षे ज्येष्ठाधिमासो भवेत् । अत्र ज्येष्ठशब्देन भाद्रपदो ज्ञेयः यतः । क्षयात्प्रागधिमासः स्यान्नित्यं भाद्रपदत्रय इति नियमात् ॥ भाद्रपदादीनां त्रयाणां मध्ये भाद्रपदो ज्येष्ठ इति जानीयादि-

स्यर्थः। अथाधिमासक्षयमासयोः कार्याकार्याण्याह-कर्माण्यन्यगतीनि नात्र तनुयादिति। अन्या गतिर्येषां तानि । अन्यगतीनि तानि । अत्राधिमासक्षयमासयोर्न तनुयान्न विस्तारयेत् न कुर्यात् । अर्थादनन्यगतीनि कर्माण्यत्रापि कर्तव्यानीति सिद्धं । अन्यगतीनामनन्यगतीनामित्थं विचारो यानि कालनिरोधेन प्रोक्तानि तान्यनन्यगतीनि यथा ऋतौ जायामुपेयात् तत्र । ऋतुः स्वाभाविकः स्त्रीणां रात्रयः षोडष स्मृत इति ॥ मनुना ऋतुप्रमाणमुक्तं। अथ षोडशरात्रीणां मध्ये निंद्यदिनान्यपहाय गच्छेत्। स ऋतुर्यदि मलमासशुद्धमासांशैर्व्याप्नोति तदा शुद्धमासांशे दोषरहिते गर्भाधानं कुर्यात् । असंभवे मलमासे एव कुर्यात्। तथा चोक्तं । अनन्यगतिकं कुर्यान्नित्यं नैमित्तिकं तथा ॥ एवमन्यानपि विचार्य कुर्यात् । गर्भाधानाद्यन्नप्राशनांतकर्मसु मलमासादीनां निषेधो नास्तीति संस्कारप्रकरणे उक्तमस्ति। गर्भाद्यन्नाशनांतेषु न गुरुसितयोर्बाल्यवार्द्धक्ये च मौढ्यमित्यादि । तथा च गर्गः । अग्न्याधानं प्रतिष्ठां च यज्ञदानव्रतानि च । वेदव्रतवृषोत्सर्गचूडाकरणमेखलाः ॥ गमनं देवतीर्थानां विवाहमभिषेचनं । यानं च गृहकर्माणि मलमासे विवर्जयेदिति ॥ तथा च सूर्योदये । आवश्यकर्म मासाब्दं मलमासमृताब्दिकं । तीर्थेभच्छाययोः श्राद्धं मघानंगपितृक्रियां ॥ कुर्यान्मलिम्लुचे वर्षे मध्ये चेत्सर्वदाऽधिकं। तत्र स्यान्मासिकं मृत्युं मासात्स द्वादशो यदि ॥ प्रेतक्रियां समाप्यात्र कुर्वीताभ्युदयं तथा । श्यामाकाग्रयणं कृच्छ्रे न स्याद्वर्ज्यमतोऽन्यथा ॥ अन्यच्च । काम्यारंभं वृषोत्सर्गं पर्वोत्सवमुपाकृतिं। मेखलाचौलमांगल्याग्न्याधानोद्यापनक्रियाः ॥ वेदव्रतमहादानाभिषेकान् वर्धमानकं । इष्टापूर्तं तथा यस्य विध्यलोपोऽन्यदाकृतौ ॥ तत्सर्वमष्टकादन्यदधिमासे विवर्जयेत्। सूतकेऽपि च कर्तव्यं स्नानाद्यं राहुदर्शन इति ॥ स्मृतिरत्नावल्यां। प्रवृत्तं मलमासात्प्राग्यत्काम्यमसमापितं । आगते मलमासेऽपि तत्समाप्यमसंशयमिति ॥ अथ क्षयमासे जन्मादौ मासज्ञानमाह- यज्जन्मेति । जन्म च मृत्युश्च जन्ममृत्यू यस्य जन्ममृत्यू यज्जन्ममृत्यू क्षये क्षयमासि भवतस्तस्य मासौ तिथिखंडयोर्ज्ञातव्यौ तिथेः प्रथमेऽर्धे जन्म वा मृत्युर्वा भवति तदाप्रथममासो द्वितीयेऽर्धे द्वितीयो मासो ज्ञेयः। तथा च बृहत्कालनिर्णये । तिथ्यर्धे प्रथमे पूर्वो द्वितीयेऽर्थे तथोत्तरः । मासाविति बुधैर्ज्ञेयौ क्षयमासस्य मध्यगाविति ॥ अथ मलमासः कुत्र कुत्र गण्यत इत्याह-चयमुख इति। चयो गर्भाधानादेर्वृद्धिः गर्भस्य कलिलं घनांकुरास्थिचर्मादि चयः प्रतिमासे भवति धनादीनां दिनकलांतरादि चयस्तदादिके प्रेष्ये भृत्ये वेतनदानार्थमधिको मासो गण्यते। तथा च यमः। गर्भे वार्धुषिके भृत्ये श्राद्धकर्मणि मासिके । सपिंडीकरणे नित्ये नाधिमासं विवर्जयेदिति ॥ पाठांतरव्याख्यानं ॥ अधियुगे पूर्वोऽधिमाः प्राकृत इति। प्राकृत एकस्मिन् वर्षेऽधियुगेऽधिकद्वये सति पूर्वोऽधिमाः प्रथमोऽधिमासः प्राकृतमासवज्ज्ञेयः । अधिकवन्न त्याज्यः । अर्थादुत्तरोऽधिकमासो मलमासः । तदुक्तं। मासद्वयेऽब्दमध्ये च संक्रमो न भवेद्यदा । प्राकृतस्तत्र पूर्वः स्यादुत्तरस्तु मलिम्लुच इति ॥ २ ॥ ॥ इति स्वकृतमुहूर्तमार्तंडटीकायां मार्तंडवल्लभायां संक्रांतिप्रकरणं समाप्तम् ॥

**टीकार्थ**—आतां संक्रांतीचा प्रसंग चालला आहे ह्मणून अधिकमास आणि क्षयमास ह्यांचें लक्षण व तेथें कर्तव्य आणि अकर्तव्य ह्यांचा निर्णय, क्षय मासांत जन्ममरणादि झालें असतां त्याचें मासज्ञान एका वृत्तानें सांगतों—ब्रह्म इत्यादि सिद्धांतकर्त्यांनीं सूर्यमंडलांत असा चांद्रमास सांगितला आहे. दुसऱ्या कित्येकांनीं अमांत असा चांद्रमास सांगितला आहे. ह्यांचा अर्थ असा आहे कीं, अमावास्येच्या शेवटापासून तों दुसऱ्या अमावास्येच्या शेवटापर्यंत जो महिना झाला त्याला अमांत मास असें सांगितलें आहे. अमावास्येचे शेवटीं सूर्यमंडल आणि चंद्रमंडल ह्या दोघांचा योग होतो तो सहा घटिकापर्यंत तसाच योग राहतो. नंतर सहा घटिकांनीं त्या दोघांचा वियोग होतो. त्या वियोगापासून तों दुसरा वियोग येईपर्यंत जो मास असतो त्याला रविमंडलांत असें नांव आहे. तसा मास ब्रह्मादि सिद्धांतकर्त्यांनीं क्षयमास आणि अधिकमास ह्यांचा निर्णय करण्याकरितां घेतला आहे. दुसऱ्या कित्येक आचार्यांनीं अमांतमास घेतला आहे. आतां जरी हा सूर्यग्रहणांत मध्य ग्रहणकालानंतर मोक्ष स्थितिकाल साहा घटिकेपेक्षां कमी असतो असें दिसून येतें. तथापि सूक्ष्म दृष्टि अशा पूर्वाचार्यांनीं रस ह्म० ६ घटिकात्मक काल हा सूर्यमंडलांत असें मानिलें आहे. त्याविषयीं आगम हाच प्रमाण आहे. पैकीं पूर्वी सांगितलेल्या लक्षणाच्या मासांत संक्रमण नसतें ह्मणून तो असंक्रमण झाला ह्मणून त्याला अधिक मास ह्मणावा. ज्या महिन्यांत दोन संक्रांति असतात, त्याला क्षय-

मास ह्मणतात. ह्याचें उदाहरण ब्रह्ममताला अनुसरणाऱ्या श्री भास्कराचार्यांनें सिद्धांतशिरोमणि ग्रंथांत दाखविलें आहे. तें असें कीं, संक्रांति नसलेला जो मास असतो त्याला अधिकमास असें ह्मणतात. आणि ज्यांत दोन संक्रांति असतात त्याला क्षयमास असें ह्मणतात. क्षयमास कार्तिक, मार्गशीर्ष, पौष ह्या तीन महिन्यांतच होतो, दुसऱ्या कोणत्याही महिन्यांत होत नाहीं. त्या वेळेस त्या वर्षांत अधिकमास दोन होतात. अब्धि ह्म० ४ अद्रि ह्म० ७ नंद ह्म० ९ बरोबर ९७४ शकामध्यें तिथि ह्म० १५ ईश ह्म० ११ बरोबर १११५ पुढें होणाऱ्या शकामध्यें, आणि अंग ह्म० ६ अक्ष ह्म० ४ सूर्य ह्म० १२ बरोबर १२४६ शकामध्यें, गज ह्म० ८ अद्रि ह्म० ७ अग्नि ह्म० ३ भू ह्म० १ बरोबर १३७८ शकामध्यें, तसाच बहुतकरून कु ह्म० १ वेद ह्म० ४ इंदु ह्म० १ बरोबर १४१ वर्षांनीं आणि कोठें कोठें गो ह्म० ९ कु ह्म० १ बरोबर १९ वर्षांनीं होत असतो. ह्यावरून श्री भास्कराचार्यांनीं ९७४ शकानंतर १११५ शकाचे पूर्वीं सिद्धांतशिरोमणि नामक ग्रंथ रचिला आहे. ह्मणून ह्मटलें आहे कीं, ९७४ ह्या शकाला गेलेला शक असें सांगितलें आणि १११५ ह्या शकाला पुढें येणारा शक असें सांगितलें आहे. पैकीं १३७८ शकामध्यें रविमंडलांत मास प्रमाण घेतल्यानें क्षयमास आणि अधिक असे दोन दिसतात. आश्विन महिन्याची अमावास्या बुधवारीं ४४ घटिका होती त्याच दिवशीं ३७ घटिका स्वाती नक्षत्र होतें त्या नक्षत्रावर तुला संक्रांति झाली होती. तो आश्विन महिना तुला संक्रांति युक्त असल्यामुळें शुद्ध महिना समजावा. आणि कार्तिकी अमावास्या शुक्रवारीं १७ घटिका होती आणि त्याच दिवशीं ३७ घटिका स्वाती नक्षत्र होतें त्या नक्षत्रावर वृश्चिक संक्रांति झाली होती ह. कार्तिक महिना संक्रांति रहित असल्यामुळें अधिक मास समजावा. दुसरा कार्तिक महिना वृश्चिक संक्रांतीनें युक्त असल्यामुळें तो शुद्ध आहे. कारण त्यांतील अमावास्या शनिवारीं ४७ घटिका होती आणि त्याच दिवशीं ५९ घटिका स्वाती नक्षत्र होतें त्यावर धनुःसंक्रांति झाली होती. धनुःसंक्रांति ही मार्गशीर्ष महिन्यांत झाली होती त्या दिवशीं सोमवार होता. १४॥। घटिका अमावास्या होती त्या दिवशींच १९ घटिका स्वाती नक्षत्र होतें त्यावर मकरसंक्रांति झाली होती. ही मकरसंक्रांति जरी अमांताचें उल्लंघन करून झालेली आहे तथापि रविमंडलांत प्रमाणानें पहिल्या महिन्यांतच पडते ह्मणून दोन संक्रांतिनीं युक्त असल्या कारणानें मार्गशीर्ष आणि पौष हे दोन महिने क्षय संज्ञक झाले. माघाची अमावास्या मंगळवारीं ४१ घटिका होती. त्याच दिवशीं ४६ घटिका स्वाती नक्षत्र होतें त्या नक्षत्रावर कुंभ संक्रांति झाली होती. हीहि संक्रांति जरी मास आक्रमण करून झालेली असेल तरी सुद्धां मंडलांत प्रमाणानें पहिल्या महिन्यांतच समजावी. ह्मणून माघ महिना हा शुद्ध समजावा. असें न घेतलें ह्मणजे मंडलांत मासाचा स्वीकार न केला तर क्षय मास आणि अधिक मास हा माघ महिना होणार नाहीं हें शास्त्र अनर्थक होईल. आर्य पक्षांत तर संदेह नाहीं कारण तो ब्रह्मपक्षाच्या तिथीपेक्षां आर्य पक्षाची तिथि ४ घटिका अधिक आहे. आणि ब्रह्मपक्ष संक्रांतीपेक्षां आर्यपक्ष संक्रांति ३ घटिकांनीं कमी आहे. ह्मणून आर्यपक्षीं संदेह नाहीं. तेंच असें आहे कीं, गुरुवारीं फाल्गुनी अमावास्या ६ घटिका होती त्याच दिवशीं ३५ घटिका स्वाती नक्षत्र होतें त्या नक्षत्रावर मीन संक्रांति होती ह्मणून हा फाल्गुन महिना संक्रांति रहित असल्यामुळें अधिक मास जाणावा. क्षय मास तर कार्तिकादि तीन महिन्यांतच होतो दुसऱ्या महिन्यांत होत नाहीं आणि त्या वर्षीं अधिक मास दोन असतात. त्याचें उदाहरण दाखविलें आहे. कितीएक असें ह्मणतात कीं, ब्रह्मपक्षामध्यें क्षयमास आणि अधिकमास ह्यांचा निर्णय अमांतमास घेऊन करतां येतो व तसा ते करितात परंतु त्यांनीं ब्रह्मपक्षाचें मत जाणिलें नाहीं असें समजावें. पौलस्ति सिद्धांतामध्यें सांगितलें आहे कीं, ज्या वेळेस आपल्या स्पष्ट गतीनें चालणारा चंद्र सूर्यमंडलाचे मध्यभागीं येतो त्या नंतर सूर्याची संक्रांति होते तो मलमास ह्मणजे अधिक मास समजावा. कालनिर्णय ग्रंथांत सांगितलें आहे कीं, सूर्यमंडलाच्या बाहेर चंद्र न निघाला असून त्या सूर्याची संक्रांति जर होईल तर त्याला शुद्ध मास असें समजावें आणि त्याहून दुसरा जो मास त्याला मलमास जाणावें, लल्ल असें सांगतो कीं, ज्या वेळेस चंद्र हा सूर्य मंडळीं जातो आणि त्या वेळीं सूर्य हा संक्रमण करितो त्या मासाला अधिक मास ह्म० मलमास असें ह्मणावें त्या महिन्यांत विवाह, यज्ञ, उत्सव हे करूं नयेत असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. रत्नमाला ग्रंथांत सांगितलें आहे कीं, ज्या वेळीं चंद्र हा सूर्य मंडळीं जातो त्यानंतर जर रवि संक्रमण करील तर तो मास अधिक मास समजावा असें श्रेष्ठ मुनींनीं सांगितलें आहे. त्यांत यज्ञ, उत्सव हे केले असतां त्यांचा नाश होतो. शार्ङ्गधर फलग्रंथांत सांगितलें आहे कीं, चंद्र आणि सूर्य ह्या दोघांचें बिंब हें ज्या वेळेस एक होतें तें प्रतिपदा आणि अमावास्या ह्यांच्या संधीमध्यें होत असतें ह्मणजे अमावास्या तिथीचा अंत आणि प्रतिपदेचा आरंभ ह्या दोहोंकडील साहा साहा घटिका पर्यंत सूर्यमंडळीं चंद्र जात असतो नंतर सूर्याचा संक्रम होतो त्या वेळीं जो मास असतो त्याला मलिनमास ह्मणूं नये व त्याहून हीन जो मास असतो त्याला अधिकमास असें ह्मणतात. पितामह सांगतो कीं, प्रतिपदा आणि अमावास्या ह्या दोहोंच्या संधीमध्यें चंद्र आणि सूर्य ह्या दोघां बिंबांचें ऐक्य होतें ह्मणजे मोठ्या वेगानें तें विषैक्य होतें येथें कलात्मक बिंबाचें ऐक्य होतें असें ज्योतिःप्रकाश ग्रंथांत

सांगितलें आहे. ह्या ठिकाणीं कित्येकांचें असें मत आहे कीं, दर्शांत असा एक मास सांगितला आहे. दुसऱ्यांचे मतानें रविमंडलांत असा एक मास सांगितला आहे. दोनही मतानें रवीचा संक्रम होतो तोच पूर्वीचा व पराचा समजावा. पितामह असें सांगतो कीं, फाल्गुन इत्यादि आठ मास हे अधिक मास सांगितले आहेत, सौम्य आणि पौष हे दोन मास नेहेमी क्षयमास होतात असा निश्चय आहे. कार्तिक महिना हा अधिक आणि क्षय ह्यापैकीं कोणताही मास होतो. परंतु माघ मास हा अधिक मास आणि क्षयमास असा कधींच होत नाहीं. वैशाखापासून पांच महिने हे अधिक मास होतात. असा निश्चय आहे. ते ८ आठ वर्षांनीं, ११ अकरा वर्षांनीं अथवा १९ एकोणीस वर्षांनीं होत असतात. त्याप्रमाणेंच फाल्गुन, चैत्र, आश्विन, कार्तिक इतके महिने १४१ वर्षांनीं, ६५ वर्षांनीं अथवा कदाचित् १९ वर्षांनीं अधिक मास येतात. मार्गशीर्ष आणि पौष हे क्षयमास होत असतात कदाचित् कार्तिक मासही क्षयमास होतो. ज्यावेळेस क्षयमास येतो त्यावेळेस ज्येष्ठ हा अधिक मास असतो. नेहेमीं भाद्रपदादि तीन महिन्यामध्यें क्षयमासाचे पूर्वी अधिक मास असतो. आश्विन आणि कार्तिक हे दोन महिने नेहमी क्षय होत असतात आणि भाद्रपद हा कदाचित् होतो. ज्या वर्षी कार्तिक मास हा क्षय मास असतो त्यावर्षी ज्येष्ठ मास हा अधिक मास होतो. येथें ज्येष्ठ ह्या शब्दानें भाद्रपद हा महिना घ्यावयाचा आहे. कारण कीं, क्षयमासाचे पूर्वी अधिक मास होतो तो भाद्रपदादि तीन महिन्यांत होतो असा वर नियम लिहिला आहे. भाद्रपद इत्यादि तीन महिन्यांमध्यें भाद्रपद हा ज्येष्ठ समजावा. आतां अधिक मास आणि क्षय मास ह्या दोन महिन्यामध्यें कोणतें कर्तव्य आहे व कोणतें कर्तव्य नाहीं तें सांगतों—ह्या दोन महिन्यामध्यें जीं कर्मे केलींच पाहिजेत ह्मणजे राहूं शकत नाहींत अशीं कर्में करावींत. जीं कर्में राहूं शकतात ह्मणजे हे महिने संपल्यानंतर करावयास हरकत नाहीं अशीं कर्में ह्या दोन महिन्यांत करूं नयेत. दुसऱ्या वेळीं होणारीं व त्याच वेळीं केलीं पाहिजेत अशीं कर्में ह्मणजे ज्या कर्मांना कालाचा अवधि नाहीं अशीं कर्में त्या वेळेस केलीं पाहिजेत जसें कीं, ऋतुकाळीं भार्ये बरोबर संग करावा असें शास्त्र आहे आणि तो ऋतुकाळ तर सोळा रात्रपर्यंत असतो असें मनूनें सांगितलें आहे. ह्मणून त्या सोळा रात्रीमध्यें निंद्य दिवस सोडून गमन करावें तो ऋतु काळ जर शुद्ध मास आणि मलमास ह्यांच्या अंशांनीं व्यापून राहिला असेल तर शुद्ध महिन्याच्या अंशीं दोषरहित अशा दिवसावर गर्भाधान करावें. तसा शुद्धमासाचा अंश न सांपडेल तर मलमासांतच गर्भाधान करावें. तेंच सांगितलें आहे कीं, ज्या कर्माला दुसऱ्या प्रकारची गति नसते असें कर्म नित्य असो अथवा नैमित्तिक असो त्याचा विचार करून करावें. अशाच रीतीनें दुसरींही कर्में जीं असतात त्यांचा विचार करून तीं करावींत. गर्भाधानापासून तों अन्नप्राशनपर्यंत जीं कर्में आहेत तीं कर्में करण्यास मलमासाचा दोष नाहीं असें संस्कार प्रकरणांत सांगितलें आहे. त्यावेळेस असें सांगितलें आहे कीं, गर्भाधानापासून तों अन्नप्राशनापर्यंत संस्कार करण्याकरितां गुरु आणि शुक्र ह्यांच्या अस्ताचा दोष नाहीं वगैरे सांगितलें आहे. तेंच गर्ग सांगतो कीं, मलमासांत अग्नीचें आधान, प्रतिष्ठा, यज्ञ, दान, व्रतें, उपनयन, वृषोत्सर्ग, चूडाकरण, देव आणि तीर्थ ह्याकरितां जाणें, विवाह, अभिषेक, यान, गृहकर्म इतकीं कृत्यें वर्ज्य करावींत. तेंच सूर्योदय ग्रंथांत सांगितलें आहे कीं, मासामध्यें केलेंच पाहिजे असें जें कर्म; मासिक, वार्षिक इत्यादि श्राद्ध, तीर्थावर गजच्छाया पर्वनिमित्त करावयाचें श्राद्ध, मघावरचें कृत्य, चतुर्दशीचें कृत्य, पितृक्रिया, निमित्तिक कार्यें इतकीं कार्यें मलमासांतही करावींत. त्या वर्षीं होणारें श्राद्ध त्या महिन्यांत आलें तर करावें. त्या महिन्यांत कदाचित् मरण झालें तर बाराव्या दिवसाचें कृत्य ह्मणजे पहिल्या दिवसापासून बारा दिवसापर्यंतचें प्रेतकृत्य समाप्त करावें. आणि नंतर मंगलकार्य करावें. श्यामाकाग्रयण आणि कृच्छ्र हें वर्ज्य होत नाहीं. ह्याशिवाय दुसरीं कर्में वर्ज्य करावींत. दुसरें असें कीं, काम्यकर्मांचा आरंभ, वृषोत्सर्ग, पर्वासंबंधीं उत्सव, उपाकर्म, मेखलाबंधन, चौलकरण, मांगल्य ह्म० विवाह, अग्नीचें आधान, उद्यापन क्रिया, वेदग्रहण, महादान, अभिषेक, वर्धमानक, इष्टापूर्त, ज्याच्या विधीचा लोप होत नाहीं असें कर्तव्यकर्म हें सर्व मलमासांत वर्ज्य करावें आणि अष्टक श्राद्धाशिवाय दुसरें वर्ज्य करावें. सूतक असतांही स्नान इत्यादि करावें. ग्रहणाबद्दलही स्नान इत्यादि करावें. स्मृतिरत्नावली ग्रंथांत सांगितलें आहे कीं, मलमास लागण्याचे पूर्वी जें काम्यकर्म आरंभिलें असेल तें सर्व कर्म मलमास आला तरी त्यामध्यें पुरें करावें. आतां क्षयमास आला असतां जन्म इत्यादिकांविषयीं महिना कोणता तें सांगतों—ज्याचें जन्म आणि मरण क्षयमासांत झालें असेल त्याचे महिने, आणि तिथि खंडांवरून जाणावेत. ह्मणजे तिथीच्या पहिल्या अर्धांत जन्म व मरण झालें असेल तर पहिला मास समजावा. तिथीच्या दुसऱ्या अर्धांत जन्म व मरण झालें असेल तर दुसरा मास जाणावा. तसेंच बृहत्काल निर्णयांत असें सांगितलें आहे कीं, तिथीच्या पहिल्या अर्धांत जन्म आणि मरण झालें असेल तर पहिला मास समजावा. तिथीच्या दुसऱ्या अर्धांत जन्म आणि मरण हीं झालीं असतील तर दुसरा महिना समजावा. ह्याप्रमाणें क्षयमासाचे मध्यभागीं असेल तरही तसेंच समजावें. आतां मलमासाचा असा विचार कीं, तो कोठें कोठें धरावा तें सांगतों.— गर्भवती स्त्रियांचा जो गर्भ वाढतो त्या गर्भाला, पैशाचे व्याजाबद्दल, चाकराला पगार

धांवयाचा ह्याबद्दल अधिक महिना धरावा. तेंच यम सांगतो कीं, गर्भ, व्याज, चाकराचा पगार, मासिक श्राद्ध, सपिंडी करण, नित्यश्राद्ध इतक्या कार्यास अधिक मास वर्ज्य करूं नये. अर्थात् अधिक मास धरावा. दुसऱ्या पाठाचें असें व्याख्यान आहे कीं, एका वर्षांत दोन अधिक मास आले असतां पहिला मास धरावा. तेंच सांगितलें आहे कीं, एका वर्षांत ज्या वेळीं दोन वेळां संक्रांति होणार नाहीं, त्या वेळेस पहिला मास नेहेमीचा मास समजावा आणि दुसरा मास मलमास समजावा ॥ २ ॥ अशा रीतिनें आपण केलेल्या मार्तंडवल्लभा नामक टीकेचें संक्रांति प्रकरण संपलें ॥

॥ इति संक्रांति प्रकरण समाप्त ॥

---

# ॥ अलंकार प्रकरणम् ॥ १३ ॥

### ग्रंथकरणाऱ्याचा वंश आणि त्याचें राहण्याचें स्थान.

श्रीमत्कौशिकपावनो हरिपदद्वंद्वार्पितात्मा हरिः ।
तज्जोऽनंत इलासुरार्चितगुणो नारायणस्तत्सुतः ॥
ख्यातं देवगिरेः शिवालयमुदक् तस्मादुदक् टापर- ।
ग्रामस्तद्वसतिर्मुहूर्तभवनं मार्तण्डमत्राकरोत् ॥ १ ॥

श्लोकार्थ—श्रीमान् कौशिकगोत्रांत उत्पन्न झालेल्या पुरुषांला पवित्र करणारा व विष्णूच्या पादयुगावर मन अर्पण केलेला, असा हरि नामक होता. त्याचा पुत्र, ब्राह्मणांनीं गुण वर्णन करण्यासारखा अनंत नामक होता. त्या अनंताचा पुत्र नारायण हा या ग्रंथाचा कर्ता होय. तो देवगिरीच्या उत्तरेस पुराण प्रसिद्ध घृष्णेश्वर ज्योतिर्लिंगाचें देवालय आहे, त्याच्या उत्तरेस टापर गांव आहे, तेथें रहात असे. त्या नारायणानें ज्यांत मुहूर्तांचा संग्रह आहे असा हा मुहूर्तमार्तंड ग्रंथ केला ॥ १ ॥

अथालंकारमाह—श्रीमत्कौशिकेति । कुशिकस्य गोत्रापत्यानि कौशिकाः श्रीमंतश्च ते कौशिकाश्च ते तथा तान् पावयति पवित्रीकरोतीति तथा । हरिपदद्वंद्वार्पितात्मा हरिर्वासुदेवः तस्य पदद्वंद्वं चरणयुगं तस्मिन्नर्पित आत्माऽतःकरणं येन स तथा । आत्मा देहे धृतौ जीवे इत्यभिधानात् । एवंविधो यो हरिस्तज्जस्तस्माज्जातो योऽनंतनामा किंलक्षण इलासुरार्चितगुण इला पृथ्वी तस्यां सुरा देवा ब्राह्मणाः तैरर्चिताः पूजिता गुणाः शमदमतपोदानाध्ययनादिगुणा यस्य स तथा । जितेंद्रियो वेधनिधिः स्मृतिज्ञो दृढव्रतो यज्ञकृदन्नदातेत्यादिगुणसंपन्न इत्यर्थः । तत्सुतो नारायणो मुहूर्तभवनं मुहूर्तानां भवनं सद्म मार्तंडं मार्तंडनाम ग्रंथमकरोत् । अत्र कुत्र देवगिरेः सकाशात् उदक् उत्तरस्यां दिशि यत् ख्यातं पुराणप्रसिद्धं शिवालयं घृष्णेशशिवालयमिति प्रसिद्धं ज्योतिर्लिंगस्थानमस्ति । तस्माच्छिवालयादुदगुत्तरस्य। दिशि यः टापरग्रामोऽस्ति तत्र टापरग्रामेऽकरोदित्यर्थः । किंलक्षणो नारायणः तद्वसतिः तस्मिन् टापरग्रामे वसतिर्वासो यस्य स तथेति ॥ १ ॥

टीकार्थ—आतां अलंकार सांगतों—श्रीमान् अशीं कुशिक गोत्रांतील जीं अपत्यें आहेत त्यांना पवित्र करणारा, तसाच ज्यांनीं आपला आत्मा ह्म० अंतःकरण श्रीहरिवासुदेवाच्या चरणद्वंद्वांकडे लावलें आहे असा, आत्मा हा शब्द देह, धृति, जीव ह्यांचा वाचक आहे. जो हरि नावाचा हा ग्रंथकाराचा आजा आहे त्या हरीपासून ज्याचे गुण पृथ्वी वरच्या देवांनीं ह्मणजे ब्राह्मणानी पूजित केले आहेत असा, शम, दम, तप, दान, अध्ययन इत्यादि गुणांनीं युक्त असा, वेधाचा केवळ निधि रूपी असा, दृढ स्मृतिचा, यज्ञ करणारा, दातृत्वादि गुणांनीं संपन्न असा होता. हा अनंत नावाचा ग्रंथकाराचा बाप होय. त्याचा मुलगा नारायण ह्यानें मुहूर्तांचें घरच असा हा मार्तंड ग्रंथ केला आहे. त्याचें राहाण्याचें स्थान सांगतों— देवगिरीच्या ह्मणजे लोकांतील प्रसिद्ध दौलताबादेच्या जवळ उत्तरदिशेकडे वेरुळ नावाचें स्थान आहे तेथें पुराण प्रसिद्ध घृष्णेश्वर नावाचें ज्योतिर्लिंगाचे मंदिर आहे. त्या घृष्णेश्वराचे उत्तरेस टापर ह्या नावाचा एक गांव आहे त्या गावीं रहाणारा हा नारायणपंडित नावाचा होता. तेथें राहून हा मुहूर्तमार्तंड ग्रंथ रचिला आहे ॥ १ ॥

### ग्रंथाचें पठनाचें फल आणि श्लोकसंख्या.

यः षष्ट्या युतशतवृत्तबद्धमेनं मार्तंडं पठति नरः स विश्वपूज्यः ॥
बह्वायुःसुखधनपुत्रमित्रभृत्यान्संप्राप्नोत्यविकलधीश्च तीर्थसिद्धिम् ॥ २ ॥

श्लोकार्थ—जो पुरुष १६० श्लोकांनीं रचिलेल्या ह्या मुहूर्तमार्तंड नामक ग्रंथाचें पठन करितो तो जगांत पूज्य होतो, आणि बहुत आयुष्य, सुख, धन, पुत्र, मित्र, सेवक हे त्याला प्राप्त होतात व मुहूर्ताविषयीं बुद्धि प्रवीण होऊन या एका ग्रंथाच्या योगानें अनेक शास्त्रांची सिद्धि होते ॥ २ ॥

अथास्य पठने फलश्रुतिं तथा ग्रंथे वृत्तसंख्यां प्रहर्षिण्याऽऽह—यः षष्ट्येति । षष्ट्या युतं शतं १६०तन्मितानि वृत्तानि तैर्बद्धः कृतः योऽयंमार्तंडः तमेनं मार्तंडं यो नरः पठति स विश्वपूज्यो भवति। न केवलं विश्वपूज्यो भवति । अपि तु बह्वायुःसुखधनपुत्रमित्रभृत्यान् संप्राप्नोति मुहूर्तदानात्साधितकार्यस्य विश्वस्य पूज्यो भवतीति युक्तम् । जनानां यथार्थमुहूर्तदानात् कार्यसिद्धिजनितपुण्येन बह्वायुरारोग्यादीनि संप्राप्नोतीति युक्तं । च परमविकलधीर्भवति न विकला धीर्बुद्धिर्यस्येति तथा । अत्र मुहूर्तमार्तंडे यद्गर्भाधानादिकमुक्तं तत्रान्यबहुसंहिताग्रंथानपेक्षत्वादविकलधीत्वमुक्तं ।अत एव तीर्थसिद्धिं प्राप्नोति तीर्थं शास्त्रं तस्य सिद्धिस्तामल्पग्रंथेन बह्वार्थसिद्धेः। यद्वा तीर्थं गुरुः तस्य सिद्धिः शास्त्रोपदेशलक्षणा तां । यद्वा तीर्थं यागस्तेन कृत्वा यागसुखादिलक्षणा सिद्धिस्तां प्राप्नोति। तीर्थं शास्त्राध्वरे क्षेत्रोपायोपाध्यायमंत्रिष्विति विश्वः ॥२॥

टीकार्थ—आतां ह्या ग्रंथाचे पठणाचें फळ आणि ग्रंथांत किती वृत्तें आहेत तें प्रहर्षिणी वृत्तानें सांगतों—शंभरांनी युक्त साठ ह्मणजे १६० श्लोक आहेत त्यांनीं हा ग्रंथ रचिला आहे ह्याचें जो पठण करितो तो जगामध्यें पूज्य होतो नुसता जगत्पूज्य होतो एवढेंच नाहीं तर दीर्घायु, सुख, धन, पुत्र, मित्र, चाकर इत्यादिकांनीं संपन्न होतो ह्मणजे मुहूर्त दिल्यापासून कार्य झालें असतां जगमान्य होणें सहजच आहे व जसा आहे तसा योग्य मुहूर्त सांगितल्यानें शरीर सिद्धिपासून झालेल्या पुण्यानें चिरायु, आरोग्य इत्यादि बहुत गुण प्राप्त होतात. आणि बुद्धि फारच तीक्ष्ण होते तीमध्यें कोणताही विकलपणा रहात नाहीं. येथें जे गर्भाधानादिकांचे मुहूर्त सांगितले आहेत त्याविषयीं दुसऱ्या पुष्कळ असलेल्या संहितादिक ग्रंथांची अपेक्षा न ठेवतां स्वच्छ आणि स्पष्ट रीतीनें निर्णय करून सांगितल्यामुळें बुद्धीमध्यें कोणत्याही प्रकारचा संशय रहात नाहीं. ह्मणूनच तीर्थ ह्म० शास्त्राची सिद्धि होते ह्मणजे थोडा अल्प ग्रंथ शिकल्यानें पुष्कळ मोठी अर्थाची सिद्धि होते. अथवा तीर्थ ह्म० गुरु त्याची सिद्धि ह्म० तो शिष्यांनां शिकवितो त्या द्वारानें सिद्धि होते. किंवा तीर्थ ह्म० यज्ञ त्याची सिद्धि होते ह्म० यज्ञ केल्यापासून जी कार्य सिद्धि व्हावयाची ती सिद्धि ह्या ग्रंथानें होते, कारण तीर्थ ह्याचे अर्थ शास्त्र, यज्ञ, क्षेत्र, उपाध्याय, मंत्री इतके आहेत ॥ २ ॥

### ग्रंथाच्या उत्पत्तीचा काळ, आणि प्रार्थना.

त्र्यंकेंद्रप्रमिते वर्षे शालिवाहनजन्मतः ॥
कृतस्तपसि मार्तंडोऽयमलं जयतूद्गतः ॥ ३ ॥
पूर्ववाक्यार्थमादाय ग्रंथोऽयं रचितो लघुः ॥
पाठनार्थमशक्तानामंगीकार्यो बुधैर्मुदा ॥ ४ ॥

श्लोकार्थ—शालिवाहनाच्या जन्मापासून १४९३ ह्या वर्षांत माघ महिन्यांत मुहूर्तमार्तंड केला. हा नवीन रचलेला ग्रंथ बहूत जय पावो ॥ ३॥ पूर्वी ऋषींनीं केलेल्या मोठ्या ग्रंथांतील वाक्यांचा अर्थ घेऊन, अशक्तांनीं पठन करण्याकरितां हा लहान ग्रंथ रचिला आहे. ह्याचा विद्वज्जनांनीं प्रीतीनें स्वीकार करावा ॥ ४ ॥

अथ ग्रंथस्याशिषमनुष्टुभाऽऽह—त्र्यंकेति । शालिवाहनजन्मतः त्र्यंकेंद्र १४९३ प्रमिते वर्षे तपसि माघे मार्तंडो मुहूर्तमार्तंडः कृतः । नामैकदेशग्रहणे नामग्रहणं । अयं मुहूर्तमार्तंडोऽलमतिशयेन जयतु । यद्वा यमलं मार्तंडयुग्ममुद्गमुदयं प्राप्तं जयतु सर्वोत्कृर्षेणाऽस्तु ॥ ३ ॥ अथैतद्ग्रंथांगीकारार्थं बुधप्रार्थना— पूर्ववाक्यार्थमिति। सुगमम् ॥ ४ ॥ ॥ इति मुहूर्तमार्तंडव्याख्या समाप्ता॥

**टीकार्थ**–ह्या ग्रंथाचा आशीर्वाद अनुष्टुप्छंदानें सांगतो- शालिवाहन शकापासून त्रि ह्म० ३ अंक ह्म० ९ इंद्र ह्म० १४ बरोबर १४९३ ह्या वर्षी तप ह्म० माघ महिन्यांत हा मुहूर्तमार्तंड ग्रंथ केला आहे. मार्तंड असा नावाचा एकदेश घेतल्यानेंही संपूर्ण नावाचें ह्म० मुहूर्तमार्तंड असें ग्रहण करावें. हा ग्रंथ अत्यंत जय पावो "मार्तंडः अयं अलं" असा पदच्छेद करून हा अर्थ सांगितला आहे. 'मार्तंडः यमलं' अशीं दोन पदें करून हा मुहूर्तमार्तंड आणि टीका हें युग्म उदय पावो. ह्म० सर्व प्रकारांनीं ह्याचा उत्कर्ष होवो ॥ ३ ॥ पूर्वींच्या वाक्याचा अर्थ घेऊन हा लहानसा ग्रंथ तयार केला आहे. कारण मोठ्या ग्रंथाचें पठण आणि पाठण करण्यास जे असमर्थ असतील त्यानीं आनंदानें हा ग्रंथ स्वीकारावा ॥ ४ ॥

**आसीत्सासमणूरनामनगरे श्रीकौशिकस्यान्वयेऽनंतो वाजसनेयिपूज्यचरणो माध्यंदिनियाग्रणीः ॥ कृष्णस्तत्तनयः श्रुतिस्मृतिविदामग्रेसरेज्यो हरिस्तत्पुत्रः श्रुतिवित्तदात्मजवरोऽनंतोऽग्निहोत्री गुरुः॥१॥ तत्पुत्रस्तदनुग्रहात्तधिषणो नारायणष्टापरग्रामे शिष्यगणेच्छया निजकृतग्रंथस्य टीकां स्फुटाम् ॥ चक्रेऽस्यां कृपया परोपकृतये शोध्यं दुरुक्तं बुधैर्माद्दक्षहय विलोक्य धाष्टर्यमपि ते कुप्यंतु नो सज्जनाः ॥ २ ॥ सुखनिधिपुरुषार्थक्ष्मा १४९४ समाभिः समाभिः परिमितशककाले जातमार्तंडटीकाम् ॥ लिखति पठति विप्रः सोऽत्र भूयाद्धरित्र्यां सुखनिधिपुरुषार्थक्ष्माक्षमावान् क्षमावान् ॥ ३ ॥ ॥ इतिस्वकृतमुहूर्तमार्तंडटीका मार्तंडवल्लभाख्या समाप्ता ॥**

**अर्थ**–सासमणूर नावाच्या शहरामध्यें श्रीकौशिकाच्या वंशांत अनंत नावाचा पंडित होता तो वाजसनेयिलोकांकडून पूज्य असा असे आणि तो माध्यंदिन लोकांचा अग्रेसर असे, त्याचा पुत्र कृष्ण नावाचा होता. तो श्रुति आणि स्मृति जाणणाऱ्यांचा मोठा अग्रेसर होता, त्याचा मुलगा हरि नावाचा होता, तो वेद जाणणारा होता त्याचा मुलगा अनंत नांवाचा अग्निहोत्री गुरु असा होता॥ १ ॥त्याचा पुत्र त्याच्याच अनुग्रहानें विद्या संपन्न होऊन बुद्धिवान झालेला जो नारायण नांवाचा पंडित होता त्यानें टापर नांवाच्या गावीं शिष्यांच्या इच्छेस्तव आपण केलेल्या मुहूर्तमार्तंड ग्रंथाची स्पष्ट टीकाही आपणच केली आहे. ह्या टीकेंत जें कांहीं अशुद्ध असेल तें विद्वानानीं शुद्ध करावें आणि माझ्या सारख्यानें धाष्टर्य करून हा जो ग्रंथ तयार केला आहे त्याबद्दल विद्वानांनीं माझ्यावर क्रोध करूं नये ॥२॥ सुख ह्म० ४ निधि ह्म० ९ पुरुषार्थ ह्म० ४ क्ष्मा ह्म० १ ह्म० १४९४ शकामध्यें ही मार्तंडाची टीका तयार झाली आहे. हीचें जो पठण करितो आणि लेखन करितो तो ह्या पृथ्वीवर सुखाचा निधीरूपी जो पुरुषार्थ ह्म० मोक्ष, पृथ्वी, क्षमा, इत्यादिकांला प्राप्त होतो ॥३॥ अशा रीतीनें आपण केलेल्या मुहूर्तमार्तंडाची आपणच केलेली मार्तंडवल्लभा नांवाची टीका समाप्त झाली ॥ ॥ ॥

॥ अलंकारप्रकरण समाप्त ॥

